# वराहपुराण

प्र. न. जोशी

प्रसाद प्रकाशन



# प्रकाशकाचे निवेदन

'आपले वेद : आपली पुराणे' योजनेतील हा चौथा संच आज प्रकाशित होत आहे. या संचात अथर्ववेद, वामनपुराण, वराहपुराण व स्कंदपुराण (दोन भागांत) असे पांच ग्रंथ आहेत. राजकीय व्यवस्थेत महाराष्ट्राबाहेरील प्रदेशात पण सांस्कृतिकदृष्टचा मराठीच असलेल्या गोव्यात हा संच प्रकाशित होत आहे. याचा मला विशेष आनंद होत आहे.

योजनेचा वाचकवर्ग जेथे जेथे मराठी समाज आहे अशा सर्व ठिकाणी पसरलेला आहे. महाराष्ट्रात सर्वत्र, महाराष्ट्राबाहेर भारतातील जवळ जवळ सर्व ठिकाणी आणि आता भारताबाहेरही अनेक देशांत या योजनेचा वाचकवर्ग आहे. जेथे वाचकवर्ग खूप मोठ्या प्रमाणात आहे, अशी पांच शहरे निवडून तेथे तेथे जाऊन प्रकाशनसोहळा साजरा करावा असे मी ठरवले होते. त्याप्रमाणे नाशिक, मुंबई, नागपूर आणि पाठोपाठ चौथ्या संचासाठी पणजीची निवड करण्यात आली. आता पांचवा व शेवटचा संच मात्र पुण्यात प्रसिद्ध होईल. ह्या सर्व प्रकाशनसमारंभास उपस्थित राहाण्याचा संकल्पही अनेकांनी केलेला आहे. आजपर्यंतच्या तीन समारंभाप्रमाणेच चौथ्या समारंभास उपस्थित असणाऱ्या अशा वाचकांची संख्याही खूप मोठी आहे.

या सर्व उद्योगांतून व समारंभांतून मला मिळणारा आनंद हा फार मोठा आहे. 'प्रसाद'ने हाती घेतलेल्या प्रत्येक चांगल्या कामाचे मराठी चिकित्सक वाचकाने कौतुकच केले आहे. त्यामुळेच नवे नवे संकल्प करताना मला त्यांच्या यशाबद्दल कधीही शंका नसते. उलट

वाचकांच्या सक्रीय सहकाराची मनाशी खात्रीच असते. हा विश्वासच माझ्या हातून आणखी असेच भरीव प्रकाशनकार्य करून घेईल व वाचकांच्या प्रेमाने आणि परमेश्वरकृपेने ते सिद्धीस जाईल, याचीही मला खात्री आहे.

या संचाच्या प्रकाशनातही आजपर्यंतच्या सर्व सुहृदांचे मनापासून सहकार्य लाभले आहे व म्हणूनच ठरलेल्या वेळेत हा संच प्रकाशित होत आहे.

मनोहर य. जोशी

## लेखकाचे निवेदन

'आपले वेद आपली पुराणे' या लोकप्रिय ग्रंथमालेतील प्रस्तुतचे वराहपुराण वाचकांच्या हाती देताना अत्यंत संतोष होत आहे. गेल्या वर्षी म्हणजे फेब्रुवारी १९८३ मध्ये नागपूर येथे या ग्रंथमालेतील तिसरा संच (अग्निपुराण, भविष्यपुराण, ब्रह्मवैवर्तपुराण, लिंगपुराण व सामवेद) मोठ्या थाटात प्रसिद्ध झाला. आमच्या पंचवीस ग्रंथांपैकी आम्ही पंधरा ग्रंथ वेळेआधीच ग्राहकांना दिले असल्याने हिमालयाचा माथा चढून गेल्याचे श्रेय आम्हांस प्राप्त झाले. आता आमचा मार्ग उतरणीवरून सुरू झाला आहे. या चौथ्या संचात आम्ही वराहपुराण, स्कंदपुराण-पूर्वार्ध, स्कंदपुराण-उत्तरार्ध, वामनपुराण आणि अथर्ववेद असे पांच ग्रंथ वाचकांच्या हाती देत आहोत.

आपल्या प्राचीन परंपरेत पुराणांचा धागा वेदकालापासून मिळतो. अठरा महापुराणे, अठरा उपपुराणे, यांचा प्रचंड विस्तार, त्यात वेळोवेळी पडलेली भर, त्यांतील पाल्हाळ व पुनरुक्ती आणि मुख्यतः संस्कृत भाषा; यांमुळे पुराणांतील सांस्कृतिक धन आजपर्यंत सर्वसामान्य लोकांच्या कक्षेत आले नव्हते. मूळ संस्कृत पुराणेही सहजासहजी उपलब्ध होत नाहीत. त्यांच्या अवाढव्य विस्तारामुळे ती वाचणेही अशक्य बनते. म्हणून त्यांचे रूपांतर आजच्या भाषेत करण्याची ही योजना सर्वांनाच पसंत पडली. या ग्रंथमालेतील पुराणे ही मूळ संस्कृतातील पुराणांचे अक्षरशः भाषांतरे नाहीत. निवडक विषयांची पुन्हा रचना करून, पुनरुक्ती टाळून, मूळ कथानकास वा निरूपणास धक्का लागणार नाही, अशा हेतूने या ग्रंथांची मांडणी केलेली आहे. माझे स्वतःचे असे या पुराणग्रंथात काहीही नाही, हे कबूल करणे अगत्याचे

आहे. संस्कृत विद्येचे संशोधक, प्राचीन संस्कृतीचे अभ्यासक यांच्यासाठी हा उपक्रम नाही हे स्पष्टच आहे.

संतबोध, संतचरित्रे, संतकार्य, यांच्या चिंतनात व मननात निम्मे आयुष्य गेल्यावर मी संतवाङमयातील अनेक संदर्भ उपनिषदांत व पुराणांत शोधू लागलो. 'अष्टादशपुराणें । तींचि मणिभूषणें' असे पुराणांविषयी श्रीज्ञानेश्वर का म्हणतात, याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला. घरी बहुतेक सर्व पुराणे होतीच. त्यांच्या अभ्यासात गेली आठ-दहा वर्षे गेली. या अभ्यासातून ही पुराणग्रंथमाला आकारास आली. 'प्रसाद' प्रकाशनचे श्री. मनोहर य. जोशी यांची कुशलतापूर्वक दृष्टी भक्कम पाया म्हणून या योजनेस लाभली. पुराणांचे हे नवदर्शन वाचकांना पसंत पडले आहे, असे वाटते. पुराणांतील चमत्कार, विकृत संकल्पना, अघटित प्रसंग, पाल्हाळ आणि मुख्यतः आजच्या या नव्या काळात पुराणांच्या दर्शनाचा उपयोग; यांसंबंधी एक समालोचनात्मक ग्रंथ याच मालेत वाचकांच्या हाती शेवटी देण्याचा आमचा संकल्प आहे, हे कळविण्यास विशेष आनंद होतो.

या वराहपुराणाचे रूपांतर करताना मला प्रामुख्याने गीताप्रेस गोरखपूर यांच्या 'संक्षिप्त वराहपुराणांक' या ग्रंथाचे साह्य विशेष-रूपाने झाले आहे.

'रेणुका' लक्ष्मीपार्क,
नवीपेठ, पुणे ३०.

— प्र. न. जोशी
जानेवारी ८४

# वराहपुराणपरिचय

## सर्व विश्वाचे मंगल व्हावे

दंष्ट्राग्रेणोद्धता गौरुदधिपरिवृता पर्वतैर्निम्नगाभिः ।
साकं मृत्पिण्डवत् प्राग्बृहदुरुवपुषानन्तरूपेण येन ।।
सोऽयं कंसासुरारिर्मुरनरकदशास्यान्तकृत् सर्वसंस्थः ।
कृष्णो विष्णुः सुरेशो नुदतु मम रिपूनादिदेवो वराहः ।।
(१.३)

ज्या अनंतरूप भगवान विष्णूंनी प्राचीन काळी समुद्रांनी घेरलेल्या वन पर्वत व नद्या यांच्यासहित पृथ्वीस आपल्या अत्यंत विशाल शरीराने व केवळ दाढांच्या अग्रभागावर मातीच्या एखाद्या ढेकळाप्रमाणे धारण केले, ते कंस, मुर, नरक, रावण आदी असुरांचा नाश करणाऱ्या कृष्ण व विष्णुरूपाने सर्वत्र व्याप्त देवदेवेश्वर आदिदेव भगवान वराह माझ्या सर्व बाधा, कामक्रोधादी शत्रू यांना नष्ट करील. सर्व विश्वाचे मंगल त्यांनी करावे.

## वराहांचा अवतार

विष्णूंच्या या तिसऱ्या अवताराने हिरण्याक्ष नावाच्या असुराचा वध करून धरणीस मुक्त केले. यासच यज्ञवराह असे दुसरे नाव आहे. ऋग्वेदात वृत्र व वराह एकरूप दिसतात. उदकात लपलेल्या वृत्रास, वराहास इंद्राने आपल्या वज्राने मारल्याचा उल्लेख ऋग्वेदात आहे. वराह हा प्रजापतीचा अवतारही म्हटले आहे. समुद्राच्या पाण्यात बुडालेली पृथ्वी प्रजापतीने वराहरूप धारण करून वर काढल्याचा उल्लेख वैदिक साहित्यात येतो. पुराणग्रंथांतून मात्र वराह हा भगवान विष्णूंचा तिसरा अवतार म्हणून प्रसिद्ध आहे. हिरण्याक्ष नावाचा दानव पृथ्वीसह समुद्रात गेला. तेव्हा विष्णूंनी वराहरूप धारण करून पृथ्वीस आपल्या दाढांनी उचलून पाताळातून वर आणले. तिची स्थापना

शेषाच्या मस्तकावर केली. वायुपुराणानुसार विष्णूचा हा अवतार वराह-कल्पाच्या प्रारंभी झाला असून तो चतुर्बाहू, चतुष्पाद, चतुर्मुख, चतुर्नेत्र असल्याचा उल्लेख पुराणांतून येतो.

या वराहाच्या मूर्ती भारतात अनेक ठिकाणी दृष्टीस पडतात. धड माणसाचे, मस्तक वराहाचे, दाढांवर पृथ्वी धारण केलेली, असे साधारणपणे या वराहाचे रूप असते.

## वराहपुराणाची श्लोकसंख्या

आज उपलब्ध असलेले वराहपुराणाचे अध्याय दोनशेसतरा आहेत. आणखी वरेच अध्याय लुप्त झाले असावेत, असा जाणत्यांचा तर्क आहे. नारदीय पुराणाने वराहपुराणाचे श्लोक चोवीस हजार असल्याचे सांगितले आहे. अग्निपुराणाने ही श्लोकसंख्या चौदा हजारांची दिली आहे. एशियाटिक सोसायटी व वेंकटेश्वरप्रेस यांच्या वराह-पुराणांत ही श्लोकसंख्या केवळ दहा हजारांची आहे. वराहपुराणाचा उत्तरभाग अप्राप्य असावा. अथवा हे पुराण वाढत वाढत चोवीस हजार श्लोकांपर्यंत गेले असावे. आज उपलब्ध असलेल्या वराहपुराणाचे दोनशेसतरा अध्याय आहेत. दोनशेअठराव्या अध्यायात अनुक्रमणिका आहे. दोनशेसतराव्या अध्यायानंतर उत्तरभागाच्या रूपाने वराहपुराण वाढले असावे. शेवटच्या दोनशेसतराव्या अध्यायात म्हटले आहे,

पुलस्त्यो वक्ष्यते शेषं यदतोऽन्यन्महामुने ।
सर्वेषामेव तीर्थानामेषां फलविनिश्चयम् ।
कुरुराजं पुरस्कृत्य मुनीनां पुरतो वने ।।

(२१७.४-५)

## वराहपुराणाचे कथारूप

एक महापुराण म्हणून या वराहपुराणास मान्यता असून विष्णु-पुराणातील सूचीप्रमाणे हे बारावे व देवीपुराणानुसार हे अकरावे पुराण आहे. विष्णूंच्या वराहावताराने पृथ्वीस हे प्रामुख्याने सांगितले आहे. या पुराणाचा प्रारंभीचा श्लोक असा आहे,

**नमस्तस्मै वराहाय लीलयोद्धरते महीम् ।**
**खुरमध्यगतो यस्य मेरुः खणखणायते ।।**

लीलेने पृथ्वीचा उद्धार करणाऱ्या वराहांना नमस्कार असो. त्यांच्या पायांच्या मध्ये सापडलेला मेरू खणखण असा आवाज करीत असतो, असा या श्लोकाचा भावार्थ आहे. या पुराणाचे नेहमीप्रमाणे स्कंद, कांड, पर्व इत्यादी विभाग नसून सरळ अध्याय क्रमानुसार आले आहेत. सर्ग-प्रतिसर्गादी स्वरूपही याचे फारसे नाही. पृथ्वीने प्रश्न विचारल्यावरून भगवान वराहांनी तिला नाना प्रकारच्या कथा, व्रतकथा, नाना प्रकारची माहात्म्ये, नाना प्रकारची तीर्थस्थाने समजावून दिली आहेत. वेदमाता सावित्रीची कथा, नारदांचा पूर्वजन्म, महर्षी कपिल व जैगीषव्य, राजा वसूचे आख्यान, रैभ्यमुनींचे ऊर्ध्वलोकगमन, मत्स्यांचा अवतार, राजा दुर्जय आणि गौरमुखमुनी, राजा सुप्रतीकाची कथा, महातपाचे आख्यान, अश्विनीकुमारांची उत्पत्ती, गौरीची उत्पत्ती व रुद्रांची तपस्या, गौरीचा शंकरांशी विवाह, गणेश, सर्प, कार्तिकेय, आदित्य, मातृका, दुर्गादेवी, आठ दिशा, कुबेर, विष्णू, धर्म, रुद्र, पितर, चंद्र इत्यादींच्या उत्पत्ति-कथा, राजा प्रजापालाचे आख्यान, आरुणी, व्याध व राजा दीर्घबाहू यांची कथा, पशुपालाचे आख्यान, सृष्टिदेवीचे आख्यान, महिषासुर व देवासुरसंग्राम, महिषासुरवध, रुरूदैत्याचा वध, ब्राह्मणकुमारीची मुक्ती, सांबाची सूर्याराधना, शत्रुघ्नाचे आख्यान, अगस्तीचा उद्धार, नचिकेताचे आख्यान, राक्षसयमदूतसंघर्ष, पतिव्रतेचे आख्यान; अशा विविध कथांच्या वा आख्यानांच्या उपस्थितीने वराहपुराण समृद्ध बनले आहे.

## आणि व्रतांचा हा सागर

इतर पुराणांप्रमाणेच याही पुराणात विविध काम्यव्रतांचा परिचय कथेच्या माध्यमातून करून दिलेला आहे. प्रत्येक तिथीचे माहात्म्य व तिची व्रतकथा, मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंह, वामन, परशुराम इत्यादी दशावतारांच्या द्वादशीव्रतकथा वराहपुराणात विस्ताराने आल्या आहेत. यानंतर धरणीव्रत, उत्तम पतीच्या प्राप्तीसाठी व्रत, शुभव्रत, धन्यव्रत, कांतिव्रत, सौभाग्यव्रत, विघ्नव्रत, शांतिव्रत, कामव्रत, आरोग्यव्रत,

पुत्रप्राप्तीव्रत, शौर्य व सार्वभौमव्रत, तिलधेनुमाहात्म्य, जलधेनू, रसधेनू यांचे दानमाहात्म्य, गुडधेनुदानविधी, शर्करा व मधुदानविधी, क्षीरधेनू, दधिधेनू यांचे दानविधी, नवनीतधेनू, लवणधेनू यांचे दानविधी, कार्पासधेनू, धान्यधेनू, कपिलाधेनू यांचे दानविधी; अशा अनेक व्रतांच्या व माहात्म्यांच्या कथा या पुराणात विस्ताराने आल्या आहेत.

## स्थानमाहात्म्यांचे वैभव

इतर काही पुराणांप्रमाणेच याही पुराणात विविध तीर्थक्षेत्रांचा परिचय विस्ताराने आला आहे. कोकामुखतीर्थ ( वराहक्षेत्र), हरिद्वारमाहात्म्य, कुब्जाम्रकतीर्थं (हृषीकेश), वराहक्षेत्राचा महिमा, आदित्यतीर्थ, कोकामुख-बदरीचे माहात्म्य, बदरिकाश्रमाचा महिमा, मंदाराचे महत्त्व, सोमेश्वरलिंग, मुक्तिक्षेत्र (मुक्तिनाथ), त्रिवेणीमाहात्म्य, शालग्रामक्षेत्र महिमा, कुरुक्षेत्र, गोनिष्क्रमणतीर्थ, स्तुतस्वामी, द्वारकामाहात्म्य, सानंदूरमाहात्म्य, लोहार्गलक्षेत्रमहत्त्व, मथुरातीर्थाचे सविस्तर वर्णन, वृंदावनाचे महत्त्व, कपिलवराहाचे माहात्म्य, गोवर्धनपर्वतमहिमा, असिकुंडतीर्थ, विश्रांतितीर्थमाहात्म्य, गोकर्णतीर्थ, सरस्वतीचा महिमा, ध्रुवतीर्थ, गोकर्णेश्वरमाहात्म्य; अशा अनेक क्षेत्रांचा व तीर्थस्थानांचा कथात्मक परिचय हे पुराण देते.

## वराहपुराणातील भूगोल

इतर अनेक पुराणांपेक्षा वराहपुराणात भारताच्या भौगोलिक कक्षांचे वा स्थानांचे वर्णन विशेष प्रकारचे आहे. नेपाळमधील मुक्तिनाथ, वागमती इत्यादींचे उल्लेख याच पुराणात येताना दिसतात. 'पौण्ड्रवर्धननेपाले पीठे नयननोर्युगे' असा उल्लेख हे पुराण करते. सुवर्णकौशिकी, कृष्णा, गंडकी या नद्या हिमालयाच्या परिसरातील आहेत. महादेवी गौरी, शंकर यांच्या शिखरांचे उल्लेख आहेत. 'शिखरं वै महादेव्या गौर्यास्त्रैलोकविश्रुतम्' असे दोनशेपंधराव्या अध्यायात म्हटले आहे. 'गौर्यास्तु शिखरं पुण्यं गच्छेत् सिद्धनिषेवितम् । तस्य सालोकान्मायाति दृष्ट्वा स्पृष्टाऽभिवाद्य च' असाही उल्लेख वराहपुराणात आहे. वराहपुराणाच्या संदर्भात हिमालयाचा भूगोल कोणी तज्ज्ञाने तपासण्यासारखा आहे.

व्रजमंडल व मथुरापरिसर या क्षेत्राचेही वर्णन या पुराणाने सविस्तर दिले आहे. व्रजातील विविध वने व त्यांची नावे, रेणुकाक्षेत्र, किरातवन, इत्यादींचे संदर्भ तपासून पाहाण्यासारखे आहेत. गोवर्धन, महावने, उपवने, यमुना, कृष्णगंगा, चरणगंगा, मानसीगंगा, गुप्तसरस्वती इत्यादी नद्यांचे संदर्भ आहेत. नंदीश्वर, चरणपहाडी, यमुनातट, आदि-वराह, श्वेतवराह, वराहदेव, गोपीवराहदेव, कपिलवराहदेव, अशा अनेकांचे माहात्म्य वराहपुराणानुसार पाहाण्यासारखे आहे.

मेरूपर्वताचे वर्णन, जंबूद्वीपाचे वर्णन, मंदरादी पर्वतांची वर्णने, भारतवर्षादी प्रदेश, विविध द्वीपे, नद्या इत्यादींची चांगली माहिती वराहपुराण देते. नाना प्रकारचे जलाशयही या पुराणाने समजावून दिले आहेत. सीता, सुवाहिनी, हंसवती, कासा, महावक्रा, चंद्रवती, कावेरी, सुरसा, आख्यावती, इंद्रवती, हरितोया, सोमावर्ता, वनमाला, वसुमती, सुपर्णा, मणिवप्रा, शैवालिनी, मणितटा, रत्नाक्षा, महाकदंबा, मानसी, श्यामा, सुमेधा, दर्भवती, प्रभंजना, कुशावती, ककुपद्मिनी, करंटका, गंगा, सिंधू, शतद्रू, वितस्ता, चंद्रभागा, इरावती, लोहिता, शोण, ज्योतिरथा, नर्मदा, मंदाकिनी, पिप्पला, करतोया, पिशाचिका, मणिजाला, तापी, पयोष्णी, वैतरणी, दुर्गा, गोदावरी, तुंगभद्रा, ताम्र-पर्णी, उत्पलावती, ऋषिकुल्या, लांगूलिनी, ऋपिका, सुकुमारी, पलाशिनी; अशा अनेक पवित्र नद्यांचे दर्शन या पुराणात होते. असेच अनेक पर्वत, अनेक जनपदे यांचेही संदर्भ पाहण्यासारखे आहेत.

## वराहपुराणातील वराहक्षेत्र

भगवान विष्णूंचा तिसरा अवतार वराहांचा. महावराह, श्वेत-वराह, यज्ञवराह अशीही नावे यांची आहेत. वराहालाच सूकर म्हणतात. भगवान वराहांचे, सूकरांचे क्षेत्र कोणते ? वराहपुराण म्हणते,

**यत्र भागीरथी गंगा मम सौकरवे स्थिता।**
**यत्र संस्था च मे देवि ह्युद्धृतासि रसातलात् ।।**

(१३७.७)

सूकरक्षेत्र म्हणजे सौकरवक्षेत्र. हे गंगेच्या तटावर आहे. येथे

वराहांची मंदिरे आहेत. आणि हे स्थान सौकरव या नावाशी संबंधित आहे. हे सौकरवक्षेत्र उत्तरप्रदेशातील 'सोरो' या नगराशी संबंधित असावे, असा तज्ज्ञांचा शोध आहे. हे स्थान गंगेच्या तटावर आहे. येथे वराहांचे मंदिर आहे. सौकरव या शब्दापासून 'सोरो' हा शब्द निघाला असावा असे तज्ज्ञांचे निरीक्षण आहे. हे स्थान सर्व स्थानांत महत्त्वाचे व मोक्ष देणारे आहे. वराहपुराणात म्हटले आहे,

**परं कोकामुखं स्थानं तथा कुब्जाम्रकं परम् ।**
**परं सौकरवं स्थानं सर्वसंस्थानमोक्षणम् ।।**

(अध्याय १४५)

## सुभाषितांचे अमृततुषार

आचारधर्म, तत्त्वज्ञान, क्षेत्रमाहात्म्ये वर्णन करताना वराहपुराण मधूनमधून सुभाषितवजा सुंदर अर्थगर्भ वाक्ये पेरताना दिसते. 'सुरूपां परनारीं तु दृष्ट्वा चक्षुर्निमीलयेः । परद्रव्येषु मा लोभोऽन्यायोपार्जितेषु च– सुंदर अशा परस्त्रीला पाहून डोळे मिटून घ्यावेत. अन्यायाने मिळविलेल्या व दुसऱ्याच्या धनाचा लोभ धरू नये' (१३७.१९३), 'सत्यमूलं जगत्सर्वं लोकाः सत्ये प्रतिष्ठिताः– सर्व जगत सत्यमूलक आहे. सर्व लोक सत्याच्या आश्रयाने प्रतिष्ठित आहेत.' (१३८.१५५), 'चित्तं नाशो हि लोकस्य चित्तं मोक्षस्य कारणम्– चित्त हे माणसांना नाश-कारक असते. तसेच ते मोक्षकारकही आहे'(१४२.२८), 'मात्सर्यं सर्व-नाशाय मात्सर्यं धर्मनाशकम्– दुसऱ्याचा मत्सर केल्यास सर्वनाश होतो. त्याने धर्माचाही नाश होतो' (१४८.३५), 'वित्तेनापि विहीनस्य कुटुम्बभरणं कुतः ? मनुष्य द्रव्यहीन झाला की त्याच्या हातून कुटुंबपोषण कसे होणार ?' (१५२.५५)

# अनुक्रमणिका

## १ प्रास्ताविक



## २ कथा–उपकथा

## ३ तीर्थक्षेत्रमाहात्म्य

## ४ सृष्टिरचना



## ५ सदाचारदर्शन

## ६. तत्त्वज्ञानदर्शन

## ७. उपसंहार व महिमा



## ८. स्तोत्रमंजूषा

# वराहपुराण

## १ प्रास्ताविक

**भगवान वराहांना नमस्कार**

नारायणं नमस्कृत्यं नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं व्यासं ततो जयमुदीरयेत् ।।
नमस्तस्मै वराहाय लीलयोद्धरते महीम् ।
खुरमध्यगतो यस्य मेरुः खणखणायते ।।
दंष्ट्राग्रेणोद्धृता गौरुदधिपरिवृता पर्वतैर्निम्नगाभिः ।
साकं मृत्पिण्डवत्प्रागबृहदुरुवपुषाऽनन्तरूपेण येन ।।
सोऽयं कंसासुरारिर्मुरनरकदशास्यान्तकृत्सर्वसंस्थः ।
कृष्णो विष्णुः सुरेशो नुदतु मम रिपुनादिदेवो वराहः ।।
(१.१-४)

अंतर्यामी नारायणस्वरूप भगवान वराह, नररत्न नरऋषी, त्याच्या लीला प्रकट करणारी भगवती सरस्वती आणि वक्ते भगवान व्यास यांना नमस्कार असो. आसुरी संपत्तीचा नाश करून अंतः-करणावर विजय मिळविणाऱ्या वराहपुराणाचा पाठ करावा. ज्यांनी लीलापूर्वक पृथ्वीचा उद्धार करताना खुरांत सापडलेल्या सुमेरूपर्वतावर खण, खण, असा आवाज केला, त्या भगवान वराहांना नमस्कार असो.

ज्या अनंतरूप भगवान विष्णूंनी प्राचीन काळी समुद्रांनी घेरलेली, वने, पर्वत व नद्या यांच्यासह पृथ्वीस अत्यंत विशाल अशा शरीराने आणि आपल्या दाढांच्या अग्रभागांवर मातीच्या गोळ्याप्रमाणे धारण

व...२

केले, त्या भगवान वराहांनी माझ्या सर्व बाधा दूर कराव्यात. कंस, मुर, नरक, रावण इत्यादी असुरांचा नाश करणारे कृष्ण, विष्णू यांच्यांत व्यापून असणारे हेच भगवान वराहदेव आहेत.

## पृथ्वीची प्रार्थना

फार पूर्वी केव्हा तरी जेव्हा सर्वव्यापी भगवान नारायणांनी वराहरूप धारण करून आपल्या शक्तीने एकार्णवाच्या अनंत जलराशीत निमग्न झालेल्या पृथ्वीचा उद्धार केला तेव्हा पृथ्वीने विचारले,

'प्रभो, आपण प्रत्येक कल्पात सृष्टीच्या आदिकाळी या प्रकारे माझा उद्धार करता. परंतु केशवा, मी अजून आपल्या स्वरूपास वा सृष्टीच्या प्रारंभीच्या विषयास मात्र जाणू शकले नाही. वेद लुप्त झाले तेव्हा आपण मत्स्यरूप धारण करून समुद्रात शिरलात व तेथून वेदांचा उद्धार करून ते आपण ब्रह्मदेवांना दिलेत. मधुसूदना, जेव्हा देव व दानव एकत्र होऊन समुद्राचं मंथन करू लागले, तेव्हा आपण कूर्माचा म्हणजे कासवाचा अवतार धारण करून आपल्या पाठीवर मंदराचलास धारण केलंत. भगवन्, आपण सर्व जगताचे स्वामी आहात. जेव्हा मी स्वतःच जलात बुडून गेले तेव्हा आपण रसातलातून सर्वत्र जल पसरलं असताना मला दाढांवर धारण करून माझा उद्धार केलात.

'त्यानंतर जेव्हा वरदानामुळं हिरण्यकशिपूस असीम अभिमान झाला आणि तो पृथ्वीवर अनेकांना उपद्रव देऊ लागला, तेव्हा आपणच त्याला मारलंत. देवाधिदेवा, प्राचीन काळी आपणच जमदग्निनंदन परशुरामांच्या रूपानं अवतीर्ण होऊन मला क्षत्रियरहित केलंत. भगवन्, आपणच क्षत्रियकुलात दाशरथी रामांच्या रूपानं अवतीर्ण झालात व क्षत्रियोचित पराक्रम करून रावणास नष्ट केलंत. आणि वामनरूपानं आपणच बलीस बद्ध केलंत. प्रभो, आपण मला जलातून काढून या सृष्टीची रचना कशी केलीत ? याचं कारण तरी काय ? आपल्या या लीलेचं रहस्य तरी काय ?

'विभो, मला जलाबाहेर काढून आपण सृष्टीच्या पालनाची व्यवस्था तरी काय केलीत ? सृष्टीचा आरंभ तरी कसा होतो ? अखेर

कशी होते ? चार युगांची गणना कशी होते ? महेश्वरा, कोणत्या युगाची कोणती प्रधानता ? कोणत्या युगात आपण लीला करता ? यज्ञात रस घेणारे राजे तरी किती झाले ? किती जणांना सिद्धी पाप्त झाली ? प्रभो, आपण प्रसन्न व्हावं आणि मला यासंबंधी संक्षेपानं सांगावं."

पृथ्वीचे हे बोलणे ऐकून सूकररूपी भगवान हसू लागले. तेव्हा त्यांच्या उदरात जगद्धात्री पृथ्वीस महर्षीसह रुद्र, वसू, सिद्ध व देवांचे समुदाय दिसू लागले. सूर्य, चंद्र, ग्रह, सात लोक यांनाही तिने पाहिले. हे सर्व पाहून एका भयानक विस्मयाने पृथ्वीचे अंग कापू लागले. पृथ्वी भयभीत झालेली पाहून वराहांनी बोलणे बंद केले. तेव्हा पृथ्वीने त्यांचे चतुर्भुज रूप महासागरात शेषनागाच्या शय्येवर पाहिले. त्यांच्या नाभीतून कमल प्रकट झाले होते. चार भुजांच्या परमेश्वरास पाहून पृथ्वी हात जोडून म्हणाली, 'भगवन्, आपण अंगावर पीतांबर धारण केला आहे. स्मरण करताच आपण भक्तांची पापं दूर करता. आपणांस वारंवार नमस्कार असो. देवांचे द्वेषी दैत्यांचा नाश करणाऱ्या आपणांस नमस्कार असो. जे शेषनागावर शयन करतात, ज्यांच्या वक्षःस्थलावर श्रीलक्ष्मी शोभा पावते, भक्तांना मुक्ती देण्याचा ज्यांचा स्वभाव आहे, जे सर्व देवांचे देव आहेत; अशा आपणांस वारंवार नमस्कार असो. प्रभो, आपल्या हातांत खड्ग, चक्र आणि शार्ङ्गधनुष्य शोभा पावतात. आपणांवर जन्म आणि मृत्यू यांचा प्रभाव पडत नाही. आपल्या नाभिकमलातून ब्रह्मदेव प्रकट झाले आहेत. अशा आपणांस वारंवार नमस्कार असो. ज्यांचे अधर व करकमल लाल विद्रुममण्यांप्रमाणं सुशोभित आहेत, अशा जगदीश्वरांना नमस्कार असो. भगवन्, मी अगतिक नारी आपणांस शरण आले आहे. आपण माझं रक्षण करावं. जनार्दना, सघन नील अंजना (काळे काजळ) प्रमाणं श्यामल रूपाच्या आपल्या अवतारास पाहून मी भयभीत झाले आहे. शिवाय आपल्या शरीरात चराचर जगत पाहून मी पुन्हा भीतिग्रस्त झाले आहे. नाथा, आपण माझ्यावर दया करावी. महाप्रभो, आपण माझं रक्षण करावं.

'भगवान केशव माझ्या पायाचं, नारायण माझ्या कटिभागाचं,

माधव दोनही मांड्यांचं, भगवान गोविंद गुह्यांगाचं रक्षण करोत. विष्णू माझ्या नाभीचं आणि मधुसूदन माझ्या उदराचं रक्षण करोत. भगवान वामन वक्षःस्थलाचं आणि हृदयाचं रक्षण करोत. लक्ष्मीपती भगवान विष्णू माझ्या कंठाचं, हृषीकेश मुखाचं, पद्मनाभ नेत्रांचं आणि दामोदर मस्तकाचं रक्षण करोत.' अशा रीतीने भगवंतांच्या नामांचा आपल्या अंगावर न्यास करून पृथ्वीने 'भगवान विष्णू, आपणांस नमस्कार असो.' अशी प्रार्थना करून मौन धारण केले.

# २. कथाउपकथा

## नारदांना सावित्रीचे दर्शन

सर्व जीवधारींच्या शरीरांत आत्मारूपाने स्थित असलेले भगवान श्रीहरी पृथ्वीच्या भक्तीने संतुष्ट झाले. त्यांनी वराहरूप धारण करून पृथ्वीस आपल्या योगमायेचे दर्शन घडविले. त्यांनी तिला विभिन्न सर्गांचे स्वरूप समजावून दिले. सृष्टीचा विस्तार समजावून सांगितला. युगाचे माहात्म्य सांगितले, या संदर्भात त्यांनी तिला एक प्राचीन कथा निवेदन केली.

प्रथम कल्पात स्वायंभुवमनूचे राज्य होते. त्याला दोन पुत्र झाले. धर्मात श्रद्धा ठेवणारा महाभाग प्रियव्रत असे एकाचे नाव होते. दुसरा उत्तानपाद या नावाने प्रसिद्ध होता. प्रियव्रत तपोबल असून महान यज्ञशाली होता. त्याने अनेक प्रकारचे महायज्ञ करून भगवान श्रीहरींचे यजन केले. त्याने सातही द्वीपांत आपल्या भरतादी सात पुत्रांना अभिषिक्त केले. त्यानंतर तो विशाला नगरीस, बदरिकाश्रमास जाऊन तपस्या करू लागला. महाराज प्रियव्रत राजा चक्रवर्ती होता. धर्माचे

अनुष्ठान करणे हा त्याचा स्वाभाविक धर्म होता. तो तपस्येत लीन झाला तेव्हा त्याला भेटण्याच्या इच्छेने स्वतः नारदमुनी तेथे आले. ते आकाशमार्गाने तेथे उपस्थित झाले. त्यांचे तेज सूर्याप्रमाणे चमकत होते. त्यांना पाहून प्रियव्रतास मोठा हर्ष झाला. त्याने त्यांना आसन, पाद्य, नैवेद्य अर्पण करून त्यांचा सत्कार केला. थोडीफार चर्चा झाल्या-वर प्रियव्रताने ब्रह्मवादी नारदांना म्हटले,

'नारदमुनी, आपण महान पुरुष आहात. या सत्ययुगात आपण एखादी अद्‌भुत घटना ऐकली असेल, पाहिली असेल तर ती मला सांगावी.'

'महाराज, मी एक आश्चर्यजनक घटना पाहिली आहे. ऐकावी. काल मी श्वेतद्वीपास गेलो होतो. तिथं मला एक सरोवर दृष्टीस पडलं. त्या सरोवरात अनेक कमळं फुलली होती. त्याच्या तटावर एक विशाल नेत्रांची कन्या उभी होती. त्या कन्येस पाहून मी मोठचा आश्चर्यात पडलो. तिची वाणीही मधुर होती. मी तिला विचारले, 'भद्रे, तू कोण आहेस ? या स्थानी तू निवास कसा करतेस ? इथं तुझं काम तरी काय आहे ?' मी इतकं म्हणत आहे तोच त्या कन्येनं माझ्याकडं एकटक नेत्रांनी पाहिलं. पण ती गप्प का राहिली हे मला समजलं नाही. तिला पाहाताच माझं सारं ज्ञान कुठं गेलं, याचंही ज्ञान मला झालं नाही. राजन्, संपूर्ण वेद, समस्त शास्त्रं, योगशास्त्र, वेदांची शिक्षादी अंगं यांना त्या किशोरीनं माझ्यावर दृष्टिपात करून अपहृत केलं. तेव्हा मी शोकानं आणि चिंतेनं ग्रस्त होऊन महान विस्मयात सापडलो. अशा अवस्थेत मी त्या कुमारीस शरण गेलो. इतक्यात मला त्या कुमारीच्या शरीरात एक दिव्य पुरुष दृष्टीस पडला. त्या पुरुषाच्या हृदयात दुसरा पुरुष दिसला. या दुसऱ्याच्या हृदयात तिसरा पुरुष मला दिसला. याचे नेत्र लाल असून तो बारा सूर्यांप्रमाणं तेजस्वी होता. अशा रीतीनं मी त्या कन्येच्या हृदयात तीन पुरुषांना पाहिलं. क्षणानंतर तिथं मी ती कन्याच तेवढी पाहिली. ते तीन पुरुष अदृश्य झाले होते. तेव्हा मी त्या किशोरीस विचारलं, 'भद्रे, माझं संपूर्ण वेदज्ञान कसं नष्ट झालं ?' तेव्हा ती म्हणाली, 'मी समस्त वेदांची माता आहे. माझं नाव सावित्री

आहे. तू मला ओळखलं नाहीस. म्हणून मी तुझं सर्व वेदज्ञान अपहृत केलं. ' राजन्, त्यानंतर मी विस्मय-विमुग्ध होऊन तिला विचारलं, ' शोभने, ते पुरुष कोण होते ? कृपा करून मला तू सांग ना.'

तेव्हा ती कुमारी म्हणाली, ' माझ्या शरीरात विराजमान होणाऱ्या पुरुषाचं जे दर्शन तुला झालं, त्यांतील सर्वांगांनी सुंदर असणाऱ्या पुरुषाचं नाव ऋग्वेद आहे. हे स्वतः भगवान नारायणांचं स्वरूप आहे. तो अग्निमय आहे. याचा सस्वर पाठ केला की, सर्व पापं त्वरित भस्म होतात. त्याच्या हृदयात जो दुसरा पुरुष तू पाहिलास, त्याची उत्पत्ती त्या पहिल्या पुरुषापासून झाली. हे यजुर्वेदाचं रूप असून तो महाशक्तिशाली ब्रह्मदेव आहे. त्याच्या हृदयातील पुरुषाचं नाव सामवेद आहे. हे भगवान शंकरांचं रूप होय. त्यांचं स्मरण केलं की ते सूर्याप्रमाणं सर्व पापं त्वरित नष्ट करतात. ब्रह्मन्, तुला दिसलेली ही तीन रूपं तीन वेदांची होती. नारदा, तू ब्रह्मपुत्रांचा शिरोमणी व सर्वज्ञानसंपन्न हो. नारदा, असा हा सर्व वृत्तान्त मी तुला सांगितला. आता तू सर्व वेदांचं, शास्त्रांचं ज्ञान प्राप्त करून घे. या वेदसरोवरात तू स्नान कर. इथं स्नान केल्यानं तुला आपल्या पूर्वजन्माचं स्मरण होईल.' राजन्, इतकं म्हणून ती कन्या अंतर्धान पावली. मग मी त्या सरोवरात स्नान केलं आणि तुला भेटण्यासाठी इथं आलो आहे.'

## नारदांचा पूर्वजन्मवृत्तांत

नारदांनी इतके म्हटल्यावर प्रियवत राजा त्यांना म्हणाला, ' भगवन्, आपण पूर्वजन्मी जे कार्य केलंत ते मला समजावून सांगावं. देवर्षी, मला ऐकण्याची भारी उत्कंठा आहे.' असे म्हटल्यावर नारद त्याला म्हणाले, ' राजेन्द्र, कुमारी सावित्रीचं ऐकून मी त्या सरोवरात स्नान केलं. त्याच वेळी मला हजारो जन्मांची स्मृती जागृत झाली. आता तू माझ्या पूर्वजन्माचा वृत्तांत ऐक. अवंती नावाची एक पुरी आहे. त्या नगरीत मी पूर्वजन्मी निवास करणारा एक श्रेष्ठ ब्राह्मण होतो. त्या जन्मी माझं नाव सारस्वत होतं. सर्व वेद व वेदांगं यांचं ज्ञान मला सम्यक् होतं. राजन्, ही दुसऱ्या सत्ययुगाची हकीगत आहे. त्या वेळी

माझ्याजवळ अनेक सेवक होते. धन-धान्याची अतूट समृद्धी होती. भगवंतांनी उत्तम बुद्धी दिली होती. एकदा मी एकांतात बसून विचार करू लागलो की, हे जगत द्वंद्वस्वरूप आहे. यात सुख-दुःख, हानिलाभ, इत्यादींचं चक्र नेहमी चालत असतं. मला या जगाचं देणंघेणं तरी काय आहे ? म्हणून मी माझी सर्व सांसारिक धनसंपदा पुत्रांवर सोपवून तपस्या करण्यासाठी त्वरित सरस्वतीनदीच्या तटावर जावं असं माझ्या मनात आलं. हे सर्व तत्काल करावं की काय ? अशा जिज्ञासेनं मी भगवंतांना प्रार्थना केली. मी त्यांच्या आज्ञेनुसार श्राद्धद्वारे पितरांचं, यज्ञद्वारे देवांचं, दानानं अन्य लोकांचं समाधान केलं. राजन्, त्यानंतर मी आता पुष्करतीर्थ या नावानं विख्यात असलेल्या सारस्वततीर्थाकिडं गेलो. तिथं जाऊन मी परम मंगलमय पुराणपुरुष भगवान विष्णूंच्या नारायणमंत्राचा– ॐ नमो नारायणाय– या मंत्राचा जप करून ब्रह्मपार नावाच्या उत्तम स्तोत्राचा पाठ केला. मी भक्तिपूर्वक आराधना केली. तेव्हा प्रसन्न होऊन स्वतः श्रीहरी प्रत्यक्ष रूपात माझ्यासमोर प्रकट झाले. ते मेघासारख्या गंभीर वाणीने म्हणाले, ' वर माग.'

' तेव्हा मी प्रभूंच्या शरीरात विलीन होण्याची इच्छा व्यक्त केली. माझी विनंती ऐकून त्या सनातन देवेश्वरांनी मला म्हटले, ' ब्रह्मन्, आता तू शरीर धारण कर. कारण त्याची आवश्यकता आहे. तू आता तपस्या करण्याआधी पितरांना ' नार ' म्हणजे जल– दान केलं आहेस म्हणून तुझं नाव नारद होईल.'

**नारं पानीयमित्युक्तं पितॄणां तद्ददौ भवान् ।**
**तदाप्रभृति ते नाम नारदेति भविष्यति ।।**

(३.२३)

' इतकं म्हणून भगवान नारायण त्वरित माझ्या डोळ्यांपुढून अदृश्य झाले. समय येताच मी ते शरीर सोडून दिलं. तपस्येच्या प्रभावानं मी मृत्यूनंतर ब्रह्मलोकास गेलो. राजन्, त्यानंतर ब्रह्मदेवांचा पहिला दिवस सुरू झाल्यावर त्यांच्या दहा मानसपुत्रांत मी एक झालो. राजा, हा माझ्या प्राकृत जन्माचा प्रसंग आहे. राजेन्द्रा, भगवान नारायणांचं

ध्यान करूनच मला लोकगुरूचं पद प्राप्त झालं आहे. म्हणून तूही श्रीहरिपरायण व्हावंस.'

## महर्षी कपिल आणि जैगीषव्य

पृथ्वीनें भगवान वराहांना एकदा विचारले, 'भगवन्, जो सनातन, देवाधिदेव, परमात्मा नारायण आहे, तेच भगवानांचं परिपूर्णतम स्वरूप आहे. नाही ? आपण या संबंधी थोडं विस्तारानं सांगावं.' तेव्हा भगवान वराह म्हणाले, 'समस्त प्राण्यांना आश्रय देणाऱ्या पृथ्वी, मत्स्य, कूर्म, वराह, नरसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण, बुद्ध व कल्की; हे दहा अवतार त्याच सनातन परमात्म्याची स्वरूपं सांगितली आहेत. शोभने, यांचं साक्षात दर्शन करणाऱ्यांना ही रूपं सोपानाप्रमाणं आहेत. त्यांचं परिपूर्णतम रूप पाहाण्यास देवही असमर्थ आहेत. ते माझ्या व इतर अवतारांच्या रूपांचं दर्शन घेऊनच आपली मनःकामना पूर्ण करतात. ब्रह्मदेव त्यांचीच रजोगुण व तमोगुणमिश्रित मूर्ती आहेत. त्यांच्या साह्यानंच श्रीहरी जगताची रचना करतात. त्याचं संचालन करतात. धरणी, तू त्याच भगवान नारायणांची आदिमूर्ती आहेस. त्यांची दुसरी मूर्ती जल आहे. तिसरी मूर्ती तेज आहे. चौथी वायू व पांचवी आकाशरूपी आहे. यांशिवाय क्षेत्रज्ञ, बुद्धी व अहंकार; याही त्यांच्याच मूर्ती आहेत. अशा प्रकारे त्यांच्या आठ मूर्ती आहेत. हे सर्व जगत भगवान नारायणांनी ओतप्रोत आहे. आता तुला कोणता प्रसंग ऐकायचा आहे ?'

'भगवन्,' पृथ्वी म्हणाली, 'श्रीहरिपरायण झाल्यानंतर राजा प्रियव्रतानं काय केलं ?' याही प्रश्नाचे उत्तर भगवान वराहांनी सविस्तर दिले. मुनिवर नारदांची विस्मयजनक गोष्ट ऐकून राजा प्रियव्रतास महान आश्चर्य वाटले. परमात्मा नारायणांचा जप करताना त्याची बुद्धी नारायणांत स्थिर झाली. देहत्याग करून तो परमधामास गेला. यानंतर वराहांनी ब्रह्मदेवांसंबंधीचा एक प्रसंग सांगितला.

प्राचीन काळात अश्वशिरा नावाचा एक परम धार्मिक राजा होता. त्याने अश्वमेधयज्ञ करून भगवान नारायणांचे यजन केले होते.

त्यात त्याने खूप दक्षिणा वाटली. यज्ञाच्या समाप्तीनंतर राजाने अवभृथस्नान केले. त्यानंतर तो ब्राह्मणांबरोबर चर्चा करीत असताना तेथे भगवान कपिलदेव आले. त्यांच्याबरोबर योगिराज जैगीषव्यही होते. त्यांना पाहाताच राजा अश्वशिरा त्वरेने उठला व त्याने अत्यंत हर्षाने त्यांचा सत्कार केला. त्या दोनही मुनींचे त्याने विधिवत स्वागत केले. पूजन होऊन ते मुनी आसनस्थ झाले. तेव्हा महापराक्रमी राजा अश्वशिराने त्यांना विचारले,

'आपण दोघे अत्यंत तीक्ष्ण बुद्धीचे आणि योगाचे आचार्य आहात. आपण कृपापूर्वक स्वतः येऊन मला दर्शन दिलंत. आपण मनुष्यांत श्रेष्ठ ब्राह्मणदेवता आहात. आता मी भगवान नारायणांची आराधना कशी करावी, हे मला सांगावं.'

'राजन्, तू नारायण कुणाला समजतोस? आम्ही तर दोन नारायण तुझ्यासमोर प्रत्यक्ष रूपात उपस्थित आहोत.'

'आपण दोघेही ब्राह्मण आहात. आपणांस सिद्धी प्राप्त झाली आहे. तपस्येनं आपलं पापही नष्ट झालं आहे; हे मी मानतो. पण 'आम्ही दोघं नारायण आहोत' असं आपण कसं म्हणता? भगवान नारायण तर देवांचेही देव आहेत. शंख, चक्र, गदा यांनी त्यांचे हात अलंकृत आहेत. ते पीतांबर धारण करतात. गरुड त्यांचं वाहन आहे. या जगतात त्यांची बरोबरी कोण करणार?'

कपिल आणि जैगीषव्य, हे दोघे ऋषी कठोर व्रताचे पालन करणारे होते. ते राजा अश्वशिराचे हे बोलणे ऐकून हसू लागले. ते म्हणाले, 'राजन, तू विष्णूंचं दर्शन घे.' असे म्हणून कपिल त्याच क्षणी विष्णू बनले. जैगीषव्यांनी गरुडाचे रूप धारण केले. त्या वेळी राजांच्या समूहात हाहाकार उडाला. गरुडवाहन सनातन भगवान नारायणांना पाहून महायशस्वी राजा अश्वशिरा हात जोडून म्हणू लागला,

'विप्रवर, आपण दोघांनी शांत व्हावं. भगवान विष्णू असे नाहीत. ज्यांच्या नाभिकमलातून ब्रह्मदेव प्रकट झाले आहेत, ते रूप परमप्रभू भगवान विष्णूंचं आहे.'

कपिल आणि जैगीषव्य; हे दोघे मुनींत श्रेष्ठ होते. राजा अश्व-

शिराचे बोलणे ऐकून त्यांनी योगमायेचा विस्तार केला. आता कपिलदेव पद्मनाभ विष्णूंच्या व जैगीषव्य प्रजापती ब्रह्मदेवांच्या रूपात परिणत झाले. कमलावर ब्रह्मदेव सुशोभित झाले. आणि त्यांच्यापासून कालाग्नीच्या सारख्या लाल नेत्रांचे परम तेजस्वी रुद्र प्रकट झाले. राजाने मनाशी विचार केला असेल, कदाचित ही त्या योगीश्वरांची माया असेल. कारण योगीश्वर अशा रीतीने सहजासहजी दृष्टिगोचर होऊ शकत नाहीत. सर्वशक्तिमान श्रीहरी तर सर्वत्र विराजमान असतात. राजा अश्वशिरा या प्रकारे विचार करीत असतानाच ढेकूण, डांस, भ्रमर, पक्षी, सर्प, घोडे, गायी, हत्ती, वाघ, सिंह, कोल्हे, हरिण; इत्यादी कोटयवधी ग्राम्य व वन्य पशू राजभवनाच्या चारही दिशांना दिसू लागले. तेथे जीवजंतूंच्या झुंडीच्या झुंडी पाहून राजाच्या आश्चर्यास सीमा उरली नाही. आता आपण काय करावे या प्रश्नात राजाचे मन गुंतून राहिले.

एवढ्यात एका गोष्टीचे स्मरण त्याला झाले. त्याच्या ध्यानात आले की, हे तर परम बुद्धिमान कपिल व जैगीषव्य मुनींचे माहात्म्य आहे. त्यानंतर राजा अश्वशिराने हात जोडून त्या ऋषींना भक्तिपूर्वक अंत:करणाने विचारले,

'विप्रवर, हा काय प्रकार आहे ?'

'राजन्, आम्हां दोघांना तू भगवान श्रीहरींच्या आराधनेचा मार्ग विचारलास. महाराज, म्हणून आम्ही तुला हे दृश्य दाखविलं. राजन्, सर्वत्र भगवान श्रीहरींची ही त्रिगुणात्मक सृष्टी आहे. जी तुला दृष्टिगोचर झाली, ती व भगवान नारायण एकच आहे. ते आपल्या इच्छेस अनुसरून अनेक रूपं धारण करतात. जेव्हा ते आपल्या अनंत तेजोराशीस आत्मसात करून सौम्यरूप धारण करतात, तेव्हा मनुष्यांना त्यांचं त्या रूपात दर्शन होतं. म्हणून नारायणांची अव्यक्त रूपातील आराधना तूर्त फलदायी होत नाही. तो जगत्प्रभू परमात्माच सर्वांच्या शरीरांत विराजमान झालेला असतो. भक्तीचा उदय झाल्यावर आपल्या शरीरातच त्याचा साक्षात्कार होऊ शकतो. तो परमात्मा एखाद्या स्थानविशेषात राहातो, असं नाही. तो तर सर्वव्यापक आहे. महाराज,

या निमित्तानं आम्हा दोघांच्या प्रभावानं तुझ्यासमोर हे दृश्य उपस्थित केलं आहे. याचं प्रयोजन हे आहे की, भगवानांच्या सर्वव्यापकतेवर तुझी आस्था दृढ व्हावी. राजन्, याच प्रकारे या तुझ्या मंत्र्यांच्या, सेवकांच्या शरीरांतही भगवान श्रीहरी विराजमान आहेत. राजा, आम्ही जे देव, कीटक, पशू यांचे समूह आता दाखविले, ते सर्वच्या सर्व विष्णुरूपच आहेत. भगवान श्रीहरीच सर्वांत व्याप्त आहेत. त्यांच्या समान दुसरा कुणीच नाही. राजन्, या प्रकारे मी सत्यज्ञानाचं वर्णन केलं आहे. आता तू आपल्या परिपूर्ण भावनेनं भगवान नारायणांचं, जे सर्वांचे गुरू आहेत, त्यांचं स्मरण कर. धूप-दीपादींनी पूजा करून ब्राह्मण व पितर यांना तृप्त कर. ध्यानात चित्त रमीव. भगवान नारायण त्वरित सुलभ होतील.'

## रैभ्य, राजा वसू, संयमन आणि निष्ठुरक

त्यानंतर राजा अश्वशिरा मुनिवरांना म्हणाला, 'मुनींनो, माझ्या मनात एक संदेह आहे. तो दूर करण्यास आपण दोघे पूर्णपणे समर्थ आहात. त्याचं फलरूप म्हणजे मुक्ती मला सुलभ होईल.' यावर योगीश्वर, परम धर्मात्मे कपिलमुनी म्हणाले, 'राजन्, तू परम धार्मिक आहेस. तुझ्या मनात कोणता संदेह आहे ? सांग तर. मी तो दूर करीन.' तेव्हा राजा म्हणाला, 'मुने, मोक्ष मिळविणारा अधिकारी कर्मशील पुरुष असतो की ज्ञानी असतो ? माझ्या मनात असा संदेह आहे.' त्यावर कपिलांनी त्याना एक प्राचीन आख्यान सांगितले.

हाच प्रश्न पूर्वी ब्रह्मदेवांचे पुत्र रैभ्य आणि राजा वसू यांनी बृहस्पतीला विचारला होता. पूर्वी चाक्षुषमन्वन्तरात एक अत्यंत प्रसिद्ध राजा होता. त्याचे नाव वसू होते. तो मोठा विद्वान व दानशूर होता. ब्रह्मदेवांच्या वंशात त्याचा जन्म झाला होता. ब्रह्मदेवांचे दर्शन घेण्यासाठी राजा वसू ब्रह्मलोकास निघाला. मार्गातच चित्ररथ नावाच्या विद्याधराची व त्याची भेट झाली. राजाने प्रेमाने चित्ररथास विचारले,

'प्रभो, ब्रह्मदेवांचं दर्शन कोणत्या वेळी होतं ?'

'ब्रह्मदेवांच्या सभेत या वेळी देवांची सभा होत आहे.' चित्ररथाने सांगितले.

याच वेळी तपस्वी रैभ्यही तेथे आले. नरेशही ब्रह्मभवनाच्या दारात उभा होता. तपस्वी रैभ्यांना पाहून राजा वसूचे मन प्रसन्न झाले. त्याच्या रोमरोमात आनंद प्रकटला. रैभ्यमुनींची पूजा करून त्याने विचारले,

'मुने, आपण कुठं निघालात ?'

'राजा, मी देवगुरू बृहस्पतींकडून आलो आहे. काही विषयासंबंधी विचारण्यासाठी त्यांच्याकडं गेलो होतो.' रैभ्यमुनी असे सांगत असतानाच ब्रह्मदेवांची ती विशाल सभा विसर्जित झाली. सर्व देव आपापल्या स्थानी निघून गेले. आता बृहस्पतीही तेथे आले होते. राजा वसूने त्यांचे चांगले स्वागत केले. त्यानंतर ते तिघेही बरोबरच बृहस्पतींच्या भवनावर आले. तेथे रैभ्य, बृहस्पती व राजा वसू बैठकीवर बसले. देवगुरू बृहस्पतींनी रैभ्य मुनींना म्हटले,

'महाभाग, आपणांस तर वेद आणि वेदांगं यांचं संपूर्ण ज्ञान आहे. सांगा. मी तुमच्यासाठी काय करू ?'

'बृहस्पती,' रैभ्यमुनी म्हणाले, 'कर्मशील व ज्ञानसंपन्न या दोहोंतील मोक्षाचा अधिकारी कोण आहे ? या संदेहात आम्ही आहोत. प्रभो आपण या प्रश्नाचा उलगडा करावा.'

बृहस्पतींनी या संदेहाचे निराकारण केले. मनुष्याने शुभ वा अशुभ जे काही कर्म केले असेल ते सर्व भगवान नारायणांना समर्पित केले तर तो कर्मफलांनी लिप्त होत नाही. यासंबंधी एक ब्राह्मण व एक व्याध यांचा संवाद ऐकण्यासारखा आहे. अत्रिवंशात उत्पन्न झालेला एक ब्राह्मण होता. त्याला वेदांच्या अभ्यासात मोठीच रुची होती. तो प्रातःकाळी, मध्यान्हसमयी व संध्याकाळी, असे त्रिकाल स्नान करी. संयमन या नावाने तो प्रसिद्ध होता. एके दिवशी हा ब्राह्मण धर्मारण्यक्षेत्रातील परमपुण्यमयी गंगानदीच्या तटावर स्नान करण्याच्या उद्देशाने गेला. तेथे त्याने निष्ठुरक नावाच्या एका व्याधास पाहिले. तो त्या व्याधास म्हणाला,

'भद्र, तू हे निंद्य कर्म करू नकोस.'

'द्विजवर,' व्याध त्याला हसून म्हणाला, 'सर्व जीवधारींत आत्मारूपानं राहून स्वत: भगवंतच क्रीडा करीत असतात. मायाजाल जाणणारा मनुष्य जसा मंत्र म्हणून मायेचा प्रयोग करतो, तसाच प्रभूही मायेचा खेळ करतो, यात शंका नाही. विप्रवर, मोक्षाची इच्छा करणाऱ्यानं कधी आपल्या मनात अहंभावास थारा देऊ नये. हे सर्व जगत आपल्या जीवनयात्रेच्या प्रयत्नात असतं. या कामी 'मी कर्ता आहे' असा अहंभाव असणं उचित नाही.' विप्राने निष्ठुरक नावाच्या व्याधाचे हे बोलणे नीट लक्षपूर्वक ऐकले. अत्यंत आश्चर्यचकित होऊन तो म्हणाला,

'भद्र, तू असं युक्तिसंगत कसं बोललास ?'

ब्राह्मणाचा हा प्रश्न ऐकून धर्माचे मर्म जाणणारा व्याध पुन: बोलू लागला. नंतर त्याने एक लोखंडाचे जाळे बनविले. ते फैलावून त्याच्याखाली त्याने सुकलेली लाकडे टाकली. त्यानंतर त्याने ब्राह्मणाच्या हातात अग्नी देऊन म्हटले, 'आर्य, या लाकडांच्या ढिगास आग लावा ना.' त्यानंतर ब्राह्मणाने मुखाने फुंकर घालून अग्नी प्रज्वलित केला, आणि तो शांत होऊन बसला. आग भडकू लागली तेव्हा लोखंडाचे जाळेही तापले. त्यावर गायीच्या डोळ्यांप्रमाणे जी छिद्रे होती, त्यांतून निघालेली ज्वाळा हंसाच्या पिलांसारखी श्रेणीबद्ध होऊन शोभा पावू लागली. त्या जळणाऱ्या अग्नीच्या हजारो ज्वाला वेगवेगळ्या प्रकट होत राहिल्या. व्याधाने विचारले,

'मुनिवर, आपण यांतील कोणतीही एक ज्वाला मनात धरा. मी उरलेल्या ज्वाळा शांत करीन.'

असे म्हणून व्याधाने जळणाऱ्या आगीवर जलाने भरलेला एक घडा त्वरित फेकला. नंतर ती आग एकाएकी शांत झाली. सारे दृश्य पूर्ववत झाले. व्याधाने तपस्वी संयमनास म्हटले, 'भगवन्, आपण जी जळणारी ज्वाळा धारण केली आहे, ती याच अग्निपुंजापासून प्राप्त झालेली आहे. ती आपण मला द्यावी. तिच्या साह्यानं मी आपली जीवनयात्रा संपन्न करीन.' व्याधाने असे म्हटल्यावर ब्राह्मणाने त्या

लोखंडाच्या जाळ्याकडे पाहिले. तेव्हा तेथे अग्नी नव्हताच. ती तर त्या पुंजीभूत अग्नीबरोबरच शांत झाली होती. तेव्हा कठोर व्रताचे पालन करणाऱ्या संयमनाचे डोळे मिटले गेले. तो मौन होऊन बसला. या स्थितीत तो असताना व्याध म्हणाला,

'विप्रवर, आताच थोड्या वेळापूर्वी आग धगधगत होती. ज्वालांना तशी मर्यादाही नव्हती. पण मूळ आग शांत होताच सर्व ज्वाळा शांत झाल्या. अशाच प्रकारचं हे जगत आहे. परमात्माच प्रकृतीच्या संयोगानं समस्त प्राण्यांच्या आश्रयानं विराजमान होतो. हे जगत प्रकृतीत विक्षोभ, विकार उत्पन्न होण्यानं प्रादुर्भूत होतं. म्हणून जगताची अशी स्थिती आहे. जीवात्मा जर शरीर धारण करून आपल्या स्वभावधर्मानुसार अनुष्ठानपूर्वक सदा हृदयस्थ परमात्म्याशी संयुक्त राहील, तर त्यास कोणत्याही प्रकारच्या कर्मांचा विषाद प्राप्त होणार नाही.''

अशी ही कथा सांगून बृहस्पती म्हणाले, 'राजेन्द्रा, निष्ठुरक व्याध व संयमन ब्राह्मण यांची अशी चर्चा होत असतानाच व्याधावर आकाशातून पुष्पांचा वर्षाव होऊ लागला. लागलीच तेथे दिव्य विमान येत असल्याचे द्विजश्रेष्ठ संयमनाने पाहिले. ती सर्व विमाने चांगली विशाल असून नाना प्रकारच्या रत्नांनी सुसज्जित होती. ती त्या निष्ठुरकास नेण्यासाठी आली होती. त्यानंतर विप्रवर संयमनानं त्या सर्व विमानांत तो निष्ठुर व्याध मनोऽनुकूल उत्तम रूप धारण करून वसलेला पाहिला. कारण निष्ठुरक व्याध अद्वैतब्रह्माचा उपासक होता. त्याच्या योगाची सिद्धी सुलभ होती. म्हणून यानं आपली अनेक शरीरं बनविली. हे दृश्य पाहून संयमनाच्या मनात मोठी प्रसन्नता निर्माण झाली. तो आपल्या स्थानावर निघून गेला. म्हणून द्विजवर रैभ्य आणि राजा वसू, आपल्या वर्णाश्रमधर्मानुसार कर्म करणारी कोणतीही व्यक्ती निश्चयानं ज्ञान प्राप्त करून घेते आणि मुक्तीची अधिकारी बनते. राजन्, हा प्रसंग ऐकून रैभ्य व वसूच्या मनात जो संदेह होता तो संपला. ते दोघे बृहस्पतीच्या भवनाहून आपापल्या आश्रमाकडं गेले. म्हणून राजेंद्रा, तूही प्रभू भगवान नारायणांची उपासना करून अभेद बुद्धीनं त्या परमप्रभू

परमेश्वराची अनुभूती घे.'

हे सर्व आख्यान सांगून वराह पृथ्वीस म्हणाले, 'पृथ्वी, मुनिवर कपिलांचं हे बोलणं ऐकून राजा अश्वशिरानं आपल्या यशस्वी ज्येष्ठ पुत्रास, स्थूलशिरास बोलाविलं आणि त्याला राज्यावर बसवून तो वनात निघून गेला. नैमिषारण्यात पोचून त्यानं तिथं यज्ञमूर्ती भगवान नारायणांचं स्तवन केलं. त्यानं उपासना सुरू केली.' हे ऐकून पृथ्वी म्हणाली, 'परम शक्तिशाली प्रभो, राजा अश्वशिरानं यज्ञपुरुष भगवान नारायणांची उपासना कशी केली ? कोणत्या स्तोत्रानं केली ?' तेव्हा भगवान वराह म्हणाले,

'राजा अश्वशिरानं यज्ञमूर्ती भगवान नारायणांची स्तुती करताना म्हटलं, 'सूर्य, चंद्र, अग्नी, इंद्र, रुद्र आणि वायू इत्यादींच्या रूपांत जे विराजमान आहेत, त्या यज्ञमूर्ती भगवान श्रीहरींना माझा नमस्कार असो. ज्यांना अत्यंत भयंकर दाढा आहेत, सूर्य व चंद्र हे दोन नेत्र ज्यांना आहेत. संवत्सर आणि दोन अयनं ज्यांचं उदर आहे, कुशसमूहच ज्यांची रोमावली आहे, त्या प्रचंड शक्तिशाली यज्ञस्वरूपास, सनातन श्रीहरींना मी प्रणाम करतो. स्वर्ग व पृथ्वी यांच्यामधील आकाश व सर्व दिशा ज्यांनी परिपूर्ण आहेत, अशा परम आराध्य, सर्वशक्तिसंपन्न, सर्व जगाचं उत्पत्तिकारण असणाऱ्या सनातन श्रीहरींना मी प्रणाम करतो.

'ज्यांच्यावर कधीच दानव व देव यांचं प्रभुत्व स्थापन होत नाही, जे प्रत्येक युगात विजयी होतात, ज्यांचा कधीच जन्म होत नाही, जे स्वतःच जगताची रचना करतात, त्या यज्ञधारी परम प्रभू भगवान नारायणांना मी नित्य नमस्कार करतो. जे महातेजस्वी श्रीहरी शत्रूंवर विजय प्राप्त करून घेण्यासाठी महामायामय परम प्रकाशयुक्त जाज्वल्य-मान सुदर्शनचक्र धारण करतात, आणि शाङ्र्गधनुष्य व शंखादींनी ज्यांच्या चारही भुजा सुशोभित असतात, त्या यज्ञरूपी भगवान नारायणांना माझा नित्य नमस्कार असो.

'जे कधी हजार शीर्षांचे, कधी महान पर्वताप्रमाणं शरीर धारण करणारे आणि कधी अणुरेणूसमान सूक्ष्म शरीराचे बनतात, त्या यज्ञ-

पुरुष भगवान नारायणांना मी सदा प्रणाम करतो. ज्यांना चार भुजा आहेत, ज्यांच्याकडून अखिल जगताची निर्मिती होते, अर्जुनाच्या रक्षणा-साठी ज्यांनी हातात चक्र धारण केलं आणि ते प्रलयकाळी कालाग्नीचं रूप धारण करतात, त्या यज्ञस्वरूप भगवान नारायणांना मी नित्य नमस्कार करतो. संसाराच्या जन्म-मृत्यूंच्या चक्रापासून मुक्ती मिळ-विण्यासाठी ज्या सर्वव्यापक पुराणपुरुष परमात्म्याची मानव पूजा करतात, आणि ज्यांच्या दर्शनासाठी योगी पुरुष ध्यानधारणा करतात, अशा यज्ञमूर्ती भगवान नारायणांना मी नित्य नमस्कार करतो.

'भगवान, ज्या समयी मला स्वतःच्या शरीरात आपल्या वास्तविक स्वरूपाचं दर्शन झालं, त्याच क्षणी मी माझं मन आपणास समर्पण केलं आहे. जगात आपणांशिवाय दुसरं काहीच नाही, अशी माझी खात्री पटली आहे.'

अशा प्रकारे राजा अश्वशिराने यज्ञमूर्ती भगवान नारायणांची स्तुती केली. एवढ्यात यज्ञवेदीतून एक अग्निशिखेप्रमाणे एक महान तेज प्रकट झाले. आता आपल्या शरीराचा त्याग करण्याच्या इच्छेने राजाने त्या तेजात शरीर समर्पण केले. तो यज्ञपुरुष भगवान नारायणांच्या तेजोमय रूपात विलीन झाला.

## वसुराजाचा जन्मांतरप्रसंग

बृहस्पतींचे वचन ऐकून राजा वसू आणि महाभाग रैभ्य यांच्या मनातील संदेह दूर झाला. यांच्या पुढल्या कार्याचे वर्णन भगवान वराहांनी पृथ्वीसाठी केले. राजा वसूने आपले राज्य नीट प्रकारे सांभाळून पुष्कळ यज्ञ केले आणि श्रीहरींचे यजन केले. त्याने देवदेवेश्वर भगवान नारायणांना यज्ञादी कर्मांनी संतुष्ट करून सर्व प्राण्यांत अभेददर्शनाची साधना प्रसन्न करून घेतली. राजा वसूने अशा रीतीने अनेक वर्षे राज्य करून, शेवटी निवृत्त होऊन, सर्व पुत्रांवर राज्यभार सोपवून तपस्या करण्यासाठी वनात प्रस्थान केले. तो तीर्थांत श्रेष्ठ अशा पुष्कर-तीर्थात पोचला. तेथे भगवत्परायण पुरुषांकडून भगवान केशवांची उपासना सदा होत होती. तेथे जाऊन काश्मीरनरेश राजर्षी वसूने

अत्यंत दीर्घ तपस्या करून आपले शरीर सुकवून टाकले. त्याचे मन भगवान नारायणांच्या आराधनेत एकरूप झाले. त्याने मोठ्या प्रेमाने 'पुण्डरीकाक्षपार' नावाच्या स्तोत्राचा जप केला. शेवटी तो पुंडरीकाक्ष भगवान श्रीहरींत विलीन झाला.

भगवान वराहांनी या पुंडरीकाक्षस्तोत्राचेही स्वरूप पृथ्वीस समजावून दिले. राजा वसू या स्तोत्राचा पाठ करीत असतानाच एक नीलवर्ण पुरुष मूर्तिमान होऊन त्याच्या शरीरातून बाहेर आला. तो दिसण्यात अत्यंत प्रचंड व भयंकर दिसत होता. त्याचे नेत्र लाल होते. एखाद्या जळत्या अंगाराप्रमाणे तो दिसत होता. तो दोनही हात जोडून म्हणाला,

'राजन्, सांग. मी काय करू ?'

'अरे, पण तू कोण आहेस ? तुझं इथं काम तरी काय आहे ? व्याधा, मला सर्व सांग बरं.'

'राजन्, प्राचीन काळातील हकीगत आहे. कलियुगात तू दक्षिण-दिशेस जनस्थान नावाच्या प्रदेशाचा राजा होतास. वीरवर, एकदा तू वन्य पशूंची शिकार करण्यासाठी जंगलात गेला होतास. त्या वेळी तुझ्याजवळ पुष्कळ घोडे होते. तुझा उद्देश हिंस्र प्राण्यांचा वध करण्याचा होता. पण मृगाचं रूप धारण करून हिंडणाऱ्या एका मुनीची शिकार तुझ्या मनात नसतानाही तुझ्या बाणानं साधली. तो मृग पृथ्वीवर पडताच, एक हरिण मारलं गेलं, याचा तुला आनंद झाला. पण जवळ जाताच तुला समजलं की, मृगरूप धारण करणारा तो एक ब्राह्मण आहे. ही घटना प्रस्रावणपर्वतावर घडली. त्या मृत ब्राह्मणास पाहून तुझी इंद्रियं व तुझं मन क्षुब्ध झाली.

'तू तिथूनच घरी आलास. तू ही घटना आणखी कोणास तरी सांगितलीस. या घटनेस काही दिवस झाल्यावर एके रात्री तू ब्रह्महत्येच्या भयानं कंपित होऊन जागा झालास. या हत्येच्या शांतीसाठी आता कोणता उपाय करू असा विचार तुझ्या मनात आला. तेव्हा तू भगवान नारायणांचं अनवरत चिंतन करून पवित्र द्वादशीपर्यंत शुद्ध

एकादशीचा उपवास केलास. दुसऱ्या दिवशी 'भगवान नारायण माझ्यावर प्रसन्न व्हावेत' या संकल्पानं तू विधिपूर्वक गोदान केलंस. यानंतर एके दिवशी उदरशूलाच्या असह्य वेदनेनं तू ग्रस्त झालास व तुझं प्राणपाखरू उडून गेलं. द्वादशीव्रत पुण्यकारक असूनही तुला मुक्ती प्राप्त होऊ शकली नाही.

'याचं कारण मी सांगतो ऐक. तुझ्या सौभाग्यवती राणीचं नाव नारायणी होतं. मृत्यूच्या वेळी जेव्हा तुझा प्राण जात होता, तेव्हा तुझ्या मुखातून तिच्या नावाचा उच्चार झाला. यामुळं तुला उत्तम गती मिळाली व तुला एक कल्पपर्यंत विष्णुलोकात निवास प्राप्त झाला. विष्णुलोकात तू जाण्यापूर्वी मी तुझ्या शरीरात स्थित होतो. मी या सर्व गोष्टी जाणतो. मी त्या वेळी एका भयंकर राक्षसाच्या रूपात होतो. तुला अपार कष्ट देण्याचा विचार मी केला होता. एवढ्यात भगवान विष्णूंचे पार्षद आले. त्यांनी मुसळांनी मला मारिले. त्यामुळे मी क्षीण होऊन तुझ्या रोमकूपांच्या मार्गांतून बाहेर पडलो.

'महाभागा, यानंतर ब्रह्मदेवांच्या एक अहोरात्र कल्पाचा अवधी समाप्त झाल्यावर महाप्रलय झाला. त्यानंतर सृष्टीचा आरंभ झाल्यावर या कल्पात तू काश्मीरचा राजा सुमनाचा पुत्र म्हणून जन्मास आलास. या जन्मीही मी तुझ्या रोमकूपांतून पुन्हा शरीरात प्रकट झालो. तू या जन्मीही यज्ञांची अनुष्ठानं केलीस. पण हे यज्ञजनित पुण्य मला तुझ्या शरीरातून बाहेर काढू शकलं नाही. कारण यांत भगवान विष्णूंच्या नामाचं उच्चारण झालं नाही. आता तू या पुंडरीकाक्षपारस्तोत्राचा पाठ केलास, त्याच्या प्रभावानं मी तुझ्या शरीरावरील रोमकूपांतून बाहेर आलो. राजेंद्रा, मी तोच ब्रह्मराक्षस आता व्याध बनून पुन्हा प्रकट झालो आहे. पुंडरीकाक्ष भगवान नारायणांचं हे स्तोत्र ऐकण्यापूर्वी माझी जी पापमयी मूर्ती होती, ती आता समाप्त झाली. मी आता तीपासून मुक्त झालो आहे. राजा, आता माझ्या बुद्धीत धर्माचा उदय झाला आहे.'

हा सर्व प्रसंग ऐकून राजाच्या मनात आश्चर्यास सीमा उरली नाही. मोठ्या आदराने त्याने त्या व्याधास म्हटले, 'व्याधा, तुझ्या

कृपेनं आज मला माझ्या पूर्वजन्माचं स्मरण झालं. तूही आज माझ्या प्रभावानं व्याध न राहून धर्मव्याध या नावानं प्रसिद्ध होशील. जो पुरुष या 'पुंडरीकाक्षपार' नावाच्या उत्तम स्तोत्राचं श्रवण करील, त्याला पुष्कर-क्षेत्रात उत्तम रीतीनं विधिपूर्वक स्नान करण्याचं फल प्राप्त होईल.'

यानंतर राजा वसू परम उत्तम विमानात आरूढ होऊन भगवान नारायणांच्या लोकात गेला व अनंत तेजोराशीत विलीन झाला.

## रैभ्यमुनींचे ऊर्ध्वलोकगमन

यानंतर पृथ्वीने विचारले, 'भगवन्, मुनिवर रैभ्यांनी वसूच्या सिद्धीची वार्ता ऐकून काय केलं?' तेव्हा भगवान वराह म्हणाले, 'तुला सांगतो सर्व.' तपोधन रैभ्यमुनींची सर्व वार्ता त्यांनी पृथ्वीस सांगितली. राजा वसूची सिद्धिप्राप्ती ऐकून रैभ्यमुनी पवित्र अशा पितृतीर्थास, गयेस गेले. तेथे त्यांनी भक्तिपूर्वक पितरांना पिंडदान केले. अशा रीतीने पिंडदान करून त्यांनी अत्यंत उग्र अशी तपस्या केली. त्या वेळी विमाना-वर आरूढ होऊन एक महायोगी त्यांच्यापाशी आला. त्याचे शरीर देदीप्यमान होते. याचे परम उज्ज्वल विमान सूर्याप्रमाणे तेजस्वी होते. विमानावरील तो तेजोमय पुरुषही परमाणुतुल्य असून त्या मुनींना म्हणाला,

'सुव्रता, तू कोणत्या उद्देशानं अशी उग्र तपस्या करीत आहेस?'

एवढे म्हणून तो सूक्ष्म पुरुष वाढू लागला. त्याने आपल्या शरीराने पृथ्वी व आकाशाचा मध्यभाग व्यापून टाकला. त्याच्या सूर्या-प्रमाणे तेजस्वी विमानानेही सर्व भूगोल व खगोल व्यापून टाकला. तेव्हा रैभ्यांनी आश्चर्ययुक्त होऊन त्या योगी पुरुषास विचारले,

'योगीश्वर, आपण कोण आहात? आपण मला कृपा करून सांगावं.'

'रैभ्य, मी ब्रह्मदेवांचा पुत्र सनत्कुमार आहे. रुद्र माझा ज्येष्ठ बंधू आहे. माझा निवास जनलोकात असतो. तपोधना, प्रेमानं वश होऊन मी आपणांपाशी आलो आहे. वत्स, तू ब्रह्मदेवांच्या सृष्टीचा विस्तार केला आहेस. तुम्ही धन्य आहात.'

'योगिराज, आपणांस माझा नमस्कार असो. हे सारं विश्वच आपलं रूप आहे. आपण प्रसन्न होऊन मजवर दया करावी. योगीश्वरा, सांगा, मी आपणांसाठी काय करू ? आताच आपण मला धन्य म्हटलंत, त्याचं रहस्य काय आहे ?'

सनत्कुमारांनी हे रहस्य समजावून सांगितले. ते म्हणाले, रैभ्य, आपण गयातीर्थात जाऊन, वेदमंत्रांचं उच्चारण करून, विधिपूर्वक पिंडदान करून पितरांना तृप्त केलं आहे. श्राद्धकर्माच्या अंगभूत व्रतांचं विधान, जप, हवन; इत्यादी विधी तुम्ही केले आहेत. म्हणून तुम्ही ब्राह्मणांत श्रेष्ठ आणि धन्यवादास पात्र आहात. याविषयी एक आख्यान आहे ते आपण ऐकावं.' असे म्हणून सनत्कुमारांनी एक आख्यान रैभ्यांना सांगितले.

विशाल नावाचा एक राजा होऊन गेला. त्याच्या नगरीचे नावही विशाला होते. तो राजा निःसंतान होता. शत्रूंचा पराभव करण्याची इच्छा मनात धारण करणाऱ्या त्या राजाने मनात पुत्रप्राप्तीची इच्छा केली. त्याने श्रेष्ठ ब्राह्मणांना बोलावून त्यांना पुत्रप्राप्तीचा उपाय विचारला. त्या ब्राह्मणांनी म्हटले, 'राजन्, तू पुत्रप्राप्तीसाठी गयेत जाऊन खूप अन्नदान करून पितरांना तृप्त कर. असं करण्यानं तुला अवश्य पुत्र होईल. तो महान दानी व सर्व भूमंडलावर शासन करणारा होईल.'

ब्राह्मणांचे हे बोलणे ऐकून विशाल नरेशास अत्यंत हर्ष झाला. सूर्य मघा नक्षत्रात आला तेव्हा त्या नरेशाने गयेस जाऊन नाना विधिविधाने करून भक्तिपूर्वक पितरांना पिंडदान केले. एवढ्यात त्याने आकाशात श्वेत, पीत व कृष्ण वर्णांच्या तीन पुरुषांना पाहिले. त्यांना पाहून राजाने विचारले,

'आपण कोण आहात ?'

'राजन्, मी तुझा पिता सित आहे.' श्वेत पुरुष सांगू लागला, 'माझं नावही सित (श्वेत) आहे. माझा वर्ण श्वेत आहे. माझी कर्मंही श्वेत म्हणजे उत्तम आहेत. माझ्याबरोबर हा लाल रंगाचा पुरुष दिसतो आहे, तो माझा पिता आहे. त्यानं मोठी निष्ठुर कर्मं केली आहेत. तो

ब्रह्महत्यारी व पापाचारी आहे. यानंतर हा तिसरा सज्जन तुझा प्रपितामह आहे. त्याचं नाव अधीश्वर आहे. तो कर्म व वर्ण यांच्या बाबतींत कृष्ण आहे. यानं पूर्वजन्मात अनेक वयोवृद्ध ऋषींचे वध केले आहेत. हे दोन पिता व पुत्र अवीची नावाच्या नरकात पडले आहेत. हे माझे पिता, त्यांचे पिता दीर्घकालात नरकात पडले होते. पण तू गयेत पिंडदान केल्यानं तिघांचीही मुक्तता झाली आहे. शत्रुदमन, पिंडदान करताना तू 'मी आपल्या पित्यास, पितामहास, प्रपितामहास तृप्त करण्यासाठी हे जल सर्मपित करतो.' असं म्हणून जल दिलंस. त्याच्या प्रभावानं आम्ही एकत्र येऊन इथं तुझ्यासमोर चर्चा करू शकतो. आता मी या गयातीर्थाच्या प्रभावानं पितृलोकात जात आहे. या तीर्थात तू पिंडदान केल्यानं तुझे पितामह, प्रपितामह आता उत्तम गतीस पावले आहेत. या गयातीर्थाचं माहात्म्यच असं आहे की, इथं पिंडदान करून पुत्र आपल्या ब्रह्महत्यारा पित्याचा उद्धार करू शकतो. वत्सा, त्यामुळंच या दोघांना, तुझे पितामह व प्रपितामह यांना घेऊन तुला पाहण्यासाठी इथं आलो आहे.'

इतके आख्यान सांगून सनत्कुमार रैभ्यमुनींना म्हणाले. 'यामुळंच रैभ्य, मी तुम्हांस धन्य म्हटलं. गयातीर्थात एकदा जाणं व तिथं पिंडदान करणं, हे परम दुर्लभ आहे. तुम्ही तर इथं प्रतिदिन उत्तम कार्याचं संपादन करता. मुनिवर, तुम्ही गदाधररूपात विराजमान असणाऱ्या साक्षात भगवंतांचं दर्शन घेतलं आहे. तुमच्या या पुण्याबद्दल मी आणखी काय सांगू ? द्विजवर, या गयाक्षेत्रात साक्षात गदाधर निवास करतात. म्हणून सर्व तीर्थांत याची प्रसिद्धी आहे.'

भगवान वराहांनी पृथ्वीस सांगितले, 'पृथ्वी, इतकं म्हणून महायोगी सनत्कुमार तिथून अंतर्धान पावले. तेव्हा मुनिवर रैभ्यांनी गदाधराची स्तुती करण्यास प्रारंभ केला.' रैभ्यमुनींनी केलेली ही गदाधरस्तुती शेवटी स्तोत्रमंजूषेत दिलेली आहे. मुनिवर रैभ्यमुनी महान बुद्धिमान होते. जेव्हा त्यांनी अशा प्रकारे गदाधरांची प्रार्थना केली तेव्हा ते त्यांच्यासमोर प्रकट झाले. त्यांची मूर्ती पीतांबराने सुशोभित होती. ते गरुडावर आरूढ झालेले असून त्यांच्या हातांत शंख, चक्र, गदा आणि पद्म ही आयुधे शोभत होती. ते तेथे येऊन मेघाप्रमाणे गंभीर वाणीने

म्हणाले,

‘ द्विजवर रैभ्य, तुमची भक्ती, स्तुती, तीर्थस्नानविधी यांनी मी संतुष्ट झालो आहे. आता तुमची काय अभिलाषा आहे, ती सांगा.’

‘ देवेश्वरा, आता मला तिथं सनक—सनंदन आदी मुनी राहतात त्या लोकात निवास करण्याची अनुज्ञा द्यावी. भगवन्, आपल्या कृपेनं मी अशा लोकांस जाण्याची इच्छा करीत आहे.’

‘ विप्रश्रेष्ठा, ठीक आहे. तसंच होईल.’

असे म्हणून भगवान अंतर्धान पावले. प्रभूंच्या कृपाप्रसादाने त्याच क्षणी रैभ्यमुनींना दिव्य ज्ञानाची प्राप्ती झाली. ते सनकादिकांच्या लोकात निघून गेले. भगवान श्रीहरींचे हे गदाधरस्तोत्र रैभ्यमुनींच्या मुखातून उच्चारिले गेले. जो मनुष्य गयातीर्थावर याचा पाठ करील, त्याला पिंडदानापेक्षा मोठ्या फलाची प्राप्ती होईल.

## भगवान मत्स्यांचा अवतार

नंतर पृथ्वीने विचारले, ‘ प्रभो, सत्ययुगाच्या आरंभी विश्वात्मा भगवान नारायणांनी कोणती लीला केली ? यासंबंधी सर्व माहिती आपण द्यावी.’ भगवान वराहांनी या प्रश्नाचे उत्तर देताना मत्स्यावताराची हकीगत सांगितली. सृष्टीच्या पूर्व काळात एकमात्र नारायण होते. त्यांच्या व्यतिरिक्त दुसरे काहीच नव्हते. एकाकी असल्याने आनंदविलास नव्हता. त्या प्रभूंना अनेक होण्याची इच्छा झाली. त्यांच्यांत अभावसंज्ञक ज्ञानमय संकल्पाची उत्पत्ती झाली. क्षणभरात त्यांच्या मनात सृष्टिरचनेचा संकल्प उठला. त्यांचे दोन भाग झाले. पहिला भाग ब्रह्मवादींनी चिंतिलेली ब्रह्मविद्या झाली. ती उमा नावाने प्रसिद्ध झाली. मनुष्यांत हीच श्रद्धा या नावाने निवास करते. दुसरी ॐकारद्वारे वाच्य अशी एकाक्षरी विद्या प्रकट झाली. तिनेच या भूलोकाची रचना केली. त्यानंतर भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनलोक इत्यादींची निर्मिती झाली.

भगवंतांनी अमूर्त व मूर्त सृष्टीची रचना केली. परमेश्वराच्या संकल्पाने या जगताची रचना झाली असल्याने सृष्टीस कल्प म्हटले

गेले. नंतर भगवान नारायण रात्रिकल्प आल्यावर निद्रामग्न झाले. त्यांना निद्रा लागल्यावर या तीनही लोकांत प्रलय झाला. रात्र समाप्त झाली. कमलनयन भगवान श्रीहरी जागे झाले. त्यांनी पुन्हा चारही वेदांची, मातृकांची आठवण केली. पण त्यांनी पाहिले की, त्यांच्याच आत्मस्वरूप जलात वेद बुडून गेले होते. त्यांना आता वेदांच्या उद्धाराची चिंता लागली. तेव्हा त्यांनी त्वरित मत्स्यरूपात अवतार धारण केला. विशाल सागरास प्रक्षुब्ध करून ते त्यात शिरले.

मत्स्यूमूर्ती श्रीहरी महासिंधूच्या अगाध जलसमूहात प्रवेश करताच महान पर्वताच्या रूपात प्रकाशित झाले. अशा देवश्रेष्ठाच्या मत्स्यावताराची देवांनी स्तुती करताना म्हटले., ' मत्स्यरूप धारण करणाऱ्या भगवान नारायणा, आपण शास्त्र जाणणाऱ्या पुरुषांनाही अगम्य आहात. हे सारं विश्व आपलंच अंग आहे. आपण अत्यंत मधुर स्वरांत वेदाचं गायन करता.विद्या व अविद्या ही दोनही आपलीच रूपं आहेत. आपणांस आमचं वारंवार वंदन असो. आपली अनेक रूपं आहेत. चंद्र व सूर्य हे दोन आपले सुंदर नेत्र आहेत. प्रलयकालीन समुद्र जेव्हा सर्व विश्वाला आप्लावित करतो, त्या वेळी आपण मात्र स्थिर असता. विष्णो, आपणांस प्रणाम असो. आम्ही आपणांस शरण आलो आहोत. आपण हे मत्स्यशरीर सोडून द्यावं व आमचं रक्षण करण्याची कृपा करावी. अनंत रूपं धारण करणाऱ्या प्रभो, सर्व जगतास आपण व्यापून आहात. आपणांशिवाय या जगात काहीही नाही. म्हणून आम्ही आपणांसच शरण आलो आहोत. पुंडरीकाक्ष, हे आकाश आपल्याच पुराणपुरुषाचा आत्मा आहे. चंद्र आपलं मन आणि अग्नी मुख आहे. देवाधिदेवा, शंभो, हे सारं जगत आपणांकडूनच प्रकाशित असतं. जरी आम्ही आपल्या भक्तीनं रहित असलो तरी आपण आम्हांस क्षमा करावी. देवेश्वरा, आपण सर्व जगाचं आश्रयस्थान आहात. आपल्या सनातन मधुरभाषी सुंदर स्वरयुक्त दिव्य रूपाशी या पर्वताकार अवताराचा काहीच मेळ बसत नाही. अच्युता, आपल्या सूर्यापेक्षा तेजस्वी प्रभेनं आम्ही संतप्त झालो आहोत. म्हणून आपलं हे रूप आवरून धरावं. भगवन्, आम्ही आपणांस शरण आलो आहोत. कारण सर्व जगास या रूपानं आपण

व्यापून टाकलेलं पाहून आमचं मन भयभीत झालं आहे. आपलं पूर्वरूप न दिसल्यानं आम्हांस असं जाणवत आहे की, आमच्या शरीरात आत्माच उरलेला नाही.'

देवांनी अशा रीतीने प्रार्थना केल्यावर मत्स्यरूपी भगवान नारायणांनी जलात निमग्न झालेल्या उपनिषदांचा, शास्त्रांसहित वेदांचा उद्धार केला. नंतर त्यांनी आपल्या नारायणरूपात स्थित होऊन देवांचे सांत्वन केले. भगवान नारायण जोपर्यंत सगुण साकाररूपात स्थित राहातात तोपर्यंत या जगाची सत्ता टिकते.

## राजा दुर्जय गौरमुखमुनींच्या आश्रमात

सत्ययुगातील गोष्ट आहे. सुप्रतीक नावाचा एक प्रसिद्ध व महान पराक्रमी राजा होता. त्याला दोन राण्या होत्या. त्या दोन परम मनोरम राण्या कोणत्याही बाबतीत एक दुसरीपेक्षा कमी नव्हत्या. त्यांतील एकीचे नाव विद्युत्प्रभा आणि दुसरीचे नाव कांतिमती होते. दोन राण्या असूनही त्या शक्तिशाली नरेशास संतान झाले नव्हते. तेव्हा राजा सुप्रतीक पर्वतांत श्रेष्ठ अशा चित्रकूटावर गेला. तेथे जाऊन त्याने निष्पाप अत्रिनंदन दुर्वासांची विधिपूर्वक आराधना केली. फार दिवस यत्न करून राजाने सेवा केली, तेव्हा ऋषी प्रसन्न झाले. राजास वर देण्यासाठी तत्पर होऊन ते काही म्हणत आहेत, एवढ्यात ऐरावतावर बसून देवराज इंद्र तेथे आला. तो चारही बाजूंनी देवसेनेने घेरला होता. तेथे येऊन इंद्र चूपचाप उभा राहिला. महर्षी दुर्वासांना इंद्राबद्दल स्नेह होता. पण इंद्राने त्यांना-प्रेम न दाखविल्याने ते रागावले व देवराज इंद्राला अत्यंत कठोर शाप देताना म्हणाले,

'अरे मूर्खा, देवराजा, तू आज माझा अपमान केला आहेस. म्हणून तू राज्यापासून च्युत होऊन दुसऱ्या लोकात जा.'

इंद्राला असे म्हणून दुर्वासांनी सुप्रतीक राजाला सांगितले, 'राजन्, तुला एक अत्यंत बलवान पुत्र होईल. तो इंद्रासारखा रूपवान, श्रीसंपन्न, महाप्रतापी, विद्यावान व तत्त्वास जाणणारा होईल. त्याची कर्मं क्रूर राहातील. तो सदैव शस्त्रांनी युक्त राहून दुर्जय या नावानं

प्रसिद्ध होईल.'

अशा प्रकारे वर देऊन मुनिवर दुर्वास अन्यत्र निघून गेले. राजा सुप्रतीकही आपल्या राजधानीस परत आला. धर्मज्ञ राजाने आपल्या राणीच्या, विद्युत्प्रभेच्या उदरात गर्भ स्थापिला. समय येताच राणी प्रसूत झाली. त्या महाबली पुत्राची दुर्जय या नावाने प्रसिद्धी झाली. त्याच्या जन्माच्या वेळी दुर्वासमुनी आले होते. त्यांनी स्वत: त्याचे जातकर्मादी संस्कार केले. या महर्षींनी आपल्या तपोबलाने त्या बालकाचा स्वभावही सौम्य केला. त्याला त्यांनी वेदशास्त्रपारंगत, विद्वान, धर्मात्मा व परमपवित्र बनविले.

राजा सुप्रतीकाच्या दुसऱ्या सौभाग्यवती राणीचे नाव कांतिमती होते. तिलाही सुद्युम्न या नावाचा पुत्र झाला. तोही वेद व वेदांगे यांचा अभ्यासक झाला. महाराज सुप्रतीकाची राजधानी वाराणसीत होती. एकदा त्याचा पुत्र दुर्जय त्याच्या शेजारी बसला होता. त्या वेळी त्याला योग्य समजून आणि आपली वृद्धावस्था जाणून राजाने त्याच्या हाती राज्य सोपविण्याचा विचार केला. त्या धर्मात्मा नरेशाने नीट विचार करून आपले राज्य दुर्जयाच्या हातात दिले व तो स्वत: चित्रकूटपर्वतावर निघून गेला.

इकडे राजा दुर्जय राज्याची व्यवस्था पाहू लागला. त्याचे राज्य जरी मोठे होते, तरी तो हत्ती, घोडे, रथ यांनी युक्त होऊन राज्याचा विस्तार करू लागला. राजा दुर्जय परम बुद्धिमान होता. त्याने हत्ती, घोडे, रथ, पायदळ, सैनिक यांनी आपली सेना सिद्ध केली व तो उत्तरदिशेकडे निघाला. राजा दुर्जयाने क्रमश: सर्व भारतावर राज्य केले व किंपुरुष नावाचे वर्षही जिंकून घेतले. त्यानंतर त्याने हरिवर्षातही आपली विजयपताका फडकविली. रम्यक, रोमावृत, कुरु, भद्राश्व, इलावृत इत्यादी प्रसिद्ध वर्षांवरही त्याचे राज्य स्थापित झाले. ही सारी स्थाने सुमेरू पर्वताच्या भोवती आहेत.

अशा रीतीने राजा दुर्जयाने संपूर्ण जंबुद्वीपावर आपला अधिकार स्थापन केला. त्यानंतर सर्व देवांसहित इंद्रासही जिंकण्यासाठी तो पुढे सरसावला. सुमेरू पर्वतावर जाऊन त्याने अनेक देव, गंधर्व,

दानव, गुह्यक, किन्नर, दैत्य यांचा पराभव केला. तेव्हा ब्रह्मपुत्र नारदांनी दुर्जयाच्या विजयाची सूचना देवराज इंद्रास दिली. देवराज त्याच क्षणी लोकपालांना बरोबर घेऊन त्याचा वध करण्यासाठी निघाला. पण राजा दुर्जयाच्या शस्त्रांना तो त्वरित शरण गेला. देवराज इंद्र सुमेरू पर्वत सोडून मर्त्यलोकात येऊन राहिला.

अशा रीतीने देवराज इंद्राचा पराभव झाला. दुर्जय परत फिरला व त्याने येताना गंधमादनपर्वतावरील उतरणीवर आपल्या सेनेची छावणी वसविली. त्या वेळी त्याच्यापाशी दोन तपस्वी आले व म्हणू लागले, " राजन्, तू संपूर्ण लोकपालांचा अधिकार हिरावून घेतला आहेस. आता त्यांच्या विना लोकयात्रा चालणार कशी ? आता या जगतास सुख प्राप्त होईल अशी व्यवस्था तू कर.' तेव्हा त्या तपस्व्यांना तो धर्मज्ञ राजा दुर्जय म्हणाला,

' आपण दोघे आहात कोण ?'

' आम्ही दोघे असुर आहोत. आमची नावं विद्युत व सुविद्युत अशी आहेत. महाराज दुर्जय, आता आमची इच्छा अशी आहे की, आपणांकडून समाजास सुसंस्कृत असा धर्म मिळाला. म्हणून तू आम्हां दोघांची नियुक्ती लोकपाल म्हणून करावीस. आम्ही ते कार्य नीट रीतीनं करू.' त्यांचे बोलणे ऐकून दुर्जयाने स्वर्गात त्यांची नियुक्ती लोकपाल म्हणून केली. ते दोघे तपस्वी तेथून त्वरित अंतर्धान पावले.

एकदा राजा दुर्जय मंदराचलपर्वतावर गेला. तेथे त्याने कुबेराचे अत्यंत सुंदर वन पाहिले. ते वन नंदनवनाप्रमाणे सुंदर होते. राजा दुर्जय प्रसन्नतापूर्वक त्या रमणीय वनात फिरू लागला. एवढ्यात त्याने एका चंपकवृक्षाखाली दोन सुंदर कन्यांना पाहिले. त्यांचे रूप अत्यंत सुंदर व अद्‌भुत होते. त्या कन्यांना पाहून राजा दुर्जयास आश्चर्य वाटले. तो मनाशी म्हणू लागला, "या सुंदर नेत्रांच्या दोन कन्या कोण असाव्यात ?" एवढ्यात राजाने पाहिले की, त्या वनात दोन तपस्वीही आहेत. त्यांना पाहताच दुर्जयाच्या मनात अपार हर्ष निर्माण झाला. त्याने त्वरित हत्तीवरून उतरून तपस्व्यांना प्रणाम केला. तपस्व्यांनी राजाला बसण्यासाठी कुशांचे एक सुंदर आसन दिले. राजा दुर्जय त्या

आसनावर बसला. तो बसल्यावर तपस्वी म्हणाले,

"आपण कोण आहात ? आपलं आगमन कुठून झालं ? आपण कुणाचे पुत्र आहात ? इथं कशासाठी आला आहात ?"

"महानुभावांनो, सुप्रतीक नावाचा एक प्रसिद्ध राजा आहे. त्याचा पुत्र मी दुर्जय नावाचा आहे. भूमंडलावरील सर्व राजांना जिंकण्याच्या इच्छेनं मी इथं आलो आहे. तपोधन, आपण कोण आहात ? कृपा करून मला सांगा ना."

"राजन्, आम्ही दोघे हेतृ आणि प्रहेतृ या नावांचे स्वायंभुवमनूचे पुत्र आहोत. देवांना जिंकून, त्यांना नष्ट करण्यासाठी आम्ही सुमेरू पर्वतावर गेलो होतो. त्या वेळी आमच्याजवळ मोठी सेना होती. तीत हत्ती, घोडे, रथ आणि शेकडो, हजारोंच्या संख्येनं देवही होते. त्यांचीही महान सेना होती. पण असुरांच्या प्रहारानं त्यांचे सर्व सैनिक मरण पावले. ही स्थिती पाहून सर्व देव क्षीरसागरात पहुडलेल्या भगवान श्रीहरींपाशी गेले. त्यांना प्रणाम करून ते म्हणाले, 'भगवन्, आपण आमचे, सर्व देवांचे स्वामी आहात. पराक्रमी असुरांनी आमच्या सेनेचा पराभव केला आहे. भयानं आमची हृदयं कंपित होताहेत. आता आपणच आमचं रक्षण करावं. केशवा, पूर्वीही देवासुरांच्या संग्रामांत क्रूरकर्मा कालनेमी व सहस्रभुज यांच्या पासून आमचं आपण रक्षण केलं आहे. देवेश्वरा, आता या समयीही तशीच परिस्थिती निर्माण झाली आहे. हेतृ व प्रहेतृ नावांचे दोन दानव देवांचे शत्रू बनले आहेत. त्यांच्या सैनिकांची व शस्त्रास्त्रांची संख्या असीम आहे. देवेश्वरा, आपलं स्वामित्व संपूर्ण जगतावर आहे. म्हणून आपण त्या दोनही असुरांना मारून आमचं रक्षण करावं.'

'अशा रीतीनं जेव्हा देवांनी भगवान नारायणांची प्रार्थना केली तेव्हा मग प्रभू श्रीहरी त्यांना म्हणाले– 'त्या दोन असुरांचा संहार करण्यासाठी मी अगत्यानं येईन.' तेव्हा देव भगवान जनार्दनांचे स्मरण करीत सुमेरू पर्वतावर आले, तेथे त्यांनी चिंतन करताच सुदर्शनचक्र व गदा धारण करून भगवान नारायण आमच्या सेनेचा पराभव करण्यासाठी देवांच्या सैन्यांत प्रविष्ठ झाले. त्या सर्वलोकेश्वरानं आपल्या

योगैश्वर्याचा आश्रय घेऊन त्याच क्षणी शेकडो, हजारो, लाखो, कोटच-वधी रूपं धारण केली. ते देवेश्वर येताच आमचे पराक्रमी वीर अचेत होऊन पृथ्वीवर पडले. राजा त्या वेळी त्यांचे प्राणही गेले. अशा रीतीनं त्या विश्वरूप धारण करणाऱ्या भगवान नारायणांनी आमच्या सर्व सेनेचा संहार केला. आम्ही दोघेच वाचलो आहोत.

'शार्ङ्गधनुष्य धारण करणाऱ्या भगवान श्रीहरींचं असं अद्भुत कर्म पाहून आम्ही दोघंही त्यांची आराधना करण्याच्या उद्देशानं त्यांना शरण गेलो. राजन्, राजा सुप्रतीक आमचा मित्र होता. आपण त्याचे पुत्र आहात. या दोनही कन्या आमच्या पुत्री आहेत. मी हेतृक. माझ्या कन्येचं नाव सुकेशी आणि हा प्रहेतृक. त्याच्या कन्येचं नाव मिश्रकेशी आहे. त्यांना तू अर्धांगिनीच्या स्वरूपात स्वीकारावंस.'

हेतृकाच्या या विनंतीनुसार राजा दुर्जयाने त्या दोनही मंगलमयी कन्यांशी विधिपूर्वक विवाह केला. अशा दिव्य कन्यांचा लाभ झाल्यामुळे दुर्जयाच्या हर्षास सीमा उरली नाही. तो सैनिकांसह आपल्या राजधानीस परत आला. काही दिवसांनी राजा दुर्जयास दोन पुत्र झाले. सुकेशीच्या बालकाचे नाव प्रभव आणि मिश्रकेशीच्या बालकाचे नाव सुदर्शन ठेवले गेले. अशा रीतीने महान, वैभवशाली दुर्जयास दोन पुत्रांची प्राप्ती झाली.

काही दिवसांनी तो राजा शिकार खेळण्यासाठी वनात गेला. तेथे जाऊन त्याने भयंकर जनावरांना पकडून वांधण्याचे कार्य सुरू केले. अशा प्रकारे वनात विहार करताना राजा दुर्जयाच्या वनात कुटी बांधून राहणारे एक मुनी दृष्टीस पडले. ते महाभाग मुनी तपस्या करीत होते. त्यांचे नाव गौरमुख असून ते ऋषींच्या परिवाराचे रक्षण करून पापी जीवांचा उद्धार करीत. त्यांच्या आश्रमात विशिष्ट गुणांनी युक्त असे एक पवित्र सरोवर होते. तेथे एक असा वृक्ष होता की, त्याचा सुगंध वनातील वातावरण सुगंधित करायचा. ते मुनी आपल्या आश्रमात असे दिसत की, जणू एखादा मेघ उत्तम विमानावर आरूढ होऊन आकाशातून पृथ्वीवर उतरला आहे ! मुनिवर गौरमुखांच्या मुखावरील प्रकाशाने सारे आकाश चमकत होते. ते पवित्र वस्त्रांनी सुशोभित होते. त्यांची

शिष्य मंडळी उच्च स्वरांत सामवेदाचे गान करीत होती. त्यांच्या आश्रमातील मुनिकन्यांचा व मुनिपत्नींचा वेष अत्यंत सात्त्विक होता. सुंदर पुष्पांनी लगडलेले अगणित वृक्ष त्यांच्या आश्रमाची शोभा वाढवीत होते. त्यांच्या आश्रमाची यज्ञशाला अद्‌भुत अशा शोभेने चमकत होती.

## गौरमुखींच्या आश्रमात दुर्जयाचा अत्याचार

भगवान वराहांनी पृथ्वीस राजा दुर्जयाचे आख्यान आणखी पुढे सांगितले. मुनिवर गौरमुखांचा आश्रम पाहून राजा दुर्जयाने विचार केला की, 'आपण आता या मनोहर आश्रमात जाऊन इथल्या ऋषींचं दर्शन घ्यावं.' राजा मुनींच्या आश्रमात आला. मुनिवर गौरमुख धर्माचे साक्षात स्वरूप होते. राजा आश्रमात येत आहेसे पाहून त्यांना अतिशय हर्ष झाला. त्यांनी राजाचा नीट सन्मान केला. स्वागत झाल्यावर परस्परांनी कुशल समाचार एकमेकांस विचारला. मुनिवरांनी म्हटले,

'महाराज, मी यथाशक्ति आपणांस अनुयायांसहित भोजन देईन. आपण हत्ती, घोडे आदींना मुक्त करून इथं यावं.' असे म्हणून गौरमुखमुनी मौन राहिले. मुनीवर राजाची श्रद्धा असल्यामुळे आतिथ्य स्वीकारण्याचा विचार त्याने केला. अनुचरांसहित तो तेथे राहिला. त्याच्याजवळ पाच अक्षौहिणी सेना होती. तो मनात विचार करू लागला, 'हे तपस्वी ऋषी मला इथं भोजन काय अन् कसं देतील ?' राजाला भोजनाचे निमंत्रण दिले खरे, पण विप्रवर गौरमुख मोठ्या चिंतेत व्यग्र झाले. तेही मनाशी म्हणू लागले, 'आता मी राजाला काय खायला घालू ?' ते निरंतर भगवद्‌भावात तल्लीन असत. मनात चिंता आली तेव्हाच त्यांना भगवान नारायणांचे स्मरण झाले. त्यांनी मनातल्या मनात नारायणांचे स्मरण केले. गंगेच्या तटावर जाऊन ते जगदीश्वर प्रभूची स्तुती करू लागले. ते म्हणत राहिले,

'पीतांबर धारण करणाऱ्या, आदिरूप असणाऱ्या, जलरूप धारण करणाऱ्या त्या सनातन भगवान विष्णूंना माझा वारंवार नमस्कार असो. जे घटघटवासी आहेत, जे जलात शयन करतात, पृथ्वी, तेज, वायू आणि आकाश इत्यादी महाभूतं ज्यांची स्वरूपं आहेत, त्या

नारायणांना माझा वारंवार नमस्कार असो. प्रभो, आपणच ॐकार आणि वषट्कार आहात. प्रभो, आपली सत्ता सर्व विद्यमान आहे. आपण सर्व देवांचं आदिकारण आहात. भगवन्, भूः भुवः स्वर्, जन, मह, तप व सत्य; हे सर्व लोक आपणांतच स्थित आहेत. हे चराचर जगत आपलाच आश्रय घेत आहे. जनार्दना, वृक्ष, झुडपं, औषधी, पशु-पक्षी, सर्प; इत्यादींची उत्पत्ती आपणांपासूनच झाली आहे. देवेश्वरा, हा दुर्जय नावाचा राजा माझ्या आश्रमात अतिथी म्हणून आला आहे. मी त्याचा सत्कार करू इच्छीत आहे. भगवन्, आपण इथं अन्नादी भोज्य पदार्थांचा संचय करावा. मी ज्या ज्या वस्तूस पाहीन अथवा स्पर्श करीन, ती ती वस्तू चार प्रकारच्या सुपक्व अन्नाच्या रूपात परिणत व्हावी. परमेश्वरा, आपणांस नमस्कार असो.'

या प्रकारे गौरमुखांनी भगवान श्रीहरींची स्तुती केली तेव्हा ते प्रसन्न झाले. त्या महाभाग केशवांनी आपले श्रेष्ठ रूप गौरमुखांना दाखविले. आणि म्हटले, 'विप्रवर, जे हवंय ते माग. वर माग.' असे ऐकताच मुनींनी आपले नेत्र उघडले आणि त्यांना भगवान श्रीहरींचे एक परम आश्चर्यमय रूप दिसले. त्यांनी पाहिले, भगवान जनार्दनांच्या हातांत गदा, शंख असून त्यांनी पीतांबर धारण केला होता. ते गरुडावर आरूढ झाले होते. त्यांचे तेज बारा सूर्यांप्रमाणे चमकत होते. जणू आकाशांत सहस्र सूर्य प्रकाशित झाले होते. परमेश्वराचे हे असे अद्‌भुत रूप पाहून गौरमुखमुनींचे नेत्र आश्चर्याने चकित झाले. मुनींनी त्यांना शिर वाकवून नमस्कार केला. हात जोडून म्हटले, 'भगवन्, आता मला कोणताच वर प्राप्त करून घेण्याची इच्छा राहिलेली नाही. मी एकच मागीत आहे की, या वेळी माझ्या आश्रमात राजा दुर्जय आला आहे. त्याला व त्याच्या सर्व परिवारास एकदमच भोजन मी कसं देऊ ? उद्या तर तो आपल्या घरी निघूनही जाईल.'

गौरमुनींची ही प्रार्थना ऐकून देवेश्वर श्रीहरी द्रवित झाले. चिंतन करताच सिद्धी देणारे 'चिंतामणि'रत्न मुनींना देऊन श्रीहरी अंतर्धान पावले. गौरमुनीही हर्षित होऊन अनेक ऋषिमुनींसह आपल्या पवित्र आश्रमात आले. त्या चिंतामणीच्या साह्याने मुनींनी हिमालयाच्या

शिखरांप्रमाणे, महान मेघांप्रमाणे उंच व चंद्रकिरणांनी चमकणाऱ्या शेकडो भवनांचे चिंतन केले. एकदम हजारो, कोटयवधी विशाल भवने तयार झाली. भवनांच्या आसपास तटबंदी होती. जवळच उद्यानांची शोभा वाढलेली होती. त्या उद्यानांत कोकिळादी अनेक पक्ष्यांची दाटी झाली. चंपक, अशोक, जायफळ, नागकेशर आदी अनेक प्रकारचे वृक्ष त्या उद्यानांत दिसू लागले. हत्तींसाठी व घोडयांसाठी स्वार निर्माण झाले.

यानंतर गौरमुखांनी सर्व प्रकारच्या भोज्य पदार्थांचे चिंतन केले. त्या मण्यापासून भक्ष्य, भोज्य, लेह्य, चोष्य, अशा प्रकारची अन्नसामग्री तयार झाली. अन्न वाढण्यासाठी सुवर्णपात्रे आली. सर्व तयारी झाल्यावर गौरमुखमुनी दुर्जयाला म्हणाले, 'महाराज, आता आपण सैनिकांसह भवनात चलावं.' मुनींची आज्ञा होताच राजाने त्या परम विशाल गृहात प्रवेश केला. सेवकांनी आपापल्या गृहांत प्रवेश केला. सर्वजण आलेले पाहताच तो दिव्य चिंतामणी हातात घेऊन मुनी म्हणाले, 'राजन्, आपणांस स्नान भोजनादी करायचं असेल तर मी दासदासी आपल्या सेवेसाठी पाठवितो.' गौरमुखमुनींनी चिंतामणी एकांतस्थानावर स्थापित करून चिंतन केले. त्वरित दिव्य रूपाच्या हजारो स्त्रिया त्या ठिकाणी प्रकट झाल्या. त्या सर्व स्त्रियांची अंगे मोठी सुंदर, सुकुमार व अनुलेपनांनी अलंकृत होती. त्यांचे कपोल, केस, नेत्र मोठे सुंदर होते. त्यांच्या हातांत सोन्याची पात्रे होती.

असेच कार्यतत्पर अनेक पुरुषही राजा दुर्जयाच्या सेवेसाठी उपस्थित झाले. तुतारीसारखी वाद्ये वाजू लागली. राजा दुर्जय जेव्हा स्नान करू लागला तेव्हा इंद्राच्या स्नानाप्रमाणे त्याच्या समोर काही स्त्रिया नृत्य-गायन करू लागल्या. अशा दिव्य उपचारांनी राजाचे स्नानकार्य संपन्न झाले. आता राजा आश्चर्यचकित झाला. तो विचार करू लागला, 'अहो, हा या मुनींच्या तपस्येचा प्रभाव की या चिंतामणीचा ?' त्याचे स्नान झाले. त्याने उत्तम वस्त्रे पांघरली. निरनिराळ्या अन्नपदार्थांचे भोजन त्याने केले. राजाचे सेवक व सैनिकही भोजनास बसले. एवढ्यात भगवान भास्कर अस्ताचलावर आला. आकाशाचा रंग लाल झाला. शरद्ऋतूतील स्वच्छ चंद्राने मंडित अशी

रात्र प्रकट झाली. असे वाटत होते की, जणू सर्वगुणसंपन्न रोहिणीनाथ त्या रात्रीशी अनुराग करीत होता. त्याच्याबरोबर हरित किरणांनी युक्त शुक्र व बृहस्पतीही उदयास आले. पण चंद्रापुढे त्यांच्या शोभेचा प्रभाव अधिक पडला नाही.

आतापर्यंत राजाचे सर्व सेवक व स्वत: राजा भोजन, वस्त्र आभूषणे यांनी युक्त झाले होते. आता त्यांच्या झोपण्यासाठी रत्नजडित सोन्याचे पलंग भिन्नभिन्न कक्षांतून उपस्थित झाले. त्यांवर सुंदर उशा आणि चादरी होत्या. आपल्या हावभावांनी प्रसन्न करणाऱ्या मनोहारिणी दिव्य स्त्रियाही त्या ठिकाणी होत्या. अशा महालात राजा दुर्जय आला. सर्व सेवकांना त्याने आपापल्या भवनांत पाठविले. प्रतापी राजा सर्व स्त्रिया सभोवती असताना सुखपूर्वक पलंगावर इंद्राप्रमाणे झोपला. अशा प्रकारे महात्मा गौरमुखांच्या स्वागतसत्काराने प्रभावित बनून राजा आणि त्याचे सेवक झोपी गेले.

रात्र संपली. राजा दुर्जयाने आपले नेत्र उघडले. तेव्हा त्या सुंदर स्त्रिया, वहुमूल्य भवने उत्तमोत्तम पलंग; हे सर्व लुप्त झालेले त्याला दिसले. ही स्थिती पाहून राजास मोठे नवल वाटले. त्याच्या मनात चिंतेचा ढग आकारू लागला. दु:खाच्या लहरी उठू लागल्या. हा मणी कसा प्राप्त करून घ्यावा ? या प्रश्नाने त्याचे मन व्यथित झाले. शेवटी त्याने निश्चय केला की, हा चिंतामणी गौरमुखांपासून हट्ट करून लुबाडायचा. त्याने त्याप्रमाणे आपल्या सेनेस तशी आज्ञा दिली. मुनींच्या आश्रमापासून जेव्हा सेना दूर केली तेव्हा दुर्जयाने आपल्या विरोचन नावाच्या मंत्र्यास मुनींकडून मणी आणण्यासाठी पाठवले. मंत्री मुनींना म्हणाला,

'रत्नांना आपणांजवळ ठेवण्यास राजा हाच उचित आहे. म्हणून आपण हा मणी राजा दुर्जयास द्यावा.' मंत्र्याचे हे बोलणे ऐकताच गौरमुखांनी क्रोधात येऊन म्हटले, 'मंत्री, तू त्या दुराचारी राजास माझा एक निरोप स्वत: जाऊन सांग. अरे दुष्टा, तू इथून आधी निघून जा. कारण हे स्थान दुर्जयासारख्या दुष्ट माणसास योग्य नाही.' मुनींचा हा निरोप घेऊन मंत्री विरोचन राजापाशी आला. ब्राह्मणाने सांगितलेला निरोप त्याने राजास जशाचा तसा सांगितला. गौरमुखमुनींचा निरोप

ऐकून दुर्जयाचा क्रोधाग्नी भडकला. त्याने नील नावाच्या आपल्या आणखी एका मंत्र्यास म्हटले, 'तू आधी इथून निघ. त्या ब्राह्मणाजवळचा मणी हिसकावून घेऊन ये.'

एवढे ऐकून अनेक सैनिकांना घेऊन नील गौरमुखांच्या आश्रमाकडे निघाला. नंतर तो रथातून उतरून जमिनीवर उभा राहिला. त्याने अग्निशालेत प्रवेश करून तेथील मण्यास पाहिले. परम दारुण व क्रूरबुद्धीचा नील तेथे येताच त्या मण्यापासून शस्त्रास्त्रे घेतलेले असंख्य शूर वीर बाहेर पडले. ते रथ, ध्वज, घोडे यांनी सुसज्ज होते. त्यांच्या हातांत ढाल, तलवार, धनुष्य, बाण ही आयुधे होती. त्या सेनेत पंधरा तर प्रमुख सेनापती होते. त्यांची नावे अशी; सुप्रभ, दीप्ततेजा, सुरश्मी, शुभदर्शन, सुकान्ती, सुन्दर, सुन्द, प्रद्युम्न, सुमन, शुभ, सुशील, सुखद, शंभू, सुदान्त व सोम. या वीर पुरुषांनी सावध राहून युद्ध सुरू केले. त्यांची धनुष्ये सुवर्णाप्रमाणे चमकदार होती. त्यांचे पंखधारी बाण शुद्ध सोन्यापासून बनविले होते. त्यांनी अत्यंत भयंकर तलवारी व त्रिशूल यांनीही प्रहार करायला सुरुवात केली. या युद्धात विरोचनाचे रथ, हत्ती, घोडे, पायदळ यांचा मण्यातून प्रकट झालेल्या सैनिकांनी नाश केला. काही सैनिक भयाने कंपित होऊन पळून गेले. घोर रक्त प्रवाहाने मार्ग भयंकर झाला. दुर्जयाचा मंत्री विरोचन मरण पावला. त्याचे बरेचसे अनुयायी यमराजाच्या लोकी गेले.

मंत्री विरोचन मरण पावल्यावर स्वतः राजा दुर्जय चतुरंगिणी सेना घेऊन त्या युद्धक्षेत्रावर आला. मण्यापासून प्रकटलेल्या शूरवीरांबरोबर त्याचेही युद्ध झाले. या युद्धात दुर्जयाच्या सैन्याचा भयंकर नाश झाला. हेतृ आणि प्रहेतृ यांना समजले की, आपला जामात संग्रामभूमीवर लढत आहे. तेव्हा ते दोघे असुरही आपल्या विशाल सेनेसह तेथे येऊन पोचले. या युद्धभूमीवर पंधरा प्रमुख मायावी दैत्य आले होते. त्यांची नावे अशी– प्रघस, विघस, संघ, अशनिप्रभ, विद्युत्प्रभ, सुघोष, भयंकर उन्मत्ताक्ष, अग्निदत्त, अग्नितेज, बाहू, शक्र, प्रतर्दन, विरोध, भीमकर्मा व विप्रचित्ती. यांच्यापाशीही उत्तमोत्तम अस्त्रांचा संग्रह होता.

प्रत्येक वीरापाशी एक एक अक्षौहिणी सेना होती. ते सर्व वीर मण्यापासून निर्माण झालेल्या वीरांशी लढण्यास उत्सुक होते.

सुप्रभाने तीन वाणांनी विघसास विद्ध केले. सुरश्मीने दहा वाणांनी प्रघसास मारले. अशनिप्रभही असाच छिन्नभिन्न झाला. सुकांतीने विद्युत्प्रभास, सुंदराने सुघोषास धाराशायी करून टाकले. सुंदाने आपल्या शीघ्रगामी पांच वाणांनी उन्मत्ताक्षावर प्रहार केला. चमकणाऱ्या बाणांनी शत्रूच्या वाणांचे तुकडे तुकडे झाले. अशा प्रकारे सुमनाचे अग्निदत्ताशी , सुवेदाचे अग्नितेजाशी, सुनलाचे वाहूशी, शक्राशी सुदेवाचे घनघोर युद्ध झाले.

असे शस्त्रास्त्रांचे युद्ध चालू असताना मण्यापासून प्रकट झालेल्या वीरांशी लढता लढता सारे दैत्य मारले गेले. एवढ्यात मुनिवर गौरमुखही हातात कुशादी घेऊन वनातून आश्रमात आले. दुर्जय आता अनेक सैनिकांबरोवर उभा होता. हे पाहून गौरमुख आश्रमाच्या दारासमोर उभे राहिले. ते मनातल्या मनात विचार करू लागले, ' अरे, या मण्यामुळं हे केवढं रण झालं. हा भयंकर संग्राम या मण्यामुळं झाला ! '

असे म्हणत गौरमुखांनी देवाधिदेव भगवान नारायणांचे स्मरण केले. त्यांचे स्मरण करताच ते गरुडावर आरूढ होऊन, पीतांवर धारण करून मुनींच्या समोर प्रकट झाले. आणि म्हणाले,

' सांग. मी तुझ्यासाठी काय करू ?'

' प्रभो, ' गौरमुखांनी हात जोडून म्हटले, ' आपण या पापी दुर्जयास याच्या सेनेसहित मारून टाका.'

मुनींनी असे सांगताच अग्नीसारख्या प्रज्वलित असणाऱ्या सुदर्शनचक्राने सर्व सेनेसहित दुर्जयाला भस्म करून टाकले. एका क्षणात हे घडले. भगवान गौरमुखांना म्हणाले, ' मुने, या वनातील दानवांचा परिवार एका क्षणातच नष्ट झाला आहे. एका निमिषात हे घडलं, म्हणून या स्थानाची प्रसिद्धी नैमिषारण्य क्षेत्र या नावानं होईल. या क्षेत्रात ब्राह्मणांचा निवास होईल. या वनातच मी यज्ञपुरुषाच्या रूपानं निवास करीन. हे पंधरा दिव्य पुरुष मण्यापासून प्रकट झाले. ते सत्य-

युगात याज्य नावानं विख्यात राजे होतील.' इतके म्हणून भगवान श्रीहरी अंतर्धान पावले. मुनिवर गौरमुखही आपल्या आश्रमात आनंदाने राहू लागले.

## राजा सुप्रतीकाचे भगवंतात लीन होणे

भगवान वरहांनी पृथ्वीस पुढले आख्यान सांगितले. सुदर्शनचक्राच्या अग्नीत वलवान पुरुषांचा नाश झाला हे समजून राजा सुप्रतीकास अतिशय चिंता वाटली. तो विचारातच पडला. पण एकदम त्याच्या अंत:करणात आध्यात्मिक ज्ञानाचा उदय झाला. त्याने विचार केला, 'चित्रकूटपर्वतावर भगवान विष्णू राघवेंद्र श्रीराम या नावानं ओळखले जातात. मी आता तिथंच जाईन. भगवानांच्या नामांचं उच्चारण करीन. त्यांची स्तुती करीन.' असा मनात निश्चय करून राजा सुप्रतीक परम पवित्र चित्रकूटपर्वतावर पोचला व तेथे त्याने भगवंतांची मनापासून स्तुती करताना म्हटले,

'जे राम नरनाथ, अच्युत, कवी, पुराण, देवांचे शत्रू असुर यांचा नाश करणारे, प्रभव, महेश्वर, प्रपन्नार्तिहरण आणि श्रीधर या नावांनी सुप्रसिद्ध आहेत, अशा मंगलमय भगवान श्रीहरींना मी निरंतर नमस्कार करतो. प्रभो, पृथ्वीत, शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पांच प्रकारांनी, जलात शब्द, स्पर्श, रूप, रस या चार प्रकारांनी, अग्नीत शब्द, स्पर्श व रूप या तीन प्रकारांनी, वायूत शब्द व स्पर्श या दोन प्रकारांनी आणि आकाशात केवळ शब्दरूपानं विराजमान होणारे आपण एकमात्र पुरुष आहात. सूर्य, चंद्र, अग्नी आणि हे जगत्, ही सर्व आपलीच रूपं आहेत. आपणांतूनच हे सर्व प्रकट झालं आहे. आपणांतच लीन होणार आहे, असं शास्त्रांचं कथन आहे.

'आपला आश्रय पावूनच हे विश्व आनंदाचा अनुभव घेतं. यासाठी तर या जगतात आपली 'राम' या नावानं प्रतिष्ठा झाली आहे. भगवन्, हा जगतसमुद्र भयंकर दु:खरूपी तरंगांनी व्याप्त आहे. या भयंकर समुद्रात ज्या मनुष्यानं आपल्या नामस्मरणरूपी नौकेचा आश्रय घेतला आहे, तो यात डुबत नाही. म्हणून संत तपोवनात आपल्या

रामनामाचं स्मरण करतात. प्रभो, वेद नष्ट झाल्यावर आपण मत्स्याचा अवतार घेतलात. विभो, प्रलयाच्या काळी आपण अत्यंत प्रचंड अग्नीचं रूप धारण करता. माधवा, समुद्रमंथनाच्या वेळी युगायुगांत आपणच कासवाचं रूप धारण करता. भगवन्, आपण जनार्दन या नावानं विख्यात आहात. महात्मन्, आपणांपासून हे जगत, वेद, समस्त दिशा ओतप्रोत भरलेल्या आहेत. आपण आदिपुरुष व परमधाम आहात. आता मी आपणांशिवाय इतरांस शरण तरी कसा जाऊ ? आपण तर सनातन पुरुष आहात. हे अखिल विश्व आपणांपासूनच निर्माण झालं. विस्तृत बनलं. प्रभो हे विश्व आपलीच मूर्ती आहे. आपण हजारों भुजांनी शोभता. परम उदार भगवन्, आपल्या ' राम 'रूपास नमस्कार असो.'

राजा सुप्रतीकाने अशा प्रकारे स्तुती केल्यावर प्रभू प्रसन्न झाले व म्हणाले,

' सुप्रतीक, वर माग.'

' भगवन्, आपलं हे जे सर्वोत्तम रूप आहे त्यात मला स्थान मिळावं. हाच एक वर आपण मला द्यावा.'

अशी विनंती करताच महाराज सुप्रतीकाची चित्तवृत्ती भगवान गदाधरांच्या दिव्यमूर्तीत स्थिर झाली. ध्यानस्थ होऊन तो भगवंतांच्या नामोच्चारांत मग्न झाला व आपल्या उत्तम कर्मांच्या प्रभावाने तो आपले पंचभौतिक शरीर सोडून श्रीहरींच्या रूपात विलीन झाला.

राजा सुप्रतीकाचा वृत्तांत सांगून भगवान वराह म्हणाले, ' पृथ्वी, तुझ्यासमोर मी जे हे वराहपुराण प्रकट करीत आहे, ते फार प्राचीन आहे. पूर्वी सत्ययुगात मी ब्रह्मदेवांना याचा उपदेश केला होता. त्याचाच एक अंश हा आहे. स्वतः ब्रह्मदेव, सर्वतंत्र–स्वतंत्र भगवान नारायण आणि मी समस्त चरित्रांचं वर्णन करण्यास असमर्थ आहोत. म्हणून तुला त्या परम प्रभू परमात्म्याच्या आदि-स्वरूपाचं सदा स्मरण करायला हवंय. समुद्राच्या काठावरील रेतीची, तिच्या कणांची गणती होऊ शकते, पण परब्रह्म, परमात्म्याच्या किती लीला आहेत, याची संख्या सांगणं असंभव आहे. शुचिस्मिते, भगवान नारायणांच्या मुखातील केवळ

एक अंशच मी तुला ऐकविला आहे. ही लीला सत्ययुगात झाली होती. आता तू दुसरा कोणता प्रसंग ऐकू इच्छितेस ? सांग.'

## असे एक पितृगीत

भगवान वराहांचा हा प्रश्न ऐकून पृथ्वीने विचारले, 'मुनिवर गौरमुखांनी भगवान श्रीहरींचं अद्‌भुत कर्म पाहून नंतर काय केलं ?' याही प्रश्नाचे उत्तर भगवान वराहांनी दिले. भगवान श्रीहरींनी निमिषमात्रातच हे सर्व अद्‌भुत कर्म दाखविले. ते पाहून मुनिश्रेष्ठ गौरमुखही नैमिषारण्यात जाऊन जगदीश्वर श्रीहरींची आराधना करू लागले. त्याक्षेत्रात प्रभास नावाचे एक प्रसिद्ध तीर्थ आहे. ते परम दुर्लभ तीर्थ चंद्राशी संबंधित आहे. येथील स्वामी भगवान श्रीहरी दैत्यांचा संहार करणारा म्हणून "दैत्यसूनद" या नावाने सदा विराजतो. अशा या प्रभूंच्या आराधनेत मुनींची वृत्ती स्थिरावली. ते उपासनेत मग्न असताना तेथे परमयोगी मार्कंडेयमुनी आले. ते अतिथिरूपात आलेले पाहून गौरमुखांनी त्यांना पाद्य, अर्घ्य आदी देऊन त्यांची पूजा केली. त्या मुनींना कुशाच्या आसनावर विराजित करून गौरमुखांनी विनयाने विचारले,

'महाव्रती मुनिश्रेष्ठ, मला पितरांचा व श्राद्धतत्त्वाचा उपदेश करावा.'

'मुने' मार्कंडेयमुनी मधुर वाणीने म्हणू लागले, 'भगवान नारायण सर्व देवांचेही आदिप्रवर्तक आणि गुरू आहेत. त्यांच्यापासूनच ब्रह्मदेव प्रकट झाले. त्या ब्रह्मदेवांनी नंतर सात मुनींची निर्मिती केली. ब्रह्मदेव त्या मुनींना म्हणाले, 'तुम्ही माझी उपासना करा.' हे ऐकताच त्यांनी स्वतःचीच पूजा केली, आपल्या पुत्रांची कर्म-विकृती पाहून ब्रह्मदेवांनी त्यांना शाप दिला, 'तुम्ही ज्ञानाच्या अभिमानानं माझ्याऐवजी स्वतःचीच पूजा करून विपरीत आचरण केलंत म्हणून तुमचं ज्ञान नष्ट होईल.'

अशा प्रकारे शापग्रस्त झाल्यावर त्या सर्व ब्रह्मपुत्रांनी आपापल्या वंशातील प्रवर्तक पुत्रांना निर्माण केले, आणि ते स्वर्गलोकी निघून गेले.

ते ब्रह्मवादी मुनी परलोकवासी झाल्यावर त्यांच्या पुत्रांनी विधिपूर्वक श्राद्ध करून त्यांना तृप्त केले. त्या पितरांना 'वैमानिक' अशी संज्ञा आहे. ते सर्व ब्रह्मदेवांच्या मनापासून प्रकट झाले. पुत्र मंत्राचा उच्चार करून पिंडदान करतो, हे पाहाताना ते तेथेच निवास करतात. यानंतर मार्कंडेयांनी पितरांचे श्राद्ध, पितरांचे गण इत्यादींचीही माहिती गौर-मुखांना दिली.

देवांसाठी सोमरसाची वृद्धी करणारे काही स्वर्गवासी पितर मरीची आदी नावांनी विख्यात आहेत. या श्रेष्ठ पितरांत चार मूर्त आणि तीन अमूर्त मानले गेले आहेत. अशी त्यांची संख्या सात आहे. सनातन नावाच्या लोकात 'भास्वर' नावाचे पितृगण राहतात. ते देवांनाही उपास्य आहेत. ते सर्व ब्रह्मवादी आहेत. ब्रह्मलोकापासून वेगळे होऊन ते नित्य लोकांत निवास करतात. शंभर वर्षे पूर्ण झाली की, त्यांचा पुनः प्रादुर्भाव होतो. त्यावेळी पूर्वस्थितीचे स्मरण असल्याने ते सर्वोत्तम योगाचे चिंतन करून अनिवृत्तिलक्षण मोक्षास प्राप्त करून घेतात. हे सर्व पितर श्राद्धात योग्यांच्या योगद्वारे तृप्त झाले की, योगी पुरुषांच्या हृदयात पुनः योगाची वृद्धी करतात. कारण भगवद्-भक्ताच्या भक्तियोगाने यांना मोठाच संतोष वाटतो.

सोमरस पिणाऱ्या सोमप पितरांचा हा प्रधान प्रथम सर्ग आहे. हे पितर उत्तम वर्णाचे ब्राह्मण आहेत. त्या सर्वांचे एक एक शरीर आहे. हे स्वर्गलोकात राहतात. भूलोकातील निवासी यांची पूजा करतात. कल्पपर्यंतजीवी मरीची आदी पितर ब्रह्मदेवांचे पुत्र आहेत. ते आपल्या परिवारासह मरुतांची उपासना करतात. मरुद्‌गण त्यांचे उपास्य आहे. सनकादी तपस्वी 'वैराज' नामक पितृगण त्या मरुद्‌गणांचेही पूज्य आहेत. वैराजसंज्ञक पितरांच्या गणांची संख्याही सात आहे.

भिन्न भिन्न वर्णांचे सर्व लोक त्या पितरांची पूजा करू शकतात. पितरांचेही मुक्त व चेतनक असे दोन प्रकार नसतात. विशिष्ट शास्त्रांचे अध्ययन करून, पुराणांचे अवलोकन करून, शास्त्रांचे अध्ययन करून आपल्या पूज्य पितरांचा परिचय करून घ्यावा. सृष्टीची रचना करताना ब्रह्मदेवांना आपल्या पूर्वपुत्रांचे स्मरण झाले. ज्ञानाच्या प्रभावाने त्यांना

तर परमपदाची प्राप्ती झाली होती. हे त्यांना समजले. वसू आदींचे कश्यपादी, ब्राह्मणादींचे वसू आदी, गंधर्वप्रभृती पितर आहेत. असा हा एकंदर पितरांचा प्रकार. यानंतर मार्कंडेयांनी श्राद्धाचाही प्रकार वर्णन करून सांगितला. त्यांनी गौरमुखांना एक पितृगीतही सांगितले. पितृगण म्हणतात,

'कुलात काय असा एखादा बुद्धिमान धन्य मनुष्य जन्म घेईल की, जो वित्तलोलुपता सोडून आमच्यासाठी पिंडदान करील ? संपत्ती असताना जो आमच्यासाठी ब्राह्मणांना रत्न, वस्त्र, यान, भोगसामग्री दान करील, अथवा केवळ अन्नवस्त्र धारण करणारा श्राद्धकाली भक्तिभावानं ब्राह्मणांना यथाशक्ति भोजन देईल. अन्न देण्यासही असमर्थ असलेल्या ब्राह्मणश्रेष्ठांना वन्य फल-मूल, जंगली शाक आणि थोडीशी दक्षिणा देईल. जर एखादा यासही असमर्थ असेल तर द्विजश्रेष्ठास प्रणाम करून एक मूठभर काळे तीळ देईल, अथवा आमच्या उद्देशानं पृथ्वीवर भक्ती व नम्रता धारण करून सात माठ तिळांनी युक्त जलांजली देईल, अथवा याचाही अभाव असला तर कुठून तरी चारा आणून आमच्या उद्देशानं गायीस खाऊ घालील. या सर्व वस्तूंचा अभाव असला तर जो वनात जाऊन, आपल्या बगला वर करून सूर्यादी दिग्पालांना उच्च स्वरांनी म्हणेल,

**न मेऽस्ति वित्तं न धनं न चान्य–**
**च्छ्राद्धस्य योग्यं स्वपितृन्नतोऽस्मि ।**
**तृप्यन्तु भक्त्या पितरौ मयैतौ ।**
**भुजौ ततौ वर्त्मनि मारुतस्य ॥**

(१३.५८)

'माझ्यापाशी श्राद्धकर्मासाठी योग्य ती धनसंपत्ती नाही आणि अन्य सामग्रीही नाही. म्हणून मी पितरांना प्रणाम करतो. ते माझ्या भक्तीनं तृप्त होवोत. मी आपले दोनही हात आकाशात वर उठविले आहेत.' धन असो वा नसो, पितरांनी श्राद्धाच्या विधींचे प्रकार विविध

सांगितले आहेत. यानंतर मार्कंडेयांनी संपूर्ण श्राद्धकल्पाचे वर्णन केले. श्राद्धाचे ब्राह्मण, त्यांची संख्या, श्राद्धांचे प्रकार, हवनविधी, अभिश्रवण (वैदिक मंत्रपाठ), पिंडदानाचा नियम, बलिवैश्वदेवाचे विधान; इत्यादींचीही माहिती त्यांनी दिली.

## गौरमुखाची ब्रह्मलीनावस्था

यानंतर पृथ्वीने भगवान वराहांना विचारले, 'भगवन्, मुनिवर गौरमुखांनी मार्कंडेयांपासून श्राद्धविधी ऐकल्यानंतर काय केलं?' तेव्हा भगवान म्हणाले, 'वसुंधरे, मार्कंडेयांची बुद्धी अपरिमित होती. त्यांच्याकडून पितृकल्प ऐकल्यावर गौरमुखांना शंभर जन्मांची स्मृती झाली.' त्यावर पृथ्वी म्हणाली, 'भगवन्, गौरमुख पूर्वजन्मी कोण होते? त्यांचं नाव काय होतं? त्यांना ही स्मृती कशी आली?' तेव्हा भगवान वराह म्हणाले,

'वसुंधरे, हे गौरमुख पूर्वीच्या एका कल्पात स्वतः भृगू मुनी होते. मार्कंडेयांनीच त्यांना ज्ञानाची प्राप्ती करून दिली. या प्रकारे उपदिष्ट झाल्यावर त्यांना सर्व जन्मांची स्मृती प्राप्त झाली. त्यावेळी गौरमुख पितरांसाठी बारा वर्षेपर्यंत श्राद्ध करीत होते. त्यानंतर श्रीहरींची आराधना करण्यासाठी त्यांनी त्यांची स्तुती केली प्रभासक्षेत्री जाऊन त्यांनी दैत्यदालन परमप्रभूची प्रार्थना करताना म्हटले,

'जे शत्रूंचा दर्प दूर करतात, ब्रह्मवेत्त्यांत जे श्रेष्ठ आहेत, सूर्य, चंद्र, अश्विनीकुमार यांच्या रूपांत जे स्थित आहेत, जे परमपुराण, आदिपुरुष आहेत, जे देवाधिदेव भगवान नारायण या नावानं विख्यात आहेत,त्या मंगलमय श्रीहरींची मी आता स्तुती करतो. प्राचीन काळी जेव्हा वेद नष्ट झाले होते, तेव्हा या आदिपुरुषानं पर्वतासमान विशाल मत्स्याचं रूप धारण केलं होतं. त्यांच्या पुच्छाच्या अग्रभागी तेजाची छटा चमकत होती. अशा या शत्रुसूदन भगवान श्रीहरींची मी स्तुती करतो. समुद्रमंथनाच्या वेळी श्रीहरींची कच्छपाचं रूप धारण करून महान मंदराचलास आश्रय दिला होता. अशा पुराणपुरुषांनी, देवेश्वर भगवानांनी माझं रक्षण करावं. याच श्रीहरींनी महावराहाचं रूप धारण

करून रसातळात प्रवेश केला, आणि तिथून पृथ्वीस वर आणिलं. अशा श्रीहरींना देवांनी व सिद्धांनी 'महापुरुष' संज्ञा दिली. या असुर-संहर्त्या सनातन श्रीहरींनी माझं रक्षण करावं.

'जे प्रत्येक युगात भयंकर नृसिंहरूप धारण करतात, ज्यांचं मुख अत्यंत भयावह असतं, कांती सुवर्णासमान असते आणि ज्यांचा स्वभावच दैत्यांचं दलन करणं, हाच असतो, असे योगिराज जगताचे परम आश्रयस्थान भगवान श्रीहरी माझं रक्षण करोत. ज्यांचं कधी माप होत नाही, तरीही बलीचा यज्ञ नष्ट करण्यासाठी ज्या योगात्म्यानं योगाच्या बलात दंड व मृगचर्म यांनी सुशोभित असं वास्तव रूप धारण करून या त्रिलोकास व्यापून टाकलं, ते परम प्रभू माझं रक्षण करोत. ज्यांनी महापराक्रमी परशुरामांचं रूप धारण करून एकवीस वेळा सर्व भूमंडलावर विजय मिळविला, आणि नंतर ते कश्यपांना समर्पण केलं, जे सज्जनांचे रक्षक आणि असुरांचे संहारक आहेत, अशा हिरण्यभर्ग भगवान श्रीहरींनी माझं रक्षण करावं. रामरूपानं राक्षसांचा विनाश करणाऱ्या भगवान श्रीहरींनी माझं रक्षण करावं. चाणूर आणि कंस या दैत्यांच्या भयापासून देवांना निर्भय करणाऱ्या वसुदेवपुत्रानं, श्रीकृष्णांनी माझं रक्षण करावं. सनातन, ब्रह्ममय आणि महापुरुष असूनही वर्णव्यवस्थेच्या रक्षणासाठी प्रत्येक युगात कल्की या नावानं विख्यात असणाऱ्या श्रीहरींनी माझं रक्षण करावं, आपण पुरुषोत्तम आहात. समस्त कारणांचं कारण आहात. भगवान श्रीहरी, माझं आपण रक्षण करावं.'

अशा प्रकारे गौरमुखमुनींनी भक्तिभावाने नम्र होऊन गदाधारी श्रीहरींची प्रार्थना केल्यावर ते त्यांच्यापुढे स्वतः होऊन प्रकट झाले. त्यांना पाहून मुनींचा आत्मा पूर्ण शांत झाला. गौरमुखांच्या शरीरातून विज्ञानात्मा बाहेर पडला आणि तो श्रीहरींना मिळून मुक्तिसंज्ञक सनातन रूपात नेहमीसाठी विलीन झाला.

## महातपाचे आख्यान

एकदा पृथ्वीने भगवान वराहांना विचारले, 'भगवन्, चिंतागण्यापासून जे प्रधान पुरुष प्रकट झाले त्यांना भगवान श्रीहरींनी वर

दिला होता की 'तुम्ही सर्व त्रेतायुगात राजे बनाल. त्यांची उन्नती कशी झाली ? त्यांची नावं काय होती ? त्यांनी कामं कोणती कोणती केली ? आपण या प्रसंगाची हकीगत सांगावी.'

भगवान वराहांनी याही प्रश्नांची उत्तरे दिली. मण्यापासून प्रकट झालेला सुप्रभ नावाचा प्रधानपुरुष होता. तो त्रेतायुगात महान राजा झाला. त्याची हकीगत ऐकण्यासारखी आहे. प्रथम सत्ययुगात महाबाहू नावाचा एक प्रसिद्ध राजा होता. तोच त्रेतायुगात पुन्हा राजा श्रुतकीर्ती झाला. त्रिलोकांत तो महापराक्रमी म्हणून गणला गेला होता. मण्यापासून उत्पन्न झालेला सुप्रभ त्याच्याच घरी पुत्ररूपाने जन्मास आला. त्या वेळी प्रजापाल या नावाने त्याची जगात प्रसिद्धी झाली.

एके दिवशी प्रजापाल शिकारीच्या उद्देशाने घनदाट अरण्यात गेला. तेथे अनेक हिंस्र पशू निवास करीत होते. त्या वनात त्याने एक सुंदर आश्रम पाहिला. त्यात परम धार्मिक महातपा ऋषी निवास करीत होते. निराहार राहून ते सतत परब्रह्माचे चिंतन करीत. तप करणे हेच त्यांचे मुख्य काम होते. त्या आश्रमात राजाने प्रवेश केला. वनातील वृक्षांनी त्या आश्रमाच्या प्रवेशमार्गाची शोभा वाढली होती. चंद्राने प्रकाश पसरावा, त्याप्रमाणे घनदाट लता गृहाच्या रूपात परिणत झाल्या होत्या. भ्रमरांची तृप्ती विनासायास तेथे होत होती. लाल कमलांच्या पानांप्रमाणे कोमल नखांच्या वारांगना तेथे सुंदर गीत गात होत्या. जणू इंद्राच्या अप्सरा स्वर्ग सोडून पृथ्वीवर आल्या होत्या. जवळच अनेक प्रकारचे पक्षी आनंदाने ची ची, चू चू शब्द करून आल्हाद वाढवीत होते. भ्रमरांचा गुंजारव सुरू होता. निरनिराळ्या आकारांच्या कदंब, अर्जुन, साखू नावांच्या वृक्षांनी त्या आश्रमाची शोभा वाढविली होती. पक्ष्यांचा मधुर ध्वनी होत होता. तेथे सज्जन पुरुष धैर्यपूर्वक आपल्या कामात व्यग्र होते. यज्ञकुंडांतून धूर प्रकटत होता. हवन करताच त्यांतून ज्वाला प्रकटत होत्या. गृहस्थ ब्राह्मणांकडून यज्ञ करवीत होते.

अशा आश्रमात प्रजापाल राजाने अनेक उपायांचा आश्रय घेऊन प्रवेश केला. तेथे समोरच त्याने अत्यंत तेजस्वी मुनिवर महातपांना

पाहिले. त्या वेळी ते पुण्यात्म्यांत व ब्रह्मवेत्त्यांत श्रेष्ठ ऋषी कुशाच्या आसनावर बसले होते. अनंत सूर्यांनी चमकावे, असे त्यांचे तेज होते. महातपांचे दर्शन होताच राजाची मृगयेची इच्छा दूर झाली. ऋषींच्या संगतीत त्याचे विचार शुद्ध होऊ लागले. धर्माबद्दल त्याला आस्था वाटू लागली. अशा पवित्र अंतःकरणाच्या राजास पाहून महातपा मुनींनी त्याला आसन, पाद्य आदी देऊन त्याचा आदरसत्कार केला. त्या नरेशानेही मुनींना प्रणाम केला. त्या मुनींना राजाने प्रश्न केला,

'भगवन्, दुःखरूपी या संसारसागरातून तरून जाण्यासाठी कोणतं कार्य करावं ? आपण कृपा करून या शरणागतास समजावून सांगावं.'

'राजन्, संसाररूपी सागर तरून जाण्यासाठी मनुष्यांनी पूजा, होम, दान, ध्यान, अनेक यज्ञ आदी उपकरणरूपी नौकेचा दृढ आश्रय घ्यावा. तू त्रिलोकेश्वररूपी नौका तयार कर. भगवान नारायणच त्रिलोकेश्वर आहेत. त्यांच्या कृपेनं नरकात जाणं होत नाही. राजन्, मोठे भाग्यवान त्या देवेश्वरांना प्रणाम करतात. त्यांच्या चिंता दूर होतात. कधीही नष्ट होणारं परमपद त्यांना प्राप्त होतं.'

'भगवन्, आपण सर्व धर्मांना नीट प्रकारे जाणता. मोक्षाची इच्छा करणाऱ्यानं सनातन पुरुष श्रीहरींच्या विभूतीचं चिंतन कशा प्रकारे करावं ? कृपा करून आपण सांगावं.'

'राजन्, तू मोठा विज्ञ पुरुष आहेस. संपूर्ण योग्यांचे स्वामी श्रीविष्णू ज्या रूपांनी अभिव्यक्त होतात त्यांचं वर्णन ऐक. पितरांसहित सर्व देवदेवता, ब्राह्मणातील ब्रह्मदेव प्रभृती, या सर्वांची उत्पत्ती श्रीविष्णूपासून झाली आहे. अग्नी, अश्विनीकुमार, गौरी, गजानन, शेषनाग, कार्तिकेय, आदित्यगण, दुर्गेसह चौसष्ट मातृका, दहा दिशा, कुबेर, वायू, यम, रुद्र, चंद्रमा आणि पितृगण; यांच्या उत्पत्तीत जगत्प्रभू श्रीहरींचीच प्रधानता असते.'

## द्वितीया तिथी व अश्विनीकुमारांची उत्पत्ती

यानंतर प्रजापालाने ऋषींना विचारले, 'ब्रह्मन्, अग्निदेवाच माहात्म्य समजलं. आता आपण प्राण-अपानरूप आश्विनीकुमारांची उत्पत्ती कशी झाली ते सांगावं.' मुनिवर महातपांनी याही प्रश्नाचे उत्तर दिले. मरीची मुनी ब्रह्मदेवांचे पुत्र होत. स्वतः ब्रह्मदेवांनी आपल्या पुत्रांच्या रूपाने चौदा रूपे धारण केली. त्यांत सर्वांत ज्येष्ठ मरीची होते. या मरीचींचे पुत्र महान तेजस्वी कश्यपमुनी होत. ते प्रजापतींत सर्वांत अधिक संपन्न होते. कारण ते देवांचे पिता होते. बारा आदित्य त्यांचे पुत्र होत. भगवान नारायणांची तेजोमय रूपे म्हणजे हे बारा आदित्य. हे बारा मासांची प्रतीके होत. आणि संवत्सर हे भगवान श्रीहरींचे रूप होय. द्वादश आदित्यांत मार्तंड मोठा प्रतापशाली होता. देवशिल्पी विश्वकर्म्याने आपली परम तेजोमयी कन्या संज्ञा, हिचा विवाह मार्तंडाशी केला. त्यांना दोन संताने झाली. पुत्राचे नाव यम व कन्येचे नाव यमुना होते.

संज्ञेला सूर्याचे तेज सहन झाले नाही. तेव्हा तिने मनाच्या समान गतिवान अशा वडवाचे म्हणजे घोडीचे रूप धारण केले. तिने आपल्या छायेस सूर्याच्या घरी ठेवून ती स्वतः उत्तरकुरूत निघून गेली. या छायेसही सूर्यापासून दोन संताने झाली. पुत्र शनी या नावाने विख्यात झाला. कन्येचे नाव तपती होते. छाया संतानांना विषमतेने वागवू लागली. तेव्हा सूर्यदेवाचे डोळे रागाने लाल झाले. त्याने छायेस म्हटले, 'भामिनी, तू आपल्या संतानांना विषमतेनं वागवितेस, हे उचित नाही.' परंतु सूर्याच्या या बोलण्याचा कसलाच परिणाम छायेच्या मनावर झाला नाही. तेव्हा दुःखित होऊन यमराज आपल्या पित्यास म्हणाला, 'तात, ही आमची माता नाही. कारण ती शनी व तपती यांच्यावर जास्त प्रेम करते. आम्हांस फार वाईट रीतीनं वागविते. विमातेप्रमाणं ती आमच्याशी विषमतापूर्ण व्यवहार करते.'

हे सर्व समजून छाया क्रोधाने सज्ज झाली. तिने यमास शाप दिला. 'तू त्वरित प्रेतांचा राजा होशील.' छायेचे असे कटू शब्द ऐकताच सूर्याने पुत्राच्या कल्याणासाठी म्हटले, 'पुत्रा, चिंता करण्याचं कारण नाही.

तू तिथं मनुष्यांचे धर्म व अधर्म निर्णय यांचा करशील. लोकपालाच्या रूपानं तुझी स्वर्गात प्रतिष्ठा वाढेल.' याच वेळी सूर्याचा क्रोध आणखीनच वाढला. त्याचे चित्त चंचल झाले. त्याने शनीसही शाप दिला. 'पुत्रा, मातेच्या दोषामुळं तुझ्या दृष्टीत क्रूरता भरून राहील.'

असे म्हणून सूर्य संज्ञेस शोधण्यासाठी निघाला. त्याने उत्तर कुरूत संज्ञा घोडीच्या रूपात हिंडत असलेली पाहिली. तेव्हा त्यानेही अश्वाचे रूप धारण केले. त्या उत्तरकुरूत जाऊन त्याने आत्मरूपा संज्ञेशी सृष्टि-रचनेच्या उद्देशाने समागम केला. जेव्हा प्रचंड तेजाने शोभणाऱ्या सूर्याने वडवारूपिणी संज्ञेशी समागम केला, तेव्हा त्याचे तेज आणखीनच वाढले व ते दोन भागांत विभक्त होऊन पडले. आत्मविजयी प्राण व अपान प्रथमच संज्ञेच्या योनीत अव्यक्तरूपाने स्थित होते. सूर्यदेवाच्या तेजाच्या संबंधाने ते दोन भाग मूर्तिमान झाले. या प्रकारे घोडीचे रूप धारण करणारी विश्वकर्म्याची पुत्री संज्ञेस दोन पुरुषरत्नांचा लाभ झाला. या मुळे हे दोन देव सूर्यपुत्र अश्विनीकुमार या नावाने प्रसिद्ध झाले.

सूर्य स्वतः प्रजापती कश्यपांचा पुत्र आहे आणि विश्वकर्म्याची पुत्री संज्ञा त्याची पराशक्ती आहे. सूर्याच्या अंशापासून दोन अश्विनीकुमार प्रकट झाले व ते सूर्यास म्हणाले, 'भगवन्, आम्हा दोघांसाठी आपली काय आज्ञा आहे?' तेव्हा सूर्याने म्हटले, 'मुलांनो, तुम्ही दोघांनी देवश्रेष्ठ प्रजापती भगवान् नारायणांची भक्तिपूर्वक आराधना करावी. ते देवाधिदेव तुम्हांस अगत्यानं वर प्रदान करतील.' सूर्याच्या सांगण्या-वरून अश्विनीकुमारांनी अत्यंत कठोर असे तप केले. चित्तास समाहित करून 'ब्रह्मपार' नावाच्या स्तोत्राचा जप निरंतर करू लागले. अनेक वर्षांनंतर नारायणस्वरूप ब्रह्मदेव संतुष्ट झाले त्यांनी त्यांना प्रेमाने वर दिला.

हा सर्व वृत्तांत ऐकून राजा प्रजापालाने विचारले, "ब्रह्मन्, अश्विनीकुमारांनी अव्यक्तजन्मा भगवान श्रीहरींची आराधना ज्या स्तोत्रानं केली, ते मला ऐकायचं आहे. आपण कृपा करून मला ते सांगावं.' मुनिवर महातपांनी राजास या स्तोत्राचा मथितार्थ सांगितला. ते संक्षेपाने असे आहे.

'भगवन्, आपण निष्क्रिय, निष्प्रपंच, निरामय आहात. आपणांस, कुणाचीच अपेक्षा नाही. अवलंबन नाही. आपण गुणातीत, स्वप्रकाशी, सर्वाधार, ममताशून्य आहात. अशा ॐकाररूप आपणांस नमस्कार असो. भगवन्, आपणच ब्रह्मदेव, महाब्रह्मा, ब्राह्मणांचे प्रेमी, पुरुष, महापुरुष व पुरुषोत्तम आहात. महादेव, देवोत्तम, स्थाणू या आपल्या संज्ञा आहेत. सर्वांचं पालन करणं हा आपला स्वभाव आहे. भूत, महाभूत, भूताधिपती, यज्ञ, महायज्ञ, यज्ञाधिपती, गुह्य, महागुह्य, गुह्याधिपती आणि सौम्य, महासौम्य व सौम्याधिपती; हे सर्व शब्द आपणांस सार्थपणानं शोभतात. पक्षी, महापक्षी व पक्षिपती; दैत्य, महादैत्य व दैत्यपती आणि विष्णू, महाविष्णू आणि विष्णुपती; ही सर्व आपलीच नावं आहेत. आपण प्रजांचे एकमेव अधिपती आहात. अशा परमेश्वर भगवान् नारायणांना माझा नमस्कार असो.'

अश्विनीकुमारांनी केलेल्या स्तुतीने प्रजापती ब्रह्मदेव संतुष्ट होऊन अत्यंत प्रेमाने ते त्यांना म्हणाले, 'तुम्ही वर मागावा. देवांनाही परम दुर्लभ असा वर मी तुम्हांस देईन. त्यामुळं तुम्ही तीनही लोकांत सुखपूर्वक विचरण कराल.' त्यावर अश्विनीकुमार म्हणाले, 'भगवन्, आम्हांस यज्ञातील देवभाग मिळावा. प्रजापते, देवांप्रमाणं सदा सोमपान करण्याचाही अधिकार आम्हांस प्राप्त व्हावा. देवांच्या रूपात आम्ही शाश्वत प्रतिष्ठित व्हावं.' तेव्हा ब्रह्मदेव म्हणाले, 'रूप, कांती, अनुपम आयुर्वेदाचं ज्ञान, सोमरस पिण्याचा अधिकार; या सर्व गोष्टी तुम्हांस सुलभ होतील.'

मुनिवर महातपांनी ही सर्व हकीगत सांगून म्हटले, 'राजन्, ब्रह्मदेवांनी अश्विनीकुमारांना हे वर दिले त्या दिवशीची तिथी द्वितीया होती. सुंदर रूपाची अभिलाषा करणाऱ्यानं या तिथीसच व्रत करायला हवं. हे व्रत एक वर्षात पूर्ण होतं. असा हा अश्विनीकुमारांच्या जन्माचा इतिहास आहे. हा प्रसंग श्रवण करणारा मनुष्य पुत्रवान होतो. त्याची, मुक्तता सर्व पापांपासून होते.'

## गौरीची उत्पत्ती, रुद्राची जलात तपस्या, रुद्र-विष्णुसंघर्ष

त्यानंतर एकदा राजा प्रजापालनाने विचारले, 'महाप्राज्ञ, परम पुरुष परमात्म्याची शक्ती गौरीनं कोणत्या वरदानाच्या प्रभावानं सगुणरूप धारण केलं ? या देवीचं स्तवन सर्व देवदानव का करतात ?' या प्रश्नांची उत्तरे मुनिवर महातपांनी दिली. अनेक रूपांच्या रुद्रांची उत्पत्ती झाल्यानंतर पिता प्रजापती ब्रह्मदेवांनी भगवान नारायणांच्या मूर्तीतून प्रकट झालेल्या परम मंगलमयी गौरीस भार्येच्या रूपात ग्रहण केले. या गौरीदेवीस 'भारती' असे नाव होते. परमसुंदर गौरीस प्राप्त केल्यामुळे रुद्रांच्या प्रसन्नतेस सीमा उरली नाही. ब्रह्मदेवांनी म्हटले, 'रुद्र, तुम्ही तपाच्या प्रभावानं प्रजांची निर्मिती करावी.' ब्रह्मदेवांनी वारंवार प्रेरणा दिली तरी रुद्र मौन राहिले. 'या कार्यास मी असमर्थ आहे' असे एकदा ते म्हणाले. तेव्हा ब्रह्मदेवांनी त्यांना म्हटले, 'तुम्ही तपाचा संचय वाढवावा. तपोहीन पुरुष प्रजांची निर्मिती करू शकणार नाही.'

हे ऐकताच परमशक्तिशाली रुद्र जलात निमग्न झाले. तेव्हा ब्रह्मदेवांनी त्या परम सुंदर गौरीस पुनः आपल्यांत सामावून घेतले. त्यानंतर त्यांच्या मनात पुनः सृष्टीचा संकल्प उठला. त्यांनी सात मानसपुत्रांची निर्मिती केली. प्रजापती दक्षही त्यांच्याबरोबर प्रकट झाला. त्यानंतर प्रजेची वाढ नीट होऊ लागली. इंद्रासह सर्व देव, आठ वसू, रुद्र, आदित्य, मरुद्गण, ही सर्व प्रजापती दक्षाच्या कन्यांची प्रजा होय. गौरीस कालांतराने ब्रह्मदेवांनी दक्षप्रजापतीस पुत्रीच्या रूपाने प्रदान केले. ब्रह्मदेवांनी या गौरीचा विवाह महात्मा रुद्रांच्या बरोबर केला. ही गौरी दक्षाची पुत्री असल्याने दाक्षायणी या नावानेही प्रसिद्ध होती. दक्षप्रजापतीने आपल्या कुळाच्या वृद्धीसाठी, समृद्धीसाठी यज्ञास प्रारंभ केला.

या यज्ञात मरीची आदी सर्व आपापल्या विभागांत व्यवस्थित येऊन ऋत्विजांचे कार्य करू लागले. स्वतः मुनिवर मरीची ब्रह्मा बनले. आणखी ब्रह्मपुत्र अन्य स्थानांवर नियुक्त झाले. अत्री ऋषींना या यज्ञात स्थान मिळाले. अंगिरा या यज्ञात आग्नीध्र बनले, पुलस्त्य होता झाले. पुलह उद्गाता झाले. महान तपस्वी क्रतू प्रस्तोता बनले. प्रचेतामुनी

प्रतिहर्त्याचे स्थान सुशोभित करू लागले. महर्षी वसिष्ठ या यज्ञात सुब्रह्मण्यपदावर अधिष्ठित झाले. चारही सनत्कुमार यज्ञाचे सभासद बनले.

स्वतः ब्रह्मदेव त्या यज्ञात उपस्थित झाले. पितृगणही प्रत्यक्ष रूप धारण करून तेथे आले होते. सर्व लोक आलेले असल्यामुळे यज्ञमंडपात प्रसन्नता होती. आपला भाग घेण्यासाठी सर्व देव, आदित्य, वसुगण, विश्वेदेव, पितर, गंधर्व, मरुद्गण इत्यादींना यथोचित भाग प्राप्त झाला. याच वेळी ब्रह्मदेवांच्या कोपातून प्रकट झालेले रुद्रदेव जलात तपस्या करून बाहेर आले. त्यांचे रूप अतिशय चमकत होते. जणू हजारो सूर्य प्रकाशमान होत होते. तत्काल त्यांच्यापासून पांच दिव्य सर्ग उत्पन्न झाले. चार भौमसर्गांची निर्मिती झाली. त्यांत मरणधर्मा जीवही होते.

भगवान महारुद्र दहा हजार वर्षांची तपस्या करून जेव्हा जलातून बाहेर आले तेव्हा त्यांनी वन-उपवनांनी युक्त अशी सश्यशामला पृथ्वी परम रमणीय रूपात पाहिली. तीवर मनुष्ये आणि पशू यांचा विस्तार झाला होता. त्यांनी दक्षप्रजापतीच्या भवनात प्रकट होणारा ऋत्विजांचा शब्द ऐकिला. यज्ञशालेतून याज्ञिकांनी गायिलेले वेदगानही त्यांनी ऐकिले. तेव्हा त्या तेजस्वी व सर्वज्ञ परम प्रभू रुद्रांच्या मनात अपार क्रोध उमटला. ते म्हणू लागले, 'अरे, ब्रह्मदेवांनी सर्वप्रथम माझी निर्मिती केली. तू प्रजेची निर्मिती कर, असं मला सांगितलं. पण हे सृष्टिकार्य दुसऱ्याच व्यक्तीनं केलं.' असा विचार करून भगवान रुद्र क्रोधित होऊन जोरजोराने गर्जना करू लागले. त्या वेळी त्यांच्या कानांतून तीव्र ज्वाला प्रकट झाल्या. त्या ज्वालांतून भूत, वेताळ, अग्निमय प्रेते व पूतना यांची कोटयवधीच्या संख्येनं निर्मिती झाली. त्यांनी आपापल्या हातांत नाना प्रकारची आयुधे धारण केली. त्या रुद्र भगवानांनी एका सुंदर रथाचीही निर्मिती केली. त्या रथात दोन सुंदर मृग अश्वांच्या स्थानांवर कल्पित झाले. तीन तत्त्वे त्या रथाचे तीन दंड झाले. धर्मराज त्या रथाचा अक्षदंड बनला. पवन त्या रथाचा घरघर ध्वनी झाला. दिवस व रात्र या त्याच्या दोन पताका बनल्या. धर्म, अधर्म त्याचे ध्वजदंड झाले. त्या वेदविद्यामय रथावर सारथी म्हणून स्वतः ब्रह्मदेव

स्थापित झाले. गायत्री धनुष्य बनली. प्रणवाने धनुष्याच्या दोरीचे स्थान ग्रहण केले. या देवेश्वरासाठी सात स्वर सात बाण झाले.

अशा प्रकारे युद्धाची सामग्री एकत्रित करून प्रतापी रुद्र क्रोधमय बनून दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस करण्यासाठी प्रवृत्त झाले. भगवान शंकर जेव्हा तेथे येऊन पोचले तेव्हा ऋत्विजांचे मंत्र विस्मृत झाले. यज्ञात विपरीत असे हे अशुभ लक्षण पाहाताच त्या सर्व ऋत्विजांनी म्हटले, 'देवांनो, आपण त्वरित सावधान व्हावं. आपणां सर्वांपुढं एखादं महान भय निर्माण होत आहे. कदाचित ब्रह्मदेवांनी निर्माण केलेला एखादा महान असुर इथं यज्ञमंडपात येत आहे.' देवगण आपल्या मातामह दक्षप्रजापतीस म्हणाले, 'तात, आता अशा वेळी आम्ही काय करावं? जे उचित असेल ते आपण सांगावं.' तेव्हा दक्षप्रजापती म्हणाला, 'तुम्ही सर्वांनी त्वरित शस्त्र धारण करून युद्धास प्रारंभ करावा.'

असा आदेश मिळताच अनेक प्रकारची आयुधे धारण करणारे देव आणि रुद्रांचे अनुयायी यांच्यांत घनघोर संग्राम झाला. या युद्धात वेताळ, भूत, कूष्मांड, पूतना, अनेक ग्रह यांनी आयुधे हातांत घेऊन लोकपालांच्या समोर प्रतिकार केला. रुद्रांच्या अनुचरांनी, भूतगणांनी आकाशात जाऊन भयंकर बाण, तलवार, कुऱ्हाडी यांनी युद्ध केले. या समरभूमीवर त्या भयंकर भूतांपाशी उल्का, अस्थिसमूह आणि बाण अशी मोठी सामग्री होती, त्यांनी देवांवर मोठाच हल्ला चढविला.

त्यानंतर संग्रामाचे रूप अत्यंत भयावह झाले. रुद्रांनी भगदेवाचे दोनही नेत्र एकाच बाणाने छेदून टाकले. त्यांच्या बाणाने भग नेत्रहीन बनला. हे पाहून तेजस्वी पूषास क्रोध झाला. त्याने रुद्रांशी युद्ध केले. या युद्धात पूषाने बाणांचा पाण्याप्रमाणे वर्षाव केला. हे पाहून शत्रुहंत्या रुद्रांनीही पूषाचे सर्व दात पाडले. रुद्रांकडून पूषाचा दंतभंग झालासे पाहून देवसेनेत सर्वत्र गडबड उडाली. नंतर अकरा रुद्र युद्धासाठी आले. त्यानंतर आदित्यांतील सर्वांत कनिष्ठ परम प्रतापी भगवान विष्णू एकदम तेथे आले. त्यांनी देवसेनेस असे हतोत्साह होऊन दश-दिशांना पळून जाताना पाहून म्हटले, 'वीरांनो, पुरुषार्थाचा त्याग

करून तुम्ही कुठं पळून जाता ? वीरोचित दर्प, महिमा, दृढनिश्चय, कुलमर्यादा, ऐश्वर्यभाव; यांना इतक्या लौकर विसरलात ? तुमच्यांत ब्रह्मदेवांचे सर्व गुण आहेत. तुम्हांस दीर्घायुष्य प्राप्त झालं आहे. म्हणून भूमीवर मस्तक वाकवून त्या पद्मयोनी प्रजापतीस साष्टांग नमस्कार करा. आणि युद्धास तयार व्हा.'

या वेळी जनार्दनांच्या अंगावर पीतांबर शोभत होता. त्यांच्या हातांत शंख, चक्र आणि गदा अशी आयुधे शोभत होती. देवांना असे म्हणून भगवान श्रीहरी गरुडावरून आरूढ होऊन आले. नंतर त्यांचे व भगवान रुद्रांचे रोमांचकारी युद्ध झाले. रुद्रांनी पाशुपतास्त्राने विष्णूंवर व विष्णूंनी कुपित होऊन रुद्रांवर नारायणास्त्राचा प्रयोग केला. नारायणास्त्र व पाशुपतास्त्र यांची आकाशातच टक्कर झाली. एक हजार दिव्य वर्षांपर्यंत हे भीषण युद्ध चालले. या संग्रामात एकाच्या मस्तकावर मुकुट शोभत होता, तर दुसऱ्याचे मस्तक जटाजालाने भूषित होते. एक शंख वाजवीत होता, तर दुसरा मंगलमय डमरूचा नाद करीत होता. एकाने तलवार धारण केली होती, तर दुसऱ्याने दंड. एकाचे अंग कंठहार व कौस्तुभमण्याने शोभत होते, तर दुसऱ्याचे अंग भस्माने भूषित झाले होते. एकाने पीतांबर धारण केला होता, तर दुसऱ्याने सर्पाची मेखला. रुद्र व नारायण यांच्यांत अशी लढाई झाली. हरी आणि हर, दोघेही एकापेक्षा एक अधिक होते. हे पाहून पितासह ब्रह्मदेवांनी म्हटले,

'आपण दोघंही उत्तम व्रतांचं पालन करणारे आहात. म्हणून आपापल्या स्वभावास अनुसरून अस्त्रांना शांत करावं.'

ब्रह्मदेवांनी असे म्हटल्यावर विष्णू आणि शिव, दोघेही शांत झाले. ब्रह्मदेव त्या दोघांना म्हणाले, 'आपण दोघेही महानुभाव हरी व हर या नावांनी जगात प्रतिष्ठा प्राप्त करून घ्याल. दक्षाचा हा यज्ञ नाश पावला आहेच. तरी त्याला पूर्णत्व प्राप्त होईल. दक्षाच्या या देवसंतानांनी हे जगत यशस्वी होईल.'

लोकपितामह ब्रह्मदेवांनी या प्रकारे विष्णू आणि शिव यांना म्हटल्यावर उपस्थित देवांना ते म्हणाले, 'देवांनो, आपण या यज्ञात

भगवान रुद्रांना भाग अवश्य द्यावा. कारण वेदाची आज्ञा आहे की, यज्ञात रुद्राला भाग देणं परम प्रशस्त आहे. या रुद्रदेवांचं तुम्ही सर्वांनी स्तवन करावं. ज्यांच्या प्रहारानं भगदेवाचे नेत्र नष्ट झाले, पूषाचे दात पडले, त्या भगवान रुद्रांची स्तुती करावी. याला विलंब करणं ठीक नाही. फलरूप म्हणून मी प्रसन्न होऊन तुम्हांला वरदान देईन.'

ब्रह्मदेवांचे हे बोलणे ऐकून आत्मयोनी ब्रह्मदेवांना प्रणाम करून देवांनी अनुरागपूर्वक परमात्मा-भगवान शिवांची स्तुती करताना म्हटले, 'भगवन्, आपण विषम नेत्रांचे त्र्यंबक आहात. आपणांस निरंतर नमस्कार असो. आपणांस अनंत नेत्र आहेत. आपल्या हातात त्रिशूल आहे. आपणांस वारंवार नमस्कार असो. खट्वांग व दंड धारण करणाऱ्या आपणांस वारंवार नमस्कार असो. भगवन्, आपलं रूप अग्नीच्या प्रचंड ज्वालांप्रमाणं अथवा कोटचवधी सूर्यांप्रमाणं कांतिमान आहे. प्रभो, आपलं दर्शन झालं नाही तर आम्ही जड विज्ञानाचा आश्रय घेऊन पशुत्वास पोचू. त्रिशूलपाणं, आपले तीन नेत्र आपली शोभा वाढवितात. आर्तजनांचं दुःख दूर करणं, हा आपला स्वभावच आहे. आपण विकृत मुख आणि आकृती बनविता. सर्व देव आपल्याच शासनात असतात. आपण परम शुद्धस्वरूप, सर्वांचे स्रष्टे आणि रुद्र व अच्युत या नावांनी प्रसिद्ध आहात. आपण आमच्यावर प्रसन्न व्हावं.

'या पूषाचे दात आपल्या हातून भग्न पावले आहेत. आपलं रूप भयावह आहे. बृहत्काय वासुकी नाग धारण केल्यानं आपला कंठप्रदेश अतिशय रमणीय दिसतो. अच्युता, आपण विशाल शरीराचे आहात. आम्हां देवांवर अनुग्रह करण्यासाठी आपण कालकूट विषाचं पान केलंत, म्हणून आपला कंठभाग नीलवर्णाचा झाला. सर्वलोक महेश्वरा, विश्वमूर्ते, आपण आमच्यावर प्रसन्न व्हावं. आपण या यज्ञाचा प्रधान भाग स्वीकारावा. नीलकंठा, आपण सर्वगुणांनी संपन्न आहात. प्रभो, आपण प्रसन्न व्हावं. आमचं रक्षण करावं. आपण स्वतः गौरवर्णानं शोभत आहात. कपाली, त्रिपुरारी आणि उमापती; ही आपलीच नावं आहेत. भगवन्, सर्व प्रकारच्या भयांपासून आपण आमचं रक्षण करावं. प्रभो भव, शर्व, महादेव, पिनाकी, हर आणि रुद्र; ही सर्व आपलीच नावं

आहेत. विश्वेश्वरा, आम्ही आपणांस प्रणाम करतो. आपण आमचं रक्षण करावं.'

देवांनी या प्रकारे स्तुती केल्यावर देवाधिदेव रुद्र प्रसन्न होऊन म्हणाले, 'देवांनो, भगास नेत्र व पूषास दात पुन्हा प्राप्त होतील. दक्षाचा यज्ञ पूर्ण होईल. तुमचं पशुत्व दूर होईल. माझ्या दर्शनानं तुम्हांस पशुपतित्वाची प्राप्ती होईल. मी सनातन कालापासून सर्व विद्यांचा अधीश्वर आहे. माझं नाव पशुपती आहे. कारण मी पशूंत, बुद्धिजीवांत त्यांच्या अधीश्वराच्या रूपानं निवास करीत असतो. जे माझी उपासना करतील, ते पाशुपत दीक्षेनं युक्त होतील.'

भगवान रुद्रांनी असे म्हणताच लोकपितामह ब्रह्मदेव अत्यंत स्नेहपूर्वक हसून त्यांना म्हणाले, 'रुद्रदेव, आपण निश्चयानं या जगात पशुपती नावानं प्रसिद्ध व्हाल. हा दक्षही जगतात प्रसिद्ध होईल. सर्व जगत याचा सन्मान करील.' यानंतर मेधावी ब्रह्मदेव दक्षास म्हणाले, 'वत्सा, मी गौरीस तुला प्रथमपासून दिलं होतं. आता तू तिला रुद्रांच्या स्वाधीन करावंस.' परम सुंदरी गौरीने दक्षाच्या घरी कन्यारूपाने जन्म घेतला होता. ब्रह्मदेवांच्या सांगण्यावरून दक्षाने तिचा विवाह महाभाग रुद्रांशी केला. दक्षकन्या गौरीस रुद्रांनी पत्नी म्हणून स्वीकारली. त्यावरोबर दक्षाचा सन्मान वाढला. तेव्हा ब्रह्मदेवांनी रुद्रास निवास करण्यासाठी कैलासपर्वत प्रदान केला. तेव्हापासून ते आपल्या गणांसहित कैलासपर्वतावर राहू लागले. ब्रह्मदेव दक्षप्रजापतीस घेऊन दुसरीकडे निघून गेले.

## हिमालयपुत्री गौरीचा शंकरांशी विवाह

भगवान रुद्र कैलासपर्वतावर राहू लागल्यानंतर काही काळाने आपला पिता दक्ष व प्राणपती महादेव यांच्यांतील वैरप्रसंगाची स्मृती गौरीस झाली. तिच्या मनात रोषाचा भाव प्रकटला. ती विचार करू लागली. 'माझ्या पित्यानं, दक्षानं या देवाधिदेवांना यज्ञात भाग न देऊन केवढा मोठा अपराध केला होता! फलस्वरूप माझ्या पित्याचा यज्ञ त्याच्या नगरासह नष्ट झाला. म्हणून शिवांच्या अपराधी अशा

पित्यापासून उत्पन्न झालेल्या या माझ्या शरीराचा त्याग करायला हवा. तपस्येच्या साह्यानं महेश्वरांची आराधना करून दुसरा जन्म धारण करावा व पुन: याच महादेवांची आपण अर्धांगिनी बनावं. पिता दक्षात तर बांधवोचित प्रेमाचा अंशही उरलेला नाही. म्हणून आता त्याच्या घरी माझं जाणंही होणार नाही.'

अशा प्रकारचा विचार करून परम सुंदरी गौरी तप करण्याच्या उद्देशाने गिरिराज हिमालयावर गेली. दीर्घ काळापर्यंत तपश्चर्या करून तिने आपले अंग सुकविले. त्यानंतर योगाग्नीच्या साह्याने तिने आपल्या शरीरास दग्ध केले आणि ती पर्वतराज हिमालयाची पुत्री म्हणून प्रकट झाली. उमा, महाकाली इत्यादी नावांनी ती प्रसिद्ध झाली. हिमवानाच्या घरी ती परम सुंदर रूपात अवतीर्ण झाली व ' भगवान रुद्र आपणांस पतिरूपानं प्राप्त व्हावेत ' अशा संकल्पाने भगवान शंकरांचे स्मरण करीत तिने कठोर तपस्येस प्रारंभ केला.

अशा प्रकारे गिरिराज हिमालयावर दीर्घ काळपर्यंत तपद्वारे आराधना केल्यावर ब्राह्मणाचा वेष धारण करून भगवान शिव तेथे आले. त्यावेळी त्यांचे शरीर वृद्ध होते. सर्व अंगे शिथिल बनली होती. चालताना ते पदोपदी पडत होते. मोठ्या कठीण अवस्थेतून ते पार्वती-पाशी आले व तिला म्हणाले,

' भद्रे, मी एक अत्यंत भुकेलेला ब्राह्मण आहे. मला काही तरी खायला दे.'

' विप्रवर ' कल्याणमयी शैलेंद्रनंदिनी त्या ब्राह्मणास म्हणाली, ' मी आपणांस भोजनार्थ फळं वगैरे देत आहे. आपण त्यांचं इच्छेनुसार ग्रहण करावं.'

तिने असे सांगितल्यावर तो ब्राह्मण शेजारून वाहणाऱ्या गंगेत स्नान करण्यासाठी उतरला. त्या ब्राह्मणवेषधारी शिवांनी स्नान केले. स्नान करताना त्यांनी स्वत:चाच पाय मायास्वरूप भयंकर अशा मकराचे रूपे धारण करून पकडला. तो पार्वतीस म्हणाला, ' धाव. धाव. मी फार मोठ्या विपत्तीत सापडलो आहे. या मकरापासून तू माझ्या प्राणांचं रक्षण कर.' हे ऐकून पार्वतीने विचार केला,

'गिरिराज हिमालय तर आपला पितर आहे. त्यांना मी पितृभावानं स्पर्श करते. आणि भगवान शिवांना पतिभावानं. मग मी तपस्विनीनं या वृद्ध ब्राह्मणास कोणत्या भावानं स्पर्श करू ? पण या वेळी जलात मकराच्या दाढेत सापडलेल्या या ब्राह्मणास मी वर काढलं नाही तर निःसंदेह मला ब्रह्महत्येचं पातक लागेल. आणखी असं की, काही अपराध घडला तर त्यासाठी प्रायश्चित्त आहे. पण ब्रह्महत्येचा दोष नाहीसा करणारं प्रायश्चित्त नाही.' असा विचार करून ती धावतच तेथे आली व तिने हात पकडून ब्राह्मणास गंगेच्या प्रवाहातून बाहेर काढले. एवढ्यात तिने पाहिले की, ज्या भूतभावन शंकरांची ती आराधना करीत होती, ते स्वतः शंकरच तिच्या हातात आले आहेत. हा प्रकार पाहून ती लज्जित झाली. भगवान शंकर हसत होते. पार्वती मौन होती. भगवान तिला म्हणाले, " भद्रे, तू माझा हात पकडला आहेस. आता माझा त्याग करणं उचित नाही. कल्याणी, तू आता हे पाणिग्रहण निष्फल करशील तर मला भोजनासाठी सरस्वतीकडं जावं लागेल.'

'आता अशी थट्टा पुरी करावी ' असे म्हणून लज्जित झालेली पार्वती पुन्हा म्हणाली, ' देवाधिदेव, महेश्वर, आपण तीनही लोकांचे स्वामी आहात. आपणांस प्राप्त करून घेण्यासाठीच हा माझा प्रयत्न होता. पूर्वजन्मी आपणच माझे पतिदेव होता. या जन्मीही आपणच पती होणार. पण अजून माझा संरक्षक पिता गिरिराज हिमालय आहे. मी आता त्याच्याकडं जाते. त्यांना विनंती करून आपण माझं विधिपूर्वक पाणिग्रहण करावं.'

असे म्हणून ती परम सुंदरी भगवती उमा आपल्या पित्याच्या घरी गेली. हात जोडून ती म्हणाली, ' पिताजी, मला अनेक लक्षणांनी प्रतीत होत आहे की, पूर्वजन्मी भगवान रुद्रच माझे पती होते. त्यांनीच दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस केला. तेच संरक्षक रुद्र ब्राह्मणाचा वेष धारण करून तपोवनात माझ्यापाशी आले होते. त्यांनी भोजनाची याचना केली. ' आपण स्नान करून यावं ' असं मी सांगताच ते गंगेवर स्नानासाठी गेले. तिथं एका मकरानं त्यांना पकडलं. त्यांनी मला साह्यासाठी हाक मारली. ब्रह्महत्येचं पातक लागू नये, म्हणून मी त्यांना आपल्या

हातांनी पकडलं. त्याच वेळी त्यांनी आपलं स्वाभाविक रूप प्रकट केलं, आणि म्हटलं, ' देवी, हे पाणिग्रहण झालं.' त्यांची अशी स्वीकृती घेऊन मी आपणांपाशी आले आहे. आपण उचित ते आता करावं.'

पार्वतीचे बोलणे ऐकून हिमालयास प्रसन्नता वाटली. तो आपल्या पुत्रीस म्हणाला, ' सुमुखी, मी आज या जगतात धन्य झालो आहे. स्वतः भगवान शंकर माझे जामात होणार आहेत ! तुझ्यामुळंच मी खरा संततिवान बनलो आहे. पुत्री, पण थोडा वेळ थांब.' असे म्हणून पर्वतराज हिमालय भगवान पितामह ब्रह्मदेवांपाशी गेला. त्यांचे दर्शन घेऊन गिरिराज त्यांना नम्रत्वाने म्हणाला, ' भगवन्, उमा माझी पुत्री आहे. आज मी तिला भगवान रुद्रांना देऊ इच्छितो.' या वचनास भगवान ब्रह्मदेवांनी अनुमती दिली.

त्यानंतर त्वरित पर्वतराज हिमालय आपल्या घरी आला. त्याने तुंबरू, नारद, हाहा आणि हूहू यांना बोलविले. किन्नर, असुर व राक्षस यांनाही सूचना दिली. अनेक पर्वत, नद्या, वृक्ष, औषधी, छोटेमोठे पाषाण मूर्तिमान होऊन भगवान शंकर व पार्वती यांच्या होणाऱ्या विवाहासाठी उपस्थित झाले. या विवाहासाठी पृथ्वी वेदी बनली. सात समुद्रांचे कलश झाले. स्वतः सूर्य व चंद्र अशा शुभ समयास दीपकांचे कार्य करण्यास उत्सुक बनले. नद्या पाणी पुरविण्याच्या कामास तत्पर झाल्या.

अशी सर्व व्यवस्था झाल्यावर गिरिराज हिमालयाने मंदराचलास भगवान शंकरांकडे पाठविले. भगवान शंकरांची स्वीकृती घेऊन मंदराचल त्वरित परत आला. नंतर भगवान शंकरांनी विधिपूर्वक उमेचे पाणिग्रहण केले. त्या प्रसंगी नारद व पर्वत हे दोघे गायन करीत होते. सिद्धांनी नृत्य केले. वनस्पतींनी अनेक प्रकारच्या पुष्पांचा वर्षाव केला. सुंदर रूपवती अप्सरांनी उच्च स्वरांनी गाणे म्हणत नृत्य केले. विवाह-समारंभास स्वतः लोकपितामह चतुर्मुख ब्रह्मदेव विराजमान होते. प्रसन्न होऊन ते उमेस म्हणाले, ' पुत्री, या जगतात तुझ्यासारखी पत्नी आणि शंकरांसारखे पती सर्वांना सुलभ होवोत.' भगवान शंकर व भगवती उमा शेजारीशेजारी बसले होते.

ही सर्व हकीगत सांगून भगवान वराह म्हणाले, ' पृथ्वी, रुद्रानं

प्राकट्य, गौरीचा जन्म आणि विवाह; हा सारा कथाप्रसंग राजा प्रजापालकानं विचारल्यावरून परम तपस्वी महातपाऋषींनी त्याला सांगितला. तोच सर्व मी तुला सांगितला. देवी गौरीचा जन्म, तिचा विवाह; इत्यादी सर्व कार्य तृतीया तिथीस संपन्न झाली. म्हणून तृतीया त्यांची तिथी मानली गेली आहे. या तिथीस मीठ खाणं सर्वथा निषिद्ध आहे. जी स्त्री या दिवशी उपवास करते, तिला अचल सौभाग्याची प्राप्ती होते. दुर्भाग्यग्रस्त स्त्री वा पुरुष या तृतीयेस लवणाचा त्याग करून या प्रसंगाचं श्रवण करील तर तिला वा त्याला सौभाग्य, धनसंपत्ती व मनोवांच्छित पदार्थ यांची प्राप्ती होईल. या जगतात उत्तम स्वास्थ्य, कांती, पुष्टी यांचा लाभ होईल.'

## गणेशजन्माची कथा

यानंतर राजा प्रजापालाने विचारले, 'महामुने, गणपतीचा जन्म कसा झाला ? त्यानं सगुण रूप कसं धारण केलं ? आपण मला सर्व कथा कृपा करून सांगावी.' राजाने अशी विनंती केल्यावर महातपांनी सर्व आख्यान निवेदन केले.

फार पूर्वीची हकीगत आहे. सर्व देव व तपासच धन मानणारा ऋषिगण यांनी कार्यास आरंभ केला होता. त्यात त्यांना निश्चयाने सिद्धी प्राप्त झाली होती. पण अशी स्थिती नंतर प्राप्त झाली की, चांगल्या मार्गाने चालणाऱ्या लोकांना विघ्नांशी सामना करावा लागे व कार्याची सिद्धी कशीतरी होई. उलट निकृष्ट कार्यशील व्यक्तीच्या कार्यसिद्धीत कोणतेच विघ्न दिसत नव्हते. तेव्हा पितरांसह सर्व देव चिंता करू लागले. त्यांना वाटे विघ्न तर असत् कार्यात येणे योग्य. या विषयावर त्यांनी परस्पर विचार केला. सर्व देवांनी भगवान शंकरांपाशी जाण्याचे ठरविले. ते कैलासावर गेले व भगवान शंकरांना प्रणाम करून म्हणाले,

'देवाधिदेव, महादेव, शूलपाणी, त्रिलोचन, भगवन्, असुरांच्या कार्यांत विघ्न उत्पन्न झालं तर आम्ही समजू शकतो, पण आमच्या कार्यांत विघ्न कशासाठी ?'

देवांचे हे बोलणे ऐकून भगवान शंकर अत्यंत प्रसन्न झाले. त्यांनी भगवती उमेकडे पाहिले. पार्वतीकडे पाहून त्यांनी मनातल्या मनात विचार केला की, 'अरे, या आकाशाचं रूप का दिसत नाही ? पृथ्वी, जल, तेज, वायू यांच्या मूर्ती तर दिसतात. पण आकाशाची मूर्ती का नाही दिसत ?' असा विचार करून ज्ञानशक्तीचे भांडार परमपुरुष भगवान रुद्र हसले. आकाशाची मूर्ती न दिसल्याने शंभू जे हसले त्याचा अभिप्राय असा होता– 'फार पूर्वी ब्रह्मदेवांकडून समजलं होतं की, शरीरधारी व्यक्तींनाच मूर्ती असते. आकाश शरीरधारी नसल्यानं त्याला मूर्ती नाही. तर मग परब्रह्म रुद्रांच्या द्वारे पृथ्वी, जल, तेज, वायू या चारांच्या सहयोगानं हे एक अद्‌भुत कार्य कसं होणार ?' अजून शिवांचे हसणे संपले नव्हते.

एवढ्यात एक परम तेजस्वी कुमार तेथे प्रकट झाला. त्याचे मुख तेजाने चमकत होते. भगवान शिवांचे सर्व गुण त्याच्यात प्रतीत होत होते. जणू साक्षात तो भगवान शिवच होता. तो कुमार एक महान आत्मा होता. तो प्रकट होऊन आपली सस्मित दृष्टी, अद्‌भुत कांती, दीप्त मूर्ती आणि रूप यांनी देवांचे मन मोहित करीत होता. त्याचे रूप मोठे आकर्षक होते. भगवती उमा त्याला निर्निमेष दृष्टीने पाहू लागली. त्या बालकाच्या सुंदर रूपावर तीही मुग्ध होऊन गेली. स्त्रीचा चंचल स्वभाव जाणून भगवान रुद्रांच्या मनात क्रोधाचा उदय झाला. म्हणून त्या परम प्रभूने बालकास शाप दिला. 'कुमार, तुझं मुख हत्तीच्या मुखासारखं होईल, पोट मोठं होईल. सर्प तुझं यज्ञोपवीत होईल.'

गणेशाला अशा प्रकारचा शाप देऊनही भगवान शंकरांचा कोप शांत झाला नाही. त्यांचे शरीर क्रोधाने थरकापत होते. ते उठून उभे राहिले. त्रिशूलधारी शिवांचे शरीर जसजसे हालत होते तसतसे त्यांच्या रोमकूपांतून तेजोमय जल बाहेर पडत होते. त्यापासून अनेक विनायक निर्माण झाले. त्या सर्वांची मुखे हत्तीच्या मुखांसारखी होती. त्यांच्या शरीरांची आभा काळ्या खैराच्या वृक्षाप्रमाणे वा अंजनाप्रमाणे होती. त्यांच्या हातांत अनेक प्रकारची शस्त्रे व अस्त्रे होती. आता देव व्यग्र होऊन विचार करू लागले. 'अरे, झालं तरी काय ? एकच बालक

असं महान कार्य करू शकतं ? आम्हां देवांची अभिलाषा अनायासच पूर्ण झाली. पण याच्या चारही दिशांनी असे हे गण आले तरी कुठून ?'

या वेळी विनायकांच्यामुळे देवांची चिंता अत्यंत वाढली. पृथ्वीवर क्षोभ निर्माण झाला. तेव्हा चार मुखांनी शोभणारे ब्रह्मदेव अनुपम विमानावर विराजमान होऊन आकाशात आले आणि म्हणाले, 'देवांनो, तुम्ही धन्य आहात. तुम्ही तीन नेत्रांच्या अद्भुत रूपधारी भगवान रुद्रांचे कृपापात्र आहात. असुरांच्या कार्यांत विघ्न निर्माण करणाऱ्या गणेशास प्रणाम करण्याचं सौभाग्य तुम्हांस प्राप्त झालं आहे.' यानंतर भगवान ब्रह्मदेव रुद्रांना म्हणाले, 'विभो, आपल्या मुखातून प्रकट झालेलं हे बालकच आता या विनायकांचा स्वामी बनवा. उरलेले दुसरे विनायक याचे अनुचर बनतील. प्रभो, माझी प्रार्थना अशी आहे की, आपल्या प्रभावानं आकाशासही शरीरधारी बनवून पृथ्वी आदी चारही महाभूतांत राहाण्याचा अवसर मिळावा. त्यामुळं एकच आकाश अनेक प्रकारांनी व्यवस्थित होईल.'

अशा प्रकारे भगवान रुद्र व ब्रह्मदेव यांची चर्चा चालली असताना तेथून विनायक निघून गेले. त्यानंतर पितामहांनी शंभूंना सांगितले, 'देव, आपल्या हातांत अनेक समुचित अस्त्रं आहेत. आपण ही अस्त्रं वरासहित या बालकास प्रदान करावीत, अशी माझी प्रार्थना आहे.' असे म्हणून ब्रह्मदेव तेथून निघून गेले. तेव्हा भगवान शंकर आपल्या सुपुत्रास, गणेशास म्हणाले, 'पुत्रा, विनायक, विघ्नहर, गजास्य, भवपुत्र; या नावांनी तू प्रसिद्ध होशील, क्रूर दृष्टीचे हे विनायक मोठ्या उग्र स्वभावाचे आहेत. पण ते सर्व तुझी सेवा करतील. यज्ञ, दान इत्यादी शुभ कर्मांत ते सिद्धी प्रदान करतील. देव, यज्ञ आणि इतर कार्यं यांत सर्वांत महत्त्वाचं स्थान तुला मिळेल.'

असे म्हणून भगवान शंकरांनी जलपूर्ण सुवर्णाच्या कलशांनी विविध तीर्थांच्या जलाने त्या गणेशास अभिषेक केला. अभिषेक झाल्यावर विनायकांचा स्वामी भगवान गणेशाची शोभा वाढू लागली. सर्व देवांनी शंकरांसहित स्तुती करताना म्हटले,

'गजानन, आपण गणांचे स्वामी आहात. आपलं एक नाव

विनायक आहे. आपण प्रचंड पराक्रमी आहात. आपणांस आमचा निरंतर नमस्कार असो. भगवन्, विघ्न दूर करणं आपला स्वभाव आहे. आपण सर्पाची मेखला धारण करता. भगवान शंकरांच्या मुखातून आपला जन्म झाला आहे. मोठ्या उदरामुळं आपली आकृती शोभून दिसते. सर्व देव आपणांस प्रणाम करतात, आपण आमची सर्व विघ्नं दूर करावीत. शांत करावीत.'

**नमस्ते गजवक्त्राय नमस्ते गणनायक ।**
**विनायक नमस्तेऽस्तु नमस्ते चण्डविक्रम ।।**
**नमोऽस्तुते विघ्नहर्त्रे नमस्ते सर्पमेखल ।**
**नमस्ते रुद्रवक्त्रोत्थ प्रलम्बजठराश्रित ।।**
**सर्वदेवनमस्कारादविघ्नं कुरु सर्वदा ।**

(२३.३३–३४½)

अशा प्रकारे भगवान रुद्रांनी महान पुरुष श्रीगणेशांस अभिषेक केला. देवांनी त्यांची स्तुती केली. तेव्हा गणेश पार्वतीचे पुत्र म्हणून शोभू लागले. गणाध्यक्ष गणेशांच्या चरित्रातील सर्व क्रिया चतुर्थीस झाल्या. म्हणून या तिथीस मोठाच सन्मान मिळाला आहे. जो भाग्यशाली मानव या तिथीस तिळांचा आहार घेऊन भक्तिपूर्वक गणपतीची आराधना करतो, त्यावर तो त्वरित प्रसन्न होतो. जी व्यक्ती या स्तोत्राचा पाठ करील अथवा यास श्रवण करील, तिच्या आसपास विघ्न राहाणार नाही. त्याच्या जवळ लेशमात्रही पाप उरणार नाही.

## सर्पांच्या उत्पत्तीची कथा

एकदा भगवान वराहांना पृथ्वीने विचारले, 'माझा उद्धार करणाऱ्या भगवंता, आपला स्पर्श पावून महान विक्रमशाली सर्प कसे निर्माण झाले ? का निर्माण झाले ?' या प्रश्नासारखे प्रश्न राजा प्रजापालाने उत्तम व्रती महातपांनाही विचारले होते. त्यांनी सर्व वृत्तांत निवेदन केला. कश्यपांच्या वंशातील संबंधित नाग तर मोठ्या दुष्ट प्रकृतीचे होते. मरीची ब्रह्मदेवांचे प्रथम मानसपुत्र होते. त्यांचे पुत्र

कश्यप. मंद हसणारी दक्षांची पुत्री कद्रू त्यांची भार्या झाली. तिच्यापासून कश्यपांना अनंत, वासुकी, महाबली कंवल, कर्कोटक, पद्म, महापद्म, शंख, कुलिक आणि पापराजिल आदी नामांचे विख्यात पुत्र झाले. हे प्रधान सर्व कश्यपांचे पुत्र होत. यानंतर या सर्पांपासून सारे जग भरून गेले. ते सर्व कुटिल आणि नीच कर्मांत रत झाले. त्यांच्या मुखांत अत्यंत तीव्र विष भरलेले होते. ते मनुष्यांनाही आपल्या दृष्टीनेच चावून भस्म करू शकत. त्यांचा दंश शब्दासारखा तीव्रगामी होता. त्यानेही मनुष्यांचा मृत्यू होई. या प्रकारे प्रजेचा अति दारुण संहार होऊ लागला. सर्व प्रजावर्ग भीषण संहार पाहून एकत्र झाला व समर्थ महाप्रभू भगवान ब्रह्मदेवांना शरण गेला. प्रजेने ब्रह्मदेवांना सांगितले, "भगवन्, आपण अतिशय शक्तिमान आहात. या तीक्ष्ण दातांच्या सर्पांमुळं आम्हांस त्रास होत आहे. आपण आमचं रक्षण करावं. त्यांची दृष्टी पडताच मनुष्ये आणि पशुसमूह भस्म होऊन जातात. ही नित्याची बाव झाली आहे. भगवन्, या सर्पांच्या द्वारे आपल्या सृष्टीचा संहार होत आहे. महामते, आपण हे आमचं दुःख दूर करावं.'

'प्रजापाल, तुम्ही भीतीनं घाबरू नका: मी तुमचं अवश्य रक्षण करीन. आता तुम्ही सर्वजण आपापल्या स्थानावर जावं.'

अव्यक्तमूर्ती ब्रह्मदेवांनी असे सांगितल्यावर सर्व प्रजा आपापल्या स्थानी गेल्या. त्या वेळी ब्रह्मदेवांच्या मनात असीम क्रोध उत्पन्न झाला. त्यांनी वासुकी प्रभृती प्रमुख सर्पांना बोलावून त्यांना शाप दिला. ते म्हणाले, 'नागांनो, मी निर्माण केलेल्या माणसांच्या मरणाचं कारण तुम्ही वनला आहात. म्हणून पुढे स्वायंभुव मन्वन्तरात तुमचा संहार तुमच्या मातेच्या शापानंच होईल, यात कसलाच संशय नाही.'

ब्रह्मदेवांचा हा शाप ऐकून सर्पांची शरीरे भयाने कापू लागली. ते प्रभूंच्या पायांवर पडून म्हणू लागले, 'भगवन्, आपणच तर अशा कुटिल जातीत आम्हाला जन्म दिलात. विष प्रकट करणं, दुष्टता करणं, एखादी वस्तू पाहिली की ती नष्ट करणं, हा आमचा तीव्र स्वभाव आपणच तर निर्माण केलात. आता आपणच त्या उग्र स्वभावास शांत करावं.'

'मी तुम्हांस निर्माण केलं, हे मी मानतो. तुमच्यांत मी कुटिलताही निर्माण केली. पण याचा अभिप्राय असा नाही की, तुम्ही निर्दय बनून नित्य मनुष्यांना खाऊन टाकावं.'

'भगवन्, आता आम्हांस वेगवेगळी राहण्यासाठी सुनिश्चित स्थानाची व्यवस्था करावी. आणि आम्ही दंश करण्याचे नियमही आम्हांस सांगावेत.'

'सर्पांनो, तुम्ही मनुष्यांच्या बरोबरही राहू शकता. यासाठी मी स्थानाचा निर्णय देतो. तुम्ही सर्वांनी मन एकाग्र करून ऐकावं. सुतल, वितल, पाताल; हे तीन लोक आहेत. तुम्हांस इच्छा झाली तर तुम्ही तिथं राहावं. तिथं माझ्या व्यवस्थेने अनेक प्रकारचे भोग तुम्हांस प्राप्त होतील. रात्रीच्या सातव्या प्रहरापर्यंत तुम्ही तिथं राहावं. पुनः वैवस्वत मन्वन्तराच्या आरंभी कश्यपांच्या घरी तुमचा जन्म होईल. देव तुमचे बंधुबांधव होतील. बुद्धिमान गरुडाशी तुमचा भाऊपणाचा संबंध राहील. त्या वेळी कारणवश तुमची सारी संतानं जनमेजयाच्या यज्ञाच्या अग्नीत जळून नष्ट होतील. यात निश्चयानं तुमचा काही दोष नसणार. जे सर्प अत्यंत दुष्ट व उच्छृंखल असतील, त्यांची जीवनलीला या शापानं समाप्त होईल. जे असे नसतील ते वाचतील. हो. अपकार करणाऱ्यास अथवा ज्याचं आयुष्य संपत आलं आहे, त्यांना समयानुसार दंश करण्यासाठी तुम्ही स्वतंत्र आहात. गरुडासंबंधी मंत्र, औषधं, गारुडमंडलद्वारे दात कुंठित करण्याची कला; इत्यादी ज्यांना अवगत असेल त्यांना भिऊनच तुम्ही वागावं. अन्यथा तुमचा विनाश निश्चित आहे.'

ब्रह्मदेवांनी असे सांगितल्यावर सर्व सर्प पृथ्वीच्या खाली पाताळात गेले. तेथे ते शाप व वरदान घेऊन आनंदाने राहू लागले. या सर्व गोष्टी त्या नागांच्या संबंधात पंचमी तिथीस घडल्या. म्हणून ही तिथी धन्य, प्रिय, पवित्र व सर्व पापांचा संहार करणारी आहे. या तिथीस जो खारट पदार्थांच्या भोजनाचा त्याग करील, आणि नागांना दुधानं स्नान घालील तो त्यांचा मित्र बनेल.

## स्वामी कार्तिकेयाची जन्मकथा

एकदा राजा प्रजापालाने विचारले, ‘ द्विजवर, माझा एक प्रश्न आहे. अहंकारापासून कार्तिकेयाची उत्पत्ती कशी झाली ? महामते, आपण माझा संदेह दूर करावा, अशी विनंती आहे.’ हे ऐकून मुनिवर महातपांनी कार्तिकेयाचा सर्व वृत्तांत निवेदन केला. सर्व तत्त्वांत ज्याला प्रधान स्थान आहे, त्याला परम पुरुष परमात्मा म्हणतात. सर्वांच्या आरंभी त्यांच्यापासूनच अव्यक्त तत्त्वाची उत्पत्ती होते. ही तत्त्वे तीन प्रकारची आहेत. परम पुरुष व अव्यक्त यांच्या योगाने महत्तत्त्वाची निर्मिती होते. याच महत्तत्त्वास अहंकारही म्हणतात. यातील जे पुंस्तत्त्व आहे ते भगवान शिव वा विष्णू या नावांनी प्रसिद्ध आहे, अव्यक्तप्रकृती भगवती उमा वा कमलनयना लक्ष्मी आहे, याच भगवान शंकर व उमा यांच्या संयोगाने अहंकाराची उत्पत्ती झाली. तोच सेनापती कार्तिकेय होय, अशा या कार्तिकेयाच्या उत्पत्तीचा प्रसंग पाहाण्यासारखा आहे.

सर्वप्रथम एकमात्र भगवान नारायणच विराजमान होते. त्यानंतर त्यांच्यापासून ब्रह्मदेवांची निर्मिती झाली. त्यानंतर स्वायंभुव मनू, मरीची, सूर्य इत्यादी प्रकटले. नंतर देव, दानव, गंधर्व, मनुष्य, पशू, पक्षी यांची सृष्टी तयार झाली. सृष्टीचा विस्तार झाल्यावर देव व दानव यांतील एक दुसऱ्यास पराभूत करण्याचा प्रयत्न करू लागला. दोनही दलांचे बल अपार होते. वैर होते. म्हणून वारंवार युद्धे होऊ लागली. दैत्यांचा सेनाध्यक्ष मोठा बलवान होता. त्याचा युद्धात पराभव कोणाकडूनच होत नव्हता. असे अनेक सेनापती होते. त्यांची काही नावे अशी– हिरण्यकशिपू, हिरण्याक्ष, महासुर, विप्रचित्ती, विचित्र, भीमाक्ष, क्रौंच. या सर्व वीरांच्या बलास सीमा नव्हती. घोर संग्रामात दानवांच्या तीक्ष्ण बाणांनी देवसेनेतील प्रमुख वीर नित्य पराभूत होऊ लागले. त्यांचा पराजय पाहून बृहस्पतींनी म्हटले, ‘ देवांनो, तुमच्या सेनेस सेनाध्यक्ष कुणी नाही. केवळ एक इंद्र तुमच्या सेनेचं रक्षण करू शकेल, हे असंभव आहे. म्हणून तुम्ही स्वतःच्या सेनेचा अध्यक्ष शोधून काढावा. आता या कामी उशीर करू नका.’

बृहस्पतींनी असे सांगितल्यावर सर्व देव ब्रह्मदेवांकडे गेले आणि व्याकुळ होऊन त्यांना म्हणाले, 'भगवन्, आपण आम्हांस एखादा सेनाध्यक्ष द्यावा.' यानंतर ब्रह्मदेवांनी ध्यान लावून पाहिले. या देवांसाठी आपणांस काहीतरी करायला हवंय, अशी जाणीव त्यांना झाली. एवढ्यात त्यांचे लक्ष भगवान शंकरांकडे गेले. सर्व देव, गंधर्व, ऋषी, सिद्ध, चारण असे सर्व ब्रह्मदेवांच्या मागोमाग चालून कैलासपर्वतावर आले. तेथे पशुपती भगवानांचे त्यांनी दर्शन घेतले. सर्वांनी स्तोत्राने स्तुती करताना म्हटले,

'महेश्वरा, या वेळी सर्व देव आपणांस शरण आले आहेत. भूतभावन, आपण त्रिनेत्र, भगवान शंकर, उमापती, विश्वपती, मरुत्पती आणि जगत्पती या नावांनी विख्यात आहात. आपणांस आमचा प्रणाम आहे. प्रभो, आपण आमचं रक्षण करावं. भगवन्, आपल्या जटापुंजाच्या अग्रभागी बसलेल्या चंद्राच्या किरणांनी तीनही विश्वं प्रकाशित होतात. आपणच अच्युत, त्रिशूलपाणी आणि पुरुषोत्तम आहात. दैत्यांकडून आम्हांस भय उत्पन्न झालं आहे. त्यांच्यापासून आपण आमचं रक्षण करावं. सर्व देवांत श्रेष्ठ असणाऱ्या प्रभो, आदिदेव, पुरुषोत्तम, हर, भव, महेश, त्रिपुरांतक, विभू, भगदेवाचे नेत्र काढणारे, दैत्यरिपू, पुरातन व वृषभध्वज; अशी आपली नावं अनंत आहेत.

'भगवन्, आपण आमचं रक्षण करावं. गिरिजापती प्रभो, पर्वतपत्नी मैनाचं आपण वात्सल्य-भाजन आहात. अच्युत, गणेश, भूतेश, शिव, अक्षय, अयन, दैत्यवरान्तक, या आपल्यास संज्ञा आहेत. भगवन्, आपण आमचं रक्षण करावं, पृथ्वी आदी पांच तत्त्वांत आपणच प्रतिष्ठित आहात. आपले प्रधान गुणही पांच आहेत. आणि विशेषता ही आहे की, आपण आकाशात तर केवळ ध्वनिरूपानंच लीन राहता. अग्नीत शब्द व रूप या दोन गुणांनी, वायूत तीन रूपांनी, जलात शब्द, स्पर्श, रूप, रस या चार गुणांनी आणि पृथ्वीत गंधासहित पांच रूपांनी आपण विराजमान असता.

'भगवन्, अग्नी आपलंच रूप आहे. वृक्ष, फत्तर, तिल आदींत आपणच साररूपानं आहात. आपण महान शक्तिशाली पुरुष आहात.

या वेळी दैत्यांनी आम्हांस अत्यंत दुःख दिलं आहे. म्हणून आपण आमचं रक्षण करावं. त्रिलोचन, ज्या वेळी हे सारं विश्व सृष्टिशून्य होतं आणि हे सूर्य, चंद्र, इंद्र आदी कुणीच नव्हते, त्या वेळी त्रिनेत्र, सर्व प्रमाणांच्या पलीकडं, समस्त बांधवांनी वर्जित अशी केवळ आपलीच सत्ता विराजित होती. भगवन्, आपण कपालांची माला धारण करता. द्वितीयेचा चंद्र आपल्या मस्तकाची शोभा वाढवीत आहे. आपण स्मशानभूमीत निवास करता. भस्मानं आपली शोभा आणखी वाढते. आपण शेषनागाचं यज्ञोपवीत वापरता. देवेश्वर, मृत्युंजय, आपण आपल्या तीव्र बुद्धीनं आमचं रक्षण करावं. भगवन्, आपण पुरुष आहात. ही श्रीगिरिजा अर्ध्या देहरूपानं आपली शक्ती आहे.

'आपणांतच हे जग स्थित आहे. आहवनीय आदी अग्नीनं आपल्या तीनही नेत्रांत स्थान प्राप्त करून घेतलं आहे. समस्त सागर, पर्वत यांच्याकडे जाणाऱ्या नद्या आपल्या जटारूप बनल्या आहेत. आपण शुद्ध ज्ञानघन आहात. ज्यांची दृष्टी दूषित आहे, तेच तुम्हांस भौतिक रूपात पाहातात. जगताचे उत्पत्तिकर्ते भगवान नारायण आणि चार मुखांनी शोभा पावणारे ब्रह्मदेव आपणच आहात. सत्त्वादी तीन गुण, आहवनीय, आवसथ्य आदी तीन अग्नी आणि कृत, त्रेता आदी युगांच्या भेदानं आपणच त्रिमूर्ती बनता. प्रभो, हे प्रधान देव आपलं साह्य घेऊ इच्छितात. हे आपणांस स्वतःचे तोषक व रक्षक मानतात. कारण रुद्रा, विश्वाचं भरण-पोषण करणं हाच आपला स्वभाव आहे. भस्म भूषण म्हणून लावणाऱ्या प्रभो, आपण आमचं रक्षण करावं.'

देवांनी केलेली अशी प्रार्थना ऐकून पशुपती भगवान शंकर स्थित होऊन म्हणाले, 'देवांनो, आपलं काय कार्य आहे ? त्वरित सांगा.'

'देवेशा, दानवांच्या वधासाठी आम्हांस एका सेनापतीची आवश्यकता आहे. आपण आम्हांस एक सेनानायक द्यावा.'

'देवगण, आपण स्वस्थ व निश्चित असावं. आता थोड्याच वेळात मी आपणांस एक सेनापती देतो,'

असे म्हणून भगवान रुद्रांनी देवांना जाण्याची आज्ञा दिली. पुत्रोत्पत्तीसाठी त्यांनी आपल्या शक्तीस प्रेरित केले. शक्ती क्षुब्ध होताच

एक कुमार प्रकट झाला. तापलेल्या सूर्यासारखी त्याची प्रभा होती. तो आपल्या जन्मजात शक्तीस अशा रीतीने प्रकाशित करीत होता की, जणू ती शक्ती ज्ञानमय बनून केवळ त्याच्यापाशीच पुंजीभूत झाली होती. या कुमाराच्या उत्पत्तीच्या अनेक कथा मुनींनी राजास सांगितल्या. अनेक मन्वन्तरे आणि कल्प यांत देवांचा सेनापती होण्याचे अनेक प्रसंग आले आहेत, भगवान शंकरांच्या शरीरात अहंकाररूपाने ज्या देवांची प्रसिद्धी होती, ते सर्व देव प्रयोजनवश देवसेनापती बनले. तो कुमार उत्पन्न झाला तेव्हा स्वतः ब्रह्मदेव देवांबरोबर आले आणि त्यांनी देवाधिदेव भगवान शंकरांची पूजा केली. समस्त देव, ऋषिगण, सिद्ध आणि भगवान शंकर यांनी सेनापती होणाऱ्या त्या बालकास पाळून पोसून मोठे केले. तेव्हा त्या बालकाने देवांना म्हटले, 'आपण मला दोन सहायक व काही खेळणी द्यावीत.' या बालकाची मागणी ऐकताच भगवान रुद्र म्हणाले, 'पुत्रा, तुला खेळण्यासाठी कुक्कुट देतो. आणि सेवेसाठी विशाख व शाख या नावांचे दोन अनुचर देतो. कुमार, तू भूत, ग्रह व विनायक यांचा नेता बन. देवांच्या सेनेचा सेनापती हो.' शंकरांनी असे म्हणताच सर्व देवांना अतिशय आनंद झाला. त्यांनी भगवान स्कंदांची स्तुती करण्यास प्रारंभ केला.

'प्रभो, आपण भगवान शंकरांचे सुपुत्र आहात. आपण आमच्या सेनेचं अध्यक्षपद स्वीकारण्याची कृपा करावी. आपण षण्मुख, विश्वेश, कुक्कुटध्वज, पावकी, शत्रूस कंपित करणारे, कुमारेश, बालग्रहानुग, शत्रूंचा पराभव करणारे, क्रौंचविध्वंसक, कृत्तिकानंदन, शिवकुमार, भूत व ग्रह यांचे स्वामी, अग्निनंदन, भूतभावन भगवान शंकरांचं संतान आहात. त्रिलोचना, आपणांस नमस्कार असो.'

देवांनी अशा प्रकारे स्तुती केल्यावर रुद्रकुमार स्कंदांची आकृती वाढू लागली. ते बारा आदित्यांप्रमाणे तेजस्वी व पराक्रमी दिसू लागले. यानंतर राजा प्रजापालाने विचारले, 'आपण स्कंदांना कृत्तिकापुत्र कसं म्हटलंत ? ते कुमार, पावकी व षण्मातृनंदन कसे ?' त्याचे उत्तर देताना मुनिवर महातपा म्हणाले, 'राजन्, देवांनी गुणद्योतक नावांचा उच्चार

करून स्कंदांची स्तुती केली. ते अग्नीचे पुत्र म्हणून पावकी. कृत्तिकादी सहा मातांनी त्यांचं पालन केलं म्हणून ते कार्तिकेय. सर्व पातकांना दूर करणारे भगवान शंकर स्वत:च स्कंदरूपानं प्रकट झाले.' पिता ब्रह्मदेवांनी त्यांची षष्ठी तिथी मानली.

## सप्तमी तिथी, आदित्यांची उत्पत्ती

यानंतर राजा प्रजापालाने विचारले, ' ब्राह्मणश्रेष्ठ, दिव्यज्योति:-पुंजाचं शरीर, ही मोठी नवलाची बाब आहे. कृपया आपण यासंबंधी आणखी सांगावं.' मुनिवर महातपांनी राजाला सर्व वृत्तांत सांगितला. ज्ञानशक्तीच्या साह्याने विज्ञानात्म्यास प्रकाशमान तेज प्राप्त होते. या तेजास सूर्य म्हणतात. या मूर्तीत संपूर्ण तेजाचीच स्थापना होते. त्याचा प्रकाश तीनही लोकांत पसरतो. त्याच्या या तेजात अखिल महर्षींसह देव आणि सिद्ध अधिष्ठित असतात. म्हणून या प्रभूस स्वयंभू म्हणतात. त्याच्यापासूनच सूर्य प्रकटतो. वेदवादी मुनिगणांनी या तेजास सूर्यादी नावांनी व्यवहृत केले.

जेव्हा तो सूर्य आकाशातील सर्व लोकांना प्रकाशित करू लागला, तेव्हा त्याचं नाव ' भास्कर ' असे पडले. चारही दिशांना तो प्रकाश देतो म्हणून ' प्रभाकर ' झाला. त्याच्यामुळेच दिवसाची निर्मिती झाली, म्हणून तो ' दिवाकर ' झाला. सर्व जगताच्या आदिस्थानी तो असल्या-मुळे ' आदित्य ' बनला. याच सूर्यापासून बारा प्रकारचे आदित्य निर्माण झाले. तो एकाच परब्रह्म परमेश्वराप्रमाणे सर्व जगाला व्यापून टाकतो, हे पाहून त्याची स्तुती करताना देवांनी म्हटले,

' भगवन्, आपणांपासूनच या जगताची निर्मिती होते. आपणां-पासून या जगाचं पालन होतं, संहार होतो. आपण आकाशात उंच जाऊन या विश्वाची फेरी करता. अशा या प्रभूंची आम्ही नित्य उपासना करतो. जगताची रचना झाल्यावर प्रतापी सूर्याचं रूप धारण करून आपणच सर्वत्र तेज पसरविता. सात घोड्यांचा आपला रथ आहे. त्याला कालरूपी धुरी आहे. तो मोठ्या वेगानं चालतो. आपणांस प्रभाकर व रवी म्हणतात. चर व अचर सर्व जगताचा आत्मा आपणच आहात.

सिद्ध पुरुष म्हणतात की, ब्रह्मा, वरुण, यम, भूत व भविष्य; सर्व काही आपणच आहात. भगवन्, वेद आपलीच मूर्ती आहे. अंधार दूर करणं, हा आपला स्वभाव आहे, आपण वेदान्त व शास्त्रं यांच्या साह्यानंही जाणले जाता. यज्ञांतून विष्णूंच्या रूपात आपणांसाठीच हवन होतं. आपण प्रसन्न होऊन आमचं रक्षण करावं.'

देवांनी अशी स्तुती केल्यावर भगवान सूर्यांनी आपल्या तेजोमयी मूर्तीस सौम्य केले. त्यांचे हे साधारण रूप पाहून देवांनी म्हटले, 'भगवन्, सर्व देवगणांत एक प्रकारची बेचैनी उत्पन्न झाली होती. आता आपल्या कृपेनं सर्वांना शांततेचा अनुभव येत आहे.' इतके सांगून महातपामुनी राजास म्हणाले, 'राजा, सप्तमीच्या तिथीस भगवान सूर्याचं प्राकट्य झालं. या तिथीस उपवास करून भक्तिपूर्वक सूर्याची पूजा करणाऱ्याची इच्छा सफल होते.'

## अष्टमी तिथी आणि मातृकांची उत्पत्ती

पूर्वीच्या काळातील हकीगत आहे. भूमंडलावर एक महापराक्रमी राक्षस होता. त्याची ख्याती अंधक या नावाने होती. ब्रह्मदेवांकडून वर प्राप्त झाल्यामुळे त्याचा अहंकार चरमसीमेपर्यंत पोचला होता. सर्व देव त्याच्या अधीन झाले होते. ते सर्व देव दुःखाने भयभीत होऊन सुमेरू पर्वत सोडून ब्रह्मदेवांना शरण गेले. त्यांना पाहून ब्रह्मदेव म्हणाले,

'सुरगण, सांगा. तुमच्या येण्याचं प्रयोजन काय आहे? तुम्हांस काय हवंय?'

'जगत्पते, आपण चतुर्मुख आहात. आपण जगताचे पितामह आहात. आपणांस आमचा नमस्कार असो. अंधकासुरानं आम्हां देवांना अतिशय दुःखी केलं आहे. आपण आमचं रक्षण करावं.'

'श्रेष्ठ देवांनो, अंधकासुरापासून रक्षण करणं माझ्या स्वाधीनची बाब नाही. या कामी भगवान शंकर समर्थ आहेत. आपण सर्वच त्यांना शरण जाऊ. त्या असुराचा नाश शंकरच करू शकतात. आपण त्या कैलासवासी प्रभूंना शरण जाऊ.'

असे म्हणून ब्रह्मदेव देवांसह भगवान शंकरांना शरण गेले.

शंकरांनी मोठ्या प्रेमाने प्रत्युत्थान देऊन त्या सर्वांचे स्वागत केले. ते म्हणाले, 'आपण सर्व देव कशासाठी आला आहात ? आपण आज्ञा द्यावी. मी त्वरित आपलं कार्य करीन.' त्यावर सर्व देव म्हणाले, 'भगवन्, दुष्टचित्त, महाबली अंधकासुरापासून आपण आमचं रक्षण करावं.' ते असे म्हणत असतानाच विशाल सेना घेऊन तेथे अंधकासुर आला. या वेळी तो सर्व साधनांनी युक्त होऊन शंकरांना मारून त्यांच्या पार्वतीचे अपहरण करण्याच्या विचारात होता. या वेळी भगवान रुद्रही युद्धासाठी तयार झाले. सर्व देवांनीही त्यांना साथ दिली. त्या प्रभूंनी वासुकी, तक्षक आणि धनंजय यांचे स्मरण करून त्यांची कंकणे आपल्या हातांत घातली.

नील नावाचा एक प्रसिद्ध दैत्य हत्तीचे रूप धारण करून भगवान शंकरांपाशी आला. नंदीने त्याची माया जाणून वीरभद्रास सांगितले. वीरभद्राने सिंहाचे रूप धारण करून त्याला मारून टाकले. त्या हत्तीचे चर्म अंजनासारखे काळे होते. वीरभद्राने त्याचे चामडे भगवान शंकरांना समर्पण केले.त्या वेळेपासून ते गजाजिनधारी झाले. अशाच प्रकारे त्यांनी श्वेत सर्पाचे भूषणही धारण केले. त्यानंतर हातात त्रिशूल धारण करून भगवान शंकर अंधकासुरावर धावून गेले. देव व दानव यांच्यांत भीषण संग्राम झाला. इंद्रादी सर्व लोकपाल, सेनापती स्कंद आणि अन्य देव रणांगणात उतरले. हे सर्व पाहून नारदांनी त्वरित भगवान नारायणांपाशी जाऊन म्हटले, 'भगवन्, कैलासपर्वतावर देव व दानव यांच्यांत घनघोर युद्ध होत आहे.'

हे ऐकून भगवान जनार्दनही हातात चक्र घेऊन, गरुडावर बसून युद्धभूमीवर आले. त्यांनी दानवांच्या बरोबर युद्ध सुरू केले. ते तेथे आले तेव्हा देवांचा उत्साह वाढला, पण त्या समरात त्यांचे मन म्लान बनले होते. ते सर्व पळून जाऊ लागले. देवांची शक्ती संपली तेव्हा स्वतः भगवान रुद्र अंधकासुरासमोर आले. त्यांनी असुराशी रोमांचकारी युद्ध केले. त्या प्रभूंनी दानवावर आपल्या त्रिशूळाने भीषण प्रहार केला. त्यामुळे तो घायाळ झाला व त्याचे रक्त जमिनीवर सांडू लागले. रक्ताच्या प्रत्येक थेंबापासून असंख्य अंधकासुर निर्माण झाले. असे हे

आश्चर्यकारक दृश्य पाहून भगवान रुद्रांनी प्रधान अंधकासुरास आपल्या त्रिशूळाच्या अग्रभागी बांधून ते नाचू लागले. मायामय अंधकासुरांना भगवान विष्णूंनी आपल्या चक्राने मारून टाकले. शूलग्रस्त अंधकासुराच्या शरीरातून रक्ताच्या धारा अजूनही प्रवाहित होत होत्या. म्हणून रुद्रांच्या मनातून भीषण क्रोधाग्नी भडकला. त्यांच्या मुखातून अग्नीची ज्वाला प्रकट झाली. त्या ज्वालेने एका देवीचे रूप धारण केले. हिलाच लोक योगेश्वरी म्हणू लागले.

याच प्रकारे भगवान विष्णूंनीही आपल्या रूपाप्रमाणे अन्य शक्तीस निर्माण केले. ब्रह्मदेव, कार्तिकेय, इंद्र, यम, वराह, महादेव, विष्णू व नारायण यांच्या प्रभावाने आठ मातृका प्रकट झाल्या. वाराही, ब्राह्मी, कौमारी, वैष्णवी, यमी, योगेश्वरी, माहेश्वरी व माहेंद्री, अशी त्यांची नावे होती. श्रीहरींनी ज्या कारणापासून त्या निर्माण झाल्या, त्यानुसार त्यांची नावे कायम केली. काम, क्रोध, लोभ, मद, मोह, मात्सर्य, पैशून्य व असूया; या आठ शक्ती मातृका नावाने प्रसिद्ध झाल्या. काम 'योगेश्वरी', क्रोध 'माहेश्वरी', लोभ 'वैष्णवी', मद 'ब्रह्माणी'. मोह 'कौमारी', मात्सर्य 'इंद्राणी', पैशून्य 'यमदंडधारी' आणि असूया 'वाराही' नावाने प्रसिद्ध झाली.

त्यानंतर या मातृदेवींच्या प्रयासाने अंधकासुराच्या रक्तधारेचा प्रवाह सुकत गेला. त्याची आसुरी माया समाप्त झाली. नंतर अंधकासुरही सिद्ध झाला. मुनिवर महातपांनी हे आत्मविद्यामृततत्त्व राजासाठी वर्णन केले. मातृकांच्या उत्पत्तीचे हे वर्णन जे ऐकतात त्यांचे रक्षण या माता प्रतिदिन करतात. त्यांना भगवान शिवलोकाची प्राप्ती होते. ब्रह्मदेवांनी या मातृकांसाठी अष्टमीची तिथी प्रदान केली. मनुष्याने या तिथीस बिल्वाच्या आहारावर राहून भक्तिपूर्वक मातृकांची पूजा करावी. मातृका त्याला कल्याण व आरोग्य यांची प्राप्ती करून देतात.

## नवमी तिथी व दुर्गादेवीची उत्पत्ती

एकदा राजा प्रजापालाने विचारले, 'मुनी, सृष्टीच्या आदिकाळात सूक्ष्म रूपात निर्गुण असलेली अव्यक्त-ब्रह्मस्वरूपा कल्याणी भगवती

महामाया, दुर्गा सगुण रूप धारण करून या पृथ्वीवर कशी प्रकट झाली ?' तेव्हा महातपमुनी त्याला म्हणाले, ' राजन्, प्राचीन काळातील गोष्ट आहे. वरुणाच्या अंशापासून उत्पन्न झालेला सिंधुद्वीप नावाचा एक प्रबल, प्रतापी नरेश होता. तो इंद्रास मारणाऱ्या पुत्राची कामना घेऊन, वनात जाऊन तपश्चर्या करू लागला. एकाच आसनावर राहून भीषण तप केल्यानं त्यानं आपलं शरीर सुकविलं.'

' द्विजवर ' राजाने विचारले, ' इंद्रानं असा त्याचा कोणता अपराध केला होता ? त्याला मारणाऱ्या पुत्राची इच्छा धरून तो असं उग्र तप का करू लागला ?' महातपांनी राजाला सर्व वृत्तांत निवेदन केला. हा सिंधुद्वीपराजा पूर्वजन्मी विश्वामित्रांचा पुत्र नमुची नावाचा दैत्य होता. तो वीरांत प्रधान होता. तो सर्व शस्त्रांनाही अवध्य होता, युद्धात इंद्रानं त्याला पाण्याच्या फेसानं मारलं. तोच पुन्हा ब्रह्मदेवांच्या वंशात सिंधुद्वीप या नावाने उत्पन्न झाला. इंद्राशी वैर मनात ठेवून त्याने अत्यंत कठीण तपस्या केली.

अशी तपस्या दीर्घ काळपर्यंत झाल्यावर पवित्र नदीने, वेत्रवतीने अत्यंत सुंदर स्त्रीचे रूप धारण करून, अनेक प्रकारच्या अलंकारांनी नटून, सजून सिंधूद्वीप जेथे तप करीत होता तेथे आगमन केले. त्या सुंदर स्त्रीला पाहाताच राजाचे मन क्षुब्ध झाले. त्याने विचारले,

' सुंदर कटिभागाच्या भामिनी, तू कोण आहेस ? सत्य सांगण्याची कृपा कर ना.'

' माझं नाव वेत्रवती आहे. आपणांस प्राप्त करून घ्यावं असं माझ्या मनात आलं आहे. म्हणून मी इथं आले आहे. महाराज, आपण या दासीचा स्वीकार करावा.'

वेत्रवतीचे हे बोलणे ऐकून राजा सिंधुद्वीपाने तिचा स्वीकार केला. समय होताच राजाला पुत्राची प्राप्ती झाली. तो पुत्र बारा सूर्यांप्रमाणे तेजस्वी होता. तो वेत्रासुर या नावाने ओळखला जाऊ लागला. त्याचे बळ फार मोठे होते. त्याच्या तेजाला सीमा नव्हती. हळूहळू तो प्राग्ज्योतिषपुराचा नरेश बनला. त्याचा विक्रम वाढतच होता. त्याने या संपूर्ण पृथ्वीला आपल्या महायोगशक्तीद्वारे जिंकले. शेवटी कालकेयांना

जिंकण्यासाठी त्याने मेरू पर्वतावर स्वारी केली. जेव्हा तो असुर इंद्रापाशी गेला, तेव्हा इंद्रही तेथून पळून गेला. अग्नीनेही आपले स्थान सोडून पळ काढला. यम, निर्ऋती, वरुण या सर्वांनी आपली स्थाने सोडून दिली. शेवटी इंद्रप्रभृतींना घेऊन वरुणदेव वायुदेवाच्या जवळ आले. पवनदेवही सर्व देवांना घेऊन धनाध्यक्ष कुबेराजवळ आले. शंकर कुबेराचे मित्र आहेत. म्हणून धनाध्यक्ष कुबेर देवांसह शंकरांपाशी आले.

एवढ्यात बलाभिमानी वेत्रासुरही हातात गदा घेऊन कैलासावर येऊन पोचला. तो अवध्य असल्याने भगवान शंकर देवांसह ब्रह्मलोकात आले. तेथे अनेक देव व सिद्ध ब्रह्मदेवांची स्तुती करीत होते. त्या वेळी जगताची निर्मिती करणारे ब्रह्मदेव भगवान विष्णूंच्या चरणांपासून प्रकट झालेल्या गंगेच्या पावनजलात स्नान करण्यासाठी प्रविष्ट होऊन परमात्म्याची माया गायित्रीचा जप करीत होते. देव ओरडून म्हणत होते, 'प्रजेचं रक्षण करणाऱ्या भगवान, आमचं संरक्षण करावं. वेत्रासुरानं आम्हां देवांना व ऋषींना अत्यंत भयभीत केलं आहे. आपण आमचं रक्षण करावं.' देवांनी अशी प्रार्थना केल्यावर भगवान ब्रह्मदेव विचार करू लागले– 'अहा, भगवान नारायणांची माया किती विचित्र आहे ! या विश्वाचं कोणतंही स्थान त्यांच्याशिवाय रिक्त नाही. असुर व राक्षस यांशी माझा काय संबंध ?'

ते अशा प्रकारचे चिंतन करीत असताना तेथे एक अयोनिजा कन्या प्रकट झाली. तिचे शरीर श्वेत वस्त्रांनी सुशोभित झालेले होते. तिच्या गळ्यात माला होती. मस्तकावर किरीट होता. तिची कांती अत्यंत उज्ज्वल होती. तिला आठ भुजा होत्या. त्यांत शंख, चक्र, गदा, पाश (शक्ती), तलवार, घंटा आणि धनुष्य; अशी आयुधे शोभत होती. ती देवी तूणीर आदी सर्व युद्धोपयोगी सामग्री घेऊन जलातून बाहेर पडली. ही महायोगेश्वरी परब्रह्म परमात्म्याची शक्ती सिंहावर आरूढ झाली होती. तिने अनेक रूपे धारण करून सर्व असुरांशी युद्ध सुरू केले. त्या देवीत अपार शक्ती होती. तिच्याजवळ अनेक दिव्य अस्त्रे होती. हे युद्ध एक हजार वर्षांपर्यंत चालले. शेवटी या संग्रामात देवीने वेत्रासुरास

मारून टाकले. देवांच्या सेनेत मोठ्याने आनंदाचा ध्वनी झाला. दैत्याचा मृत्यू झालेला पाहून सर्व देवांनी 'भगवती, आपला जय असो. जय, असो' म्हणून तिला प्रणाम केला. भगवान शंकरांनी तिची स्तुती करताना म्हटले,

'महामाये, महाप्रभे, गायत्रीदेवी, आपला जय असो. महाभागे, आपलं सौभाग्य, बल, आपला आनंद, सर्व काही असीम आहे. दिव्य गंध आणि अनुलेपन आपल्या अंगांची शोभा वाढवितात. परमानंदमयी देवी, दिव्य माला आपली शोभा वाढवितात. महेश्वरी, आपण वेदांची माता आहात. आपणच वर्णांच्या मातृका आहात. आपण तीनही लोकांना व्यापून आहात. तीन अग्नींतील शक्ती आपणच आहात. त्रिशूल धारण करणाऱ्या देवी, आपणांस माझा नमस्कार असो. देवी, आपण त्रिनेत्रा, भीमवक्त्रा, भयानका आदी अर्थानुरूप नावांनी ओळखिल्या जाता. आपणच गायत्री व सरस्वती आहात. आपणांस आमचा नमस्कार असो.

'अंबिके, आपले डोळे कमळांप्रमाणं आहेत. आपण महामाया आहात. आपणांपासून अमृताची वृष्टी होते. सर्वगे, आपण संपूर्ण प्राणांची अधिष्ठात्री आहात. स्वाहा व स्वधा आपल्याच प्रकृती आहेत. आपणांस माझा नमस्कार असो. महान दैत्यांचं दलन करणाऱ्या देवी, आपण सर्व प्रकारांनी पूर्ण आहात. आपल्या मुखाची शोभा चंद्राप्रमाणं आहे. आपल्या शरीरातून महान तेज प्रकट होतं. आपणांकडूनच हे विश्व प्रकट झालं आहे. आपण महाविद्या व महावेद्या आहात. आनंदमयी देवी, विशिष्ट बुद्धीचा उदय आपणांपासूनच होतो. आपण समयानुसार लहान वा मोठं शरीर धारण करता. महामाये, आपण नीती, सरस्वती, पृथ्वी व अक्षरस्वरूपा आहात. देवी, आपणच श्री, धी आणि ॐकारस्वरूपा आहात. परमेश्वरी तत्त्वात विराजमान होऊन आपण अखिल प्राण्यांचं हित करिता. आपणांस माझा वारंवार नमस्कार असो.'

अशा प्रकारे परम शक्तिशाली शंकरांनी त्या देवीची स्तुती केली. देवांनीही तिचा जयजयकार केला. आतापर्यंत ब्रह्मदेव जलातच जप करीत होते. जयध्वनी ऐकून ते बाहेर आले तेव्हा त्यांनी देवांचे कार्य सिद्ध करणाऱ्या देवीस पाहिले. ते देवांना म्हणाले, 'देवांनो, अनुपम

अंगानी शोभणारी ही देवी आता हिमालयपर्वतावर जाईल. नवमी तिथी हिच्यासाठी असून याच तिथीस तिची आराधना करावी. यामुळं ती सर्व प्राण्यांना वर देईल. देवी, आपण हे कार्य उत्तम रीतीनं केलंत. परंतु अद्यापि आमचं दुसरंही एक महत्त्वाचं मोठं कार्य उरलेलं आहे. पुढं महिषासुर नावाचा एक राक्षस होईल. त्याचा विनाश आपणच करावयाचा आहे.'

ही देवी हिमालयावर आनंदात राहू लागली. म्हणून ही 'नंदादेवी' या नावाने प्रसिद्ध झाली. हिची कथा ऐकणारा कैवल्याचा, मोक्षाचा अधिकारी होतो.

## दशमी तिथी आणि दिशांची उत्पत्ती

मुनिवर महातपांनी राजास भगवान श्रीहरींच्या कानांपासून दिशा कशा उत्पन्न झाल्या हेही सांगितले. आदिसर्गाच्या प्रारंभी सृष्टीची रचना करताना ब्रह्मदेवांना चिंता उत्पन्न झाली की, आपण निर्माण केलेल्या प्रजेस आधार कोणाचा राहील ? म्हणून त्यांनी आभ्यंतर-स्थानाचा संकल्प केला. अशा संकल्पानुसार त्या परम प्रभूंच्या कानां-पासून दहा तेजस्वी कन्या प्रकट झाल्या. पूर्वा, दक्षिणा, पश्चिमा, उत्तरा, ऊर्ध्वा व अधरा, या सहा कन्या मुख्य होत्या. आणखी चार कन्या त्या कन्यांच्या मध्यापासून निर्माण झाल्या. त्या सर्व कन्यांनी ब्रह्मदेवांना नम्रत्वाने प्रार्थना केली,

'देवेश्वरा, आपण प्रजेचं पालन करता. आम्हांस स्थान देण्याची कृपा करावी. आम्ही आपल्या पतींसह सुखपूर्वक निवास करू असं स्थान आपण द्यावं. अव्यक्त– जन्मी, प्रभो, आम्हांस भाग्यशाली पती प्रदान करावा.' त्यावर ब्रह्मदेव म्हणाले, 'कमनीय कटिभागानं शोभणाऱ्या दिशांनो, हे ब्रह्मांड शंभर कोटींच्या विस्ताराचं आहे. यात तुम्ही संतुष्ट होऊन यथेष्ठ स्थानावर निवास करावा. मी शीघ्रच तुम्हांला अनुरूप अशा पतींना निर्माण करतो. त्यानंतर इच्छेनुसार तुम्ही आपापल्या स्थानी जावं.'

अशा रीतीने ब्रह्मदेवांनी सांगितल्यावर सर्व कन्या इच्छित

स्थानावर गेल्या. त्याच वेळी त्या प्रभूंनी महान पराक्रमी लोकपालांची निर्मिती करून त्या कन्यांना परत आपणांपाशी बोलाविले. लोकपिता ब्रह्मदेवांनी त्या कन्यांचे विवाह लोकपालांशी केले. पूर्वाचा विवाह इंद्राशी, आग्नेयदिशेचा अग्निदेवाशी, दक्षिणदिशेचा यमाशी, नैर्ऋतीचा निर्ऋतीशी, पश्चिमेचा वरुणाशी, वायव्येचा वायूशी, उत्तरेचा कुबेराशी, ईशानीचा भगवान शंकराशी विवाह केला. ऊर्ध्वदिशेचे अधिष्ठाते ते स्वत: बनले. अधोलोकाचा स्वामी शेषनाग झाला. अशा रीतीने त्या दिशांना पती देऊन त्यांच्यासाठी ब्रह्मदेवांनी दशमी निर्धारित केली. या तिथीस केवळ दही खाऊन जो पुरुष व्रत करतो, त्याच्या पापाचा नाश होतो.

## एकादशी तिथी आणि कुबेराची उत्पत्ती

त्यानंतर मुनिवर महातपांनी राजास कुबेराच्या उत्पत्तीची कथा सांगितली. प्रथम कुबेर वायूच्या रूपात अमूर्त होता. त्यानंतर तो मूर्तिमान होऊन प्रकट झाला. परब्रह्म परमात्म्याचे शरीर आहे, त्यात तो वायू विराजत होता. आवश्यकता निर्माण झाल्यावर तो क्षेत्रदेव म्हणून प्रकट झाला. त्याच्या उत्पत्तीची कथा ऐकण्यासारखी आहे.

एकदा ब्रह्मदेवांच्या मनात सृष्टीची रचना करण्याची इच्छा निर्माण झाली. तेव्हा त्यांच्या मुखातून वायू प्रकट झाला. त्याच्या वेगाने धुळीचा प्रचंड वर्षाव झाला. ब्रह्मदेवांनी त्याला रोखून म्हटले, ' वायू, तू शरीर धारण करून शांत व्हावंस.' असे ऐकताच वायू मूर्तिमान बनून कुबेराच्या रूपात त्यांच्यापुढे उपस्थित झाला. तेव्हा त्याला ब्रह्मदेवांनी म्हटले, ' सर्व देवांपाशी जे धन आहे, ते केवळ फलमात्र आहे. आता त्याचं रक्षण करण्याचं काम तू करावंस. यामुळं तुला 'धनपती ' या नावानं प्रसिद्धी मिळेल.' आणि त्यांनी अत्यंत प्रसन्न होऊन त्याला एकादशीचा अधिष्ठाता बनविले. या तिथीस कच्चे फळ खाऊन जो व्रताची साधना करील, त्याला कुबेर प्रसन्न होतो आणि सर्व कामना पूर्ण करतो. धनाध्यक्ष कुबेराची ही कथा सर्व पापांना नष्ट करणारी आहे. भक्तिपूर्वक जो ही कथा श्रवण करील, त्याचे मनोरथ

पूर्ण होतील.

## द्वादशी तिथी आणि विष्णूंची उत्पत्ती

यानंतर मुनिवर महातपांनी भगवान विष्णूंच्या उत्पत्तीची कथा राजास सांगितली. मनूचे नाव व त्याचे मनुत्व (मंत्र) यांची जी मंत्र-शक्ति आहे, तीच प्रयोजनवश स्वरूपात: मूर्तिमान विष्णूच आहे. भगवान नारायण सर्वश्रेष्ठ परम पुरुष आहेत. त्या प्रभूंच्या मनात एकदा सृष्टी निर्माण करण्याचा संकल्प उत्पन्न झाला. त्यांनी विचार केला, 'आपण जगताची रचना तर केली. आता त्याचं पालनही मलाच करावं लागणार आहे. हा सर्व कर्म प्रपंच आहे. सम्यक् स्वरूप धारण केल्याशिवाय हे कार्य नीट होणार नाही. म्हणून जगताचं रक्षण करणाऱ्या सगुण मूर्तीची निर्मिती करावी.'

परब्रह्म परमात्म्याचा असा संकल्प झाला तेव्हा एक प्राक्तनी विशिष्ट रूप धारण करणारी सृष्टी त्यांच्यासमोर प्रकट झाली. यातूनच स्वत: पुराणपुरुष भगवान नारायण प्रकट झाले. त्यांनी त्रैलोक्य आपल्या वैष्णव शरीरात प्रविष्ट होताना पाहिले. नंतर ते पुन: प्रभूंच्या शरीरातून बाहेर आले. तेव्हा त्यांना आपल्या प्राचीन वरदानाची आठवण झाली. त्यावेळी भगवंतांनी संतुष्ट होऊन वाणी:आदींना वर दिले होते. हा फार पूर्वीचा प्रसंग आहे. भगवान नारायणांनी वर देताना म्हटले होते, 'तुम्हांस सर्व वस्तू विदित होतील. तुम्ही सर्वांचे कर्ते व्हाल. सर्व प्राणिवर्ग तुम्हांस नमस्कार करील. तुमच्याकडून तीनही लोकांचं रक्षण होईल. म्हणून तुम्ही 'विष्णु' हे नाव धारण करावं. तुम्ही सनातन पुरुष आहात. देव व ब्राह्मण यांचं रक्षण करणं तुमचं कर्तव्य आहे. तुम्हांस सर्वज्ञता प्राप्त होईल.'

अशा प्रकारचा वर देऊन भगवान नारायण आपल्या प्रकृतरूपात स्थित झाले. विष्णूंना पूर्वीचे स्मरण झाले. ते मनाशी म्हणाले, 'आपण तर तोच शक्तिसंपन्न पुरुष आहोत.' त्या ऐश्वर्यसंपन्न प्रभूंनी योगनिद्रेचे स्मरण केले. त्या देवी प्रकट झाल्या. स्त्रीपुरुषांच्या संयोगाने उत्पन्न होणाऱ्या प्रजेचा भार त्यांच्यावर सोपविला. त्यानंतर 'मी परम

प्रभू भगवान नारायणस्वरूपच आहे ' असा विचार करून ते झोपी गेले. तेव्हा त्यांच्या नाभीतून एक मोठे कमल प्रकट झाले. सात द्वीपांची पृथ्वी, समुद्र आणि वने अशी सृष्टी कमलावर शोभत होती. त्या कमलाचा विस्तार आकाशापासून पाताळापर्यंत फैलावला होता. त्याच्या कर्णिकेवर सुमेरू पर्वत सुशोभित झाला होता. सर्वांच्या मध्ये ब्रह्मदेव होते.

आपले असे वैराज रूप पाहून परमपुरुष परमात्म्यास मोठाच संतोष झाला. त्यांच्या आतील जो पवनदेव होता, त्याने व्यवहारासाठी वायूचे स्तवन केले. आणि म्हटले, ' तू अज्ञानावर विजय मिळविणाऱ्या या शंखाचं रूप धारण कर. ' नंतर श्रीहरींना म्हटले, ' अज्ञानाचा नाश करण्यासाठी तुमच्या हातात ही तलवार शोभून दिसते. अच्युत, भयंकर अशा कालचक्रास कापण्यासाठी तुम्ही हे चक्र धारण करावं. केशवा, पापराशी नष्ट व्हावी म्हणून ही गदा धारण करावी. समस्त भूतांना उत्पन्न करणारी वैजयंतीमाला तुमच्या कंठात सतत शोभत राहील. चंद्र व सूर्य हे दोघे श्रीवत्स व कौस्तुभ यांच्या स्थानांवर शोभतील. पवन सर्वांत वेगवान असल्यानं तुमच्यासाठी गरुड बनून राहील. तीनही लोकांत फिरणारी देवीलक्ष्मी सदा आपल्याच आश्रयानं राहील. आपण या द्वादशीतिथीच्या आश्रयानं रहावं. या तिथीस जो कुणी पुरुष वा स्त्री घृताच्या आहारावर राहील त्याला स्वर्गाचा लाभ होईल. '

अशा रीतीने तो परमात्मा पुरुष नारायण ' विष्णु ' या नावाने विख्यात झाला. देव व दानव या त्यांच्याच मूर्ती आहेत. ते स्वतःही आपल्या भिन्न रूपांनी अवतीर्ण होतात. त्यांच्याकडून कोणाचा तरी संहार होतो. कोणाचे तरी रक्षण होते. त्यांना ' वेदांतपुरुष ' म्हणतात. ते प्रभूच प्रत्येक युगात सर्वत्र निवास करतात, जो कोणी त्यांना मनुष्य मानतो, त्याला बुद्धिहीन समजावे.

## त्रयोदशी तिथी आणि धर्माची उत्पत्ती

महातपांनी राजास सांगितले की, धर्माचा मोठा आदर करावा. त्यांनी त्याच्या उत्पत्तीचा, महिम्याचा, तिथीचा प्रसंग सांगितला. ज्याला

परब्रह्म परमात्मा म्हणतात, तो प्रथम केवल होता. त्याच्या मनात प्रजांची रचना करावी, असे आले. नंतर त्याने प्रजेच्या रक्षणाचा विचार केला. एवढ्यात त्याच्या दक्षिण अंगातून एक पुरुष प्रकट झाला. त्याच्या कानात श्वेत कुंडले, गळ्यात श्वेत माळा होती. त्याच्या अंगावर शुभ्र रंगाचे अनुलेपन होते. त्याला चार पाय होते. त्याची आकृती बैलाची होती. त्या पुरुषाला पाहून प्रभूंनी म्हटले, ' साधू, तू या प्रजेचं रक्षण करावंस. मी तुला या जगात प्रमुख पद देत आहे. ' भगवानांच्या आज्ञेवरून तो पुरुष त्यांच्या मनासारखाच बनला. सत्ययुगात त्याला सत्य, शौर्य, तप व दान, असे चार पाय होते. त्रेतायुगात तीन व द्वापरात दोन पाय त्याला उरले. कलियुगात तो दानरूपी एका पायानेच प्रजेचे पालन करू लागला. ब्राह्मणांसाठी त्याने अध्यापन आणि यजनादी सहा कर्मे निश्चित केली. क्षत्रियांसाठी त्याने दान, यज्ञ व अध्ययन अशी कर्मे ठरविली. वैश्यांना दोन व शूद्रांना केवळ सेवारूपानेच संपन्न करून तो धर्म सर्वत्र फिरू लागला. तो शक्तिशाली पुरुष सर्व द्वीपे आणि तलातल यांना व्यापून राहिला. प्रकारान्तराने द्रव्य, गुण, क्रिया व जाती, हे त्याचे चार पाय झाले. वेदात सांगितले आहे– संहिता, पद व क्रम, ही तीन त्याची शिंगे आहेत. आदी व अंत स्थानांत त्याची दोन शिरे शोभा पावतात. त्याला सात हात आहेत. उदात्त, अनुदात्त आणि स्वरित या तीन स्वरांनी तो सदा बद्ध असतो.

काही काळानंतर विचित्र कर्म करणाऱ्या चंद्रापासून मोठे दुःख झाले. बृहस्पती हा चंद्राचा बंधू होय. चंद्राच्या मनात बृहस्पतीच्या पत्नीबद्दल, तारेबद्दल इच्छा निर्माण झाली. या निंदित कर्मामुळे धर्माचे मन उद्विग्न बनले. तो तेथून निघून एका वनात राहू लागला. धर्म वनात निघून गेल्यावर सर्व देव व दानव यांचे सर्व सैनिक धर्महीन झाले. देव व दानव यांच्यांत युद्ध सुरू झाले. धर्म नसल्याने कोणतीच मर्यादा उरलेली नव्हती. चंद्राच्या दोषामुळे देव व दानव यांच्यांत वितुष्ट आले. त्यांनी अनेक प्रकारची आयुधे धारण करून परस्परांत झगडा केला. त्या संग्रामास कारण केवळ एक स्त्री होती.

नारद मोठे विनोदी होते. दानवांशी लढणाऱ्या देवांना पाहून

त्यांनी ब्रह्मदेवांना ही वार्ता सांगितली. ब्रह्मदेव सर्व प्राण्यांचे पितामह. हंसावर आरूढ होऊन ते युद्धभूमीवर आले व त्यांनी युद्ध थांबविले. त्यांनी विचारले,

'तुम्ही असं कशासाठी युद्ध करता ?'

'भगवन्, हा चंद्रच सर्व अनर्थाचं कारण आहे. त्याच्या कर्मानं दुःखी बनून धर्म वनात राहू लागला आहे.'

हे ऐकून देव व दानव यांना घेऊन ब्रह्मदेव वनात गेले. तेथे त्यांनी धर्मास चार पायांनी युक्त अशा वृषभाच्या वेषात पाहिले. चंद्राप्रमाणे शुभ्र अशी त्याची शिंगे होती. तो इकडे-तिकडे भ्रमण करीत होता. ब्रह्मदेव उपस्थित देवांना म्हणाले, 'देवांनो, हा माझा प्रथमपुत्र आहे. या महामुनीस लोक धर्म म्हणतात. बंधूच्या भार्येशी अयोग्य वर्तन करणाऱ्या चंद्राच्या कर्मामुळं याला व्यथा पोचली आहे. म्हणून तुम्ही सर्व देवांनी व दानवांनी याला संतुष्ट करण्याचा प्रयत्न करावा. त्याचं फल तुम्हांस मिळेल.' हे ऐकून देवांनी धर्माची स्तुती करताना म्हटले,

'जगताचं रक्षण करणाऱ्या महाभागा, आपला वर्ण चंद्रासारखा उज्ज्वल आहे. आपणांस वारंवार नमस्कार असो. देवरूप धारण करणाऱ्या प्रभो, आपल्या कृपेनंच आम्हांस स्वर्गाचा मार्ग दिसतो. तुम्हीच कर्ममार्गाचं स्वरूप बनून सर्वत्र प्रतीत होत आहात. जनलोक, तपोलोक आणि सत्यलोक या तीनही लोकांचं रक्षण आपणच करता. स्थावर व जंगम यांत असा एकही प्राणी नाही की, जो आपणांशिवाय राहू शकेल. आपल्या अभावानं हे जगत त्वरित नष्ट होईल. आपणच सर्व प्राण्यांचा आत्मा आहात. सज्जन पुरुषांच्या हृदयांत आपण सत्त्वरूपानं शोभता. राजस पुरुषांत राजस आणि तामस पुरुषांत तामसरूपानं आपला निवास असतो. आपणांस चार चरण आहेत. चारही वेद आपली शिंगं आहेत. हातांची संख्या सात आहे. आपणांस तीन बंध आहेत. अशा वृषभरूपी प्रभो, आपणांस नमस्कार असो.* देवा, आपल्या अनुपस्थितीत आम्ही

---

* वेदमंत्रातही असाच भाव व्यक्त झाला आहे. 'चत्वारि शृंङ्गा त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य। त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति महो देवो मर्त्यान् आ विशेषं' (ऋग्वेद ४. ५८. ३)

विपथगामी व मूर्ख बनलो होतो. आपणच आमचा परम आश्रय आहात. आम्हांस सन्मार्ग सांगण्याची आपण कृपा करावी.'

देवांची अशी स्तुती केल्यावर प्रजापालक धर्म संतुष्ट झाला. वृषभावर आरूढ झालेल्या धर्माचे मन प्रसन्न झाले. त्याने आपल्या शांतस्वरूप नेत्राने त्यांना सन्मार्ग दाखविला. त्याची केवळ दृष्टी पडताच देव धार्मिक नेत्रांनी पाहू लागले. एका क्षणात त्यांचे अज्ञान नष्ट झाले. ते सद्धर्मसंपन्न झाले. असुरांची स्थितीही अशीच झाली. तेव्हा ब्रह्म-देवांनी धर्मास म्हटले, 'धर्म, आजपासून तुझ्यासाठी त्रयोदशी तिथी निश्चित केली आहे. या तिथीस उपवास करून जो पुरुष तुझी पूजा करील तो पापमुक्त होईल. धर्मा, तुझ्यात मोठं सामर्थ्य आहे. तू या अरण्यात दीर्घकाळपर्यंत निवास केलास म्हणून हे अरण्य "धर्मारण्य" या नावानं विख्यात होईल. चार, तीन, दोन व एक चरणांनी युक्त होऊन तू कृत, त्रेता आदी युगांत लक्षित होशील. पृथ्वी व आकाश यांत राहून तू विश्वाचं रक्षण कर."

असे सांगून लोकपितामह ब्रह्मदेव देव व दानव पाहात असतानाच अंतर्धान पावले. देवांचा शोक दूर झाला. ते वृषभाचा वेष धारण केलेल्या धर्माबरोबर आपापल्या लोकात निघून गेले. जो पुरुष त्रयो-दशीच्या दिवशी श्राद्ध करताना धर्माच्या उत्पत्तीचा हा प्रसंग पितरांना ऐकवितो, भक्तीने दुधाचे तर्पण करतो, तो देवांसह स्वर्गास जाऊन सुखपूर्वक निवास करतो.

## चतुर्दशी तिथी व रुद्रांची उत्पत्ती

यानंतर महातपामुनींनी चतुर्दशीतिथीची व रुद्रांच्या निर्मितीचीही कथा राजास सांगितली. तेव्हा तपोरूप धर्ममय वृक्ष नष्टप्राय झाला होता. त्या वेळी प्रचंड तेजस्वी ब्रह्मदेव क्षमारूपी अस्त्र धारण करून प्रकट झाले. परमज्ञान व तत्त्व यांना जाणून प्रजांचे रक्षण करणे, हे त्या प्रतापी प्रभूंच्या आगमनाचे प्रयोजन होते. सृष्टी निर्माण करण्याची इच्छा त्या महाप्रभूंना झाली. 'प्रजा निर्माण व्हाव्यात आणि इच्छेनुसार जगताची वृद्धी व्हावी' अशा त्यांच्या इच्छेत प्रतिबंध निर्माण झाला.

त्यांचे मन क्रोधाने संतप्त झाले. पुन: ते समाधिस्थ झाले.

तेव्हा त्यांच्यापुढे एक श्रेष्ठ पुरुष प्रकट झाला. त्याचे अंत:करण अत्यंत पवित्र होते. त्याचे रजोगुण व तमोगुण सर्वथा नष्ट झाले होते. त्याची कीर्ती अचल होती. त्या पुरुषात वर देण्याची शक्ती होती आणि अपार बल होते. त्याच्या शरीराची कांती काळी व लाल रंगाची असून नेत्रांचा रंग पिवळा होता. तो उत्पन्न होताच रडू लागला. तेव्हा ब्रह्मदेवांनी म्हटले, 'त्वं मा रुद– तू रडू नकोस.' म्हणून त्या पुराणपुरुषाचे नाव रुद्र झाले. त्याला ब्रह्मदेव पुन: म्हणाले, 'तू एक महान पुरुष आहेस. सर्व काही करण्याची शक्ती तुला आहे. तू अशा सृष्टीचा विस्तार कर की, जी तुझ्या रूपास अनुरूप होईल.'

ब्रह्मदेवांनी इतके म्हटल्यावर तो पुरुष जलात तप करण्यासाठी गेला. देवेश्वर रुद्र जलात गेल्यावर ब्रह्मदेवांनी दक्षप्रजापतीची निर्मिती केली. ब्रह्मदेवांच्या इतर मानसपुत्रांनीही प्रजांची निर्मिती केली. सृष्टीची मर्यादा वाढली. देवेश्वरांच्या अध्यक्षतेखाली दक्षप्रजापतीचा ब्रह्मयज्ञ सुरू झाला. एवढ्यात जलातून रुद्रदेव जगत व सुरगण यांची निर्मिती करण्यासाठी बाहेर आले. त्यांनी ऐकले, 'यज्ञ होत आहे. तिथं देव, सिद्ध व यक्ष आले आहेत.' तेव्हा रुद्रांना क्रोध आला. ते मनाशी म्हणाले, 'अरे, आपली कन्या आणि मी यांचा तिरस्कार करून मूर्खतावश होऊन यानं अशा प्रकारची सृष्टी निर्माण केली. त्यानं असं करायला नको होतं.'

असा विचार करताच रुद्रांचे शरीर रागाने चहू दिशांनी तप्त झाले. त्यांच्या मुखातून ज्वाला निघू लागल्या. त्यांत अनेक भूते पिशाचे, वेताळ, योगी यांच्या रूपात झुंडीने फिरू लागले. सर्व आकाश, पृथ्वी, सर्व दिशा, लोक हे सर्व या भूतांनी भरून गेले. त्या रुद्रांनी चोवीस हात लांबीचे एक धनुष्य बनविले. तीनपट लांबीच्या दोरीची प्रत्यंचा बनविली. क्रोधाचे दोन दिव्य भाते तयार केले. पूषाच्या दातांचे त्यांनी बाण बनविले. भग नावाच्या मुनींचे डोळे फोडले. क्रतू नावाच्या देवाचा अंडकोश कापून टाकला. बाणविद्ध होऊन क्रतुदेव यज्ञशालेतून पळून गेला. वायूने त्याचा मार्ग रोखून धरला. यज्ञ नष्ट व भ्रष्ट झाला. देव

यज्ञाच्या पशूसारखे झाले. तेव्हा सर्व भगवान रुद्रांना शरण गेले.

ब्रह्मदेवांनी रुद्रांची भेट घेतली. त्यांना शरण आलेले देव तेथेच होते. सर्व हकीकत समजल्यावर देवाधिदेव ब्रह्मा रुद्रांना म्हणाले, 'तात, आता क्रोध आवरावा. कारण यज्ञदेव क्रतू तर इथून पळून गेला आहे.' ब्रह्मदेवांचे हे बोलणे ऐकल्यावर रुद्रदेव क्रोधात येऊन म्हणाले, 'देवेश्वरा, आपण सर्वप्रथम मला बनविलं आहे. पण या लोकांनी मला या यज्ञात भाग दिला नाही. म्हणून मी त्यांना असं विकृत केलं आहे. त्याचं ज्ञान हरण केलं आहे.' तेव्हा ब्रह्मदेव देवांना म्हणाले, 'देवांनो, तुम्ही आणि असुरांनी ज्ञानप्राप्तीसाठी उच्च स्वरांनी स्तोत्रं म्हणून या शंभूची आराधना करावी. नंतर भगवान रुद्र प्रसन्न होतील. यांच्या प्रसन्नतेनं सर्वज्ञता सुलभ होईल.' ब्रह्मदेवांनी असे म्हटल्यावर देवांनी रुद्रांची स्तुती करण्यास प्रारंभ केला.

'महात्मन्, आपण देवांचे अधिष्ठाते, तीन नेत्रांचे, जटामुकुटानं सुशोभित आणि महान सर्पाचं यज्ञोपवीत वापरणारे आहात. आपल्या नेत्रांचा रंग काहीसा पिवळा, काळसर आहे. भुते व वेताळ सदैव आपल्या सेवेत मग्न असतात. अशा आपणांस आमचा नमस्कार असो. आपण भगाचे नेत्र फोडणारे आहात, आपल्या मुखातून भयंकर अट्टहास होत आहे. कपर्दी व स्थाणू ही आपलीच नावं आहेत. पूषाचे दात तोडणाऱ्या भगवन्, आपणांस आमचा नमस्कार असो. महाभूतांचं रक्षण करणाऱ्या प्रभो, आपणांस आम्ही नमस्कार करीत आहोत. प्रभो, भविष्यात वृषभ वा धर्म आपल्या ध्वजाचं चिन्ह होईल. आपण त्रिपुराचा नाश कराल. आपण अंधकासुराचं हनन कराल. भगवन्, आपलं कैलासावर सुंदर निवासस्थान आहे. आपण हत्तीचं चर्म वस्त्ररूपानं धारण करता. आपल्या शिरावर उभे राहिलेले केस सर्वांना भयभीत करतात. म्हणून आपणांस भैरव नाव आहे. प्रभो, आपणांस आमचा वारंवार नमस्कार असो.

'देवेश्वरा, आपल्या तिसऱ्या नेत्रातून अग्नीची ज्वाला प्रकट होत आहे. आपण चंद्राचा मुकुट धारण केला आहे. पुढं आपण कपाल धारण करणार आहात. आपण सर्वसमर्थ प्रभू आहात. आपणांस आमचा

नमस्कार असो. प्रभो, आपल्या हातून 'दारुवना'चा विध्वंस होईल. निळया कंठानं आणि तीक्ष्ण त्रिशूलानं शोभा पावणाऱ्या भगवन्, आपण महान सर्पाचं कंकण बनविलं आहे. तीक्ष्ण त्रिशूल धारण करणाऱ्या देवेश्वरा, आपणांस नमस्कार असो. यज्ञमूर्ते, आपण हातात प्रचंड दंड धारण केला आहे. आपल्या मुखात वडवानलाचा निवास आहे. वेदान्ताच्या साह्यानं आपलं रहस्य जाणलं जातं. आपणांस वारंवार नमस्कार असो. शंभो, आपण दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस केला आहे. शिवा, जगत आपणांस भितं. भगवन्, आपण विश्वाचे शासक आहात. आपण विश्वाचे उत्पादक आहात. कपर्दी नावाचे जटाजूट धारण करणारे आपण महादेव आहात. आपणांस नमस्कार असो.'

अशा प्रकारे देवांनी स्तुती केल्यावर प्रचंड धनुषधारी सनातन शंभू म्हणाले, 'सुरगण, मी देवांचा अधिष्ठाता आहे. माझ्याकडून काय हवंय ते सांगा.' तेव्हा देव त्यांना म्हणाले, 'प्रभो, आपण जर प्रसन्न असाल तर आम्हांस वेदांचं व शास्त्रांचं सम्यक् ज्ञान प्रदान करण्याची कृपा करावी. रहस्यासह यज्ञविधीही समजावून द्यावा.' तेव्हा त्यांना महादेव म्हणाले, 'देवांनो, आपण सर्वांनी पशूचं रूप धारण करावं. मी तुम्हां सर्वांचा स्वामी बनतो. तेव्हा आपण आपल्या अज्ञानातून मुक्त व्हाल.' त्यावर देव शंभूंना म्हणाले, 'ठीक आहे. आपण पशुपती व्हावं.' यावेळी ब्रह्मदेवांचे अंतःकरण प्रसन्नतेने भरून आले. ते त्या पशुपतींना म्हणाले, 'देवेश, आपणांसाठी चतुर्दशी तिथी निश्चित केली आहे. या दिवशी जो श्रद्धापूर्वक आपली उपासना करील, गव्हाच्या पक्वान्नाचं भोजन ब्राह्मणांना देईल, त्यावर आपण संतुष्ट व्हाल. त्यास उत्तम स्थानांचा अधिकारी बनवाल.'

अव्यक्तजन्मा ब्रह्मदेवांनी असे म्हटल्यावर भगवान रुद्रांनी पूषाचे दात व भगाचे नेत्र पूर्ववत केले. सर्वांना यज्ञाच्या समाप्तीचे फल दिले. देवांना परम विशुद्ध ज्ञान दिले. जो मनुष्य प्रातःकाली उठून प्रतिदिन या कथेचे श्रवण करील त्याची सर्व पापे नष्ट होतील व तो भगवान रुद्रांच्या लोकास जाईल.

## अमावास्या व पितरांची उत्पत्ती

यानंतर महातपांनी राजास पितरांच्या उत्पत्तीचा प्रसंग निवेदन केला. पूर्वीची हकीगत आहे. प्रजापती ब्रह्मदेव अनेक प्रकारची प्रजा निर्माण करण्याच्या विचारात एकाग्र होऊन बसले होते. तेव्हा त्यांच्या मनातून तन्मात्रा (पंचज्ञानेंद्रियांचे विषय शब्द, स्पर्श इत्यादी) बाहेर पडल्या. त्यांनी त्या सर्वांना प्रधानता दिली व यांना आता कोणत्या रूपाने सुशोभित करावे, असा विचार ते करू लागले. कारण त्या सर्व तन्मात्रा ब्रह्मदेवांच्या शरीरात प्रथमपासून होत्याच. आणि तेथूनच धूम्रवर्णाच्या त्या तन्मात्रा प्रकट झाल्या होत्या. त्याच देवांना चमकून म्हणू लागल्या,

'आम्ही सोमास पिऊ इच्छितो.'

त्याचवरोबर वरच्या लोकात जाण्याची इच्छा त्यांच्या मनात निर्माण झाली. आकाशात आसन टाकून तेथे तपस्या करावी, असा त्यांचा विचार होता. वर जाण्यासाठी मुख उंचावून त्या प्रयत्नात असताना त्यांना पाहून ब्रह्मदेव म्हणाले, 'समस्त गृहस्थाश्रमींचं कल्याण करण्यासाठी आपण पितर होऊन राहावं. वर तोंड करून जे जाऊ इच्छितात त्यांना 'नांदीमुख' होईल.' इतके म्हणून ब्रह्मदेवांनी त्यांच्या मार्गाचेही निरूपण केले. त्यांनी त्यावेळी पितरांसाठी सूर्याच्या दक्षिणायन-कालाचा निर्देश केला.

अशा रीतीने प्रजेची निर्मिती करून ब्रह्मदेव मौन झाले, तेव्हा पितरांनी त्यांना म्हटले, 'भगवन्, आम्हांस उपजीविकेचं साधन देण्याची कृपा करावी.' तेव्हा ब्रह्मदेव म्हणाले, 'तुमच्यासाठी अमावास्या ही तिथी कायम राहील. या दिवशी मनुष्य जल, तिल आणि कुश यांनी तुम्हांस तर्पण करील. यानं तुम्ही परम संतुष्ट व्हाल. या अमावास्येस तिलदानाचं महत्त्व राहील. तुमची उपासना करणाऱ्या पुरुषास वर देणं हे तुमचं कर्तव्य राहील.'

## पौर्णिमा व चंद्राची उत्पत्ती

यशस्वी अत्रिमुनी ब्रह्मदेवांचे मानसपुत्र होते, त्यांच्या घरी पुत्र-

रूपाने चंद्र प्रकटला. दक्षप्रजापतीने त्याला आपला जामात बनविले. दक्षाच्या सत्तावीस दाक्षायणी कन्या चंद्राच्या पत्नी झाल्या, त्या कन्यांत रोहिणी सर्वांत श्रेष्ठ होती. चंद्रही एकांतात तिच्यावर अधिक प्रेम करायचा. इतर कन्यांवर त्याचे इतके प्रेम नव्हते. तेव्हा इतर सर्व कन्या पित्याकडे, दक्षाकडे गेल्या व त्यांनी चंद्राचा हा विषम व्यवहार त्याला सांगितला. दक्षही चंद्राकडे गेला. त्याने चंद्रास वारंवार समजावून सांगितले. पण चंद्राने त्याच्या उपदेशाकडे लक्ष दिले नाही. तेव्हा दक्षाने चंद्रास शाप दिला,

'तू क्षीण होऊन अस्त पावशील.'

दक्षाच्या या शापाने चंद्रमा हळूहळू क्षयी, रोगी बनून क्षीण बनला. शेवटी अमावास्येच्या दिवशी त्याचा अंत झाला. त्याच्या अभावाने देव, मनुष्य, पशू, वृक्ष, वनस्पती सर्वांच्या सर्व नष्ट झाले. औषधांचा अभाव झाला. तेव्हा मुख्य देवांची आतुरता वाढली. ते म्हणू लागले, 'चंद्र वृक्षांच्या मुळांशी स्थित झाला आहे.' चिंतातुर देव भगवान विष्णूंना शरण गेले. श्रीहरींनी त्यांना विचारले,

'आपण इथं कशासाठी आलात ? मी काय करू ?'

'भगवन्, दक्षानं चंद्रास शाप दिला आहे. त्यामुळं तो तिरोहित झाला आहे.'

'सुरगणांनो, तुम्ही गर्जना करणाऱ्या समुद्रात चारही बाजूंना औषधी वनस्पती टाका. आणि मोठ्या सावधपणानं त्याचं मंथन करा.'

देवांना असे सांगितल्यावर स्वतः भगवान श्रीहरींनी महाभाग शंकर व ब्रह्मदेव यांचे स्मरण केले. वासुकिनागास मंथनाचा दोर होण्याची आज्ञा त्यांनी दिली. सर्व एकत्र जमून समुद्राचे मंथन सुरू झाले. समुद्राचे मंथन होताच त्यातून चंद्रमा प्रकट झाला. ज्या परमपुरुष परमात्म्याचे क्षेत्रज्ञ नाव आहे, त्यासच प्राण्यांचा जीवात्मा चंद्र समजला पाहिजे. आता सुंदर सोमाचे रूप धारण करून तो पृथक रूपाने प्रकाशित होऊ लागला. सर्व देव, मानव, वृक्ष, औषधी या सोळा कलांच्या परम प्रभूचा आश्रय घेऊन जीवन धारण करण्यास समर्थ झाले. या सोमप्रभूच्या द्वितीयेच्या कलेस रुद्रांनी आपल्या मस्तकावर

धारण केले. जल त्याचेच स्वरूप आहे. चंद्रावर प्रसन्न होऊन ब्रह्मदेवांनी त्यास पौर्णिमेची तिथी प्रदान केली.

या तिथीस उपवास करून चंद्राची उपासना करावी. त्याचे ध्यान करावे. व्रतधारीस चंद्र कांती, ज्ञान, पुष्टी, धन, धान्य आणि मोक्ष सुलभ करतो.

## राजा प्रजापाल परम धामास

महातपा मुनींनी राजास आणखी एक प्राचीन इतिहास सांगितला. सत्ययुगात ज्याचे नाव सुप्रभ होते तोच आता राजा प्रजापाल या नावाने प्रसिद्ध झाला. उरलेले महाबली राजे त्रेतायुगात निर्माण होतील. जो दीप्ततेजा होता, त्याचे नाव शांत असे झाले. सुरश्मी महाबली राजा शशकर्ण या नावाने कीर्ती प्राप्त करील. शुभदर्शनच पांचाळराजा होईल, यात संशय नाही. सुशांती अंगवंशात जन्मून सुंदर या नावानें विख्यात होईल. सुंदरच सत्ययुगाच्या अंती मुचुकंद झाला. याच प्रकाराने सुद्युम्न तरू नावाने, सुमना सोमदत्त नावाने, शुभ संवरण या नावाने विख्यात झाले. सुशील वसुदान झाला व सुखद असुपती नावाचा राजा झाला. शंभू सेनापती या नावाने प्रसिद्ध झाला. कांत दशरथ नावाने विख्यात राजा झाला. सोमाची प्रसिद्धी राजा जनक या नावाने झाली. हे सर्व नरेश त्रेतायुगात झाले. या भूमंडलाने राज्य सुखाने भोगून, अनेक प्रकारच्या यज्ञांच्या द्वारे भगवानांची आराधना करून ते निःसंदेह स्वर्गाची प्राप्ती करून घेतील.

भगवान वराहांनी पृथ्वीस म्हटले, 'वसुंधरे, हे उत्तम 'ब्रह्मविद्यामृत नावाचं आख्यान आहे.' हे ऐकून राजर्षी प्रजापालास अत्यंत हर्ष झाला. तो शेवटी तपस्या करण्यासाठी वनात निघून गेला. या प्रकारे त्याने जप व ब्रह्माचे चिंतन करून पंचभौतिक देहाचा त्याग केला व शेवटी तो ब्रह्मात विलीन झाला. राजा प्रजापालाने ही तपस्या वृंदावनात केली होती. त्याने तपस्या करताना भगवान गोविंदांची अशी स्तुती केली.

राजा प्रजापालाने स्तुती करताना म्हटले, 'आपण संपूर्ण जग-

ताच्या रूपात विराजमान आहात. गोविंद आणि उपेंद्र ही आपली नावं आहेत. पृथ्वी आपल्याच आश्रयावर टिकून आहे. देवेश्वर भगवान गोविंद, मी आपणांस नमस्कार करतो. श्रीकृष्ण, आपण गायींचे रक्षक आहात. संसारसमुद्रात गोता खाणाऱ्यास सुख देण्यास आपणच समर्थ आहात. विभो, आपणांस माझा नमस्कार असो. आपण सर्व प्राण्यांचे बंधू आहात. जनार्दना, दुःखी व व्याकुळ व्यक्तीवर कृपा करणं हा आपला स्वाभाविक गुण आहे. म्हणून महाभागा, आपणांस माझा नमस्कार असो. सुरेशा, सर्वज्ञांत आपलं नाव श्रेष्ठ आहे. हे अखिल विश्व आपल्या प्रयत्नानंच विस्तृत बनलं आहे. प्रभो, आपल्या छत्रछायेत गोप आनंदानं निवास करतात. चक्रधर प्रभो, मी संसारात भयभीत झालो आहे. म्हणून माझं रक्षण करण्याची कृपा आपण करावी. अच्युता, आपण परमदेव आहात. सुरसमाजात आपली प्रधानता आहे. आपण पुराणपुरुष आहात. चंद्रातील प्रकाश म्हणजे आपलं तेज आहे. अग्नी आपलं मुख आहे.

'गोपेंद्रा, मी या संसारात गुरफटलो आहे. आपण माझं रक्षण करावं. सुरेशा, या जगतात आपली माया कोण पार करू शकेल? गोपेंद्र, आपण अगोत्र, अस्पर्श, अरुप, अगाध, अनिर्देश्य आणि अज आहात. जो विद्वान मनुष्य आपली पूजा करील तो मुक्तीस पात्र होईल. आपली कोणती मूर्ती नाही की कोणतं कर्म नाही. आपण परम कल्याण-मय आहात. आपण शंख, चक्र व कमल धारण करता. मी आपणांस निरंतर नमस्कार करतो.

'आपण वामनांचा अवतार धारण करून तीनही लोकांवर विजय प्राप्त केला आहे. आपण कृष्णादी चतुर्व्यूहात शोभा पावता. शंभू, विभू, भूतपती, सुरेश ही सर्व आपलीच नावं आहेत. अशा अनंत व विष्णुनाम-धारी प्रभूंना मी प्रणाम करतो. भगवन्, आपण स्थावर, जंगम सृष्टीचं पालन करता. संहार करता. प्रभो, मी मुक्तीची इच्छा करतो. म्हणून मला आपण अशा स्थानावर न्यावं की, जिथून योगी पुरुष परत येत नाहीत. विश्वमूर्ते, गोविंदा, आपला जय असो. सर्वज्ञा, अप्रमेया, विश्वे-श्वरा, आपला जय असो.'

अशी प्रार्थना प्रजापालाने करून त्याने आपले शरीर गोविंदांच्या शरीरात विलीन केले. तो शाश्वत अशा धामास गेला.

## आरुणी, व्याध व दीर्घबाहू राजा

एकदा पृथ्वीने भगवान वराहांना विचारले, ' भगवन्, आपण सर्व प्राण्यांचे सृजन करता. मी आपला उपासनाविधी समजावून घेऊ इच्छिते. आपली उपासना कशी करावी ?' तेव्हा वराह पृथ्वीस म्हणाले, ' देवी, मी भावानं वशीभूत होतो. प्रचुर धन, जपतपादी अन्य उपासना यांनी नाही. अहिंसा, सत्यभाषण, चोरी न करणं आणि ब्रह्मचर्याचं पालन, या मानसिक व्रतांना मी महत्त्व देतो. दिवसा एकदाच भोजन करावं. वेदांचा अभ्यास करणं, विष्णूचं नामसंकीर्तन गाणं, चहाडी न करणं, हितकारी मधुर बोलणं, सर्वांचं हित चिंतणं, धर्माची आस्था राखणं, धर्मयुक्त बोलणं, ही वाणीची उत्तम व्रतं आहेत. '

वराहांनी पृथ्वीला यासंबंधी एक प्राचीन आख्यान सांगितले. पूर्वकल्पात आरुणी नावाचा एक विख्यात महान तपस्वी ब्राह्मणपुत्र होता. तो एकदा कोणत्या तरी हेतूने तप करण्यासाठी वनात गेला. तेथे तो उपवासपूर्वक तप करू लागला. देविका* नदीच्या सुंदर तटावर आपला आश्रम बनविला. एकदा हा ब्राह्मण स्नान करण्यासाठी त्या नदीच्या तटावर गेला. स्नान करून तो जप करीत असता त्याने समोरून एक भयंकर व्याध येताना पाहिला. त्याच्या हातात मोठे धनुष्य होते. त्याचे डोळे मोठे क्रूर होते. तो त्या ब्राह्मणाची वल्कले—वस्त्रे घेण्याच्या, त्याला मारण्याच्या विचारात होता. त्याला पाहून आरुणीच्या मनात भीती उत्पन्न झाली व तो थरथर कापू लागला. पण ब्राह्मणाच्या अंतःशरीरात भगवान नारायणांना पाहून व्याधही भयभीत झाला होता. त्याच्या हातातील धनुष्यबाण गळून पडले. तो म्हणाला.

' ब्रह्मन्, मी आपणांस मारण्यासाठी इथं आलो होतो. पण आपणांस पाहाताच माझी क्रूर बुद्धी कुठं गेली, काही समजत नाही.

---

* या नावाच्या अनेक नद्या आहेत. पण येथे ही नदी पंजाबमधील देगनदी असावी. महाभारत व स्कंदपुराण यांतही हिचा उल्लेख आहे.

विप्रवर, माझं जीवन सदा पाप करण्यातच गेलं. मी आतापर्यंत हजारो ब्राह्मणांना मृत्युमुखात धाडलं. प्राय: दहा हजार साध्वी स्त्रियांचा मी अंत केला आहे. ब्राह्मणांची हत्या करणारा मी ! आता मला कोणती गती प्राप्त होणार ? महाभाग, आता मी आपणांपाशी राहून तप करण्याची इच्छा करतो. आपण कृपा करून मला उपदेश द्यावा व माझा उद्धार करावा.'

व्याधाचे हे सर्व बोलणे आरुणीने ऐकिले. पण तो ब्रह्मघाती व महान पापी असल्याने द्विजश्रेष्ठाने त्याला उत्तर दिले नाही. पण हृदयात धर्माची अभिलाषा उत्पन्न झाल्यामुळे तो व्याध ब्राह्मणाने काहीच म्हटले नाही तरी तेथेच उभा राहिला. ब्राह्मणाने नदीत स्नान केले व वृक्षाच्या खाली बसून तो तप करू लागला. याप्रकारे दोघांचा नियमित असा धार्मिक कार्यक्रम सुरू झाला. असे काही दिवस गेले.

एके दिवशीची हकीकत. आरुणी स्नान करण्यासाठी नदीच्या जलात गेला होता. एवढ्यात भुकेने कासावीस झालेला एक वाघ त्या शांतस्वरूप मुनीस मारण्यासाठी आला. पण एवढ्यात त्या व्याधाने वाघास मारून टाकले. मृत्यूनंतर त्या वाघाच्या शरीरातून एक पुरुष प्रकट झाला. ज्यावेळी आरुणी जलात होता आणि वाघ त्यावर झडप घालणार होता, त्याचवेळी मुनीने मुखातून ' ॐ नमो नारायणाय ' या मंत्राचा जप केला. वाघाचे प्राण कंठात असताना त्याने हा मंत्र ऐकला. प्राण जाताना हा मंत्र वाघाने ऐकल्यामुळे त्याच्या शरीरातून एक दिव्य पुरुष बाहेर आला. तो प्रकट होऊन म्हणाला, ' द्विजवर, जिथं भगवान विष्णू विराजमान होतात, तिथं मी जातो. आपल्या कृपेनं माझं पाप धुतलं गेलं. आता मी शुद्ध व कृतार्थ बनलो आहे.'

असे त्या पुरुषाचे बोलणे ऐकल्यावर विप्रवर आरुणीने त्याला विचारले, ' नरश्रेष्ठा, तू कोण आहेस ?' तेव्हा तो म्हणाला, ' यापूर्वीच्या जन्मात मी ' दीर्घबाहू ' नावाचा एक प्रसिद्ध राजा होतो. समस्त वेद, संपूर्ण धर्मशास्त्र यांत माझी गती होती. अन्य शास्त्रंही मला अपरिचित नव्हती. पण मी प्राय: सर्व ब्राह्मणांचा अपमान करीत असे. यामुळं सर्व ब्राह्मण क्रुद्ध झाले. त्यांनी मला भीषण शाप दिला की,

'तू अत्यंत निर्दय असा वाघ होशील. तुला कोणत्याच बाबीचं स्मरणही राहाणार नाही. मृत्यूच्या समयी भगवान नारायणांचं नाव तुझ्या कानांवर पडेल.

'विप्रवर, ते सर्व ब्राह्मण वेदाचे परमार्थी विद्वान होते. त्यांचा भीषण शाप मला भोवला. मुने, जेव्हा ब्राह्मणांनी मला शाप दिला तेव्हा मी त्यांच्या पायांवर पडून त्यांची क्षमा मागितली. माझ्यावर त्यांची कृपा झाली. त्यांनी माझ्या उद्धाराची वात्र सांगितली. ते म्हणाले,

'राजन्, प्रत्येक सहाव्या दिवशी तुला जे काही मिळेल ते तू खा. मध्यान्हकाळी हाच तुझा आहार होईल. जेव्हा तुला बाण लागेल तेव्हा तुझे प्राण कंठाशी येतील. त्याच वेळी एखाद्या ब्राह्मणाच्या मुखातून 'ॐ नमो नारायणाय' हा मंत्र तुझ्या कानावर येईल. तेव्हा तुला स्वर्गाची प्राप्ती होईल.' मुने, मी आज हा मंत्र आपल्या मुखातून ऐकला. परिणाम असा झाला की, मला ब्रह्मद्वेष्टयास भगवान नारायणांचं दर्शन झालं. ब्राह्मण चालते, फिरते देवच आहेत.'

असे म्हणून तो शुद्ध अंतःकरणाचा पुरुष स्वर्गाकडे निघून गेला. ब्राह्मण आरुणी त्या व्याधाला पाहून म्हणाला, 'आज वाघ मला खाण्यासाठी आला होता. पण आज तू माझं रक्षण केलंस. उत्तम व्रताचं पालन करणाऱ्या वत्सा, मी तुझ्यावर संतुष्ट आहे. एखादा वर माग.' तेव्हा व्याध म्हणाला, 'ब्राह्मणदेवा, मला इथंच आपण बोलत आहात, हाच वर पुरे आहे. आपल्या प्रेममय भाषणापेक्षा अधिक प्रिय वर कोणता असेल ?' त्यावर आरुणी त्या व्याधास म्हणाला,

'व्याधा, तुला तपस्या करण्याची इच्छा होती. त्यासाठी तू माझी प्रार्थना केली होतीस. परंतु अनघा, त्यावेळी तुझ्यात अनेक प्रकारची पापं होती. तुझं रूप भयंकर होतं. पण आता तुझं अंतःकरण पवित्र झालं आहे. कारण की, देविकानदीत स्नान, माझं दर्शन, चिरकालपर्यंत भगवान विष्णूचं नाम कानांनी ऐकणं, यामुळं तुझं पाप नष्ट झालं आहे. आता माझा एक वर स्वीकार. आता तू इथंच राहून तपस्या कर.' तेव्हा व्याध म्हणाला, 'ऋषे, आपण ज्या प्रभू भगवान नारायणांची, विष्णूंची चर्चा केली, त्यांची प्राप्ती मानवास कशी होणार ? आपण

मला हे कृपा करून सांगावं. हाच माझा वर होईल.' त्यावर ऋषी म्हणाला, 'व्याधा, कोणत्याही पुरुषानं सनातन श्रीहरींच्या उद्देशानं भक्तिपूर्वक व्रत केलं तरी त्याला भगवान प्राप्त होतील. पुत्रा, तू हे जाणून भगवान नारायणांचं हे व्रत कर. केव्हाही गणान्न–ब्राह्मणांसाठी निर्माण केलेलं अन्न खाऊ नकोस. खोटं बोलू नकोस. व्याधा, हेच एक उत्तम व्रत आहे. आता तू तपस्वी बनून इच्छा होईल तोपर्यंत इथंच राहावंस.'

आरुणीचे वचन ऐकून व्याध मोक्षप्राप्तीसाठी अत्यंत चिंतित झाला. वरदाता ब्राह्मण एके दिवशी तेथून दुसरीकडे निघून गेला.

## व्याध सत्यतपा ऋषी बनतो

भगवान वराहांनी या व्याधाची कथा आणखी पुढे सांगितली. आता तो व्याध साधूंच्या मार्गाचे अवलंबन करून निराहार राहून तपस्या करू लागला. भिक्षा घेण्याचा समय आला की, वृक्षावरून गळलेली सुकलेली पाने खाऊन ती भूक भागवायचा. एके दिवशी त्याला भूक लागली. त्याने वृक्षाखाली पाहिले. झाडाखाली पडलेली पाने घेऊन खाण्याची इच्छा त्याला झाली. एवढ्यात एक आकाशवाणी झाली. 'अरे, ही शाखोटकाची निकृष्ट पानं आहेत. ती खाऊ नकोस' म्हणून व्याधाने ती खाल्ली नाहीत. तेव्हा तो दुसऱ्या वृक्षापाशी गेला. तेथेही तसाच पहिल्यासारखा ध्वनी झाला. अशी आपत्ती आल्यावर त्या दिवशी व्याधाने काहीच खाल्ले नाही. निराधार राहून त्याने मोठ्या समाधानाने गुरुदेव आरुणीचे स्मरण केले. पुनः तो तप करू लागला.

त्याचे असे तप चालले असताना महर्षी दुर्वास त्या व्याधापाशी आले. त्या ऋषींनी पाहिले. व्याधाचे शरीर दुर्बल झाले होते. केवळ प्राण तेवढा शिल्लक होता. पण तपस्येचे तेज मात्र चमकत होते. जणू अग्नीत तुपाची आहुती पडली होती. त्या व्याधाने मुनिवर दुर्वासांना पाहून, डोके नमवून प्रणाम केला व म्हटले, 'भगवन्, आपल्या दर्शनानं मी कृतार्थ झालो आहे. आज श्राद्धाचा दिवस आहे. आपण अतिथी माझ्याकडं आला आहात. सुकलेली पानं आपणांस देऊन मी

श्राद्ध करून तृप्त करतो.' तेव्हा मुनी व्याधास म्हणाले, 'ठीक आहे. तू अतिथींस यव, गहू आदी धान्यांचं अन्न समर्पण कर. मी भुकेनं अत्यंत पीडित झालो आहे.'

दुर्वासांचे हे बोलणे ऐकून व्याध चिंतामग्न झाला. तो मनाशी म्हणाला, 'ही सर्व सामग्री कुठं मिळेल ?' तो असा विचार करीत असतानाच एक सोन्याचे पात्र आकाशातून खाली आले. ते पात्र सिद्ध अन्नांनी पूर्ण होते. व्याधाने ते हातात घेतले व दुर्वासांना म्हणाला, 'ब्रह्मन्, आपण परम ब्रह्मज्ञ पुरुष आहात. मी भिक्षा मागण्यासाठी जात आहे. तोपर्यंत आपण इथंच राहाण्याची कृपा करावी.'

इतके म्हणून व्याध भिक्षा मागण्यासाठी निघाला. एवढ्यात अनेक उपवने असलेली, अहिरांची वस्ती असलेली एक नगरी त्याने पाहिली. तेथील वृक्षांपासून अनेक पुरुष सुवर्णपात्रे हातात घेऊन बाहेर पडले. विविध प्रकारच्या दिव्य अन्नांनी त्यांनी त्याची थाळी भरून टाकली. व्याधाने स्वतःस कृतार्थ समजून तो आपल्या स्थानावर परत आला. तेथे त्याने श्रेष्ठ दुर्वास बसलेले पाहिले. मुनींना पाहून त्याने भिक्षेचे अन्न एका पवित्र स्थानावर ठेवून, मुनींना प्रणाम करून म्हटले, 'ब्रह्मन्, जर आपली माझ्यावर कृपा असेल तर आपणही आसन घ्यावं. पाय धुऊन या पवित्र आसनावर बसावं.'

व्याधाची परीक्षा पाहाण्यासाठी विप्रवर महर्षींनी म्हटले, 'व्याधा, मी नदीपर्यंत जाऊ शकत नाही. माझ्या जवळ जलपात्रही नाही. मग मी माझे पाय कसे धुणार ?' मुनींनी असे म्हणताच व्याध विचार करू लागला. 'आता मी काय करू ? मुनींचं भोजन माझ्या इथं कसं होणार?' तेव्हा त्या व्याधाने मनातल्या मनात आपल्या गुरूचे, आरुणीचे स्मरण केले. त्याने देविकानदीची स्तुती करताना म्हटले,

'नद्यांत श्रेष्ठ असणाऱ्या देविके, मी व्याध आहे. मी सदा पापंच केली आहेत. ब्राह्मणाच्या हत्येचं महापापही मी केलं आहे. देवी, तरी-सुद्धा मी आज तुला शरण आलो आहे. आज तू माझं रक्षण कर. देव, मंत्र, पूजेचं विधान, यांतलं मी काहीच जाणीत नाही. देवी, तू नद्यांत मुख्य आहेस. केवळ गुरूचं उत्तम ध्यान केल्यामुळं माझं कल्याण होत

आहे. तू माझ्यावर आज कृपा कर. आणि, दुर्वासमुनींना पाय धुवायचे आहेत. तू त्यांच्या जवळ येण्याची कृपा कर.'

व्याधाने अशी प्रार्थना करताच पापनाशिनी देविकानदी तेथे येऊन पोचली. हे पाहून दुर्वासमुनींना फार आश्चर्य वाटले. त्यांचे मन प्रसन्न झाले. त्यांनी हातपाय धुतले व श्रद्धापूर्वक अन्न भक्षण केले. व्याधाच्या शरीरात केवळ हाडेच शिल्लक उरली होती. भुकेने तो अत्यंत दुर्बळ झाला होता. दुर्वासमुनी त्याला म्हणाले, 'अंगांसहित वेद, पदक्रम, ब्रह्मविद्या, पुराणं, हे सर्व तुला प्रत्यक्ष प्राप्त होतील.' असे म्हणून दुर्वासांनी त्याचे नवीन नामकरण केले. ते म्हणाले, 'तू आज-पासून ऋषींत अग्रगण्य होशील व सत्यतपा या नावाचा ऋषी होशील.'*

मुनिवर दुर्वासांनी जेव्हा व्याधाला अशा प्रकारचा वर दिला तेव्हा त्याने मुनींना म्हटले, 'ब्रह्मन्, मी व्याध असून वेदांचं अध्ययन कसं करू?' त्यावर ऋषी म्हणाले, 'साधुव्याधा, निराहार राहून तपस्या केल्यानं आता तुझं पहिलं शरीर संपलं आहे. ते संस्कार आता राहिले नाहीत. तुझं हे तपोमय शरीर सर्वथा भिन्न बनलं आहे. यात संशय नाही. पूर्वकालीन अज्ञानही उरलेलं नाही. यावेळी तुझ्या अंतःकरणात शुद्ध रूपाचा अविनाशी परमात्मा निवास करीत आहे. आता तुझं शरीर पवित्र झालं आहे. मी हे सर्व तुला सत्यच सांगत आहे. मुने, म्हणून तुला वेद व शास्त्रं यांचं ज्ञान होईल.'

यानंतर दुर्वासांनी त्याला नाना प्रकारच्या व्रतांची माहात्म्ये समजावून दिली. मत्स्यद्वादशीव्रत, कूर्मद्वादशीव्रत, वराहद्वादशीव्रत, नृसिंहद्वादशीव्रत, वामनद्वादशीव्रत, जामदग्न्यद्वादशीव्रत, श्रीराम व श्रीकृष्णद्वादशीव्रत, बुद्धद्वादशीव्रत, कल्किद्वादशीव्रत, पद्मनाभद्वादशीव्रत, धरणीव्रत अशा व्रतांचा महिमा मुनींनी सत्यतपास सांगितला.

---

* हीच कथा अडतिसाव्या अध्यायात आली आहे. याच पुराणात अठ्ठचाळिसाव्या अध्यायात असे सांगितले आहे की हा सत्यतपा जन्मानेच ब्राह्मण होता. परंतु व्याधांच्या संसर्गाने व्याध बनला होता. नंतर दुर्वासांच्या सत्संगाने पुनः ब्राह्मण झाला.

## पशुपाल नावाच्या पुरुषाची निर्मिती

भगवान वराहांनी पृथ्वीला म्हटले, ' वसुंधरे, दुर्वासांकडून अशा व्रतकथा ऐकून सत्यतपा त्याच क्षणी हिमालयातील पवित्र स्थानावर गेला. तिथं पुष्पभद्रा नावाची नदी होती. चित्रशिला नावाचा एक प्रसिद्ध पहाड होता. भद्रवट नावाचा एक वडाचा वृक्ष होता. त्याच ठिकाणी मुनींनी एक सुंदर आश्रम बनविला. भविष्यात मोठी विचित्र, लीला सत्यतपाच्या या आश्रमात होईल.' हे ऐकून पृथ्वी म्हणाली, ' प्रभो, आपण सनातन पुरुष आहात. तपोमय, या व्रताची साधना मी कित्येक हजार कल्पांपूर्वी केली होती. आता मी ती सर्व विसरून गेले आहे. पण प्रभो, आज आपल्या कृपेनं मला पूर्वकाळाचं स्मरण थोडं होत आहे. पूर्वजन्मांची आठवण जातिस्मरता प्राप्त झाल्यामुळं माझ्या मनास मोठी शांतता प्राप्त झाली आहे. भगवन्, अगस्त्यमुनी राजा भद्राश्वाच्या भवनावर पुन: केव्हा आले ? त्याच्या आज्ञेनं राजानं काय केलं ? आपण कृपा करून मला सारं सांगावं.'

भगवान वराहांनी सर्व हकीकत सांगितली. राजा भद्राश्व व अगस्त्य यांच्यांत झालेला हा संवाद अगस्त्यगीता या नावाने प्रसिद्ध आहे. नासदीयसुक्तावरील हे विवरण आहे. राजा भद्राश्व सदा श्वेत अश्वावर आरूढ होत असे. अगस्त्यमुनी जेव्हा त्याच्याकडे दुसऱ्या खेपेस आले तेव्हा त्याने त्यांना उत्तम आसनावर बसविले. त्यांची पूजा केली आणि त्यांना विचारले,

' भगवन्, असं कोणतं कर्म आहे की, जे केल्यानं मुक्ती प्राप्त होते ? जे केल्यानं शोक कधीच प्राप्त होत नाही ? '

' राजन् ' अगस्त्यमुनी सांगू लागले, ' नीट सावध होऊन ऐक. ही कथा दृष्ट व अदृष्ट या दोनही लोकांशी संबद्ध आहे. ही हकीकत त्यावेळची आहे की, जेव्हा दिवस, रात्र, नक्षत्र, दिशा, आकाश, देव, सूर्य, इत्यादींचा नितांत अभाव होता. त्यावेळी पशुपाल नावाचा एक पुरुष राज्य करीत होता.' मुनींनी निवेदन चालू केले. एकदा पशूंचे रक्षण करण्याच्या वेळी त्याच्या मनात पूर्वसमुद्र पाहाण्याची उत्कंठा जागी झाली. तो त्या महासागराकडे गेला. त्या सागराच्या तटावर

एक वन होते. तेथे अनेक सर्प निवास करीत होते. तेथे आठ वृक्ष होते आणि एक स्वच्छंदगामिनी नदी वाहात होती. वर गमन करणारे अन्य प्रधान पांच पुरुष होते. एक विशिष्ट पुरुष असा होता की, त्याच्या प्रसादाच्या तेजामुळे चमकणारी एक स्त्री शोभा पावत होती.

त्यावेळी हजार सूर्याप्रमाणे आकृती असणाऱ्या त्या महान पुरुषास त्या स्त्रीने आपल्या वक्षःस्थळावर स्थान दिले होते. त्या पुरुषाच्या अधरांवर तीन रंगांचे तीन विकार विराजमान होते. तो पुरुष तिचा संचालक होता. त्याची गती थांबत नव्हती. त्याला पाहून ती स्त्री मौन झाली. तेव्हा तो प्रबंधक पुरुषही त्या वनात निघून गेला. तेव्हा क्रूर स्वभावाचे आठ सर्प राजाच्या जवळ आले. आणि त्यांनी त्याच्या शरीरास चहू बाजूंनी लपेटून टाकले. या सर्पांचे आक्रमण दूर कसे करावे ? यांचा संहार कसा करावा ? या विचारात राजा होता.

एवढ्यात त्याच्या समोर तीन वर्णांचा आणखी एक पुरुष प्रकट झाला. श्वेत, पीत व रक्त या तीन वर्णांची रूपे त्याने धारण केली होती. त्याने आपले नाव समजावून घेण्याचा प्रयत्न केला व म्हटले, 'मला दुसरं स्थान हवंय.' त्याला प्रधान पुरुषाने विचारले, 'कुठं जाण्याचा विचार करतोस ?' त्या पुरुषाचे नाव तेव्हा 'महत्' असे ठेवण्यात आले. आता त्याने त्या जगन्नियंत्या प्रभूच्या बरोबर राहाण्यास स्वीकृती दिली. त्यानंतर राजाने विचारले, 'तुम्हांस जगताची माहिती होणं आवश्यक आहे.' त्यावर ती स्त्री म्हणाली, 'या जगतात तर मी ओतप्रोत आहे.' तेव्हा त्या दुसऱ्या पुरुषाने म्हटले, 'तू घाबरू नकोस.' एवढे म्हणून तो पुरुष राजापाशी स्वतः येऊन उपस्थित झाला.

त्यानंतर दुसरे पांच पुरुष आले. आणि ते प्रधान राजाच्या चारही बाजूंना उभे राहिले. त्या डाकूंनी शस्त्रे उठवून प्रधान राजास मारण्याची तयारी केली. पण भीतीने एक दुसऱ्यात विलीन होऊन गेला. त्यानंतर राजाचे भवन विशेष रूपाने सुशोभित झाले. पृथ्वी, जल, तेज, वायू व आकाश, या पांच भूतांनी आपला एक समूह तयार केला. त्यावेळी वायूचे रूप शीतल व सुखदायी होते. अन्य चारही भूते उत्तम गुणांनी संपन्न होती. ती सर्व राजभवनात आली. तेव्हा त्या प्रधान

पुरुषाने, पशुपालाच्या सूक्ष्म रूपास पाहून तीन वर्णांच्या पुरुषाने म्हटले, 'महाराज, मला पुत्र नाही.' त्यावर पशुपालाने म्हटले, 'सांग, मी तुझ्यासाठी काय करू ?' त्यावर तीन वर्णांच्या पुरुषाने म्हटले, 'आम्ही आपणांस बंधनात घालू इच्छीत होतो. आम्ही तसा प्रयत्न केला. पण आम्हांस यश आलं नाही. राजन्, अशा परिस्थितीत आम्ही आपल्याच शरीरात निवास करू. आपण माझ्यावर आपली पुत्रभावना करावी.'

अशा प्रकारे तीन वर्णांच्या पुरुषाने म्हटल्यावर राजा पशुपालाने म्हटले, 'मी पुत्र असा पाहातो आहे की, जो दुसऱ्यांचाही प्रबंधक होईल.' त्या तीन वर्णांच्या पुरुषास त्याने आपला पुत्र मानले. त्याच्यासंबंधी मनात त्याने आसक्ती धारण केली.

## पशुपालाचे आख्यान

अगस्त्यांनी या पशुपालाचे चरित्र आणखी पुढे निवेदन केले. परम प्रभूने पशुपाल या नावाच्या पुरुषाची निर्मिती केली. त्याला राज्य करण्याची आज्ञा दिली. स्वतंत्र असल्यामुळे तो पुरुष राजा बनला. त्या पुत्रात तीन रंग होते. त्याने अहंकार नावाच्या पुत्रास जन्म दिला. त्या पुत्रास अवबोधस्वरूपिणी एक कन्या झाली. त्या कन्येने ज्ञान, दान करण्याची योग्यता असलेल्या एका सुंदर पुत्रास जन्म दिला. या पुत्रास पांच पुत्र झाले. ते सर्व रूपवान होते. त्यांना विषय भोगण्याची रुची होती. त्यांनाच इंद्रिये समजावे. त्यानंतर सर्वांनी राहाण्यासाठी एक सुंदर भवन तयार केले. या त्यांच्या मंदिरात नऊ दरवाजे होते. त्यात एक स्तंभ होता. जलाने संपन्न अशा हजारो नद्या त्याला सुशोभित होत्या. राजा पशुपाल साकार होऊन पुरुषाच्या रूपात त्या भवनात राहू लागला. वेद व छंद यांचे स्मरण त्याला झाले.

एका समयाची हकीकत आहे. राजा पशुपालाच्या मनात आनंदाच्या अभावाचा अनुभव होता. आता त्याने जगताच्या निर्मितीची इच्छा केली. योगमायेचा आश्रय घेऊन त्याने एक पुत्र प्रकट केला. त्याला चार मुखे, चार भुजा, चार वेद, चार पंथ यांची प्राप्ती झाली. समुद्र, वन व तृणापासून हत्तीप्रभृती पशूंपर्यंत त्याचा प्रवेश होता. पशु-

पालापासून ज्याची उत्पत्ती झाली, त्याला चार चरण, चार मुखे होती. सत्यस्वरूप खर हा त्याचा पुत्र होय. त्याने जे म्हटले ते धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचे साधन झाले. भक्तिपूर्वक उपासना करणाऱ्यांना यांची प्राप्ती होते. यांतील पहिल्याचे स्वरूप वृषभाचे आहे. त्याला चार शिंगे आहेत. अर्थ व काम हे त्याचेच अनुकरण करतात. चौथी मुक्ती. भक्तीसह जो तिचा आदर करील, त्याला परब्रह्म परमात्मा सुलभ होईल. या ब्रह्माचाच सनातन अंश मनुष्यांत व्यक्त झालेला असतो.

मनुष्याने प्रथम ब्रह्मचारी असावे. दुसऱ्या अवस्थेत धर्माचा आश्रय घेऊन सेवकवर्गाचे भरणपोषण करावे. तिसरी अवस्था वानप्रस्थाची आहे. या अवस्थेतही त्याचे अंत:करण धर्मयुक्त असावे. यानंतर या परब्रह्माने 'अहमस्मि' केवळ मीच आहे– असा उच्चार केला. त्यानंतर ते दोन प्रकारच्या रूपांत विराजमान झाले. सर्वप्रथम चार मुखांच्या ब्रह्मदेवांनी पाहिले की, काही प्रजा नित्य आहेत, काही अनित्य आहेत. त्यानंतर ब्रह्मदेवांच्या मनात विचार आला की, आपण पिताजींना कसे भेटावे ? कारण ते महान पुरुष आहेत. ब्रह्मदेवांनी स्वराचे मंथन केले आणि स्वराचे शिर प्रकट झाले. त्याची आकृती नारळाच्या फळासारखी होती. तो स्वर पुन: विभक्त झाला. प्राण, अपान, उदान, समान व व्यान यांना ब्रह्मदेवांनी निवासासाठी स्थान दाखविले. ब्रह्मदेवांनी जेव्हा आपल्या प्राणिसृष्टीवर दृष्टी टाकली, तेव्हा त्यांना तिच्या अंतरंगात परब्रह्म परमात्म्याचा अंश दिसला.

यानंतर अगस्त्यांनी राजा भद्राश्वास आणखी काही व्रतांची माहिती करून दिली. उत्तम पतीसाठी व्रत, शुभव्रत, धन्यव्रत, कांतिव्रत, सौभाग्यव्रत, अविघ्नव्रत, शांतिव्रत, कामव्रत, आरोग्यव्रत, पुत्रप्राप्तिव्रत, सार्वभौमव्रत. इत्यादी व्रतांचा परिचय करून दिला. सत्य, त्रेता, द्वापर, कली. या चार युगांचे वर्णन त्यांनी केले.

## सृष्टिदेवीचे आख्यान*

भगवती पृथ्वीने एकदा वराहांना विचारले, ' भगवन्, काही लोक रुद्रांना परमात्मा, पुण्यमय शिव मानतात. काही लोक विष्णूंना परमात्मा मानतात. काही लोक ब्रह्मदेवांना सर्वेश्वर मानतात. पण यांतील कोणता देव श्रेष्ठ ? कोणता कनिष्ठ ? देवा, कृपा करून मला हे सर्व सांगावं. ' तेव्हा भगवान वराह म्हणाले, ' वरानने, भगवान नारायणच सर्वांत श्रेष्ठ आहेत. त्यांच्यानंतर ब्रह्मदेवांचं स्थान आहे. या ब्रह्मदेवांपासून रुद्रांची उत्पत्ती आहे. रुद्र तप:साधनाच्या प्रभावानं सर्वज्ञ बनले. या भगवान रुद्रांची अनेक आश्चर्यमय कर्मं आहेत. मी त्यांच्या चरित्राचं वर्णन थोडं करतो. ' असे म्हणून त्या भगवान वराहांनी पृथ्वीस रुद्रांचे चरित्र ऐकविले.

महान रमणीय व नाना प्रकारच्या धातूंनी सुशोभित असा कैलास नावाचा एक पर्वत आहे. भगवान शूलपाणी त्रिलोचन शिवांचे ते नित्य निवासस्थान आहे. एका दिवसाची हकीकत आहे. सर्व प्राण्यांकडून नमस्कृत असे भगवान पिनाकपाणी आपल्या सर्व गणांनी घेरलेले त्या कैलासपर्वतावर विराजमान होते. त्यांच्याजवळच भगवती पार्वतीही बसली होती. या गणांपैकी काहींची मुखे सिंहासारखी गर्जना करीत असत. काही गण हत्तींच्या मुखासारखे होते. काही गण घोड्यांच्या मुखाकृतीचे होते. काही गणांची मुखे जलप्राणी शिशुमारासारखी होती. त्यांतील काही गात होते, नाचत होते, दौडत होते, टाळ्या वाजवून हसत होते, गर्जत होते, मातीच्या ढेकळांनी परस्परांत लढत होते. काही बलवान मल्लयुद्ध खेळत होते. भगवान रुद्र देवी पार्वतीबरोबर हास्यविलास करीत होते.

एवढ्यात ब्रह्मदेव तेथे येऊन पोचले. त्यांच्याबरोबर इतर देवही

---

* ' वराहपुराणा 'तील हे त्रिशक्ति–माहात्म्याचे आख्यान फार प्रसिद्ध आहे. भास्कररायांनी ' ललितासहस्रनाम ' – ' सौभाग्य भास्करभाष्य 'मध्ये याचा अनेकदा उल्लेख केला आहे. ' सेतुबंधा 'त पदोपदी या त्रिशक्तिमाहात्म्याच्या श्लोकांना उद्धृत केले आहे.

होते. ते आलेले पाहाताच भगवान शिवांनी त्यांची विधिपूर्वक पूजा केली, आणि म्हटले, 'ब्रह्मन्, आपण या वेळी कसे आलात ? आपल्या मनात भीती कसली दिसते ?' तेव्हा ब्रह्मदेव म्हणाले, 'अंधक नावाचा एक दैत्य सर्व देवांना त्रास देत आहे. त्याच्यापासून रक्षण व्हावं म्हणून सर्व देव माझ्याकडे आले आहेत. त्यांना घेऊन मी इथं तुमच्या सभेत आलो आहेत.'

असे म्हणून भगवान ब्रह्मदेव पिनाकपाणी भगवान रुद्रांच्याकडे पाहू लागले. त्यांनी मनातल्या मनात भगवान नारायणांचेही स्मरण केले. नारायण त्वरित तेथे उपस्थित झाले. ब्रह्मा, विष्णू व रुद्र हे तीन देव परस्परांकडे प्रेमपूर्वक दृष्टीने पाहू लागले. त्या तिघांची दृष्टी त्या वेळी एकरूप झाली. तीमधून एक कन्या प्रकट झाली. तिचे स्वरूप दिव्य होते. तिचे अंग नीलकमलाप्रमाणे श्यामल होते. तिचे डोक्याचे केस निळसर कुरळे होते. तिचे नाक, ललाट व मुख अत्यंत सुंदर असून विश्वकर्म्याने तिला सुंदर लक्षणांनी युक्त बनविले होते. ब्रह्मा, विष्णू व रुद्र ह्यांनी तीनही देवांनी तिला विचारले,

'शुभे, तू कोण आहेस ? विज्ञानमय देवी, तू काय करणार आहेस ?'

'देवश्रेष्ठांनो,' शुक्ल, कृष्ण व रक्त या तीन वर्णांनी सुशोभित अशा त्या कन्येने म्हटले, 'मी तर आपल्याच दृष्टीपासून निर्माण झाले आहे. मी आपलीच परमेश्वरी शक्ती आहे. आपण आपल्या कन्येस ओळखत नाही ?' यानंतर तीनही देवांनी तिला वर देताना म्हटले, 'देवी, तुझं नाव 'त्रिकला' होईल. तू विश्वाचं सदा रक्षण करशील. महाभागे, गुणांना अनुसरून आणखीही अनेक नावं तुझी होतील. त्या नावांना सर्व कार्य करण्याची शक्ती राहील. सुंदर मुखाच्या देवी, तुझ्या तीन वर्णांच्या तीन मूर्ती तयार कर.'

देवांनी असे म्हटल्यावर त्या कुमारीने श्वेत, रक्त, श्यामल रंगांनी युक्त अशी आपली तीन शरीरे बनविली. ब्रह्मदेवांच्या अंशापासून 'ब्राह्मी' (सरस्वती) नावाची मंगलमयी सौम्यरूपिणी शक्ती उत्पन्न झाली. ही प्रतिसृष्टी करते. सूक्ष्म कटिभाग, सुंदर रूप, लाल वर्णाची

दुसरी कन्या होती ती ' वैष्णवी ' या नावाने ओळखली गेली. तिच्या हातांत शंख व चक्र शोभत होते. ती विष्णूंची कला होती. ती अखिल विश्वाचे पालन करीत असते. तिला विष्णुमायाही म्हणतात. काळया रंगाने शोभणारी रुद्रांची जी शक्ती होती, तिच्या हातात त्रिशूल होते. तिचे दात मोठे विक्राळ होते. ही जगताचा संहार करणारी ' रुद्राणी ' होती. ब्रह्मदेवापासून प्रकट झालेली श्वेत वर्णाची कन्या ' विभावरी ' या नावाची होती. त्या कुमारीचे नेत्र फुललेल्या कमलाप्रमाणे होते. सर्वज्ञता प्राप्त करण्यासाठी ती श्वेतगिरीवर तपस्या करण्यासाठी गेली. तेथे पोचून तिने उग्र तपश्चर्येस आरंभ केला, भगवान विष्णूंच्या अंशापासून निर्माण झालेली कन्याही अत्यंत कठोर तपस्या करण्यासाठी मंदराचल–पर्वतावर गेली. तिसरी श्यामल वर्णाची कन्याही तपस्या करण्यासाठी नीलगिरी नावाच्या पर्वतावर गेली.

काही काळानंतर प्रजापती ब्रह्मदेव प्रजेची निर्मिती करण्यासाठी तत्पर झाले. परंतु प्रयत्न करूनही त्यांना प्रजेची वृद्धी करता आली नाही. तेव्हा त्यांनी मनात विचार केला की, आपली प्रजा का वाढत नाही ? ब्रह्मदेवांनी योगाभ्यासाच्या साह्याने ध्यान केले. तेव्हा श्वेत-पर्वतावर असलेली ' सृष्टी ' कुमारी तपस्या करीत असल्याचे त्यांच्या ध्यानात आले. तपस्येच्या प्रभावाने तिचे सर्व पाप दग्ध झाले होते. ब्रह्मदेव कमलासमान नेत्र असलेल्या त्या कुमारिकेजवळ गेले. त्यांनी त्या तपस्विनी दिव्य कुमारिकेस पाहिले. ते तिला म्हणाले, ' कमनीय कांतीच्या कुमारी, तू प्रधान कार्याची अवहेलना करून आता तपस्या का करीत आहेस ? विशाल नेत्राच्या कन्ये, मी तुझ्यावर प्रसन्न आहे. तू वर माग.'

' भगवन्, ' सृष्टी म्हणाली, ' मी एका स्थानावर राहू इच्छीत नाही. म्हणून मी सर्वगामी होईन, असा मला वर द्यावा. ' तेव्हा ब्रह्म-देव म्हणाले, ' देवी, तू सर्वत्र जाऊ शकशील. सर्वव्यापिनी होशील. ब्रह्मदेवांनी असे म्हणताच ती कमलासमान नेत्र असलेली सृष्टिदेवी त्यांच्याच अंकात लीन झाली.. तेव्हा ब्रह्मदेवांची सृष्टी मोठ्या वेगाने वाढू लागली. त्यांना सात मानसपुत्र झाले. त्या पुत्रांनाही अनेक

संताने झाली. त्यांनाही मोठी प्रजा झाली. त्यानंतर स्वेदज, उद्भिज, जरायुज, अंडज, अशा चार प्रकारच्या प्राण्यांची निर्मिती झाली. चर अचर प्राण्यांच्या सृष्टीने हे सारे विश्व भरून गेले. याच सृष्टीने भूत, भविष्य व वर्तमान, या तीन लोकांचीही व्यवस्था केली.

## सृष्टी, सरस्वती, वैष्णवी

वरील सृष्टिदेवीची आणखीही कथा ऐकण्यासारखी आहे. परमेष्ठी रुद्रांकडून ज्या तीन शक्ती प्रकट झाल्या त्यांतील सर्वप्रथम श्वेतवर्णीय सृष्टिदेवीचा उल्लेख महत्त्वाचा आहे. संपूर्ण अक्षरांनी युक्त असल्यानेही ती 'एकाक्षरा' या नावाने ओळखली जाते. या देवीस कधी 'वागीशा' तर कधी 'सरस्वती,' कधी 'विश्वेश्वरी,' तर कधी 'अमिताक्षरा' या नावांनीही लोक जाणतात. काही ठिकाणी तिला 'ज्ञाननिधी' अथवा 'विभावरी' या नावांनी ओळखतात. अथवा असे समजावे की, जितकी स्त्रीवाचक नामे आहेत, ती सर्व तिचीच आहेत.

विष्णूंच्या अंशाची 'वैष्णवी' देवी लाल वर्णाची आहे. तिचे डोळे मोठे मोठे आहेत. तिचे रूप अत्यंत मनोहर आहे. या दोन शक्ती आणि तिसरी रौद्रीशक्ती, या सर्व रूपमयी देवी एकच आहे. परंतु त्या तीन भेदांनी जाणल्या जातात. स्थावर– जंगम हे सारे विश्व या सृष्टिदेवीने ओतप्रोत भरले आहे. या सृष्टीचे महत्त्व जाणून पितामह ब्रह्मदेवांनी तिची उचित शब्दांत स्तुती करताना म्हटले,

'देवी, तू सत्यरूपा, सदा अचल राहाणारी, सर्वांना आश्रय देण्यात कुशल, अविनाशी, सर्वव्यापी, सर्वांना जन्म देणारी, अखिल प्राण्यांवर स्वामित्व गाजविणारी, सर्वज्ञ, सिद्धिबुद्धि-रूपा, आणि संपूर्ण सिद्धी देणारी आहेस. सुंदरी, तुझा जय असो. देवी, ओंकार हे तुझं स्वरूप आहे. त्यात तू सदा विराजमान होतेस. वेदांची उत्पत्तीही तुझ्यापासून आहे. मनोहर मुखाच्या देवी, देव, दानव, यक्ष, गंधर्व, राक्षस, पशू, वीरुध (वृक्ष, लता इत्यादी) इत्यादींचा जन्म तुझ्याच कृपेनं झाला आहे. तूच विद्या, विद्येश्वरी, सिद्धा, सुरेश्वरी आहेस.'

यानंतर वैष्णवी देवीचे वर्णन ऐकण्यासारखे आहे. ही तपस्या करण्यासाठी मंदराचलावर गेली होती. या देवीने कौमारव्रत धारण करून विशाल क्षेत्रात एकाकी राहून कठोर तपस्येस आरंभ केला. तपस्या केल्यानंतर खूप काळाने देवीच्या मनात विक्षोभ झाला. तिच्यापासून अनेक कुमारिका उत्पन्न झाल्या. त्यांचे नेत्र अति सुंदर होते. त्यांचे केस काळे व कुरळे होते. त्यांचे ओठ बिंबफलाप्रमाणे लाल होते. त्या कन्यांच्या शरीरांतून दिव्य प्रकाश पडत होता. अशा कोटयवधी कन्या या वैष्णवी देवीपासून निर्माण झाल्या. त्या देवीने या कुमारींसाठी शेकडो नगरे व उत्तम मंदिरे यांची निर्मिती केली. त्या भवनांत मण्यांचे जिने होते. अनेक जलाशय होते. छोटी मोठी उपवने होती. त्या मंदराचलावर असंख्य भवनांत त्या कन्या निवास करू लागल्या.

त्यांतील काही मुख्य कन्यांची नावे अशी आहेत– विद्युत्प्रभा, चंद्रकांती, सूर्यकांती, गंभीरा, चारुकेशी, सुजाता, मंजुकेशिनी, उर्वशी, शशिनी, शीलमंडिता, चारुकन्या, विशालाक्षी, धन्या, चंद्रप्रभा, स्वयंप्रभा, चारुमुखी, शिवदूती, विभावरी, जया, विजया, जयंती आणि अपराजिता. या देवींनी भगवती वैष्णवीच्या अनुचरियांचे स्थान ग्रहण केले. एवढ्यात ब्रह्मदेवांचे मानसपुत्र तपोधन नारद एके दिवशी तेथे अचानक आले. त्यांना पाहून वैष्णवीदेवी विद्युत्प्रभेस म्हणाली, 'तू त्यांना हे आसन दे. पाय धुण्यासाठी, आचमन करण्यासाठी जलही दे.' वैष्णवी देवीने सांगितल्यावरून विद्युत्प्रभेने मुनिवर नारदांना आसन, पाद्य व अर्घ्य प्रदान केले. त्यांनीही देवीस नमस्कार करून आसन ग्रहण केले. तेव्हा वैष्णवीने म्हटले,

'मुनिवर, यावेळी आपण कुठल्या लोकातून आलात ? आपलं काय काम आहे ?'

'कल्याणी, मी प्रथम ब्रह्मलोकात गेलो होतो. तिथून इंद्रलोकी गेलो आणि नंतर कैलासपर्वतावर पोचलो. देवेश्वरी, त्यानंतर माझ्या मनात आपल्या दर्शनाची इच्छा निर्माण झाली म्हणून मी इथं आलो.'

असे म्हणून नारदमुनी वैष्णवी देवीकडे पाहू लागले. नारद आश्चर्याने चकित झाले. त्यांनी मनात विचार केला. 'अहो, हिचं रूप तर

मोठं विचित्र आहे. एवढी सुंदरता, धीरता, कांती कशी नवलाईची आहे. आणि इतकं असूनही हिची उपरती, निष्कामता तर आश्चर्य-दायिनी आहे.' इतकं समजून नारदमुनी काहीसे खिन्न झाले. ते समजू लागले, 'देव, गंधर्व, सिद्ध, यक्ष, किंवा राक्षस यांच्या स्त्रियांतही हिच्या एवढी सुंदर कुणी नाही. विश्वातील कुणाही स्त्रीस एवढी सुंदरता लाभली नाही.'

इतके समजून नारद उठले. त्यांनी वैष्णवीदेवीस प्रणाम केला. आकाशमार्गाने ते समुद्रात स्थित असलेल्या महिषासुराच्या राजधानीस पोचले. त्याने ब्रह्मदेवांच्या वराने देवांच्या सर्व सेनांना पराभूत केले होते. सर्व लोकांत भ्रमण करणाऱ्या नारदमुनींना पाहून महिषासुराने त्यांची भक्तिभावाने पूजा केली. नारदमुनी त्या असुरास म्हणाले,

'असुरेन्द्र, सावधान होऊन ऐक. या विश्वात रत्नासारखी एक कन्या प्रकट झाली आहे तू तर वरदानाच्या प्रभावानं आता चराचर जगतास वश करून घेतलं आहेस. दैत्या, मी ब्रह्मलोकाहून मंदराचलावर गेलो होतो. तिथं मी एक देवी शेकडो कन्यांनी घेरलेली पाहिली. त्यातील प्रधान देवी देव, दैत्य, यक्ष यांच्यांतही सुंदरतेच्या बाबतीत दुसरी कुणी नाही. त्या सुंदर देवीत सतीत्वाचा प्रभाव आहे. अशी कन्या समस्त ब्रह्मांडात दुसरी नाही. देव, गंधर्व, ऋषी, सिद्ध, चारण आणि अन्य दैत्याधिपतीही त्या कन्येची उपासना करतात. पण त्या कन्येस जिंकणारा असा कुणीच समर्थ नाही.' इतके सांगून नारदमुनी तेथून आकाशमार्गाने निघून गेले.

## महिषासुर आणि देवासुरसंग्राम

भगवान वराहांनी महिषासुराचे आख्यान पुढे चालू ठेविले. नारदमुनी निघून गेल्यावर महिषासुरास त्या कन्येचेच ध्यान सतत लागले. त्याला आता क्षणभरही चैन पडेनासे झाले. त्याने आपल्या मंत्रिमंडळास बोलाविले. त्याचे आठ मंत्री होते. त्या शूरवीर, नीतिमान व बहुश्रुत मंत्र्यांची नावे अशी होती. प्रघस, विघस, शंकुकर्ण, विभावसू, विद्युन्माली, सुमाली, पर्जन्य आणि क्रूर. ते महिषासुराच्या भोवती जमा

झाले आणि म्हणाले,

‘सांगा. आम्ही कोणतं सेवाकार्य करावं ; आपण त्वरित आज्ञा द्यावी.’

‘नारदांनी एका कन्येची वार्ता मला दिली. त्या कन्येची प्राप्ती मला व्हावी, म्हणून मी तुम्हांस इथं बोलाविलं आहे. मंत्र्यांनो, देवर्षी नारदांनी मला एका कन्येची हकीकत सांगितली आहे. पण देवांचा स्वामी इंद्रास जिंकल्याशिवाय त्या कन्येची प्राप्ती होणार नाही. आपण सर्वांनी विचार करावा व ती सुलभ रीतीनं कशी प्राप्त होईल, देवांचा पराभव कसा करता येईल हे आपण मला सांगावं.’

‘दैत्यवर’ प्रघस म्हणाला, ‘आपण नारदमुनींकडून ज्या कन्येची माहिती मिळविली ती एक महान सती आहे. तिचं नाव ‘वैष्णवी’ देवी आहे. ती सुंदर रूप धारण करणारी देवी पराशक्ती या नावानं ओळखली जाते. गुरूची पत्नी, राजाची राणी अथवा सामंत, मंत्री, सेनापती यांची स्त्री अपहरण करण्याची इच्छा जो करतो, त्याचं राज्य त्वरित नष्ट होतं.’ यानंतर या विषयासंबंधी विघसाने म्हटले, ‘राजन्, या देवीच्या संबंधानं प्रघसानं जे सांगितलं ते सर्व सत्य आहे. जर सर्व लोकांचं एकमत झालं, बुद्धीनं समर्थन केलं, तरच त्या कन्येचं आपण हरण करावं. पण स्वच्छंदतापूर्वक त्या कन्येचं बलानं अपहरण वा अपकर्षण करणं कदापि ठीक नाही. मंत्रिवर, जर आपणांस माझं बोलणं आवडलं असेल तर आपण सर्व मंत्री त्या देवीपाशी जाऊन तिची प्रार्थना करू. प्रथम सामनीतीनं काम करू. अगदी शेवटी वाटल्यास दंडाचा आश्रय आपण घेऊ. एवढ्यानंही भागलं नाही तर मात्र अस्त्रांनी, शस्त्रांनी सुसज्ज बनून आपण बलपूर्वक त्या देवांना पराजित करू.’

अशा चर्चेतून त्या देवीस प्राप्त करून घेण्याचा प्रयत्नास महत्त्व आले. सर्व मंत्र्यांनी विघसाची प्रशंसा केली. त्या देवीला पाहाण्यासाठी सर्वलक्षण युक्त अशा ‘विद्युत्प्रभ’ नावाच्या दूतास पाठविण्यात आले. इकडे महिषासुराच्या मंत्र्यांची बैठक पुनः झाली. परस्परांचा विचार-विनिमय झाला. त्या कन्येला त्वरित प्राप्त करण्यासाठी देवांवर आक्रमण करण्याचे ठरले. महिषाच्या सेनेत त्यावेळेस नऊ पद्म असुरांची

संख्या होती. सेनापती विरूपाक्षास सैन्यासह युद्धास जाण्याची आज्ञा मिळाली. महिषासुरही हत्तीवर स्वार होऊन मंदराचलपर्वतापाशी इच्छेनुसार रूप धारण करून ससैन्य पोचला. तो पोचताच देवांच्या सेनेत खळबळ माजली. सर्व असुरांनी आपापली शस्त्रे व अस्त्रे यांची गर्जना केली. त्यांनी देवावर आक्रमण केले. तुमुल युद्ध सुरू होऊन अंगावर रोमांच उभे राहिले.

अंजनासारखा काळा नीलकुक्षी, मेघवर्ण, बलाहक, उदराक्ष, ललाटाक्ष, सुभीम, भीमविक्रम आणि स्वर्भानू, या आठ दैत्यांनी मोर्चे बांधून वसूंना मारण्यास सुरुवात केली. ध्वांक्ष, ध्वस्तकर्ण, शंकुकर्ण, वज्राप्रमाणे कठोर अंगांचा ज्योतिर्वीर्य, विद्युन्माली, रक्ताक्ष, भीमदंष्ट्र, विद्युज्जिव्ह, अतिकाय, महाकाय, दीर्घबाहू आणि कृतकान्त. या बारा दैत्यांनी युद्धभूमीवर आदित्यांवर स्वारी केली. काल, कृतांत, रक्ताक्ष, हरण, मृगहा, नल, यज्ञहा, ब्रह्महा, गोघ्न, स्त्रीघ्न, संवर्तक, या अकरा दैत्यांनी रुद्रांवर स्वारी केली. महिषासुरानेही देवांशी मोठ्या वेगाने युद्ध केले. असुर, राक्षस आणि देव यांच्यांत घनघोर युद्ध सुरू झाले. असुरांनी देवांचे सैनिक मोठ्या प्रमाणावर नष्ट केले. देवांची सेना भग्न झाली. इंद्रादी प्रमुख देव युद्धभूमीवर टिकू शकले नाहीत. अनेक प्रकारची शस्त्रे, अस्त्रे, शूल, पट्टिश, मुद्‌गर यांनी दानवांनी देवांना पराभूत केले. दानवांनी पीडित झालेल्या देवांनी शेवटी युद्धभूमी सोडून ब्रह्मदेवांकडे प्रयाण केले.

## महिषासुराचा वध

देवासुरांच्या या संग्रामाचा आणखी पुढला वृत्तांत भगवान वराहांनी पृथ्वीस सांगितला. विद्युत्प्रभ नावाचा दैत्य महिषासुरास प्रणाम करून दूताच्या रूपाने वैष्णवीदेवीपाशी येऊन पोचला. ती शेकडो कुमारींसह बसली होती. कोठलाही शिष्टाचार न पाळता विद्युत्प्रभ म्हणाला, ‘ देवी, फार पूर्वीची हकीगत आहे. सृष्टीच्या प्रारंभी सुपार्श्व नावाचा एक अत्यंत ज्ञानी ऋषी होता. ’ त्याने या ऋषीची कथा सांगितली. या ऋषीचा जन्म सरस्वतीनदीच्या तटावरील देशात

झाला. सिंधुद्वीप नावाचा एक प्रसिद्ध असा त्याचा मित्र त्याच्याप्रमाणेच तेजस्वी व प्रतापी होता. माहिष्मती नावाच्या उत्तम पुरीत त्याने निराहार राहून अत्यंत कठीण अशी तपस्या केली. विप्रचित्ती नावाच्या दैत्याची माहिष्मती याच नावाची एक कन्या मोठी सुंदर होती. एकदा ती आपल्या मैत्रिणींसह फिरत फिरत पर्वताच्या भूमीजवळ गेली. तेथे एक उपवन दिसले. त्या तपोवनाचे स्वामी एक ऋषी होते. ते मौनव्रत धारण करून तपस्या करीत होते. त्या महात्म्यांचा हा पवित्र आश्रम पाहून, मनोहर स्थान पाहून विप्रचित्तिकुमारी माहिष्मती मनात विचार करू लागली, 'मी या तपस्व्यास भयभीत करून या आश्रमात का राहू नये ? इथंच आपण सख्यांसह आनंदानं विहार करावा.'

असा विचार करून त्या दानवकन्या माहिष्मतीने आपल्या इच्छेने म्हशीचे रूप धारण केले. तिच्या शिरावर अत्यंत तीक्ष्ण शिंगे सुशोभित झाली. ती राक्षसी आपल्या सख्यांसह त्या सुपार्श्वऋषीच्या आश्रमापाशी आली. सुंदर मुखाच्या त्या दैत्यकन्येने मैत्रिणींसह येऊन त्या ऋषींना दरडावण्यास प्रारंभ केला. प्रथम त्या ऋषींना तिची भीती वाटली. पण नंतर त्यांनी ज्ञाननेत्रांनी जाणले की, ही सुंदर नेत्रांची म्हैस नसून एक राक्षसी आहे. म्हणून मुनीने क्रोधवश बनून तिला शाप दिला, 'दुष्टे, तू म्हशीचा वेष धारण करून मला भीती दाखविण्याचा प्रयत्न करतेस ? म्हणून तू आता शंभर वर्षांपर्यंत म्हशीच्याच रूपात राहाशील.'

ऋषींची ही शापवाणी ऐकताच दानवकन्या माहिष्मतीचा थरकाप झाला. ती त्यांच्या चरणांवर पडून रडत म्हणाली, 'मुने, आपण कृपा करून या शापास समाप्त करावं.' माहिष्मतीची प्रार्थना दयाळू मुनींनी ऐकली व तिला आपल्या शापाचा अंत सांगताना ते म्हणाले, 'भद्रे, या म्हशीच्या रूपातच तू एक उत्तम पुत्र उत्पन्न करून यापासून मुक्त होशील. माझं हे बोलणं असत्य होणार नाही.'

ऋषींचे हे बोलणे ऐकून माहिष्मती नर्मदानदीच्या तटावर गेली तेथे तपस्वी सिंधुद्वीप तपस्या करीत होते. तेथे काही वेळापूर्वी एक दैतकन्या इंदुमती जलात नग्न होऊन स्नान करीत होती. तिचे रूप

अत्यंत मनोहर होते. तिच्यावर दृष्टी पडताच मुनीचे रेत शिलाखंडावर स्खलित झाले. ते एका प्रवाहाबरोबर नर्मदेत आले. माहिष्मतीची दृष्टी त्यावर पडली. ती आपल्या सख्यांना म्हणाली, 'मी हे स्वादिष्ट जल पिऊ इच्छिते.' असे म्हणून तिने ते रेतयुक्त जल प्राशन केले. त्यामुळे तिला गर्भ राहिला. समयानुसार तिला एक पुत्र झाला. तो मोठा पराक्रमी, प्रतापी, बुद्धिमान असून महिषासुर या नावाने प्रसिद्धीस आला. ही कथा सांगून विद्युत्प्रभ वैष्णवीदेवीस म्हणाला,

'देवी, देवांच्या सैनिकांचा पराभव करणारा तोच महिष आज तुला हरण करण्यासाठी आला आहे. अनघे, या महान असुरानं युद्धभूमीवर देवसमुदायासही पराभूत केलं आहे. तो आता त्रैलोक्यास जिंकून ते तुला समर्पण करील. तू त्याचा स्वीकार कर.'

हे ऐकताच भगवती वैष्णवीस मोठ्या जोराने हसू आले. त्यावेळी त्या दूताने देवीच्या उदरात चर व अचरसहित तीन लोकांना पाहिले. ते पाहून तो आश्चर्यचकित झाला. देवीची एक प्रतिहारिणी, द्वारपालिका जया नावाची होती. तिने भगवती वैष्णवीच्या हृदयातील रहस्य सांगताना म्हटले, 'कन्येची प्राप्ती करण्याची इच्छा धारण करणाऱ्या महिषानं जसं तुला सांगितलं, तसंच तू इथं येऊन बोललास, पण प्रश्न असा आहे की, या वैष्णवीदेवीनं सदासाठी 'कौमरव्रत' धारण केलं आहे. या देवीच्या या अनुगामिनी कन्याही कुमारिकाच आहेत. त्यांतील एकाही कुमारीची प्राप्ती तुम्हांस होणार नाही. मग भगवती वैष्णवीदेवीस प्राप्त करण्याची गोष्ट दूरच ! दूता, तू इथून त्वरित परत जा.'

प्रतिहारिणीने असे म्हटल्यावर विद्युत्प्रभ तेथून निघून गेला. एवढ्यात परम तपस्वी नारदमुनी उच्च स्वरांनी वीणेचा झंकार करीत आकाशमार्गाने तेथे आले. त्या मुनीने 'अहोभाग्यम्' म्हणून त्या कुमारीस प्रणाम केला. देवीकडून पूजित होऊन नारद एका सुंदर आसनावर बसले. सर्व देवींना प्रणाम करून ते म्हणाले, 'देवी, देवसमुदायानं मोठ्या आदरानं मला आपणांकडं पाठविलं आहे. कारण की, महिषासुरानं संग्रामात त्यांना पराभूत केलं आहे. देवी, इतकंच नव्हे तर तो दैत्यराज तुलाच प्राप्त करण्याच्या प्रयत्नात आहे. वरानने,

देवांची ही वार्ता सांगण्यासाठी मी इथं आलो आहे. देवेश्वरी, आपण जोरानं त्या दैत्याशी युद्ध करून त्याला मारून टाकावं.'

भगवती वैष्णवीस असे म्हणून नारदमुनी तेथून अंतर्धान पावले. तेव्हा देवीने सर्व कन्यांना म्हटले, 'तुम्ही सर्वांनी शस्त्रास्त्रांनी सुसज्जित व्हावं.' तेव्हा त्या सर्व पराक्रमी कन्या देवीच्या आज्ञेने भयंकर आकार धारण करून ढाल, तलवार, धनुष्य आदी शस्त्रांनी सुसज्जित झाल्या. दैत्यांचा संहार युद्धात करण्यासाठी त्या तत्पर झाल्या. एवढ्यात महिषासुराची सेनाही देवसेनेस सोडून तेथे आली. स्वाभिमानी कन्या आणि दानव यांच्यांत युद्ध सुरू झाले. त्या कन्यांच्या प्रयत्नाने असुरांची चतुरंगिणी सेना क्षणभरात पराभूत झाली. कित्येकांची शिरे कापून भूमीवर पडली. अनेकांच्या छातींमधील रक्त क्रव्यादगणांनी पिऊन टाकले. अनेक प्रधान दानवांची मस्तके कापली गेली. ते कबंधरूपात नृत्य करू लागले.

अशा रीतींने एका क्षणातच ते पापबुद्धीचे असुर युद्धभूमीवरून पळून गेले. काही इतर दैत्य पळत पळत महिषासुरापाशी आले. निशाचरांच्या त्या विशाल सेनेत हाहाकार माजला. त्यांची अशी व्याकुळता पाहून महिषासुराने सेनापतीस म्हटले, 'सेनापती, हे काय आहे? माझ्यासमोर माझ्या सेनेचा संहार?' तेव्हा हत्तीच्या आकृतीचा यज्ञघ्नू विरूपाक्षाने महिषासुरास म्हटले, 'स्वामिन्, या कुमारींनीच आपल्या सैनिकांना चारही दिशांना पळवून लावलं.'

तेव्हा महिषासुर हातात गदा धारण करून देवांच्या सैन्यावर धावून गेला. तेथे देव व गंधर्व यांनी पूजित अशी वैष्णवीदेवी होती. तो दैत्य येत आहे असे पाहून वैष्णवीने आपल्या वीस भुजा सज्ज केल्या. त्या वीस हातांत क्रमशः धनुष्य, ढाल, तलवार, शक्ती, बाण, परशू, वज्र, शंख, त्रिशूल, गदा, मुसळ, चक्र, बर्ची, दंड, पाश, ध्वज, घंटा, पानपात्र, अक्षमाला व कमल, अशी आयुधे धारण केलेली होती. त्या देवीने कवचही धारण केले होते ती सिंहावर स्वार झाली होती. तिने देवाधिदेव, प्रलयंकर भगवान रुद्रांचे स्मरण केले. स्मरण करताच साक्षात रुद्र तेथे आले. त्यांना प्रणाम करून

देवीने म्हटले, ‘देवेश्वर, मी सर्व दैत्यांवर विजय प्राप्त करू इच्छिते. सनातन प्रभू, आपण केवळ इथं उपस्थित राहून ही रणक्रीडा पाहावी.’

असे म्हणून भगवती परमेश्वरीने सर्व असुरसेनेचा संहार केला व ती महिषावर धावून गेली. महीषही तिच्यावर जोराने तुटून पडला. तो दानवराज कधी लढत होता. कधी पळून जात होता. त्या दानवाचे व देवीचे युद्ध दहा हजार वर्षांपर्यंत चालले होते. तेव्हा ते सर्व दैत्य पळून ब्रह्मांडात निघून गेले. नंतर देवीने शतशृंगपर्वतावर* त्या दानवश्रेष्ठास पायांनी दाबून शूलाने मारून टाकले. तलवारीने त्याचे मस्तक कापून धडावेगळे केले. महिषासुराचा जीव शरीरातून बाहेर पडल्यावर तो देवीच्या शस्त्रनिपाताने स्वर्गात गेला. त्या अजेय असुरास पराभूत पाहून ब्रह्मदेवांसहित सर्व देव आनंदित होऊन देवीची स्तुती करू लागले,

‘महान ऐश्वर्यांनी सुसंपन्न देवी, गंभीरा, भीमदर्शना, जयस्था, स्थितिसिद्धान्ता, त्रिनेत्रा, विश्वतोमुखी, जया, जाप्या, महिषासुरमर्दिनी, सर्वगा, सर्वा, देवेशी, विश्वरूपिणी, वैष्णवी, वीतशोका, ध्रुवा, पद्मपत्रशुभेक्षणा, शुद्धसत्त्वव्रतस्था, चंडरूपा, विभावरी, ऋद्धिसिद्धिप्रदा, विद्या, अविद्या, अमृता, शिवा, शांकरी, वैष्णवी, ब्राह्मी, सर्वदेवनमस्कृता, घंटाहस्ता, त्रिशूलास्त्रा, उग्ररूपा, विरूपाक्षी, महामाया, अमृतस्रवा, अशा विशिष्ट नावांनी आम्ही तुझी उपासना करतो. तुला आमचा निरंतर नमस्कार असो.

‘तू सर्व प्राण्यांची हितचिंतिका आहेस. अखिल प्राणी तुझीच रूपं आहेत. विद्या, पुराणं, शिल्पशास्त्र यांची जननी तूच आहेस. सर्व जगत तुझ्यावरच अवलंबून आहे. अंबिके, सर्व वेदांचं रहस्यं आणि सर्व देवधारी यांना तूच केवळ शरण्य आहेस. शुभे, तुला सामान्य जनता विद्या आणि अविद्या या नावांनी ओळखते. परमेश्वरी, तू विरूपाक्षी, क्षांती, क्षोभितान्तजला, अमला या नावांनीही विख्यात आहेस. महादेवी, आम्ही तुला वारंवार नमस्कार करीत आहोत. भगवती परमेश्वरी, रणसंकटांत जो तुला शरण येतो त्या भक्ताचं काहीच अशुभ

---

* हा हिमालयाचा पुत्र मानला जातो. पांडवांचाही जन्म येथेच झाला असल्याचे सांगतात. (महाभारत १–१२२–२३) येथील वैष्णवीदेवी सिद्धी देते.

होत नाही. देवी, सिंह–व्याघ्रांचं भय, चोरभय, राजभय, अन्य घोर भयं उपस्थित झाल्यावर जो मनुष्य सावधान होऊन या स्तोत्राचा पाठ करील, तो या सर्व संकटातून मुक्त होईल. आनंदपूर्वक सुखानं जीवन व्यतीत करू लागेल. '

सर्व देवांनी अशा प्रकारची स्तुती केल्यावर, भगवती वैष्णवीने म्हटले ' देवगण, आपण एखादा उत्तम वर मागावा ' तेव्हा देव म्हणाले ' पुण्यस्वरूपिणी देवी, तुझ्या या स्तोत्राचा जो पुरुष पाठ करील, त्याच्या सर्व कामना पूर्ण करण्याची कृपा कर.' यानंतर त्या सर्व देवमयी देवीने त्या देवांना ' एवमस्तु ' म्हणून ती स्वत: तेथेच विराजमान झाली. देवीच्या या स्वरूपाचे ज्ञान जे कोणी करून घेतील ते शोकदु:खादी दोषांपासून मुक्त होऊन भगवतीच्या अनामयपदास प्राप्त करून घेतील.

## रौद्रीशक्तीचे आख्यान, रुरूदैत्याचा वध

यानंतर भगवान वराहांनी पृथ्वीस त्रिशक्ति– माहात्म्यातील रौद्री-व्रताची हकीकत सांगितली. रौद्रीशक्ती तपस्या करण्यासाठी नीलगिरी-पर्वतावर गेली होती. तिचे प्रकटीकरण रुद्रांच्या तप:शक्तीपासून झाले होते. अखिल जगताचे रक्षण करण्यासाठी ती दीर्घकाल तपस्या करू लागली. पंचाग्निसेवन करून तिने खडतर तपश्चर्या आरंभिली. तिच्या तपस्येस काही काळ झाल्यावर ' रुरू ' या नावाचा एक असुर उत्पन्न झाला. तो महान तेजस्वी होता. त्याला ब्रह्मदेवांचा वर प्राप्त झाला होता. समुद्रात वनांनी घेरलेली रत्नपुरी त्याची राजधानी होती. सर्व देवांना जिंकून तो दानवराज तेथे राज्य करीत होता.

त्याचे अनुचर कोटयवधी असुर होते. त्यांची शक्ती मोठी होती. ऐश्वर्यसंपन्न रुरू हा जणू दुसरा इंद्रच भासत होता. काही काळानंतर त्याच्या मनात अनेक लोकपालांवर विजय प्राप्त करण्याची इच्छा निर्माण झाली. देवांशी युद्ध करण्यात त्याला स्वाभाविक रुची होती. त्याने एक विशाल सेना तयार केली. असुर रुरू युद्ध करण्यासाठी समुद्रा-तून बाहेर आला. तेव्हा समुद्राचे पाणी एकदम वर उसळून आले. त्यातील नक्र, मत्स्य आदी प्राणी घाबरून गेले. सर्व देश समुद्राच्या

पाण्यानें आप्लावित झाला. समुद्राचे अगाध जल सर्वत्र फैलावले. त्यातून चित्र-विचित्र कवचे धारण करणारे असुर युद्धास तयार होऊन बाहेर पडले. उंच हत्ती, अश्व, रथ यांवर बसून असुर सैनिक युद्धासाठी सज्ज झाले. लाखो, कोटचवधी पायदळ सैनिक युद्धासाठी बाहेर पडले.

रुरूच्या सेनेचा रथ सूर्याच्या रथासारखा यंत्रयुक्त असून सुसज्ज होता. अशा असंख्य रथांवर अनेक अनुगामी दैत्य हस्तत्राणांनी सुशोभित होऊन युद्धास तत्पर झाले. त्यांनी देवांच्या सैन्याची शक्ती कुंठित केली. त्यांनी आपल्या चतुरंगिणी सेनेसह इंद्राच्या नगरीस, अमरावतीपुरीस वेढा दिला. दानवराजाने देवांच्या सह युद्ध सुरू केले. त्याने मुद्गर, मुसळे, भयंकर बाण, दंड आदी आयुधांनी प्रहार करणे सुरू केले. या युद्धात दानवांच्या प्रभावापुढे इंद्राच्या सैन्याचा टिकाव लागला नाही. ते सर्व तोंड फिरवून पळू लागले. त्यांचा सारा उत्साह संपला. ते नीलगिरीपर्वतावर जाऊन पोचले. तेथे भगवती रौद्री तपस्येत मग्न झाली होती. देवीने देवांना पाहाताच उच्च स्वराने म्हटले,

‘ भिऊ नका. देवगण, आपण असे भीतीनं व्याकुळ का बनता ? त्वरित मला सारं सांगावं. ’

‘ परमेश्वरी, हा रुरू नावाचा महान पराक्रमी दैत्य आम्हा देवांना पराभूत करीत आहे. आता आमचं रक्षण करावं. ’

हे ऐकून देवीला हसू आले. हसत असतानाच तिच्या मुखातून सर्व विश्व भरून जाईल अशा अनेक देवी प्रकट झाल्या. त्यांची रूपे विकृत होती. त्या शस्त्रे–अस्त्रे यांनी सुसज्जित होत्या. त्यांच्या हातांत पाश, अंकुश, त्रिशूल, धनुष्य, इत्यादी आयुधे शोभत होती. त्या देवींची संख्या कोटचवधी होती. भगवती तामसीस त्यांनी चारही बाजूंनी घेरले होते. त्या सर्वांनी दानवांच्या बरोबर युद्ध सुरू केले. तत्काल असुरांचे सर्व सैनिक मारले गेले. देवांना आता लढण्यास हुरूप आला होता. कालरात्रीची सेना व देवांची सेना यांच्यांत नवी शक्ती उत्पन्न होऊन त्यांनी दैत्यांच्या सैनिकांना यमलोकी पाठविले.

युद्धभूमीवर आता केवळ महादैत्य रुरूच उरला होता. तो मोठा मायावी होता. त्याने आता ‘ रौरवी ’ नावाची भयंकर मायावी रचना

केली. त्यामुळे सर्व देवांना निद्रा आली. शेवटी देवीने त्या युद्धभूमीवर त्रिशूलाने त्या दानवास मारले. देवीने त्याला मारताच त्या रुरू दैत्याचे चर्म (धड) व मुंड अलग अलग झाले. त्याचवेळी देवीने त्याला उठविले. म्हणून तिला 'चामुण्डा' असे नाव प्राप्त झाले. हीच भगवतीदेवी महा-रौद्री, परमेश्वरी, संहारिणी, कालरात्री या नावांनी प्रसिद्ध झाली. तिच्या अनुचारी देवीही संख्येने खूप होत्या. युद्धाच्या शेवटी या अनुगामिनी देवींनी त्या ऐश्वर्यशालिनी देवीस घेरून म्हटले,

'आम्ही भुकेनं व्याकुळ झालो आहोत. कल्याणस्वरूपिणी देवी, आता आमच्या भोजनाची कृपा करून व्यवस्था करावी.'

हे ऐकून देवीने देवाधिदेव पशुपती भगवान रुद्रांचे स्मरण केले. ध्यान करताच पिनाकपाणी परमात्मा रुद्र तेथे प्रकट झाले आणि म्हणाले,

'देवी, सांग. तुझं काय कार्य आहे ?'

'देवेशा, आपण या उपस्थित देवांच्यासाठी भोजनाची काही सामग्री आणावी. नाहीतर त्या बलपूर्वक मलाच खाऊन टाकतील.'

'देवेश्वरी, महाप्रभे, यांना खाण्यासारख्या वस्तू अशा आहेत– जी गर्भवती स्त्री दुसऱ्या स्त्रीनं वापरलेले कपडे वापरते, दुसऱ्या पुरुषास स्पर्श करते आणि स्वयंपाक करते, अशा स्त्रियांसाठी भोजनाची सामग्री त्यांच्यासाठी आहे. अज्ञानी व्यक्तींचा बलिभागही या देवींनी ग्रहण करावा. तो प्राप्त करून त्यांनी शंभर वर्षांसाठी तृप्त व्हावं. अन्य काही देवींनी प्रसवगृहात प्रवेश करावा. तिथं लोक त्यांची पूजा करतील. गृह, नक्षत्रं, तडाग, विहिरी, उद्यानं इत्यादी ठिकाणी जाऊन ज्या स्त्रिया निरंतर रडत बसतात, त्यांच्या शरीरांत प्रवेश करून काही देवींनी तृप्त व्हावं.'

रुरू दैत्य मरण पावलेला पाहून भगवान शंकरांनी देवीची अशी प्रार्थना केली, 'देवी, तुझा जयजयकार असो. चामुंडे, भगवती भूताप-हारिणी, सर्वंगते परमेश्वरी, तुझा जय असो. देवी तूच त्रिलोचना, भीमरूपा, वेद्या, महामाया, महोदया, मनोजवा, जया, जुम्भा, भीमाक्षी, क्षुभिताशया, महामारी, विचित्रांगा, नृत्यप्रिया, विकराला, महाकाली, कालिका, पापहारिणी, पापहस्ता, दंडहस्ता, भयानका, चामुंडा, ज्वल-

मानास्या, तीक्ष्णदंष्ट्रा, महाबला, शतयानस्थिता, प्रेतासनगता, भीषणा, सर्वभूतभयंकरी, कराला, विकराला, महाकाला, करालिनी, काली, काराली, विक्रांता, कालरात्री, या नावांनी प्रसिद्ध आहेस. तुला वारंवार नमस्कार असो.'

रुद्रांनी अशी स्तुती केली तेव्हा भगवती परम संतुष्ट झाली. ती देवांना म्हणाली, 'देवेशा, आपल्या मनात असेल तो वर मागा.' तेव्हा रुद्र म्हणाले, 'वरानने, जर तू प्रसन्न असशील तर या स्तुतीनं प्रसन्न होऊन तू वर देण्याची कृपा करावीस. या स्तुतीचं नाव 'त्रिप्रकार' असं राहील. तो भक्तीनं याचा पाठ करील, त्याला पुत्र, पौत्र, पशू आणि समृद्धी यांची प्राप्ती होईल. त्याची सर्व पापं नष्ट होतील. अशी व्यक्ती अविनाशी पदाची अधिकारी होईल.'

असे म्हणून भगवान रुद्र अंतर्धान पावले. देवही स्वर्गास निघून गेले. देवीची ही तीन प्रकारची स्तुती 'त्रिशक्तिमाहात्म्य' या नावाने प्रसिद्ध आहे. राज्यापासून भ्रष्ट झालेला जो राजा पवित्रपूर्वक इंद्रियांना वश करून, अष्टमी, नवमी आणि चतुर्दशी या दिवशी उपवास करून याचे श्रवण करील त्याला एक वर्षाच्या आत नष्ट झालेले राज्य प्राप्त होईल. यात सात्त्विक व श्वेत वर्णाच्या 'सृष्टी'चा संबंध ब्रह्मापासून आहे. वैष्णवी शक्तीचा संबंध भगवान विष्णूंचा आहे. रौद्रीदेवी कृष्ण वर्णाची असून शिवांची ती शक्ती आहे. ज्या घरी हा प्रसंग ऐकला जाईल, लिहिला जाईल, त्या घरात भयंकर अग्निभय, सर्पभय, चोरभय, राज्यभय इत्यादी त्रास राहाणार नाही. त्याच्या घरी प्रचुर रत्ने, घोडे, गायी, दास, दासी इत्यादी वस्तू अगत्याने त्याला प्राप्त होतील.

असे हे रुद्रमाहात्म्य. चामुंडेच्या एकूण शक्ती नऊ कोटी आहेत. त्या पृथक पृथक रूपात राहतात. तामसी शक्ती व वैष्णवी शक्ती यांच्या एकूण शक्ती अठरा कोटी आहेत. या सर्व शक्तींचा अध्यक्ष सर्वत्र विचरण करणारे भगवान रुद्र आहेत. जितक्या शक्ती, तितके रुद्रही आहेत. जो या शक्तींची आराधना करील त्यावर रुद्र प्रसन्न होतील. ते साधकाच्या सर्व कामना पूर्ण करतील.

## रुद्रांची माहात्म्यकथा

यानंतर भगवान वराहांनी पृथ्वीस रुद्रांच्या व्रताचा उत्पत्तिप्रसंग सांगितला. ज्या वेळी ब्रह्मदेवांनी पूर्वकाली रुद्रांना निर्माण केले, त्यावेळी त्यांना विभू, पिंगाक्ष, नीललोहित अशा संज्ञा प्राप्त झाल्या. अव्यक्तजन्मा ब्रह्मदेवांनी कुतूहलवश होऊन रुद्रांचा जन्म होताच त्यांना खांद्यावर धारण केले. त्या वेळी ब्रह्मदेवांना जन्मसिद्ध असे पांचवे शिर होते. ते आथर्वण मंत्राचा जप अशा प्रकारे करीत होते,

**कपालिन् रुद्र बभ्रोऽथ भव ! कैरात सुव्रत ।**
**पाहि विश्वं विशालाक्ष कुमार वरविक्रम ।।**

(९.७.५)

'सुव्रता कपाली, बभ्रू, भव, कैरात, विशालाक्ष, कुमार आणि वरविक्रमनामधारी रुद्र, आपण या विश्वाचं रक्षण करावं.' या मंत्रास अनुसरून रुद्रांची ही भविष्यातील कर्मसूचक नावे होती. परंतु 'कपाली' शब्द ऐकून रुद्रांना क्रोध आला. तेव्हा त्यांनी ब्रह्मदेवांचे पांचवे शिर आपल्या डाव्या हाताच्या अंगठ्याच्या नखाने कापून टाकले. पण कापलेले शिर त्यांच्या हातास चिकटले. रुद्र भगवानांना शरण जाऊन म्हणाले,

'उत्तम व्रताचं पालन करणाऱ्या भगवाना, हे कपाल माझ्या हातात कसं आलं आणि ते अलग कसं होईल हे सांगावं आणि माझी या पापापासून मुक्तता कशी होईल ?'

'रुद्रदेवा, तुम्ही नियमपूर्वक कापालिक व्रताचं अनुष्ठान करावं समय अनुकूल झाल्यावर या कपालातून मुक्त व्हाल.'

हे ऐकून महादेव रुद्र पापनाशक महेंद्रपर्वतावर गेले. तेथे जाऊन त्यांनी त्या शिरास तीन भागांत विभाजित केले. त्यांच्या केसांनाही त्याने अलगपणे हातात घेऊन यज्ञोपवीत तयार केले. या प्रकारे पृथ्वीवर भ्रमण करीत प्रतिदिन ते तीर्थात स्नान करून पुढे गेले. सर्वप्रथम त्यांनी समुद्रात स्नान केले. त्यानंतर त्यांनी गंगेत स्नान केले. सरस्वती,

गंगायमुना-संगम, शतद्रू, महानदी, देविका, वितस्ता, चंद्रभागा, गोमती, सिंधू, तुंगभद्रा, गोदावरी, उत्तरगंडकी, नैपाल, रुद्रमहालय, दारुवन, केदारवन, भद्रेश्वर इत्यादी क्षेत्रांवरून तें गयेस पोचले. तेथे फल्गूनदीत स्नान करून त्यांनी पितरांना तर्पण केले. अशा प्रकारे भगवान रुद्रांनी सान्या ब्रह्मांडाचा प्रवास केला. सहा वर्षांच्या यात्रेत त्यांची कौपीन, मेखला अलग झाली. आता रुद्र नग्न व कापालिकरूपात हातात कपाल घेऊन प्रत्येक तीर्थात भटकू लागले. पवित्र तीर्थांची यात्रात्यांनी आणखी दोन वर्षे केली. भूमंडलावरील पवित्र तीर्थे त्यांनी पाहिली. बारा वर्षां-नंतर ते हरिहरक्षेत्रात आले व त्यांनी दिव्य नदी गंगेत व देवांगदकुंडात स्नान करून भगवान सोमेश्वरांचे विधिवत पूजन केले. नंतर ते चक्र-तीर्थात गेले. तेथे स्नान करून त्यांनी 'त्रिजलेश्वर' महादेवांची आरा-धना केली. त्यानंतर अयोध्येस जाऊन ते वाराणसीस आले. तेथे त्यांनी गंगेत स्नान केले. त्याच क्षणी त्यांच्या हातातून कपाल गळून पडले. तेव्हापासून हे स्थान 'कपालमोचन' या नावाने विख्यात झाले. नंतर ते ब्रह्मदेवाजवळ येऊन म्हणाले,

'विशाल नेत्रांच्या रुद्रा, आता तू लोकमार्गात सुव्यवस्थित होशील. हातात कपाल घेऊन तू भ्रमण करीत होतास म्हणून या भूमंडलावर तुझं हे व्रत 'नग्नकापालिकव्रत' या नावानं ओळखलं जाईल. तू हिमालयावर भ्रमण करीत होतास म्हणून याचं नाव 'वाभ्रव्य' असंही होईल. आता या तीर्थात तुझी शुद्धी झाली आहे. हे व्रत शुद्धशैव होईल. यात पाप-नाशाची शक्ती राहील. या 'वाभ्रव्यव्रता'ची व 'कापालिक'व्रताची जो आराधना करील तो तुझ्या कृपेनं ब्रह्महत्यादी पापांपासून मुक्त होईल. नग्न, कपाल, वाभ्रव्य, शुद्धशैव या नावांनी या व्रताची प्रसिद्धी होईल. तू ज्या मंत्रांनी पूजा केलीस ते सर्व शास्त्र 'पाशुपतशास्त्र' या नावानं विख्यात होईल.'

रुद्रांना ब्रह्मदेव असे म्हणत असतानाच सर्व देवांनी जयजयकार केला. महाभाग रुद्र परम संतुष्ट होऊन कैलासावर गेले. ब्रह्मदेवही देवांसह स्वर्गलोकी गेले.

## सत्यतपांचा शेष वृत्तांत

एकदा पृथ्वीने वराहांना विचारले, 'भगवन्, सत्यतपा व्याध जो नंतर ब्राह्मण झाला होता, ज्यानं आपल्या शक्तीच्या साह्यानं वाघाच्या भयापासून आरुणिमुनींचं रक्षण केलं होतं, आणि जो दुर्वासांकडून वेदपुराणादी ऐकून हिमालयपर्वतावर गेला होता. आपण कृपा करून मला त्याची पुढील हकीकत सांगावी.'

भगवान वराहांनी सत्यतपांची उरलेली माहिती पृथ्वीस सांगितली. वास्तवात असे होते की, सत्यतपा भृगुवंशात उत्पन्न झालेला शुद्ध ब्राह्मणच होता. त्याचा संबंध डाकूंशी आल्यामुळे तो व्याध बनला. त्यानंतर त्याला आरुणिऋषींची संगत लाभली. त्यामुळे त्याला पुनः ब्राह्मणत्व प्राप्त झाले.

हिमालयाच्या उत्तर भागात 'पुष्पभद्रा' नावाची एक पवित्र नदी आहे. त्या दिव्य नदीच्या तीरावर 'चित्रशिला' नावाची एक विख्यात शिला होती. तेथेच एक विशाल वटवृक्ष होता. त्याचे नाव 'भद्र' होते. तेथे राहून सत्यतपाने तप केले. एके दिवशी कुऱ्हाडीने झाड कापीत असताना त्याच्या, डाव्या हाताचे बोट कापले गेले. त्याचे बोट अलग झाले. तेव्हा त्या स्थानावर भस्माचे चूर्ण विखुरले गेले. त्या अंगुलीपासून रक्त गळाले नाही, की मांस वा मज्जाही गळून गेले नाही. त्या ब्राह्मणाने आपले कापलेले बोट पुनः आपल्या हातास जोडून टाकले. आणि ते जोडलेही गेले.

याच भद्रवटाच्या वरच्या भागी एका किन्नरदंपतीचा निवास होता. तेथे उंच वृक्षावर बसून त्यांनी हा विचित्र प्रकार पाहिला. या घटनेने त्यांच्या मनास भारी आश्चर्य वाटले. प्रातःकाली तो किन्नर इंद्रलोकी पोचला. तेथे यक्ष, गंधर्व, किन्नर आणि इतर देव इंद्राबरोबर होते. तेथे इंद्राने कोणी काही अपूर्व हकीकत पाहिली असल्याचे विचारले. रुद्रसरोवरावर निवास करणाऱ्या त्या किन्नरदंपतीने सांगितले' 'पुष्पभद्रेच्या पवित्र तटावर मी एक अद्‌भुत दृश्य पाहिलं.' त्याने सत्यतपाची सर्व वार्ता तेथे सांगितली. ती एकून सर्वांनाच नवल वाटले. इंद्रादेवाने भगवान विष्णूंना म्हटले, 'प्रभो, या आपण हिमालयाच्या

त्या उत्तम दरीत जाऊ. तिथं एक आश्चर्यकारक घटना घडली असल्याचं या किन्नर दंपतीनं सांगितलं.'

असे म्हणून भगवान विष्णूंनी वराहाचे रूप धारण केले. इंद्राने एका व्याधाचे रूप धारण केले. दोघेही सत्यतपा ऋषीच्या आश्रमापाशी आले. वराहवेषधारी विष्णू त्या ऋषीच्या आश्रमाच्या भोवती भटकू लागले. ते कधी दिसत, तर कधी अदृश्य होत. एवढ्यात धनुष्यबाण हातात घेऊन व्याधवेषधारी इंद्राने ऋषीच्या समोर येऊन विचारले,

'भगवान, आपण इथंच एका विशाल सूकरास पाहिलं असेल. मी त्याचा वध करून आपल्यावर आश्रित असणाऱ्यांचं भरण-पोषण करू का ?'

हे ऐकून सत्यतपा मुनींच्या मनात विचार आला. जर या व्याधास वराहाचा पत्ता सांगावा, तर हा त्याला निश्चयाने मारणार. जर सांगू नये तर या बिचाऱ्या व्याधाचा परिवार भुकेने भारी कष्टी होणार. कारण हा आधीच भूक व कष्ट यांनी व्याकुळ झाला आहे. आता आपण काय करावे ? असा विचार करीत असताना त्यांच्या मनाचा निश्चय काही होईना. त्यांच्या मनात आणखी एक विचार आला.

'गतिशील प्राणी डोळ्यांनी पाहातात. पाहाणं हे नेत्रांचं काम आहे. भाषण करणारी जीभ काही बोलत नाही. पाहणारं इंद्रिय डोळा आहे. जीभ नाही. आणि जो जिव्हेचा विषय आहे, त्यास नेत्र काही प्रकाशित करू शकत नाही. आता या विषयात आपण निरुत्तर व्हावं आणि गप्प बसावं.'

हा सत्यतपांच्या मनातील विचार समजताच व्याधरूपी इंद्र आणि सूकररूपी विष्णु या दोघांच्याही मनात प्रसन्नता आली. ते दोघे महापुरुष त्यांच्या समोर प्रकट झाले. ते सत्यतपांना म्हणाले, 'ऋषिवर, आम्ही दोघे आपणांवर प्रसन्न आहोत. आपण एक श्रेष्ठ वर मागावा.' तेव्हा ऋषींनी म्हटले, 'देवेश्वरांनो, यावेळी आपण प्रकट होऊन इथं दर्शन दिलंत. यापेक्षा मोठा वर असा कोणता असणार ? पण जर आपण मला कृतार्थ करू पाहात असाल तर असा वर द्यावा की, या पर्वकाली जी व्यक्ती इथं ब्राह्मणांची भक्तिपूर्वक एक मासपर्यंत भक्ती करील,

त्याची सर्व पापं नष्ट होतील. त्याचं संचित पापही नष्ट होईल. मलाही मोक्षाची प्राप्ती होईल.'

विष्णू आणि इंद्र यांनी 'तथास्तु' म्हणून परत प्रयाण केले. वर प्राप्त झाल्यावर ते ऋषी सर्वत्र परमात्मा पाहू लागले. याच वेळी त्यांचे गुरू आरुणी तीर्थयात्रा करीत करीत तेथे आले. मुनिवर आरुणींची सत्यतपांनी मोठ्या भक्तीने पूजा केली. त्यांचे चरण धुतले. त्यांना गायीचे दान केले. आरुणी आसनावर बसले आणि आपला शिष्य चांगला सिद्ध झाला हे त्यांनी जाणले. तपस्येने त्याचे पाप भस्म झाले आहे. ते त्यास म्हणाले,

'उत्तम व्रताचं पालन करणाऱ्या पुत्रा, तपाच्या प्रभावानं तुझं अंतःकरण शुद्ध झालं आहे. तुला ब्रह्मभावाची स्थिती प्राप्त झाली आहे. आता माझ्याबरोबर परमपदाची यात्रा कर. आता जिथं जाशील तिथून परतीचा प्रवास नाही.' त्यानंतर मुनिवर आरुणी व सत्यतपा हे दोघे सिद्धपुरुष भगवान नारायणांचे ध्यान करून त्यांच्या स्वरूपात लीन झाले. जी व्यक्ती या विस्तृत आख्यानास श्रवण करील, त्याला अभीष्टाची प्राप्ती होईल.

यानंतर भगवान वराहांनी पृथ्वीस अनेक माहात्म्ये कथन केली. तिलधेनु-माहात्म्य, जलधेनू व सवत्सधेनूदान, गुडधेनुदान, शर्करा व मधधेनुमाहात्म्य, क्षीरधेनू व दधिधेनुदानविधी, नवनीतधेनू व लवणधेनुदान विधी, कार्पास व धान्यधेनुविधी, कपिलादानविधी व हेमकुंभदानविधी इत्यादींचे विस्ताराने वर्णन केले. त्यानंतर पृथ्वीने भगवानांच्या विभूतींचे वर्णन केले. वराहांचे भोज्यपदार्थ, मुक्तीची साधने, इत्यादी अनेक विषयांची वर्णने भगवान वराहांनी केली.

यानंतर मायापुरी म्हणजे हरिद्वार, कुब्जाम्रकतीर्थ म्हणजे हृषीकेश, वराहक्षेत्रमहिमा, आदित्यतीर्थांचे माहात्म्य, कोकामुखवदरीक्षेत्रमाहात्म्य, वदरिकाश्रममाहात्म्य, सोमेश्वरलिंग, मुक्तिक्षेत्र, त्रिवेणी इत्यादींचे माहात्म्य, शालग्रामक्षेत्राचा महिमा, कुरुक्षेत्रवर्णन, गोनिस्क्रमणतीर्थमाहात्म्य, स्तुतस्वामीमाहात्म्य, द्वारकामाहात्म्य, सानन्दूरमाहात्म्य, लोहार्गलक्षेत्रमाहात्म्य, मथुरातीर्थमाहात्म्य, यमुना आणि

अक्रूरतीर्थमाहात्म्य, मथुरामंडल व वृंदावनमाहात्म्य, चक्रतीर्थमाहात्म्य, कपिलवराहमाहात्म्य, अन्नकूट (गोवर्धन) पर्वताचे तीर्थमाहात्म्य, गोकर्णतीर्थ व सरस्वती यांचा महिमा; अशा अनेक क्षेत्रांची कथात्मक माहिती भगवान वराहांनी पृथ्वीस दिली. काही पूजाविधीही समजावून दिले.

## ब्राह्मण कुमारीची मुक्ती

भगवान वराहांनी पृथ्वीस गंगेसंबंधी एक कथा निवेदन केली. एकदा श्रीकृष्णद्वैपायन मुनींनी मथुरेत एक दिव्य आश्रम बनवून तेथे बारा वर्षांपर्यंत यमुनेच्या धारेत नियमपूर्वक स्नान केले. चातुर्मास्यात तेथे मोठेमोठे मुनी येऊ लागले. पुराणासंबंधी अनेक शंका उपस्थित झाल्या. त्यांचे निरसन झाले. तेथेच 'कालञ्जर' नावाचे एक तीर्थ असून तेथील प्रधान देव शिव आहेत. त्यांचे दर्शन घेण्याने 'कृष्णगंगे' त स्नान करण्याचे पुण्य लागते.

याच सुमारास ध्यानयोगात रमणारे व्यास एकदा हिमालयपर्वतावर गेले. त्यांचा मुक्काम काही दिवस बदरिकाश्रमात होता. त्या त्रिकालदर्शी मुनींनी आपल्या ज्ञाननेत्रांनी कृष्णगंगेचा एक तट पाहिला. त्यावर त्यांना एक आश्चर्यजनक दिव्य दृश्य दिसले. नदीच्या पलीकडच्या काठावर पांचालकुलाचा वसू नावाचा एक ब्राह्मण राहात होता. दारिद्र्याने पीडून तो आपल्या पत्नीसह दक्षिणापथास गेला आणि शिवानदीच्या दक्षिणतटावर एका नगरीत ब्राह्मणी वृत्तीने राहू लागला. तेथे त्याला पांच पुत्र व एक कन्या यांची प्राप्ती झाली. कन्येचा विवाह त्याने एका ब्राह्मणाशी केला. त्यानंतर तो ब्राह्मण दिवंगत झाला. त्याच सुमारास ती 'तिलोत्तमा' नावाची कन्या मात्यापित्यांची हाडे घेऊन तीर्थयात्रा करीत मथुरेस आली. कारण की, तिने पुराणांत ऐकले होते की, ज्यांची हाडे मथुरेच्या 'अर्घ्यचंद्र' तीर्थात पडतात, ते सदा स्वर्गात निवास करतात. ही पुत्री ब्राह्मणाचे शेवटचे संतान होते. विवाहानंतर ती लौकरच विधवा झाली होती.

त्या वसू नावाच्या ब्राह्मणाच्या कनिष्ठ पुत्राचे नाव पांचाल होते. तो मोठा रूपवान होता. तो काही व्यापारी लोकांबरोबर

अनेक देश, राज्ये, पर्वत, नद्या ओलांडून मथुरेस आला व तेथेच राहू लागला. एकदा तो काही पुरुषांच्या बरोबर स्नान करण्यासाठी उत्तम अशा 'कालञ्जर' तीर्थावर गेला. स्नान करून, नवे वस्त्र परिधान करून तो धनाच्या गर्वातच एका यानात बसून देवदर्शनाच्या निमित्ताने 'त्रिगर्तेश्वर' महादेवाजवळ आला. तेथे त्याची दृष्टी तिलोत्तमेवर गेली. तिला पाहून तो मुग्ध झाला. त्याने त्या कन्येस उत्तम वस्त्रे, आभूषणे, रत्नांचे हार यांच्या भेटी दिल्या. आसक्तीने तो तिच्याच घरी राहू लागला. तो रोज 'कृष्णगंगा' तीर्थावर स्नान करू लागला. अशा प्रकारे सहा महिने गेले. एकदा तो सुमंतमुनींच्या आश्रमापाशी स्नान करीत असताना मुनींची दृष्टी त्याच्यावर पडली. त्याच्या शरीरात किडे पडले होते आणि ते रोमकूपांतून जलात पडत होते. परंतु स्नान केल्यानंतर मात्र तो निरोगी झाला. मुनींनी हे सारे पाहिले आणि त्याला विचारले,

'सौम्य, तू कोण आहेस ? तुझा पिता कोण ? तू कुठला राहणारा ? तुझी जात कोणती ? दिनरात तू काय काम करतोस ?'

'मी एक ब्राह्मणबालक आहे. माझं नाव पांचाल असून मी व्यापार करीत दक्षिण भारतातून इथं आलो आहे. प्रातःकाली इथं स्नान करून 'त्रिगर्तेश्वर' महादेवाचं मी दर्शन घेतो. त्यानंतर कालञ्जरक्षेत्रात आपल्या चरणांचं दर्शन घेऊन मी परत जातो.'

'ब्राह्मण, तुझ्या शरीरात मी प्रतिदिन एक आश्चर्यकारक दृश्य पाहातो. स्नान करण्यापूर्वी तुझं शरीर कृमिपूर्ण असतं आणि स्नानानंतर ते स्वच्छ व प्रकाशमान बनतं. तू कुठल्यातरी पापात सापडला आहेस. ते पाप या तीर्थातील स्नानानं नाहीसं होतं. आता तू नीट विचार करून मला खरं काय ते सांग.'

पांचालाने त्या कन्येच्या घरी जाऊन तिला एकांतात विचारले, 'सुभगे, तू कुणाची पुत्री आहेस ? तुझा देश कोणता ? तू इथं कशी आलीस ?' तरी या प्रश्नांची उत्तरे त्या कन्येने दिली नाहीत. तेव्हा पांचाल म्हणाला, 'पाहा, तू जर खरं सांगितलं नाहीस तर मी आपल्या प्राणांचा त्याग करीन.' हे ऐकून त्या कन्येने आपल्या मातापित्यांची

नावे, देश, जात, कुळ, असा सर्व परिचय देऊन म्हटले, 'माझ्या पित्यांना पांच पुत्र आणि मी सहावी कन्या. मी सर्वांत लहान संतान. विवाहानंतर माझ्या पतिदेवाचं निधन झालं. पांच भावांतील सर्वांत लहान बंधू व्यापाऱ्यांबरोबर विदेशात गेला. त्यानंतर माझे मातापिता मरण पावले. काहींची मदत घेऊन मी अस्थिविसर्जनासाठी इथं आले. इथं काही वेश्यांच्या कुचक्रात सापडून माझी अशी दशा झाली. मी कुलटेचा धर्म आचरून माझ्या कुळास कलंक लाविला.'

हे सर्व ऐकून पांचालास तर मूर्च्छा आली. तो भूमीवर पडला. तेथील स्त्रियांनी त्या ब्राह्मण कुमारीस समजावून सांगितले. अनेक उपाय करून त्यांनी त्याला सावध केले. त्या ब्राह्मण कुमारानेही आपला सर्व वृत्तांत सांगितला. या पापाच्या चिंतेने त्याच्या मनात घोर निराशा झाली. तो प्रायश्चित्ताचा विचार करू लागला. तो म्हणाला, 'मुनींनी विचार करून असा आदेश दिला आहे की, ब्राह्मणाची हत्त्या अथवा मदिरापान यांच्यासाठी शरीराचा त्याग हेच प्रायश्चित्त आहे. माता, गुरूची पत्नी, बहीण, पुत्री, पुत्रवधू यांच्याशी संबंध ठेवणाऱ्यानं अग्नीत प्रवेश केला पाहिजे. याशिवाय त्याच्या शुद्धीचा उपाय नाही.'

पांचालीने मोठ्या बंधूच्या मुखातून हे सर्व ऐकले. मुनिकथित प्रायश्चित्तही तिने समजावून घेतले. तिने आपली सौभाग्यपूर्ण आभूषणे, रत्ने, वस्त्रे, धनधान्य इत्यादी सर्व वस्तू ब्राह्मणांना वाटून टाकल्या. आणि त्याला म्हटले, 'या द्रव्यानं कालञ्जरास श्रृंगार करावा आणि इथं एक उद्यान निर्माण करावं.' तिने आपल्या मनाशी निश्चय केला की, आपल्या आत्मशुद्धीसाठी कृष्णगंगोद्भवतीर्थात जाऊन विधिपूर्वक चितेवर आरोहण करावे.

इकडे पांचालही सुमंतुमुनींच्या जवळ जाऊन, त्यांना प्रणाम करून आपल्या मृत्यूचे कार्य साधण्यास सिद्ध झाला. त्याने मथुरानिवासी ब्राह्मणांना बोलावून त्यांना नाना प्रकारची दाने दिली. आपले उरलेले धन अन्नछत्र सुरू करण्यासाठी देऊन टाकले. आणि विधीनुसार आपल्या और्ध्वदैहिक संस्काराची व्यवस्था केली. कृष्णगंगेत स्नान करून त्याने इष्टदेवाचे दर्शन घेतले. सुमंतुमुनींच्या चरणांवर पडून

त्याने प्रार्थना केली, 'भगवन्, मी महान पापाच्या दोषानं ग्रस्त झालो आहे. मी स्वतःच्या भगिनीबरोबर अवैध संबंध ठेवला, म्हणून मी आपल्या शरीराचा त्याग करू इच्छितो. आपण आज्ञा द्यावी.'

हा प्रकार सुमंतुमुनींना सांगून तो भडकणाऱ्या चितेत प्रवेश करू लागला. तेव्हा आकाशवाणी झाली, 'असं दुःसाहस करू नकोस. कारण तुम्हां दोघांचं सर्व पाप धुतलं गेलं आहे. जिथं भगवान श्रीकृष्णांनी सुखपूर्वक लीला केली आणि जे स्थान त्यांच्या चरणांच्या चिन्हांनी अंकित झाले आहे ते स्थान ब्रह्मलोकापेक्षाही श्रेष्ठ आहे. इतर ठिकाणी केलेली पापं या तीर्थात आल्यानंतर नष्ट होतात. मनुष्यानं गंगासागरात एकदा स्नान केलं की, तो ब्रह्महत्त्येच्या पातकापासून मुक्त होतो. पृथ्वीवर जितकी तीर्थं आहेत त्यांत स्नान केल्यानं जे पुण्य मिळतं तेच या पंचतीर्थ स्नान केल्यानं मिळतं. यात संशय नाही. शुक्ल व कृष्ण पक्षांतील एकादशींना विश्रांतितीर्थात, द्वादशीस सौकरवतीर्थात, त्रयोदशीस नैमिष्यारण्यात, चतुर्दशीस प्रयागात आणि कार्तिकी एकादशीस पुष्करात स्नान करावे. यामुळे सर्व पापं नष्ट होतात.'

अशा प्रकारची आकाशवाणी ऐकून पांचालाने सुमंतूंना विचारले, 'मुने, आपण मला सांगावं की मी अग्नीत प्रवेश करू की "त्रिरात्र", आणि "कृच्छ्र", अथवा, "चांद्रायण" अशी व्रतं करू?' मुनींनी आकाशवाणीस अनुसरून त्याला शुद्ध धर्माचरणाचा उपदेश केला. जो मनुष्य श्रद्धा ठेवून ही कथा ऐकील, वाचील त्याला कोणतेही पाप लागणार नाही. इतकेच नव्हे तर सात जन्मांची त्याची पापे दूर होतील. जरा-मरणापासून तो मुक्त होऊन स्वर्गलोकास जाईल.

## सांबास शाप, त्याची सूर्याराधना

एकदा भगवान श्रीकृष्ण द्वारकेत आनंदाने राहात होते. तेव्हा तेथे नारद मुनी आले. भगवानांनी त्यांना आसन अर्घ्य, पादय, मधुपर्क, गायी, इत्यादी समर्पण केले. त्यानंतर मुनींनी भगवानांना, विचारले, 'मी आपणांपाशी एकांतात काही बोलू इच्छितो' नारदांनी

श्रीकृष्णांना एकांतात सांगितले की, ' प्रभो, आपला नवयुवक पुत्र सांब मोठा चतुर, रुपवान, आणि परमसुंदर आहे. देवेश्वरा, आपल्या देवतुल्य हजारो स्त्रियाही त्याला पाहून क्षुब्ध होतात. आपण सांबाला आणि त्या स्त्रियांना बोलावून परीक्षा करावी '

यानंतर सर्व स्त्रिया आणि सांब श्रीकृष्णांच्या पुढे येऊन हात जोडून उभे राहिले. सांबाने विचारले, ' प्रभो, आपली काय आज्ञा आहे ? ' परत याच वेळी सांबाचे सौंदर्य पाहून श्रीकृष्णासमोरच स्त्रियांच्या मनात क्षोभ उत्पन्न झाला. तो पाहून श्रीकृष्ण त्यांना म्हणाले, ' देवींनो, आता तुम्ही आपापल्या स्थानास निघून जावं. ' श्रीकृष्णांची आज्ञा मान्य करून सर्व स्त्रिया आपापल्या स्थानास निघून गेल्या. परंतु सांब तेथेच बसून राहिला. त्याचे शरीर कापत होते. श्रीकृष्णांनी म्हटले, ' नारदा, स्त्रियांचा स्वभाव मोठा विलक्षण असतो.' यावर नारद म्हणाले, ' प्रभो, त्यांच्या या प्रवृत्तीमुळंच सत्यलोकात आपली निंदा होत आहे. आपण आता सांबाचा त्याग करावा हे उचित. भगवन्, या जगतात आपल्याशी तुलना होईल असा दुसरा कोण पुरुष आहे ? केवळ आपणच हे काम कराल. '

नारदांच्या या सांगण्यानंतर भगवान श्रीकृष्णांनी सांबाला रूप-हीन होण्याचा शाप दिला. त्यामुळे सांबाचे शरीर कुष्ठरोगाने ग्रस्त झाले. त्याच्या शरीरातून दुर्गंधयुक्त रक्त गळू लागले. त्याचे शरीर एखाद्या छिन्नभिन्न अंगाच्या पशूसारखे झाले. नंतर नारदांनीच सांबाला शापातून मुक्तता होण्यासाठी सूर्याची आराधना करण्याचा उपदेश केला. ते म्हणाले, ' जांबवतीनंदन, तू वेद आणि उपनिषदं यांतील मंत्रांचा उच्चार करून विधीनुसार सूर्यास नमस्कार करावा. त्याची आराधना करावी. त्यामुळे तो संतुष्ट होईल. त्यानंतर तुझा व सूर्याचा संवाद होईल. हा संवाद भविष्यपुराणात आढळेल. तो मी ब्रह्मलोकात जाऊन ब्रह्मदेवांना ऐकवीन. त्यांच्यापासून ऐकून मर्त्य लोकात सुमंतु-मुनी मनूच्या समोर तो कथन करतील. आणि या प्रकारे त्याचा सर्वत्र प्रसार होईल.

सांबाने म्हटले, ' प्रभो, माझी तर स्थिती अशी आहे. मी तर

केवळ एक मांसाचा पिंड बनलो आहे, मी उदयाचलावर जाऊ शकणार नाही. आपल्याच कृपेनं मला हे दुःख भोगावं लागत आहे. नाही तर तत्त्वतः मी अगदी दोषरहित आहे.' त्यावर नारद म्हणाले, 'सांबा, उदयाचलावर जाऊन सूर्याची आराधना केल्यानं जे फल प्राप्त होतं तेच मथुरा येथील षट्सूर्यावर सुलभ होतं. इथंच भगवान सूर्याच्या प्रातः, मध्यान्ह आणि सायं या तीनही काळी पूजा केल्यास साम्राज्यप्राप्तीचं फल मिळतं. या तीन पवित्र समयांस सूर्यमंत्राचा जप आणि उच्चस्वरात स्तोत्र पाठ केल्यास सर्व पाप नष्ट होतं आणि कुष्ठादी रोगांपासून मुक्ती प्राप्त होते.'

नारदमुनींनी असे म्हटल्यावर महाबाहू सांबाने श्रीकृष्णांची आज्ञा प्राप्त करून, मथुरेत जाऊन, नारदांनी सांगितलेल्या विधीस अनुसरून षट्सूर्यांची पूजा केली. दिव्य स्तोत्राने उपासना केली. तेव्हा भगवान सूर्य योगबळाच्या साहाय्याने सुंदर रूप धारण करून त्याच्या समोर प्रगट झाले. आणि त्याला म्हणाले, 'सांबा, तुझं कल्याण असो. तू एखादा मला वर माग. तू माझं कल्याणकारी व्रत केलं आहेस. मुनिवर नारदांनी जे स्तोत्र तुला सांगितलं आणि ज्यानं तू माझी उपासना केलीस ते स्तोत्र अथवा ती स्तुती 'सांबपंचाशिका' नावाच्या स्तुतिरूपानं वेदात पन्नास श्लोकांनी बद्ध झाली आहे. वीरा, नारदांच्या या श्लोकांद्वारे जो कुणी माझी स्तुती करील. त्यावर मी संतुष्ट होईन. मी तुझ्यावर संतुष्ट झालो आहे.'

इतके म्हणून भगवान सूर्याने सांबाच्या संपूर्ण शरीरास स्पर्श केला. त्याबरोबर सांबाचे सर्व शरीर रोगमुक्त होऊन चमकदार झाले. जणू तो दुसरा सूर्य वाटू लागला. त्या वेळी याज्ञवल्क्यमुनी माध्यंदिन यज्ञ करू पाहात होते. भगवान सूर्य सांबास घेऊन त्या यज्ञात उपस्थित झाला. तेथे सांबाने 'माध्यंदिनसंहिता' या ग्रंथाचे अध्ययन केले. तेव्हापासून सांबाचे नावही 'माध्यंदिन' झाले. वैकुंठ-क्षेत्राच्या पश्चिमभागात हा यज्ञ झाला म्हणून या स्थानास माध्यंदिनतीर्थ म्हणतात. येथे स्नान व दर्शन केल्याने मानव सर्व पापांपासून मुक्त होतो. सांब व सूर्य यांच्या संवादाने निर्माण झालेला हा प्रसंग 'भविष्यपुराण' या

नावाने प्रख्यात होईल. येथेच सांबाने कृष्णगंगेच्या दक्षिणतटावर मध्यान्हीच्या सूर्याची मूर्ती स्थापन केली. जो मनुष्य सकाळी, दुपारी आणि संध्याकाळी येथे सूर्याचे दर्शन घेतो तो पवित्र होऊन ब्रह्मलोकात जातो.

याखेरीज सूर्याची दुसरी एक प्रात:कालीन प्रतिमा भगवान 'कालप्रिय' या नावाने प्रतिष्ठित झाली. यानंतर पश्चिम भागात 'मूलस्थानावर' मूलस्थान नावाची एक प्रतिमा प्रतिष्ठित झाली. अशा प्रकारे सांबाने सूर्याच्या तीन प्रतिमा स्थापन करून प्रात:, मध्यान्ह व संध्या अशा तीन कालांच्या उपासना साध्य केल्या. सांबाने भविष्यपुराणात सांगितल्याप्रमाणे या तीन मूर्तींची स्थापना केली. मथुरेतील हे श्रेष्ठ स्थान सांबपूर ह्या नावाने प्रसिद्ध झाले. सूर्याच्या आज्ञेने येथे माघमासातील सप्तमीस रथ यात्रेचा विधी सुरू झाला. या यात्रेची व्यवस्था करणारा सूर्यमंडलास भेटून परमपदास जातो.

## शत्रुघ्नाचे आख्यान

भगवान वराहांनी शत्रुघ्नाचेही आख्यान पृथ्वीस सांगितले. प्राचीन काळातील हकीकत आहे. मथुरेत लवण नावाचा एक राक्षस राहात होता. ब्राह्मणांच्या रक्षणासाठी शत्रुघ्नाने त्या दानवाचा वध केला. मार्गशीर्षाच्या द्वादशीस संयमपूर्वक राहून स्नान करून शत्रुघ्नाचे वर्णन करावे. लवणासुराचा वध केल्यावर शत्रुघ्नास आपल्या शरीरात पाप शिरले असल्याची शंका आली, ती दूर करण्यासाठी त्याने गोड अन्नांनी ब्राह्मणांना संतुष्ट केले. हे ऐकून भगवान रामचंद्रांना अत्यंत आनंद झाला. आपल्या सेनेसह येऊन रामचंद्रांनी मोठा उत्सव केला. माघाच्या शुक्लपक्षाच्या दशमीस भगवान श्रीराम मथुरेस आले व त्यांनी एकादशीच्या पुण्यमासाच्या शुक्ल तिथीस उपवास करून 'विश्रांतितीर्था'वर सपरिवार स्नान केले. ब्राह्मणांना तृप्त करून त्यांनी स्वत: भोजन केले.

* 'वराहपुराणा'तील हे सांबोपाख्यान अथवा 'सूर्योपासनाध्याय' फार महत्त्वपूर्ण आहे. यात सूर्याची 'साम्बपञ्चाशिका' स्तुती आणि कोणार्क, उज्जयिनी आदीमधील प्राचीन सूर्यमंदिरांचा निर्देश आहे. सविस्तर सांबकथानक व सूर्यमाहात्म्य 'भविष्यपुराणात' आली आहेत.

त्या दिवशी उत्सव करून जे उत्सव करतात ते सर्व पापांतून मुक्त होऊन पितरासह दीर्घकालापर्यंत स्वर्गलोकात निवास करातात.

## श्राद्धाने अगस्तीचा उद्धार

मथुरापुरीस पूर्वी एक धार्मिक व शूर राजा होऊन गेला. त्याचे नाव चंद्रसेन होते. त्याला दोनशे राण्या होत्या. त्यांतील चंद्रप्रभा सर्वांत गुणवती होती. तिच्या शंभर दासी होत्या. त्यांतील एकीचे नाव प्रभावती होते. त्या दासीच्या परिवारातील पुरुष सदाचारविहीन होते, सर्व मरण पावल्यावर नरकात गेले. कारण त्या कुलात वर्णसंकर उत्पन्न झाला होता. एकदा ते पितर 'ध्रुवतीर्थात' आले. त्यांच्यावर एका त्रिकालदर्शी ऋषींची दृष्टी पडली. त्यातील काही दिव्यरूपाचे पितर आकाशगमनाच्या शक्तीने युक्त असून श्रेष्ठ वाहनावर बसून आले. व आपल्या वंशजांना आशीर्वाद देऊन निघून गेले.

काही पितृगण ध्रुवतीर्थावरून आले होते. श्राद्ध न झाल्याने त्यांना भूक लागली होती. तेव्हा पुत्रांना शाप देऊन ते निघून गेले. त्रिकालज्ञ मुनी हे सर्व दृश्य पाहात होते. पितृगण निघून गेल्यावर मुनी एकटेच आश्रमात राहिले. त्यांना एका सूक्ष्मधारी पितराने म्हटले, ' मुने, वर्णसंकराच्या दोषामुळं मला नरकात स्थान मिळालं आहे. मी शंभर वर्षं आशा धरून आहे. पण आता निराश होऊन मी आपणांकडं आलो आहे. तीन तापांनी अत्यंत विवश होऊन मी आपणाकडं आलो आहे. ज्यांच्या पुत्रांना पिंडदान केलं, समर्पण केलं, ते हृष्टपुष्ट होऊन आकाशमार्गानं स्वर्गात गेले. पण मी बलहीन व्यक्ती कुठंच जाऊ शकत नाही. त्रिकालज्ञ मुनिवर, आपली दिव्य दृष्टी सुलभ आहे तिच्या प्रभावानं आपण पितरांना स्वर्गात जाताना पाहिलं आहे, ते सर्व राजा चंद्रसेनाद्वारे सत्कृत झाले आहेत.

पितराने आणखी म्हटले, 'जो पितरांसाठी श्राद्ध करतो, त्याचं उत्तम फल निश्चित आहे. परंतु न करण्यानं मात्र विपरीत फल प्राप्त होतं. पितर नरकात जातात. त्याचं कारण आता मी समजलो. श्राद्धा-संबंधी जो उचित देश, काल व पात्र यांचा विचार करीत नाही,

विधीचं रक्षण होत नाही, दक्षिणा दिली जात नाही, तो तर प्रत्यवायास कारण होतो. जे श्राद्ध श्रद्धेशिवाय संपन्न होत नाही, ज्यावर दुष्ट प्राण्याची दृष्टी पडते, ज्यात तिल व कुश यांचा अभाव असतो, मंत्रही ज्यात नसतात, त्या श्राद्धास असुर ग्रहण करतात. प्राचीन काळापासून अशा श्राद्धाचा अधिकारी वामनांनी बळी सांगितला आहे. असंच जेव्हा दशरथनंदन भगवान रामांकडून आपल्या गणांसह क्रूर रावण दिवंगत झाला, तेव्हा त्रिभुवनभर्त्या श्रीरामांनी अशा श्राद्धांचं फल त्रिजटेसही दिलं होतं. भगवान राम जेव्हा सीतेबरोबर बसले होते तेव्हा सीतेनं त्यांना म्हटले, 'त्रिजटा आपणांत भक्ती राखून होती' सीतेचं ऐकून श्रीरामचंद्र प्रसन्न झाले. त्या प्रभूंनी त्या राक्षसीला वर दिला, 'त्रिजटे, श्राद्ध करणाऱ्या ज्या व्यक्तीच्या घरी उत्तम हविष् पदार्थ आदी सामग्री नसेल, विधी व पात्र उचित असूनही श्राद्ध करतेवेळी क्रोध आला अथवा पाक्षिक व मासिक श्राद्ध उचित समयास संपन्न झालं नाही, दक्षिणाही दिली गेली नाही तर त्याचं फल मी तुला देईन.'

अशाच प्रकारे एकदा भगवान शंकरांनी नागराज वासुकीची भक्ती पाहून, प्रसन्न होऊन वर देताना म्हटले, 'नागराज, ज्या मनुष्यानं वार्षिक श्राद्ध करण्याआधी भगवान श्रीहरींची आज्ञा प्राप्त केली नाही, आणि श्राद्धक्रिया केली, यज्ञाच्या वेळी उचित दक्षिणा दिली नाही, देव व ब्राह्मण याच्या समोर केलेली प्रतिज्ञा पूर्ण केली नाही, श्राद्धात मंत्र न म्हणताच क्रिया पूर्ण केली; अशा यज्ञांचं वा श्राद्धांचं संपूर्ण फल मी तुला अर्पण करतो.' मुने, असा हा पुराणांतील इतिहास मी सांगितला.

'मुने, ज्यांनी आपल्या दयनीय दशेत पाहिलं की त्यांचं श्राद्ध अवैध रूपातच झालं. म्हणून त्याचं उत्तम फल पितरांना प्राप्त होऊ शकलं नाही. म्हणून ते आता नागडे-उघडे राहून कालक्षेप करीत आहेत. त्यांच्या पुत्रांनी जी श्राद्धक्रिया केली होती, तीत त्रुटी राहिली होती. म्हणूनच पितरगण म्हणतात,– 'काय आमच्या कुलात कुणी अशी व्यक्ती जन्म घेईल, जी नदीच्या जलात '**तृप्यध्वं., उदीरतां.. आयन्तु**' इत्यादी मंत्रांनी आमचं तर्पण करतील ?'

हे सर्व ऐकून ते ऋषी राजा चंद्रसेनापाशी गेले. त्या ऋषींना

पाहून राजा सिंहासनावरून उठला आणि त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवून म्हणाला, ' मुनिवर, अपण माझ्या घरी आलात. मी धन्य व कृतार्थ झालो आहे. आपण इथं आल्यानं माझा जन्म सफल झाला. मुने, अर्घ्य, पाद्य, मुधुपर्क, गायी; या सर्व वस्तू मी आपल्या सेवेसाठी अर्पण केल्या आहेत. आपण यांचा स्वीकार करावा. यामुळं मला परम संतोष होईल.'

राजाने दिलेल्या अर्घ्यादिकांचा स्वीकार करून त्रिकालज्ञ मुनींनी त्याला म्हटले, ' राजन्, मी इथं आलो, याचं एक कारण आहे. आपण ऐकावं.' तेव्हा राजा म्हणाला, ' तपोघन, ते कोणतं कारण? आपण कृपा करून सांगावं. मी ते करून आपला मनोरथ सिद्ध करीन.' तेव्हा मुनी म्हणाले, ' राजन्, तू तुझ्या पट्टराणीस आणि तिच्या प्रभावती दासीस इथं बोलावून घे.' हे ऐकून राजाने राणीस व दासीस बोलावून घेतले. राणी परम साध्वी होती. ती येऊन जमिनीवर बसली. पण त्यावेळी तिचे शरीर भय व आशंका यांनी कापत होते. तिने अत्यंत नम्र होऊन ऋषींना प्रमाण केला. ती बसल्यावर मुनींनी म्हटले,

' मी ध्रुवतीर्थावर एक आश्चर्यकारक गोष्ट पाहिली. ती आपणां सर्वांपुढं प्रकट करतो. आज प्राण्यांचे पितृगण ध्रुवतीर्थावर आले होते. श्राद्ध करण्यात कुशल अशा पुत्रांनी ज्यांचं विधिवत श्राद्ध केलं होतं, ते तृप्त होऊन स्वर्गास गेले. पण तिथं मला एक अत्यंत दुःखी पितर भेटले. त्यांचं शरीर तहान व भूक यांनी सुकून गेलं होतं, त्यांचं मुख शुष्क झालं होतं. त्यांचे डोळे खोल गेले होते. स्वर्गात जाण्याची आशा तर दूरच होती, पण ते अपवित्र नरकात निघाले होते. त्यांना पाहून मला फार दया आली. मी त्यांना विचारलं,— ' बंधो, तू कोण आहेस? तुझी काय इच्छा आहे? मला सांगण्याची कृपा कर.'—तेव्हा त्यांनी स्वतःची परिस्थिती सर्व सांगितली. त्याचं बोलणं ऐकून मी करुणेनं विवश झालो. महाराणी, आपली ही एक दासी आहे. तिला एक पुत्री आहे. तिचं नाव ' विरूपकनिधी ' असं आहे. आपण तिला बोलविण्याची कृपा करावी.'

त्रिकालज्ञनींचे हे बोलणे ऐकून महाराज चंद्रसेनराणीने त्याच क्षणी

त्या दासीपुत्रीस बोलाविण्याची आज्ञा दिली. त्यावेळी ती मद्यपान करून उन्मत्त झाली होती. राजसेवकांनी कसे तरी सांभाळून तिला हातांनी पकडून त्या मुनींच्या पाशी आणले. मुनी धर्माचे पूर्ण झाले होते. मदाच्या प्रभावाने उन्मत्त दिसणाऱ्या त्या दासीस त्यांनी विचारिले, 'अग, तू पितरांना पिंडदान केलंस का ? जलानं 'स्वधा' म्हणून तर्पण केलंस ? असं समजलं की, तू पितरांना मुक्त करण्यसाठी पिंडदान वा तर्पण केलं नाहीस.' तेव्हा ती दासी मुनींना म्हणाली, 'मी असा कोणताच विधी केलेला नाही. माझे पितर कोण आहेत ? त्यांच्यासाठी काय काय करायला हवंय, हेही मला माहीत नाही.' तेव्हा त्रिकालज्ञ मुनी तिला म्हणाले, 'आज या नगराचे महाराज, महाराणी, इथले निवासी, सर्व सज्जन ध्रुवतीर्थावर येतील. तिथं पितरांसाठी पुत्रांनी करावयाच्या श्राद्धाचा महिमा सुस्पष्ट होईल.'

हे ऐकून सर्व नगरवासी, श्राद्धाविषयी कौतुक नसलेले ही सर्व ध्रुवतीर्थावर जमा झाले. तेथे पोचल्यावर त्यांची दृष्टी संतानांकडून अवहेलना झालेल्या अस्ताव्यस्त प्राण्यांवर पडली. ते भुकेने अत्यंत व्यथित झाले होते. तेव्हा त्रिकालज्ञमुनी म्हणाले, 'पाहा, या स्त्रिया तुमच्या संतानांच्या आहेत. तुम्ही परिपुष्ट व्हावं. म्हणून तर राजाच्या कृपेनं यांचं आगमन झालं आहे' त्यावर तो पितर म्हणाला,

'त्या दासीनं या ध्रुवतीर्थात जाऊन स्नान करावं. वेदात सांगितल्याप्रमाणं तर्पण करावं. त्यानंतर प्राचीन ऋषींनी सांगितल्याप्रमाणं विधी करून पिंडदानादी श्राद्धकर्म करावं. सर्व कर्मपात्रं चांदीची असावीत. वस्त्र व चंदन यांची आवश्यकता आहे. भक्तिपूर्वक पितरांची पूजा करावी. आपण सर्वांनी आता इथंच थांबून चमत्कार पाहावा. मी परम सुखानं संपन्न होऊन जाईन. अशा विधीनं माझं श्राद्ध होईल.'

त्या चंद्रप्रभाराणीने अगस्तीची वाणी ऐकली. दासीकडून त्या प्राण्याचे श्राद्ध करण्याची तयारी तिने केली. त्या श्राद्धकर्मात खूपशी दक्षिणा दिली गेली. रेशमी वस्त्र, धूप, कर्पूर, अगरू, चंदन, तिल आदी वस्तूंचे दान पिंडदानाच्या वेळी केले. फलस्वरूप श्राद्धविधीनंतर तो विकृत आकाराचा अगस्ती जणू देवरूपाचा बनला. त्याचे शरीर परम

तेजोमय वनले. अगस्ती आदींनी म्हटले

‘महानुभावांनो, आम्ही आता नीट तृप्त झालो आहोत. आता आम्ही परमधामास जातो. ध्रुवतीर्थाचा हा महिमा आपल्यासमोरच प्रकट झाला आहे. आपण सर्वांनी तो पाहिला आहे. आमचा उद्धार असंभव होता. पण आपल्या कृपेनं या दुस्तर पापपंकातून मी मुक्त झालो.’

आता तो अगस्ती नावाच्या प्राण्याने, मुनिवर त्रिकालज्ञ, राजा चंद्रसेन, राणी चंद्रप्रभा, उपस्थित जनता, दासी प्रभावती व पुत्री यांना उत्तम आशीर्वाद देऊन विमानात वसून स्वर्गाकडे प्रयाण केले. यानंतर महाराज चंद्रसेन त्या तीर्थाचा महिमा पाहून, महर्षी त्रिकालज्ञांना प्रणाम करून आपल्या लोकांसह नगरास परतला. अशा या शक्तिसंपन्न तीर्थाचा महिमा जो गातो, ऐकतो, त्याचे पाप नष्ट होते. गयाक्षेत्रात पितरांना तृप्त करण्याचे श्रेय त्याला प्राप्त होते. ज्याला व्रतात आस्था नाही, जो ही कथा ऐकण्यात उदासीन आहे, जो भगवान श्रीहरींच्या अर्चनेविषयी उदासीन आहे, त्याच्यासाठी या व्रतकथेचे वर्णन करू नये. हा कथाप्रसंग म्हणजे तीर्थांत परमतीर्थ, धर्मांत श्रेष्ठ धर्म, ज्ञानांत सर्वश्रेष्ठ ज्ञान, व लाभांत उत्तम लाभ आहे. ज्याची भगवान श्रीहरींवर भक्ती आहे, जो पुण्यात्मा आहे त्यासच हे व्रत सांगावे. भगवान वराहांकडून ही व्रतकथा ऐकून पृथ्वी संतुष्ट झाली.

त्यानंतर भगवान वराहांनी पृथ्वीस काष्ठपाषाणाच्या प्रतिमेचा निर्माणविधी व तिचा पूजाविधी समजावून दिला. मृण्मयी व ताम्रप्रतिमा, कांस्यप्रतिमा, रजत–सुवर्णप्रतिमा, शालग्राम इत्यादींची निर्मिती, स्थापना, प्राणप्रतिष्ठा, असे विषय त्यांनी तिला समजावून दिले. सृष्टी व श्राद्ध यांची उत्पत्ती, पितृयज्ञाचे कार्य, अशौच, पिंडकल्प, श्राद्धाचे दोष, दानप्रकरण, मधुपर्कविधी, शांतिपाठ, यमपुरीचे वर्णन, यमयातना, कर्मविपाकनिरूपण, दानधर्माचे महत्त्व, पतिव्रतामाहात्म्य, पापनाशाचा उपाय, गोकर्णेश्वराचे माहात्म्य, नंदिकेश्वरास वरप्रदान, जलेश्वराचे माहात्म्य, शृंगेश्वरमाहात्म्य; इत्यादी आचारविषयक व तत्त्वसंबंधी

विषय समजावून देऊन पुराण संपविले आहे. मध्ये दोन तीन उद्‌बोधक कथा आल्या आहेत. त्यांतीलच एक नचिकेताचे आख्यान.

## नचिकेताची यमपुरीची यात्रा

एकदा व्यासांचे वेदवेदांचे पारंगत शिष्य वैशंपायन राजा जनमेजयाच्या दरबारात गेले. परंतु त्यावेळी राजाचा अश्वमेधयज्ञ सुरू असल्याने त्यांना फाटकापाशीच उभे राहावे लागले. यज्ञ समाप्त होऊन राजा जेव्हा हस्तिनापुरास परत गेला, तेव्हा त्याला समजले की, परम ज्ञानी वैशंपायनऋषी तेथे आले होते. त्यांनी गंगेच्या तटावर आपले स्थान बनविले आहे. ‘ ऋषी आपणांस भेटण्यासाठी आले होते. पण त्यांची भेट झाली नाही. हा त्यांचा एक प्रकारचा अपमान होय. ’ या चिंतेने जनमेजय व्याकुळ झाला. त्याचे डोळे अस्वस्थ बनले. राजा जनमेजयाचा जन्म कुरुवंशाच्या शेवटच्या पिढीत झाला होता. तो त्वरित वैशंपायनऋषींकडे गेला. त्यांचे स्वागत करून तो म्हणाला,

‘ भगवन्, माझं चित्त चिंतेनं व्याकुळ बनलं आहे. यमराजपुरी किती दूर आहे, कशी आहे, हे मी जाणू इच्छितो. मी असं समजतो की, यमराज हा प्रेतपुरीचा अध्यक्ष आहे. सर्व जगतावर त्यांचं स्वामित्व आहे. प्रभो, काय कर्मं केल्यानं तिथं जावं लागत नाही ? ’

‘ राजन्, याबद्दलचा एक पुरानकालीन इतिहास आहे. ’ असे म्हणून वैशंपायनांनी तो इतिहास त्याला सांगितला. प्राचीन काळी उद्दालक नावाचे एक वैदिक ऋषी होते. त्यांचा नचिकेत नावाचा एक तेजस्वी योगाभ्यासी पुत्र होता. संयोगवश होऊन त्याच्या पित्याने, उद्दालकमुनींनी रागात येऊन आपल्या परम धार्मिक पुत्रास शाप दिला. ते म्हणाले, ‘ दुर्मते, तू यमपुरीस निघून जा.’ यावर नचिकेताने क्षणभर विचार केला. तो नम्रतेने उद्दालकांना म्हणाला, ‘ पिताजी, आपण धार्मिक पुरुष आहात. आपलं बोलणं कधी मिथ्या होत नाही. मी आपल्या आज्ञेनं बुद्धिमान धर्मराजाच्या सुरम्य नगरीस जातो. ’

‘ तू तर माझा एकमेव पुत्र आहेस. ’ पश्चात्ताप झालेले उद्दालक म्हणत होते, ‘ तुला दुसरा भाऊही नाही. मी क्रोधात होतो. त्यामुळं

अधर्म, निंदा, मिथ्यावादी इत्यादी दोष मला लागोत, परंतु वत्सा, आता माझा उद्धार होईल, असा व्यवहार तू कर. तुझ्यासारख्या धर्मतत्पर पुत्रास मी शाप दिला हे ठीक नाही केलं. तू यमपुरीस जाणं उचित नाही. त्या पुरीचा राजा वैवास्वतदेव आहे. तू जर तिथं गेलास तर तो यशस्वी राजा रोषामुळं तुला कधीच परत येऊ देणार नाही. पुत्रा, तू पाहावंस. आपल्या कुलाच्या भविष्याचा संहार करणारा मी प्राय: नष्ट होत आहे. नरकाचं एक नाव 'पुत्' असं आहे. त्यापासून रक्षण करणारा 'पुत्र' असतो. म्हणून या लोकी व परलोकी लोक पुत्राची इच्छा करितात. संतानहीन व्यक्तीनं केलेलं हवन, दिलेलं दान, केलेलं तप, पितरांचं तर्पण, सर्व काही नष्ट होतं.

'पुत्रा, मी असं ऐकलं आहे की, सेवापरायण शूद्र, शेतीवर जीवन चालविणारा वैश्य, धनाचं रक्षण करणारा राजसमूह, उपासनाकर्मात निरत ब्राह्मण, महान तप करणारा तपस्वी अथवा उत्तम दान करणारी व्यक्ती यांनाही संतान नसेल तर त्यांना स्वर्गाची प्राप्ती होत नाही. पुत्रापासून पित्यास, पौत्रापासून पितामहास, प्रप्रौत्रापासून प्रपितामहास परम आनंद प्राप्त होतो. म्हणून मी माझ्या वंशाची वृद्धी करणाऱ्या तुझ्यासारख्या पुत्राचा त्याग करणार नाही. मी याचना करतो की, तू यमपुरीस जाऊ नकोस.'

'पिताजी, आपण विषाद करू नये. मी पुन्हा परत येईन. आपण निश्चितपणानं मला पुन्हा पाहू शकाल. सर्व जगत ज्यास नमस्कार करतं, त्या दिव्य पुरुषाचं, धर्मराजाचं दर्शन घेऊन मी निश्चयानं परत येईन. मला मृत्यूचं भय बिलकुल नाही. पिताजी, सत्यात एक मोठी शक्ती असते. हे सत्यच स्वर्गाची शिडी आहे. सूर्यही सत्याच्या बलावर तापतो. अग्नीतही दाहकता सत्याच्या बलावर असते. सत्यावरच ही पृथ्वी टिकून आहे. सत्याचं पालन करण्यासाठीच समुद्र आपली मर्यादा सोडीत नाही. जगाचं हित करण्यासाठी सामवेद सत्यमंत्राचं गान करतो. सत्यावरच सर्वांची प्रतिष्ठा असते. स्वर्ग व धर्म; ही सत्याचीच रूपं आहेत. सत्याशिवाय दुसरं काहीही नाही. पिताजी, मी तर असं ऐकलं आहे की, सत्यानं सर्व काही मिळतं. जर त्याचा त्याग केला तर

कोणतीही उत्तम वस्तू हाती येत नाही.

'ब्रह्मदेवांनीही सृष्टीच्या आरंभी यत्नपूर्वक सत्याची दीक्षा घेतली होती. सत्याचा आश्रय घेऊनच और्वमुनींनी अग्नीस वडवामुखात फेकून दिलं होतं. पिताजी, प्राचीनकाळी सर्वशक्तिमान अशा संवर्तानं देवांवर कृपा करण्यासाठी सर्व लोकांना आश्रय दिला होता. पाताळात निवास करणाऱ्या बळीनंही सत्याच्या रक्षणासाठी बंधन स्वीकारलं होतं. शेकडो शिखरांनी शोभणारा विंध्यपर्वत वाढतच होता. पण सत्याचं पालन करण्यासाठीच तो वाढण्याचा थांबला. संपूर्ण चर व अचर असं हे जग सत्यानंच शोभा पावतं. गृहस्थ, वानप्रस्थ आणि योगी यांचा धर्म, हजार अश्वमेध-यज्ञांचा धर्म, यांची सत्याशी तुलना केली तर सत्याचं पारडं सदा जड राहील. सत्यापासून धर्माचं रक्षण होतं. रक्षित धर्म प्राण्यांचं रक्षण करतो. म्हणून आता या वेळी सत्याचंच रक्षण केलं पाहिजे.'

इतके बोलून नचिकेत यमराजाच्या पुरीच्या यात्रेस निघाला. तप व योग यांच्या प्रभावाने तो त्वरित यमपुरीस पोचला. यमराजाने त्याचे यथोचित स्वागत केले, काही दिवसांनंतर तो यमराजाची अनुज्ञा घेऊन घरी परत आला. परत आलेल्या आपल्या पुत्रास उद्दालकमुनींनी दोनही बाहूंनी हृदयाशी धरले. त्याचे मस्तक हुंगले. त्या वेळी त्यांना अपार हर्ष झाल्याने पृथ्वी व आकाश हर्षध्वनीने भरून गेले. उद्दालकांनी पुत्रास विचारले,

'वत्सा, यमपुरीत तुला यातना तर झाल्या नाहीत ?' यमपुरीतून परत आलेल्या नचिकेतास पाहाण्यासाठी तेथे अनेक ऋषी, मुनी, देव आले होते. त्यांत बहुतेक नग्न होते. काहींनी मौनव्रत धारण केले होते. काही वायू भक्षण करून राहात होते. अनेकांनी अग्निसेवन केले होते. समस्त ऋषी त्या कुमाराच्या भोवती उभे राहिले. काही बसले होते. ते सर्व शांत, शिष्ट, अनुशासित व शालीन होते. त्या सर्वांनी वेदान्ताचे चांगले अध्ययन केले होते. प्रथमच काहींची दृष्टी नचिकेतावर पडली तेव्हा ते थोडे घाबरले होते. काहींना मोठेच कुतूहल वाटत होते. काहींच्या मनात हर्ष दाटून आला होता. काहींचे मन बेचैन झाले होते.

त्या ऋषींनी नचिकेतास विचारले,

‘ वत्सा, तू मोठा विद्वान व गुरूंचा सेवक आहेस. धर्मावर तुझी निष्ठा आहे. नचिकेता, खरं सांग. यमपुरीत तुला कोणती विशेषता जाणवली ? त्या पुरीची तर सर्वांना भीती वाटते. यमपुरीत चित्रगुप्ताचं कार्य कशा प्रकारचं आहे ? धर्मराज व काल यांचं रूप कसं आहे ? तिथल्या व्याधी कोणत्या प्रकारच्या आहेत ? कर्म विपाकापासून सुटका कशी होऊ शकते ?’

## नचिकेताकडून यमपुरीचे वर्णन

या प्रश्नांची उत्तरे देताना नचिकेताने यमपुरीचे वर्णन केले. तेथील यातनाही सांगितल्या. तो म्हणाला, ‘ द्विजवरा, मी यमपुरीची माहिती सांगतो. जे असत्य बोलतात, स्त्री, बालक इत्यादींचा वध जे करतात, जे ब्राह्मणांची हत्या करतात, जे विश्वासघातकी आहेत, शठता, कृतघ्नता लोलुपता यांनी जे भरले आहेत, दुसऱ्यांच्या स्त्रीचं जे अपहरण करतात, ते सदा पापात रत होतात, तेच यमपुरीस जातात. जे वेदांची निंदा करतात, वैदिकमार्गावर आघात करतात, ते मदिरा पितात, जे कपट करतात, जे पतिव्रता स्त्रीचा त्याग करतात, ते नरकात जातात. गुरूचा द्वेष जे करतात, वाईट आचरण जे करतात, कपटी भाषण जे करतात, दूताचं काम जे करतात, गृह–ग्रामाची सीमा जे नष्ट करतात, विनाकारण जे फल व फूल तोडतात, जे पतिव्रतेवर दया करीत नाहीत. जे पापी आहेत, हिंसक आहेत, सोमविक्री करणारे आहेत, स्त्रीच्या अधीन होणारे आहेत, खोटं बोलण्याची ज्यांना सवय आहे, द्विज असूनही जे वेदांची विक्री करतात, ते सर्व नरकात जातात.’

हे ऐकून ऋषिमुनींना फार आश्चर्य वाटले. त्यांनी पुनः त्याला विचारले, ‘ मुने, तू मोठा ज्ञानी पुरुष आहेस. तू यमपुरीत जे काही पाहिलंस ते सर्व आम्हांस सांग. विद्वान लोक म्हणतात की, सूक्ष्म शरीर यमयातनांनीही नष्ट होत नाही, अग्नीनं जळत नाही. अस्त्रांनी कापलं जात नाही. विप्रा, वैतरणीनदीचं स्वरूप कसं आहे ? तीत कोणतं जल वाहतं ? रौरवनरकाची स्थिती कशी आहे ? कूट शाल्मलीचं रूप कसं

आहे ? यमराजाचे दूत कसे आहेत ? त्यांचं कार्य काय असतं ? त्यांचा पराक्रम कोणता ? तिथले दूत कोणतं कार्य करतात ? त्यांचा आचार कसा आहे ?'

या सर्व प्रश्नांना अनुलक्षून नचिकेत ऋषींना म्हणाला, 'द्विजवर, धर्मराजाची ही पुरी परिसांनी वेढलेली व सोन्याची बनलेली असून एक हजार योजनं पसरलेली आहे. तिथं दिव्य भवनं आणि गच्च्यांची मंदिरं यांनी शोभा आली आहे. काही ठिकाणी भीषण युद्ध व संघर्ष चालतो. काही प्राणी विवश होऊन बद्ध झाले आहेत. तिथं पुष्पोदका नावाची नदी आहे. तिच्या तटावर अनेक प्रकारचे वृक्ष आहेत. त्या नदीच्या पायऱ्या सुवर्णाच्या आहेत. वाळू सुवर्णाच्या रंगाची आहे.

'तिथं वैवस्वती नावाची एक अतिशय प्रसिद्ध व मोठी नदी आहे. ही अति पवित्र व श्रेष्ठ मानली जाते. तिचं जल सर्वांना सुखदायी असतं. या नदीत सदा दिव्य जल वाहात असतं. कुंद वा चंद्रासमान शुभ्र रंगाचे हंस आनंदाच्या भरात तिच्या तटांवर निरंतर भ्रमण करतात. त्यांचा आकार व रंग मोठा आकर्षक असतो. त्यांच्या कर्णिका सुवर्णासारख्या असतात. ही नदी रमणीय कमलांनी मोठी मनोहर दिसते. तिचं जल निर्मल, स्वादिष्ट, सुगंधपूर्ण आणि अमृतासारखं असतं. तिच्या तटांवरील वृक्षांवर फुलांचा व फळांचा अभाव कधीच असत नाही. भूलोकावर पितरांसाठी जे जल दिलं जातं, त्यानंच या नदीस सुंदर रूप प्राप्त झालं आहे. त्या नदीच्या तीरावर अनेक उंच इमारती आहेत.

'या पुरीत अनेक प्रकारची यंत्रं, प्रकाशाची साधनं, अन्य आवश्यक उपकरणं असतात. देव, ऋषी, धर्मज्ञ यांच्यासाठी इथं वेगवेगळी निवासस्थानं असतात. शरदऋतूतील मेघांप्रमाणं इथली गोपुरं प्रकाशमान असतात. पुण्यात्मा पुरुषाचा प्रवेश इथून होतो. या पुरीचं दक्षिणद्वार अत्यंत भयानक आणि लोहमय आहे. ते आतपादीनं सदा संतप्त असतं. जो पापात रमतो, दुसऱ्यांशी शत्रुत्व करतो, मांस खातो, दूषित स्वभावाचा असतो, त्याच्यासाठी 'औदुंबर', 'अवीचिमान्' आणि 'उच्चावच' नावांचे खंदक बनविले आहेत. यमपुरीच्या पश्चिमभागी अग्नीच्या मोठ्या लाटा उसळत असतात. पापी जीवांचा

प्रवेश या मार्गानं होतो.

'या परम रमणीय पुरीत एकीकडं सर्वोत्कृष्ट सभाभवन निर्माण झालं आहे. त्यात सर्व प्रकारची रत्नं आहेत. धार्मिक आणि सत्यवादी व्यक्तींचं स्थान यात असतं. ज्यांनी क्रोध व लोभ यांवर विजय मिळविला आहे, जे वीतरागी व तपस्वी आहेत, असे धर्मात्मे, महात्मे यांनी ही पुरी समृद्ध आहे. या सभेत प्रजापती मनू, मुनिवर व्यास, अत्री, औद्दालकी, पराक्रमी महर्षी आपस्तंब, बृहस्पती, शुक्राचार्य, गौतम, महातपा शंख, लिखित, अंगिरामुनी, भृगू, पुलस्त्य व पुलह यांच्यासारखे ऋषिमुनी निवास करतात.

'द्विजवर, यमराजाच्या पार्श्वभूमीस छंद:शास्त्र, शिक्षा, व्याकरण, सामवेद, धातुवाद, वेदवाद, निरुक्तवाद यांना जाणणारे असतात. धर्मराजाच्या भवनात उत्तम प्रवचनं करणारे ऋषी आणि पितरही मी पाहिले. ऋषींनो, तिथं मला एका कल्याणमयी देवीचं दर्शन झालं. ती सर्व तेजांची रासच होती. स्वत: यमराज दिव्य गंध आणि अनुलेपन यांनी तिची पूजा करतो. सर्व जगताचं लालन व पालन तिच्याच हातात आहे. विश्वाच्या गतींमधील ती सर्वोत्तम गती आहे. ज्यामुळं सर्व प्राणी त्रस्त होतात, तो कालही तिथं मूर्तिमान होतो. हा काल प्रकृतीशीं सहयोग साधून अत्यंत भयंकर, क्रोधी व दुर्विनीत बनतो. त्याच्यात मोठं बल व तेज आहे. तो कधी वृद्ध होतच नाही. त्याची सत्ता कधीच समाप्त होत नाही. त्याचा तिरस्कार कुणी करीत नाही. दिव्य चंदन व अनुलेपन त्याची शोभा वाढवितात. त्याच्या सहवासात काही व्यक्ती गीतं गातात, काही हसतात, काही सर्वांना उत्साहित करतात.

'धर्मराजाच्या पुरीत कूष्मांड, यातुधान आणि मांसभक्षी राक्षस यांचेही समूह अनेक आहेत. कुणाला एकच पाय, कुणाला दोन, कुणाला तीन, तर कुणाला अनेक पाय असतात. कुणाला एक हात, कुणाला दोन हात, कुणाला तीन हात, लहानमोठे कान असतात. हत्ती, घोडे, बैल, शरभ, हंस, मोर, सारस, चक्रवाक अशा अनेक पशुपक्ष्यांनी यमपुरीची शोभा वाढलेली आहे.'

## नचिकेतद्वारे यमयातनांचे स्वरूप

ऋषींना नचिकेताने सांगितले, ‘ द्विजांनो, मी जेव्हा यमपुरीस पोचलो तेव्हा त्या प्रेतपुरीच्या अध्यक्षानं, यमराजानं मला एक मुनी समजून आसन, पाद्य, अर्घ्य इत्यादी अर्पण करून माझा सन्मान केला. आणि म्हटलं ‘ मुने, हे इथं सुवर्णमय आसन आहे. आपण यावर विराजमान व्हावं.’ मग मी त्यास म्हटलं, ‘ महाभाग, आपण श्राद्धात धाता व विधाता यांच्या रूपात असता. पितृसमूहात आपण प्रधान देव असता. वृषभरूप असल्यानं आपणास चतुष्पाद म्हणतात. आपण कालज्ञ, कृतज्ञ, सत्यवादी व दृढव्रत आहात. प्रेतांवर शासन करणाऱ्या धर्मराजा, आपणांस निरंतर नमस्कार असो. प्रभो, आपण कर्मांचे प्रेरक, भूत-भविष्य-वर्तमानात विराजमान असता. श्रीमान, एखाद्या सूर्यासारखा आपला प्रकाश फैलावत आहे. आपणांस नमस्कार असो. प्रभविष्णो, हव्य व कव्य यांना प्राप्त करण्याचा अधिकार आपणांस आहे. आपल्या आज्ञेनंच व्यक्ती कठोर तपस्या, सिद्धी व व्रत यांत तत्पर राहून पापातून मुक्त होते. आपण धर्मात्म्यांत श्रेष्ठ, कृतज्ञ, सत्यवादी व सर्व प्राण्यांचे हितैषी आहात.’

ऋषिपुत्र नचिकेतानें अशी स्तुती केल्यावर धर्मराज अत्यंत संतुष्ट झाला. त्याने ऋषिकुमारास विचारले, ‘ अनघा, तुझी वाणी यथार्थ व परम मधुर आहे. तीमुळं मी अतिशय संतुष्ट झालो आहे. दीर्घायुष्य, निरोगी अवस्था, अथवा जे काय हवंय ते तू माझ्याकडून मागून घे.’ यावर ऋषिकुमार नचिकेत म्हणाला, ‘ प्रभो, आपण इथले अधिष्ठित आहात. महाभाग, मी जगणं—मरणं काहीच इच्छीत नाही. आपण सदा प्राण्यांच्या हितात तत्पर असतात. भगवन्, जर आपण मला वर देऊ शकत असाल तर त्यायोगे मी आपल्या या देशास नीट पाहीन. पापात्मा व पुण्यात्मा यांची गती मी पाहीन.’

असे ऐकताच तेजस्वी यमराजाने द्वारपालास आज्ञा दिली की, ‘ तू या ब्राह्मणास चित्रगुप्तापाशी घेऊन जा. त्याला त्याच्याशी मृदुतेचा व्यवहार करण्यास सांग. सर्व लोक याला दाखवावा.’ दूताबरोबर नचि-

केत चित्रगुप्तापाशी गेला. त्याला पाहताच चित्रगुप्त आसनावरून उठला. वस्तुस्थिती जाणून तो म्हणाला, 'मुनिवर, आपलं स्वागत असो.' नंतर चित्रगुप्त दूतांना म्हणाला, ' दूतांनो, तुम्ही नेहमीच माझ्या मनासारखे वागता. तुम्ही यास यमपुरी सर्व दाखवावी. यास सर्दी, गर्मी, भूक, तहान यांचे क्लेश होऊ नयेत.'

चित्रगुप्ताच्या आज्ञेनुसार दूतांसह नचिकेत यमपुरी पाहाण्यासाठी निघाला. तेथे आणखी दूत इकडेतिकडे धावत होते. ते कोणाला तरी पकडत होते, कोणावर तरी प्रहार करीत होते. पाप्यांना बांधत होते. आगीत जाळीत होते. दंड्यांनी वारंवार मारीत होते. काहींची शिरे फुटली होती. काही भयंकर चीत्कार करीत होते. तेथे त्यांना कोणीच रक्षक नव्हता. असे अनेक प्राणी अंधकारपूर्ण अगाध नरकात खितपत पडले होते. काही प्राणी नरकात शिजले जात होते. अधिक पापकर्मे जीव उकळत्या तुपात, तेलात, क्षारयुक्त नरकात पडले होते. त्यात त्यांचे देह जळत होते. आपल्या कर्मांनुसार ते विवश होऊन त्रास भोगीत होते. काही प्राणी तिळांप्रमाणे घाण्यात सापडून पिळले जात होते. त्या पापात्म्या प्राण्यांच्या रुधिराने, मेदाने एक दुस्तर अशी वैतरणीनदी प्रकट झाली होती. त्या भयंकर नदीत फेनमिश्रित रुधिराचे भवरे उमटत होते. हजारो दूत पाप्यांना सुळांवर चढवीत होते. वृक्षावर चढून त्या जीवांना अत्यंत भयंकर वैतरणीनदीत फेकीत होते. ती नदी उष्ण रुधिराने भरलेली होती. तीत अनेक सर्प होते. ते त्या जीवांना डसत होते. त्या नदीच्या बाहेर येणे कोणासच शक्य नव्हते. त्यांना वारंवार ओकारी होत होती.

तेथे असेही काही प्राणी होते की, ज्यांना कूटशाल्मलिवृक्षावर लटकाविले होते. त्या वृक्षास लोखंडाचे असंख्य काटे होते. दूत तलवार व शक्ती यांनी जीवांना मारीत होते. त्या वृक्षाच्या शाखा रोमांचकारी होत्या. त्यांवर हजारो जीव लोंबकळत होते. कूष्मांड व यातुधान हे यमराजाचे अनुचर आहेत. त्यांची आकृती मोठी लांब असल्याने त्यांना पाहाताच प्राण्यांना भीती वाटते. तीक्ष्ण काट्यांनी भरलेल्या शाल्मलिवृक्षावर ते शीघ्रतेने चढतात व निःशंक बनून प्राण्यांच्या अंगांवर प्रहार

करतात. त्यांचे मांस खाण्यात हे कूष्मांड तत्पर असतात. त्यांची जातच भयंकर राक्षसाची आहे. एखाद्या मनुष्याने आम्रफल खावे त्याप्रमाणे कूष्मांड प्राण्यांना आपल्या उदरात सहजपणे ढकलतात. त्या प्राण्यांची केवळ हाडे उरली की, ते त्यांना जमिनीवर फेकतात. वनवासी जनावरे मग त्यांचे उरलेले मांसही कुरतडून खातात.

तेथे कधी कधी फत्तर व धूळ यांचा वर्षाव होतो. त्यास घाबरून कित्येक प्राणी वृक्षाच्या खाली जमतात. पण तेथेही त्यांच्या शरीरांना आग लागते. काही जीव जोराने पळून जाण्याचा प्रयत्न करतात. पण दूत त्यांना सावधान राहून पकडतात. भयंकर स्थानात ते अग्नीत त्यांना शिजवितात. ते दुःखी प्राण्यांना म्हणतात, 'तुम्ही सर्व कृतघ्न आहात. लोभी आहात. परक्यांच्या स्त्रियांवर प्रेम करता. तुमच्या मनात सदा पाप असतं. तुम्ही पुण्य कोणतंच केलं नाही. सदा तुम्ही दुसऱ्यांची निंदा केली.'

अशा अनेक प्रकारच्या हकिगती नचिकेताने ऋषिमुनींना सांगितल्या. यमपुरीत असे एक स्थान आहे की, जेथे लोखंडाचे काटे पसरलेले आहेत. सर्वत्र अंधकार आहे. तेथे काही पापाचारी प्राणी पडलेले आहेत. काहींचे पाय कापले आहेत. कोणास हात नाहीत. कोणास शिरे नाहीत. त्या यमपुरीत लोखंडाची बनलेली एक स्त्री असून तिचे शरीर अग्नीप्रमाणे जळत असते. तिची आकृती अत्यंत भयानक असते. ती जेव्हा पापी पुरुषास आलिंगन देते तेव्हा त्याचे अंग भाजून निघते. तेव्हा तो पळून जाताना ती त्याला म्हणते, 'मी तुझी वहीण होते. तुझी पुत्रवधू होते. मूर्खा, तुझी मावशी, मामी होते. आत्या होते. गुरुपत्नी होते. मित्राची भार्या होते. बंधूची, राजाची स्त्री होते. श्रोत्रिय ब्राह्मणाची पत्नी होण्याचं सौभाग्य मला मिळालं होतं. त्या वेळी तूच आमच्यावर बलात्कार केलास. आता तू क्लेशापासून वाचणार नाहीस. अरे निर्लज्जा, आता विपत्तींना घाबरून पळतोस का ? दुष्टा, मी आता तुला अवश्य मारून टाकीन.'

याशिवाय तेथे वाघ, सिंह, कोल्हे, गाढवे, राक्षस, हिंसक जंतू, कुत्री, कावळे अशा पापी जनांना आपला ग्रास बनवितात. यमदूत त्यांना

'असिपत्रवन' व 'तालवन' नावांच्या नरकात फेकतात. धूर व ज्वाला यांनी परिपूर्ण असा दावानलाप्रमाणे अग्नी धडधडत असतो. अग्नीच्या ज्वालांनी जेव्हा प्राणी त्रस्त होतात तेव्हा ते वृक्षांच्या खाली विश्रामासाठी जातात. तेथे तलवारीसारख्या पानांनी त्यांचे शरीर कापले जाते. पीडेने त्रस्त बनून ते ओरडत असतात. असिपत्र व तालवन या नरकांच्या फाटकांवर महारथी वीर पहारा करतात. त्यांच्या रूपाची भयंकरता अवर्णनीय आहे.

यमपुरीतील अनेक पक्षी अग्नीचया ज्वालेप्रमाणे जाळण्याची शक्ती असणारे आहेत. त्यांचे शब्द अत्यंत तीक्ष्ण व कर्कश असतात. त्यांचा स्पर्श होताच प्राणी जळू लागतात. त्यांच्या चोची जणू लोखंडाच्या बनलेल्या असतात. काही ठिकाणी वाघांच्या झुंडी असतात. काही ठिकाणी मांसभक्षी क्रूर कुत्र्यांच्या टोळचा असतात. अनेक हिंसक जनावरे क्रोधात येऊन प्राण्यांना खातात. एके ठिकाणी 'असितालवन' अस्वले आणि हत्ती यांनी खचाखच भरलेले असते. यमपुरीत मेघ हाडे, पाषाण, रुधिर, अश्मखंड यांचाही वर्षाव करतात. त्यांच्याकडून अनेक प्राणी मरतात. त्यांच्या करुण क्रंदनाने सर्व दिशा व्यापून जातात. कोठे कोणी रडत असतो, कोठे कोणी मोठचा फत्तराखाली दबलेला असतो. सर्वत्र हाहाकारपूर्ण अत्यंत करुण पुकार ऐकू येत असतो.

ऋषिकुमार नचिकेताने यमपुरीचे आणखी वर्णन केले. तप्त, महातप्त, रौरव, महारौरव, सप्तताल, कालसूत्र, अंधकार, करीषगर्त, कुंभीपाक आणि अंधकाररव; असे दहा प्रसिद्ध नरक आहेत. हे उत्तरोत्तर दुप्पट, तिप्पट, दसपट क्लेशकारक असतात, येथे प्रेते दिनरात्र मार्गावर चालून यमपुरीस येतात. दुःखी माणसाचे दुःख क्रमशः वाढते. मार्गात केवळ दुःखच असते. सुखाचा उपायच नसतो. परिवाराशी संबंध सुटतो. पांचही भूते अलग होतात. दुःखाच्या अंतिम सीमेवर पोचल्यावर व्यक्तीच्या शरीरास मानसिक क्लेश फार होतात. कधी लोखंडाच्या तीक्ष्ण काटचांवर तर कधी तापलेल्या वाळूवर त्याला पाय ठेवावे लागतात.

धगधगत्या आगीप्रमाणे जीभ असलेले अनेक पक्षी येथे आकाशात असतात. येथे पाणी मिळते, ते अत्यंत गरम असते. कधी थंड पाणी

मिळाले तर ते फारच शीतल असते. कधी पापात्मा प्राणी पाणी पिण्याची इच्छा करतो, तर त्यास राक्षसतलावावर नेण्यात येते. हंस व सारस पक्ष्यांनी भरलेला तलाव कमल व कुमुद यांनी शोभा पावत असतो. प्राण्यास जल पिण्याची इच्छा झालेली असते. तो पाण्याकडे धावून जातो, पण पाणी अत्यंत संतप्त झालेले असते. त्यात जाताच त्याचे मांस शिजू लागते. राक्षसांच्या उदरपूर्तीचे तो साधन बनतो. कधी पापी व्यक्ती क्षारजलात बुडून जातो. त्यात राहाणाऱ्या मगरी, मासे त्याला खाऊ लागतात.

असाच एक 'शृंगाटकवन' नावाच्या नरकात ज्वलंत वाळूने भरलेली भूमी असते. पापकर्मी लोक या नरकात जळतात, कापले जातात, मरतात, पडतात. सर्प व विंचू यांच्याप्रमाणे दुःखदायी कुत्री त्यांना चावतात. त्या कुत्र्यांचा रंग काळा असतो. ते सदा क्रोधात राहातात. येथेच 'कूटशाल्मली' नावाचा आणखी एक दुसरा नरक आहे. तो काट्यांनी परिपूर्ण असतो. यमराजाचे दूत प्राण्यांना येथे टाकतात, तेव्हा त्यांची केवळ हाडेच शिल्लक राहतात. येथेच एक करंभवालुका नावाची एक नदी आहे. हीत त्वचा, मांस, हाडे यांना छिन्नभिन्न करणारे हिंसक खेकडे निवास करतात. त्यांचे दात वज्राप्रमाणे कठोर असतात. तेथे धनुष्याच्या आकाराची घुबडे असतात. त्यांच्या वज्राकार जिव्हा हाडांचे तुकडे-तुकडे करतात. ती मोठी विषारी, महान क्रोधी, अत्यंत भयंकर व सर्वांना असह्य असतात.

मोठ्या कष्टाने ही नदी पार केली की, चिखलाचा मार्ग लागतो. वैतरणीच्या दक्षिणेस तीन योजने उंच एक वडाचा वृक्ष आहे. त्यापासून संध्याकाळच्या ढगांसारखा प्रकाश पसरत असतो. त्याच्या पुढे यमचुल्ली नावाची नदी आहे. तिच्याही पुढे 'शूलग्रह' नावाचा नरक आहे. त्याचा आकार पर्वतासारखा आहे. तेथे सर्वत्र फत्तर फत्तरच आहेत. येथेच शृंगाटकवनात निरनिराळे गवत आहे. निळ्या रंगाच्या माशा त्या विशाल वनात सतत भटकत असतात. त्या वेळी पापी प्राण्याचा आकार किड्यांसारखा होतो. हिंसक माशा त्यांवर आक्रमण करून त्याला त्रस्त करतात. यमराजाचे दूत लाठ्या मुद्गर, दंड, बुक्क्या, सर्पाकार चाबूक

इत्यादींनी प्राण्यांना मारतात. यामुळे प्राणी मूर्च्छित होतात.

## राक्षस-यमदूत-संघर्ष

यानंतर ऋषिपुत्र नचिकेताने राक्षस व यमदूत यांच्या संघर्षाची हकीगत सांगून नरकाचे क्लेशही वर्णन केले. एकदा सर्व दूत थकून कामास कंटाळले होते. त्यांनी हात जोडून चित्रगुप्तास म्हटले, 'आमची सारी शक्ती समाप्त झाली आहे. आपण अन्य दूतांची निवड करावी.' हे ऐकून चित्रगुप्तास राग आला. त्याने 'मन्देह' नावाच्या राक्षसांची निर्मिती केली. त्या सर्व राक्षसांनी अनेक प्रकारची रूपे धारण केली. ते राक्षस चित्रगुप्तास म्हणाले.

'प्रभो, आम्हांस त्वरित आज्ञा करावी.'

'तुम्ही या प्रतिकूल दूतांना पकडावं आणि त्वरित बंधनात टाकावं.'

'जे थकले आहेत, ज्यांना भूक लागली आहे, दुःखी व तपस्वी आहेत, अशा व्यक्तींना सेवक वा आत्मीयजन समजून त्यांच्यावर दया करायला हवी. आपण महात्मा पुरुष आहात, आपण अशी आज्ञा देऊ नये.'

परंतु चित्रगुप्ताने हे म्हणणे मानले नाही. शेवटी दूत व राक्षस यांच्यांत भयंकर संग्राम सुरू झाला. दूत पराक्रमी वीर होते. राक्षसांची सेना इकडे-तिकडे विखुरली गेली. सर्वच एकत्र गोंधळ माजला. 'मला जीवनदान द्या. प्राणदान द्या' असे एकीकडे व दुसरीकडे 'थांबा, पकडा, कापून टाका' असे शब्द उमटत होते. ज्यांची अंगे छिन्नभिन्न झाली होती ती पिशाचे युद्धभूमीवरून विमुख बनून पळू लागली. अशा वेळी दूत डोळे लाल करून त्यांना उंच स्वरांनी म्हणू लागले, 'थांबा, कुठं पळून जाता? धैर्य राखा. आता आम्ही तुमच्यावर आक्रमण करणार नाही.'

एवढ्यात एकदम धर्मराज तेथे आले आणि त्यांच्या आज्ञेने युद्ध समाप्त झाले. त्यांनी दूत व चित्रगुप्त यांच्यांत संधी केला. धर्मराजाचा

या वेळी आदेश असा होता की, 'तो खोटी साक्ष देईल, चहाडी करील, अशा मानवाच्या दोनही कानांत खिळे ठोकावेत. खोटं बोलणाऱ्यासही दंड करावा. तो गावात भ्रमण करून यज्ञ करतो, कोणत्याही एका सिद्धान्तावर स्थिर होत नाही, जो दंभ करतो, ज्याच्या मनात मूर्खता भरलेली आहे, अशा ब्राह्मणास दोरानं बांधून एखाद्या भयंकर नरकात टाकावं. ज्याच्या तोंडून सदा वाईट वाणी प्रकट होते, त्या पापी मनुष्याची जीभ त्वरित कापून टाकावी. ज्यानं सुवर्णाची चोरी केली असेल, जो उपकार विसरून जातो, ज्यानं पित्याची हत्या केली असेल, तो मानव क्रूर व पापी असतो. त्याला ब्रह्मघातक्यांच्या श्रेणीत बसवावं. त्याची हाडे काढून धगधगत्या अग्नीत टाकून द्यावीत.'

यानंतर नचिकेताने स्पष्ट केले, 'ऋषींनो, चित्रगुप्ताच्या विचारानुसार असत्याचे चार भेद असतात. निंदा, कटुवचन, हिंसाप्रद व सर्वथा असत्य. अशा असत्यभाषी, निष्ठुर, शठ, निर्दयी, निर्लज्ज, मूर्ख आणि मर्मभेदी वाणी बोलणाऱ्या, कुत्सित व कठोरवाणी बोलणाऱ्या अधमांना नरकात पडावं लागतं. त्यानंतर पशुयोनी अथवा किडे वा पक्षी यांच्या योनीत त्यांना जन्म घ्यावा लागतो.' यानंतर नरकाचे प्रकार, शरीरव्याधी, यांचे वर्णन करून यमराज म्हणाल्याचे नचिकेताने सांगितले.

'दूतांनो, चोरी करण्यात जे तत्पर आहेत, त्यांना पशू अथवा मनुष्ये यांची शरीरं प्राप्त होतील. जो धर्मशीलादी संपन्न व शुभलक्षणांच्या व्यक्तींची अवहेलना करतो, त्याला हजार वर्षांपर्यंत नरकात पडावं लागतं. नरकात राहूनही जी व्यक्ती निर्लज्ज, विचित्र अंगाची, दुर्बलगात्र, स्त्रीच्या अधीन, स्त्रीसारखा वेष करणारी, स्त्रीत सदा आसक्त असणारी, स्त्रीच्या प्रभुत्वानं मोठी होणारी, केवळ स्त्रीस देवता मानणारी असते, ती स्वतःच तशा प्रकारचा जन्म प्राप्त करून घेते.'

## पतिव्रतेचे आख्यान

नारद व धर्मराज यांच्या संवादातून दानधर्माचे महत्त्व नचिकेताने विप्रांना सांगितले. दानांचे विविध प्रकार समजावून दिले. ऋषिपुत्र

नचिकेतानें सांगितले, 'विप्रांनो, याच वेळी यायावर,* शिलोञ्छजीवी† स्वाध्यायव्रती तपस्वी ब्राह्मणांना आपल्यावरून जाताना पाहून यमराज अत्यंत उदास झाला. एवढ्यात तिथं विमानात बसून आपल्या पतिदेवांसहित एक परम तेजस्वी पतिव्रता स्त्री आली.' या पतिव्रतेचे आख्यान पुढे चालू झाले.

तिच्याबरोबर अनेक अनुचरही विराजमान होते. त्या प्रियदर्शना देवीच्या आगमनाच्या वेळी नरशिंगादी वाद्यांचे विपुल ध्वनी झाले. त्या देवीस धर्माची पूर्ण माहिती होती. तिच्या सर्व प्रयासांत धर्मराजाचे हित होते. अशा प्रकारची साधनसंपन्न ती शुभांगना विमानात बसता बसताच धर्मराजास तपस्व्यांशी ईर्ष्या न करण्यासाठी, त्यांच्याविषयी सद्भाव ठेवण्यासाठी सांगून ती एखाद्या विजेप्रमाणे आकाशात विलीन झाली.

या वेळी धर्मराजाने पूजिलेल्या त्या स्त्रीस पाहून नारदांनी विचारले, 'राजन्, आपणांकडून पूजित झालेली ही सर्वोत्तम देवी कोण आहे ? ही मोठी भाग्यशालिनी दिसते. तिचं स्वरूप मोठं दिव्य आहे. आपण मला हे रहस्य समजावून द्यावं.' धर्मराजाने म्हटले, 'देवर्षी, मी ज्या देवीची पूजा केली, तिची कथा मोठी परम सुखद आहे. ती मी आता तुम्हांस विस्तारानं सांगतो.' धर्मराजाने ही कथा निवेदन केली.

निमी नावाचा एक प्रसिद्ध, महान तेजस्वी, सत्यवादी आणि प्रजापालक राजा होता. त्याच्या पुत्राचे नाव मिथी होते. पित्यापासून तो जन्मास आला म्हणून लोक त्याला जनकही म्हणू लागले. त्याच्या पत्नीचे नाव रूपवती होते. ती निरंतर आपल्या पतीच्या हितात तत्पर असायची. पतीची आज्ञा पाळणे, त्याच्यावर अपार श्रद्धा व भक्ती ठेवणे, शुभकार्यात सदा मग्न असणे; हा तिचा स्वाभाविक स्वभाव होता. स्वामीच्या वचनानुसार अत्यंत प्रसन्नतेने ती कार्यात तत्पर

---

* यायावर म्हणजे भटकणारा साधू. रोज भिक्षा मागणारा. 'वृत्या वरया यायाति यायावरत्वम्' असे बौद्धायनधर्मसूत्रात सांगितले आहे.

† शिल म्हणजे कापणीनंतर शेतात राहिलेले धान्य. तपस्यावृत्तीने असे धान्य वेचून जीविका चालविणारा शिलोञ्छजीवी होय.

असायची. महाराज मिथीही महान तपस्वी, सत्याचा समर्थक, सर्व प्राण्यांच्या हितात तत्पर होता. तो धर्मपूर्वक सर्व भूमंडलाचे पालन करी. त्याच्या शासनकालात रोग, वृद्धत्व, मृत्यू यांची शक्ती कुंठित झाली होती. त्या तेजस्वी नरेशाच्या राष्ट्रात देव नेहमी जलाचा वर्षाव करीत. त्यांच्या राज्यात कोणीही दुःखी, मरणासन्न व व्याधींनी ग्रस्त असा नव्हता. दरिद्री नव्हता.

काही काळ गेल्यानंतर त्याच्या राणीने नम्र वाणीने म्हटले, ‘ राजन्, आपली सारी संपत्ती भृत्य, ब्राह्मण, परिजन यांना देण्यातच हळूहळू समाप्त झाली आहे. आता आपल्या कोषात काहीही उरलेलं नाही. अधिक काय सांगू ? या वेळी भोजनाचीही काही व्यवस्था नाही. आता आपल्यापाशी गोधन, कपडेलत्ते, भांडीकुंडीं, काहीच उरलं नाही. राजन्, अशा वेळी माझं कर्तव्य काय असावं ? मी आपली आज्ञाधारक दासी आहे. कृपा करून मला सांगावं.’

‘ भामिनी,’ राजा मिथीने म्हटले, ‘ तुझ्या भावनेच्या विरुद्ध मी काही बोलणार नाही. पण नीट ऐक. शंभर वर्षं तर आपण हविष्य-भोजनावरच काढली. प्रिये, आता आपण कुदळ व लाकडी नांगर यांच्या साह्यानं शेती करू. म्हणजे आपला जीवननिर्वाह होईल. आपणांस शुद्धधर्माची प्राप्ती होईल यात संशय नाही. असं करण्यानं आपणांस भक्ष्य व भोज्य पदार्थांची प्राप्ती होईल.’

‘ राजन्, राणी रूपवतीने म्हटले, ‘ आपण महान यशस्वी पुरुष आहात. आपल्या इथं सेवक, शूरवीर, हत्ती, घोडे, उंट, म्हशी, गर्दभ इत्यादींची संख्या हजारोंनी आहे. ही सर्व जनावरंही कृषिकार्य करणार ?’

‘ वरानने, माझ्यापाशी जितके सेवक आहेत, ते सर्व राष्ट्राच्या रक्षणासाठी तत्पर आहेत. देवी, आपणांपाशी असणारे पशू, बैल, खेचर, घोडे, हत्ती, उंट इत्यादी सर्व राज्याच्या कामी नियुक्त आहेत. अनिंदिते, याच प्रकारे लोखंड, तांबे, सोने, चांदी इत्यादींची उपकरणीही राष्ट्राच्या उपयोगाची आहेत. आता या वेळी आपणांसाठी मात्र उपयुक्त भूमी, लोखंडादी द्रव्ये यांचा शोध घ्यायला हवा. आपण सुगमतेनं शेती करू.’

'राजन्, आपण आपल्या इच्छेस येईल ते करावं. मी आपल्या मागं आहेच.' असे म्हणताच महाराज मिथी आपल्या सहधर्मचारिणीसह तेथून निघाला. स्थान क्षेत्राच्या शोधात असताना त्याने दोन मार्ग पार केले. एका स्थानावर लक्ष देऊन राजाने म्हटले, 'वरवर्णिनी, हे स्थान कल्याणप्रद आहे असं वाटतं. आता तू इथंच थांब. भद्रे, तोपर्यंत मी इथलं गवत आणि काटेरी झुडपं साफ करतो. तूही इथली तृणपत्रं दूर कर.'

'प्रभो,' हसून राणी मधुर वाणीने म्हणू लागली, 'इथं तर केवळ वृक्ष, सोनेरी रंगाच्या लता दिसत आहेत. जवळपास जल मात्र दिसत नाही. इथं शेती करताना चिंता मात्र लागून राहील. शेतीचं काम कसं होईल ? इथं वेगवान नदी वाहाते आहे. वृक्ष आहेत. पण इथली भूमी खडकाळ आहे. इथं शेती करताना आपणांस सफलता कशी प्राप्त होणार ?'

'प्रिये,' राजाने मधुर वाणीने म्हटले, 'पहिल्यासारखाच इथंही संपत्तीचा संग्रह निर्माण होऊ शकेल. सुंदरी, जवळच पाण्याची व्यवस्था होऊ शकेल. चारदोन मनुष्यं झाली की इथंच सर्व सुखसोयी निर्माण होतील. महादेवी, पाहा. इथंच हे घर आहे. इथं कसलीच बाधा होणार नाही.'

इतके म्हणून राजा पत्नीसह राहून शेतीचे काम करण्यास प्रयत्नशील झाला. सूर्य आकाशाच्या मध्यभागी येताच त्याचा उग्र ताप सर्वत्र पसरला. राणी तहानेने परम व्याकुळ झाली. त्या तपस्विनीस भूकही लागली. तिच्या पायांचे कोमल तळवे तांब्याप्रमाणे लाल झाले. अत्यंत व्यथित होऊन ती पतिदेवास म्हणाली, 'महाराज, मी ग्रीष्मानं पीडित झाले आहे. मी तहानेनं व्याकुळ बनले आहे. राजन्, कृपा करून मला त्वरित पाणी आणून द्यावं.'

त्या वेळी देवी रूपवती दुःखाने अत्यंत कष्टी झाली होती. तिची शुद्ध बुद्ध हरपली होती. ती जमिनीवर बेहोष होऊन पडली. त्याच वेळी तिचे नेत्र सूर्यावर गेले. धरणीवर पडत असताना तिच्या चेहऱ्यावर क्रोध उमटला होता. तिच्या क्रोधाने सूर्याचाही थरकाप झाला. त्या

व...११

महान तेजाची देवाने आकाशातून धरणीवर विवश होऊन येणे केले. असे निसर्गविरुद्ध दृश्य पाहून राजा जनकाने त्याला विचारले, 'तेजस्विन्, आपण आकाशमंडलाचा त्याग करून इथं कसे आलात ? आपण परम तेजस्वी देव आहात. सर्व व्यक्ती आपणांस अभिवादन करितात. मी आपलं कसं स्वागत करू ?'

यावर राजा मिथीस सूर्य विनयपूर्वक म्हणाला, 'राजन्, ही पतिव्रता माझ्यावर अत्यंत क्रुद्ध झाली होती. म्हणून मी आपली आज्ञा पाळण्यासाठी आकाशातून पृथ्वीवर आलो. या वेळी भूमंडळावर, स्वर्गात, तीनही लोकांत हिच्याशिवाय दुसरी पतिव्रता दृष्टीस पडत नाही. हिच्यात असीम शक्ती आहे. हिचं तप, धैर्य, हिची निष्ठा, हिचा पराक्रम, या सर्व गोष्टी आश्चर्यकारक आहेत. महाभाग, हिचं चित्त नेहमी आपल्या चित्तास अनुसरतं. हिच्या पुण्याचं फळ महान समजलं पाहिजे. आपण दोघंही शची व इंद्र यांप्रमाणे एकमेकांना अनुरूप आहात. राजन्, आपली कोणतीच अभिलाषा व्यर्थ होणार नाही. महाराज, भोजनासाठी व्यवस्था करण्याकरिता आपण शेतीचं कार्य उचित प्रकारानं करावं. आपला प्रयत्न सफल होईल. आपली अभिलाषा पूर्ण होईल.'

असे म्हणून सूर्याने त्याला जलाने भरलेले एक पात्र दिले. पादत्राणाचा एक जोड, दिव्य अलंकारांनी युक्त असे एक छत्र, इत्यादी वस्तूही सूर्याने राजा मिथीस दिल्या. हे सर्व फल या स्त्रीच्या पुण्याचे आहे, असेही भास्कराने राजास सांगितले. राणी रूपमती जल पिऊन तृप्त झाली. आता ती सचेत व अभय बनली. पण हे सर्व आश्चर्य पाहून ती राजास म्हणाली, 'राजन्, हे स्वच्छ व शीतल जल कुणी आणलं ? हे दिव्य छत्र कुणी दिलं ? हे उपानह कुणी दिलं ? तपोधना, आपण सांगण्याची कृपा करावी.'

'महादेवी, या विश्वाचा प्रधान देव भगवान विवस्वान आहे. तो तुझ्यावर कृपा करण्यासाठी गगनमंडलाहून इथं आला होता. त्यानंच या सर्व वस्तू दिल्या.'

'प्राणनाथ, या सूर्यदेवाच्या प्रसन्नतेसाठी मी काय करू ? आपण त्याची अभिलाषा जाणून मला सांगावं.'

राजा जनक महान तपस्वी पुरुष होता, राणीचे बोलणे ऐकून त्याने सूर्यास दोनही हात जोडून म्हटले,

'भगवन् मी आपलं कोणतं कार्य करू?' राजास सूर्यदेव म्हणाला, 'राजा, माझी हार्दिक इच्छा आहे की, स्त्रियांपासून मला कोणतंच भय असू नये.' राजा मिथी सर्वांचा सन्मान करणारा होता. राणी रूपवती त्याच्या हृदयास सदा आल्हादित करीत असे. भुवनभास्कराचे सारे म्हणणे राजाने आपल्या पत्नीस सांगितले. ते ऐकून राणीस अत्यंत आनंद झाला व ती म्हणाली, 'देवा, आपल्या तीव्र किरणांपासून रक्षण करण्यासाठी छत्रीचं दान दिलंत. एक दिव्य जलपात्र दिलंत. पाय सुरक्षित राहण्यासाठी पादत्राणं दिलीत. या सर्व वस्तू परम आवश्यक आहेत. महाभाग, आपण जसा वर मागितला, तसाच आपणांस मिळेल. आपणांस स्त्रियांपासून भय राहणार नाही. आपल्या इच्छेनुसार कार्य करण्यास आपण स्वतंत्र राहाल.'

नारदांच्या विनंतीवरून धर्मराजाने पतिव्रता स्त्रीचे माहात्म्यही वर्णन केले. सर्वोत्तम अशी स्थिती प्राप्त करण्यासाठी नियम व तप ही काही उपयुक्त साधने नाहीत. उपवास, दान अथवा देवार्चन, यांमुळेही ही गती प्राप्त होत नाही. जी स्त्री आपला पती झोपी गेल्यावर झोपते, तो जागा होण्यापूर्वी जागी होते, पतीच्या भोजनानंतर भोजन करते, तिला मृत्यूवरही विजय मिळतो. पती मौन असला की जी मौन राहाते, तो आसनावर बसल्यावरच ती बसते. अशी स्त्रीच मृत्यूस जिंकते. जिची दृष्टी एकमात्र पतीवरच असते, जिचे मन केवळ पतीत गुंतलेले असते, जी स्वामीची आज्ञा निरंतर पाळते, अशा पतिव्रतेचे भय सर्वांनाच वाटते. जी स्वामींच्या वचनांवर श्रद्धा ठेविते, त्याच्या आज्ञेचे उल्लंघन कधीच करीत नाही, त्या साध्वीची शोभा जगतात वाढते. जी परोक्ष अथवा प्रत्यक्ष कधी अन्य पुरुषाचे ध्यान करीत नाही, तिलाच पतिव्रता म्हणतात. अशा स्त्रीस मृत्यूपासूनही भय नसते. स्वामीच्या हितात नित्य तत्पर असणाऱ्या स्त्रीस अभय मिळते.

पतिव्रता स्त्री सदा पतीच्या शुश्रूषेत मग्न असते. तिच्यावर यमाचा अधिकार चालत नाही. ती नित्य स्वामीचे ध्यान करीत असते.

व्यर्थ चिंतेत जिचा एक क्षणही खर्च होत नाही, तीच परम साध्वी असते. अशा पतिव्रतेस मृत्यूचे भय नसते. नृत्य, गीत व वाद्य यांच्यापेक्षा ज्या स्त्रीस पतीची सेवा महत्त्वाची वाटते, तिला मरणाची भीती वाटत नाही. स्नान करताना, स्वच्छंद बसताना अथवा केस सावरताना जिचे मन कधीच दुसऱ्यावर जात नाही, तिला मृत्यूचा दरवाजा माहीत नसतो. सूर्योदयापूर्वी उठून जी स्त्री घर स्वच्छ करते, तिला मृत्यूचे भय नसते. तिचे नेत्र, शरीर व भाव सदा सुसंयत असतात, आचार शुद्ध असतो, अशा साध्वीस मरणाची भीती नसते. या जगतात अशा अनेक स्त्रिया आहेत. त्या स्वर्गात निवास करतात. त्यांचे दर्शन देवही घेतात. अशीच एक पतिव्रता धर्मराजासमोर उभी होती. भगवान सूर्याने या पतिव्रतेचा महिमा त्याला सांगितला.

# ३ तीर्थक्षेत्रमाहात्म्य

## कोकामुखतीर्थ–वराहक्षेत्राचे * माहात्म्य

इतर काही पूराणांप्रमाणे वराहपुराणही तीर्थक्षेत्रांच्या माहात्म्यां-

*या स्थानाचा उल्लेख पुढे १०४ व्या अध्यायातही आहे. नंदलाल डे यांच्या मतानुसार हे स्थान नाथपुराच्या जवळ तम्वर, अरुणा आणि सुनकोशी नद्यांच्या त्रिवेणी संगमापासून निर्माण झाले आहे. वराहक्षेत्र (कोकामुख) नेपाळमध्ये कोसीनदीच्या किनाऱ्यावर धवलगिरीच्या शिखरावर आहे. एका मंदिरात वराहभगवानांची चतुर्भुज मूर्ती असून मंदिराजवळूनच कोवरा (कोका) नदी वाहाते. हिच्या जलाने भगवानांना स्नान घालण्यात येते. कार्तिकी पौर्णिमेस येथे यात्रा भरते.

कोकामुख पवित्र पितृतीर्थ आहे. तेथे स्नान व पितृतर्पण केले जाते. भगवान विष्णूंनी याच स्थानी वराहरूप त्यागून चतुर्भुजरूप धारण केले. कोकामुखतीर्थ पांच योजने विस्तीर्ण आहे. जलबिंदुतीर्थ, विष्णुधारा, विष्णुपद, वराहशिला, सोम तीर्थ, पंचशिला, अग्निसरोवर, ब्रह्मसरोवर, सूर्यप्रभ, कोशिकीनदी, मत्स्यशिला, इत्यादी तीर्थांचाही वराहपुराणाच्या आधारे शोध याच परिसरात घेता येण्यासारखा आहे.

साठी प्रसिद्ध आहे. एकशेबाविसाव्या अध्यायात भगवान वराहांनी वसुंधरेस कोकामुखतीर्थाची, वराहक्षेत्राची महती समजावून दिली आहे. पृथ्वीने एकदा त्यांना विचारले, 'माधवा, मी आपली शिष्या आहे. दासी आहे. माझी आपणांत अपार श्रद्धा आहे. मी आपणावर भक्ती ठेवून विचारते की, वाराणसी, चक्रतीर्थ, नैमिषारण्य, अट्टहासतीर्थ, भद्रकर्णह्रद, द्विरंड, मुकुट, मंडलेश्वर, केदारक्षेत्र, देवदारुवन, जालेश्वर, दुर्ग, गोकर्ण, कुब्जाम्रेश्वर, एकलिंग; अशा पवित्र व सुप्रसिद्ध तीर्थस्थानांना सोडून आपण 'कोकामुख' क्षेत्राची एवढी प्रशंसा का करता?'

तेव्हा भगवान वराह म्हणाले, 'भीरू, तुझं बोलणं ठीक आहे. 'कोकामुख' मला अत्यंत प्रिय आहे. हे स्थान कशासाठी प्रिय आहे? तू ज्या क्षेत्रांची नावं घेतलीस ती सर्व रुद्रांसंबंधी, पाशुपततीर्थ आहेत. परंतु 'कोकामुख' मात्र श्रीहरींचं क्षेत्र आहे. वरानने, या संबंधीचं एक उपाख्यान मी तुला सांगतो.' असे म्हणून भगवान वराहांनी एक आख्यान सांगितले.

एके दिवशी या 'कोकामुख' क्षेत्रात मांसाच्या लोभाने एक व्याध फिरत होता. तेथेच एका लहानशा सरोवरात एक मत्स्य राहात होता. त्याला पाहून व्याधाने काठीच्या साह्याने त्याला बाहेर काढले. पण तो बलवान मत्स्य त्वरित त्याच्या हातून निसटला. एवढ्यात एक बाजपक्षी आकाशात घिरट्या घालीत होता. त्याच्या दृष्टीस तो मासा पडला. त्याला पकडण्यासाठी तो खाली उतरला. त्या मत्स्याला पकडून तो उंच उडून गेला. पण त्यालाही त्या मत्स्याचे ओझे सहन न होऊन तो त्याच्यासह या 'कोकाक्षेत्रात' पडला. पण पडत असतानाच या क्षेत्राच्या माहात्म्याने रूप, गुण व वय यांनी युक्त असा एक कुलीन राजपुत्र त्याच्यापासून निर्माण झाला.

काही काळानंतर त्या व्याधाची स्त्री मांसाच्या शोधात तेथे येऊन पोचली. याच सुमारास मांसासाठी लोलुप झालेली एक घार मांस घेण्यासाठी तेथे आली. बलपूर्वक मांस हिसकावून घेणाऱ्या त्या घारीवर व्याधाने बाण मारला. त्यामुळे ती घार त्या 'कोकामुख'

क्षेत्रात मरून पडली. त्यानंतर या घारीने चंद्रपूर नावाच्या नगरात राजपुत्रीच्या रूपात जन्म धारण केला. तिचे यश चारही दिशांना पसरले. ती कन्या हळूहळू वाढू लागली. रूप, गुण, वय, चौसष्ट कला यांत ती ज्ञानसंपन्न झाली. परंतु ती पुरुषांची सतत निंदा करू लागली. रूपवान, गुणवान, शूरवीर, सौम्य स्वभावाच्या पुरुषाची चर्चाही तिला आवडत नसे.

ती युवती झाल्यावर आनंदपुराच्या शकजातीच्या पुरुषाबरोबर तिचा विवाह झाला. विवाहानंतर गृहस्थजीवन व्यतीत करण्यासाठी ते एकमेकांबरोबर राहू लागले. प्रेमबंधनामुळे ते एक क्षणही एकमेकास सोडीत नसत. आता ती अत्यंत नम्र बनून आपल्या स्वामीची सेवा उत्तम प्रकारे करू लागली. एके दिवशी मध्यान्हाच्या समयी राजकुमाराच्या डोक्यात वेदना उत्पन्न झाल्या. अनेक कुशल वैद्यांनी चिकित्सा केली. परंतु शिरोव्यथा दूर झाली नाही. काही मंत्रतंत्रही झाले. सर्व उपाय थकल्यावर राजकुमारीने आपल्या स्वामीस जिज्ञासेने विचारले,

'प्रभो, आपल्या शिरातील वेदना आता कशी आहे ? अनेक कुशल वैद्यांनी चिकित्सा केली. पण त्यांना वेदना दूर करण्यात यश आलं नाही.'

'भद्रे, मनुष्याचं शरीर व्याधींचं मंदिर असतं, हे तू विसरलीस काय ? हे मानवशरीर रोग व दुःख यांनीच भरलेलं आहे. संसारसागरात सापडल्यावर तू असा प्रश्न मला पुनःपुन्हा का विचारतोस ?'

यानंतर काही दिवस गेले. राजकुमारीने अत्यंत आग्रहाने राजकुमारास तोच प्रश्न विचारला, तेव्हा शकनरेश आपल्या भार्येस म्हणाला, 'भद्रे, तू या मानुषी भावाचा त्याग कर. आणि आपल्या पूर्वजन्माचं स्मरण कर. तू पूर्वजन्मीची हकीगत जाणशील तर मग माझ्या माता–पित्यांना प्रसन्न कर. तू त्यांचं पूजन कर. कारण त्यांनी मला आपल्या उदरात धारण केलं होतं, तू त्यांचा सन्मान करून 'कोकामुख'-क्षेत्रास चल. तिथं मी तुला सर्व प्रसंग सांगीन.'

त्यानंतर त्या राजकुमारीने आपली सासू, आपला सासरा यांच्या चरणांवर पडून म्हटले, 'मी आपणां दोघांना काही सांगू इच्छिते. आम्ही दोघंही आपली आज्ञा घेऊन 'कोकामुख'क्षेत्रात जात आहोत.

आपण आमचे गुरू आहात. आजपर्यंत मी आपणांस काहीच मागितलं नाही. आता प्रथमच मी आपणांपाशी याचना करीत आहे. आपल्या या कुमाराच्या शिरात निरंतर वेदना असतात. दोन प्रहरी तर ते मृतवत पडून राहतात. कुठलाच उपचार चालत नाही. सर्व सुखभोग सोडून ते दु:खी होतात. त्यांचं हे दु:ख 'कोकामुख'तीर्थास गेल्याशिवाय दूर होणार नाही.'

आपल्या पुत्रवधूचे हे बोलणे ऐकून शकजातीच्या त्या नरेशाने विचारले, 'पुत्रा, तुमच्या मनात 'कोकामुख'क्षेत्रास जाण्याचा विचार कसा आला ? हत्ती, घोडे, स्वाऱ्या, अप्सरांसारख्या स्त्रिया, कोष, रत्न-भंडार, राज्यसंपत्ती, ही सर्व तुमच्या अधीन आहे. तुम्हीच ही सर्व सांभाळावी. साऱ्या संपत्तीचा उत्तराधिकारी पुत्रच असतो. माझे प्राण तुमच्यातच आहेत. तू 'कोकामुख'क्षेत्रास जाऊ नकोस.'

पित्याचे हे बोलणे ऐकून राजकुमाराने त्याचे चरण पकडून म्हटले, 'तात, राज्य, कोष, स्वारी, सेना यांचा उपयोग काय ? मी तर आता त्या 'कोकामुख'क्षेत्रास जाऊ इच्छितो. माझ्या डोक्यात फार वेदना होत आहेत. जर मी जिवंत राहिलो, तरच राज्य, सेना, कोष यांचा उपयोग आहे. पण या वेदनेपासून मुक्ती मला त्या क्षेत्रास गेल्यासच मिळेल.' शेवटी पुत्राची तीव्र इच्छा पाहून नरेशाने त्याला जाण्यासाठी अनुज्ञा दिली. राजकुमाराने 'कोकामुखा'च्या यात्रेस आरंभ केला. त्याच्याबरोबर अनेक व्यापारी, नागरिकही निघाले. काही काळानंतर ते सर्व 'कोकामुख'क्षेत्रास पोचले. तेथे पोचल्यावर राजकुमारी आपल्या स्वामीस म्हणाली,

'स्वामिन्, आता मला या क्षेत्राचं माहात्म्य सांगा ना.'

'प्रिये, आता रात्र होत आहे. या वेळी तू सुखपूर्वक झोप. प्रात:-काळी मी सर्व सांगीन.'

प्रात:काळी दोघांनी स्नान करून रेशमी वस्त्रे परिधान केली. राजकुमाराने सर्वप्रथम शिर वाकवून भगवान विष्णूंना प्रणाम केला. त्यानंतर त्याने आपल्या पत्नीस हाताने धरले व पूर्वउत्तर भागात आपल्या मत्स्यदेहाच्या अस्थी दाखवून म्हटले, 'प्रिये, माझ्या पूर्व.

जन्मीच्या शरीराची ही हाडे आहेत. पूर्वजन्मी मी मत्स्य होतो. एकदा मी इथल्या 'कोकामुख' क्षेत्राच्या जलात विहार करीत असताना एका व्याधानं मला पकडलं. मी माझी शक्ती पणाला लावली व त्याच्या तावडीतून सुटलो. पण एका घारीनं मला उचललं व ती वर उडून गेली. तिनं नखांनी माझं शरीर छिन्नभिन्न केलं. एवढ्यात मी सुटून जमिनीवर पडलो. तिनं केलेल्या प्रहारांनी माझ्या शिरात वेदना होत आहेत. या प्रसंगाला मीच केवळ जाणतो. भद्रे, मी तुला म्हटलं होतं ते रहस्य सांगितलं.'

हे सर्व ऐकून राजकुमारी करुण स्वरात म्हणू लागली, 'आता मीही आपलं एक गुप्त रहस्य आपणास सांगते. पूर्वजन्मी मी आकाशात संचार करणारी घार होते. भूक आणि तहान यांनी मी कष्टी होते. खाण्यास योग्य अशा पदार्थांच्या शोधात असताना मला एक व्याध दृष्टीस पडला. त्यानं मिळवलेलं मांस पत्नीजवळ दिलं व तो आणखी मांस शोधण्यास गेला. मी त्या मांसपिंडास उचललं. पण ते मला नीट पेललं नाही. मी त्याच्या समीप बसून राहिले. त्या व्याधाची दृष्टी माझ्यावर पडली. त्यानं धनुष्य रोखून मला मारलं. मी प्राणहीन होऊन माझी जीवनलीला समाप्त झाली. पण हा प्रसंग याच 'कोकामुख'-क्षेत्रात घडून आल्यामुळं माझ्या मनात वासना उरली नाही. माझा जन्म एका राजाच्या घरी झाला. मला स्त्रीचा जन्म आला. माझ्याही पूर्वजन्माची ही हाडं पाहा. आता त्यांच्यापैकी थोडासाच अंश उरला आहे.'

असा हा या 'कोकामुख' क्षेत्राचा महिमा आहे. तिर्यक्‌योनीतील जीवही उत्तम कुळात जन्म घेऊ शकतो. राजकुमार व राजकुमारी यांनी या क्षेत्रस्थानी काही धार्मिक कार्ये केली. अन्य लोकांनीही त्यांचे अनुकरण केले. त्या दंपतीने प्रसन्न वृत्तीने ब्राह्मणांना दाने दिली. त्या सर्वांना यथोचित भोग मिळाला व नंतर त्यांना उत्तम लोकाची प्राप्ती झाली. सर्व सुवासिनी स्त्रिया मुक्त झाल्या.

## मायापुरी (हरिद्वार) माहात्म्य

एकशे पंचविसाव्या अध्यायात मायाचक्राचे वर्णन आले असून

मायापुरी अथवा हरिद्वारचे माहात्म्यही सांगितले आहे. पृथ्वीने विचारल्यावरून भगवान नारायणांनी तिला मायेचे महत्त्व सांगितले. शेवटी ते म्हणाले, ' एकदा एक पुरुषही मायेच्या द्वारे स्त्रीच्या स्वरूपात परिणत झाला. ' तेव्हा पृथ्वी म्हणाली, ' भगवन्, त्या ऋषींनी असं कोणतं अपकर्म केलं ? त्यांना स्त्रीचं रूप कसं प्राप्त झालं ?' पृथ्वीचा हा प्रश्न ऐकून भगवानांनी सर्व कथा तिला विस्ताराने निवेदन केली.

नारायणांच्या मायेनेच सोमशर्मा नावाचा एक ऋषी प्रभावित झाला. उत्तम, मध्यम व अधम अशा अनेक अवस्थांत तो भ्रमण करी. ईश्वराच्या मायेने त्याला ब्राह्मणत्व सुलभ झाले. सोमशर्मा नेहमी नारायणांची उपासना, आराधना करायचा. नेहमी तो त्यांचेच चिंतन करीत असे. त्याची भक्ती, तपश्चर्या, अनन्यभावाची स्तुती पाहून नारायण त्याच्यावर प्रसन्न झाले. त्यांनी त्याला दर्शन देऊन म्हटले, ' ब्राह्मणा, मी तुझ्या तपस्येनं संतुष्ट झालो आहे. तू एक वर माग. रत्नं, सुवर्ण, गायी, अकंटक राज्य, जे काय हवं असेल ते तू माग. मी तू मागशील ते देईन. स्वर्गसुख, वारांगनांचा सहवास, सुवर्णाचं भांडार, काय हवंय ते माग. '

तेव्हा त्या ब्राह्मणाने नारायणांना भूमीवर पडून साष्टांग नमस्कार घातला व म्हटले, ' देवा, आपण माझ्यावर रुष्ट होऊ नये. भगवन्, मला सुवर्ण, गायी, स्त्री, राज्य, ऐश्वर्य वा अप्सरांनी सुशोभित स्वर्ग; यांची काहीच जरुरी नाही. मी फक्त आपल्या मायेचं रहस्य जाणू इच्छितो. ' त्यावर नारायण त्याला म्हणाले, ' द्विजवर, मायेशी तुझा काय संबंध ? ब्राह्मणा, तू अनुचित आणि अकार्याची कामना करीत आहेस. ' तेव्हा तो ब्राह्मण पुन्हा नारायणांना म्हणाला, ' भगवन्, आपण माझ्या तपस्येनं संतुष्ट असाल तर मला तोच वर द्यावा. '

तेव्हा नारायण त्याला म्हणाले, ' द्विजवर, तू ' कुब्जाम्रक 'तीर्थावर जाऊन तिथं गंगेत स्नान कर. म्हणजे तुला मायेचं दर्शन होईल. ' ब्राह्मणाने नारायणांना प्रदक्षिणा केली आणि मायेच्या दर्शनासाठी तो कुब्जाम्रकतीर्थास, ऋषिकेशास गेला. तेथे त्याने मोठ्या सावधतेने आपली कुंडी, आपला दंड, भांडे गंगातटावर ठेवून मोठ्या भक्तीने

विधिपूर्वक तीर्थाची पूजा केली. त्यानंतर तो गंगेचे स्नान करण्यासाठी नदीत उतरला. त्याने गंगेच्या पाण्यात बुडी मारली, त्याचे अंग भिजून गेले. तेव्हा त्याला जाणवले की, आपण एका निषादाच्या घरी त्याच्या स्त्रीच्या गर्भात प्रवेश केला आहे. त्याला गर्भवासाचे क्लेश होऊ लागले. तेव्हा तो मनाशी म्हणाला, ' माझ्याकडून नक्कीच एखादं वाईट कर्म घडलं असेल, म्हणून मी या निषादाच्या घरी नरकयातना भोगीत आहे! विष्ठा, मूत्र, रक्त व मांस यांच्या चिखलात सापडलो आहे. इथली दुर्गंधी असह्य आहे. मी या गर्भात असह्य दुःख भोगत आहे. आता कुठं भगवान विष्णू ? कुठं गंगाजल ? आणि या गर्भवासातून माझी सुटका तरी आता कशी होणार ?'

असा विचार चालू असतानाच तो ब्राह्मण त्या निषादीच्या गर्भातून बाहेर आला. भूमीवर पडताच त्याचा गर्भात असतानाचा निश्चय तो विसरून गेला. आता तो धनधान्यांनी परिपूर्ण अशा निषादाच्या घरात कन्येच्या रूपात राहू लागला. असे बरेच दिवस झाल्यावर त्या कन्येचा विवाह झाला. मायेच्या प्रभावाने त्याला बहुत पुत्र व पुत्री झाल्या. आता कन्यारूपातील तो ब्राह्मण भक्ष्य, अभक्ष्य वस्तू खाऊ लागला. अपेय पदार्थ पिऊ लागला. तो निरंतर मत्स्यादी जीवांची हिंसा करीत राहिला. कर्तव्याकर्तव्याचे ज्ञानही त्याचे नाहीसे झाले.

अशा रीतीने निषादीच्या रूपात त्याची पन्नास वर्षे गेली. त्याला पुन्हा स्मरण आले. तो निषादीरूपी ब्राह्मण घडा बरोबर घेऊन, धुण्याची वस्त्रे घेऊन गंगातटावर आला. स्नान करण्यासाठी तो गंगेत उतरला. कडक ऊन असल्यामुळे त्याच्या शरीरावर घाम डवरून आला होता. आता डोके बुडवून स्नान करण्याची त्याला इच्छा झाली. असे करताच तो पूर्वीसारखा तपस्वी ब्राह्मण झाला. स्नान संपताच त्याची दृष्टी दंड, कमंडलू आणि वस्त्रे यांच्यावर गेली. त्याला सर्व आठवण झाली. भगवंतांची माया जाणण्याची इच्छाही त्याला नीट आठवली. गंगाजलातून बाहेर येऊन त्याने आपले वस्त्र बदलले व लज्जित होऊन पुन्हा वाळूवर बसून योग व तप यांत तो रमून गेला. म्हणू लागला, 'अरे मी पाप्यानं किती निंदनीय अकार्य केलं !'

त्याने स्वतःचा धिक्कार केला. म्हणू लागला, 'साधुपुरुषांनी निंदित ठरविलेलं कर्म करणाऱ्या माझा धिक्कार असो. मी सदाचारानं सर्वथा भ्रष्ट झालो होतो. त्याचमुळं मला निषादाच्या योनीत जावं लागलं. त्या कुळात उत्पन्न होऊन मी किती अभक्ष्य पदार्थ खाल्ले, किती अपेयपान केलं. सर्व प्रकारच्या जीवांचा वध केला. विक्रीस योग्य नसलेल्या वस्तूंची मी विक्री केली. निषादाच्या संपर्कानं मी अनेक पुत्र व पुत्री यांची उत्पत्ती केली. कोणत्या दुष्कर्मानं मला निषादाची पत्नी व्हावं लागलं !'

अशा प्रकारे हा ब्राह्मण चिंतामग्न झाला असताना तिकडे तो निषाद क्रोध व दुःख यांनी पागल बनला. तो आपल्या भार्येचा शोध घेत भटकू लागला हरिद्वारला येऊन त्याने प्रत्येक तपस्व्यास आपल्या पत्नीसंबंधाने विचारले. तो सारखा विलाप करीत होता. 'प्रिये, तू मला व आपल्या पुत्रांना सोडून कुठं गेलीस ? दूध पिणारी तुझी छोटी बालिका आता भुकेनं व्याकुळ झाली आहे.' तो तपस्व्यांना म्हणाला, 'तपस्वीजनहो, माझी पत्नी जल आणण्यासाठी हातात घडा घेऊन गंगेच्या तटावर गेली. आपण कुणी तिला पाहिलं ?' पण तो निषाद आपल्या पत्नीस पाहू शकला नाही. मात्र त्याला घडा व वस्त्र दिसले. तो करुण वाणीने विलाप करीत म्हणाला,

'अहो, हे पाहा माझ्या स्त्रीचं वस्त्र. हा घडा तिचाच. पण गंगेवर स्नान करण्यासाठी आलेली माझी पत्नी मात्र कुठं दिसत नाही. असं वाटतं की, स्नान करीत असताना एखाद्या नक्रानं तिला पकडलं असावं. अथवा पिशाच, भूत, राक्षस यांच्यापैकी कुणाचा तरी ती आहार बनली असावी. प्रिये, मी तुला कधी अप्रिय भाषण केलं. ? असं वाटतं की, एखाद्या रोगानं ती उन्मत्त होऊन गंगातटावर आली असावी. पूर्वजन्मी मी कोणतं पाप केलं होतं ? ज्यामुळं माझ्यावर हे महान संकट आलं ! माझी पत्नी माझ्या डोळयांदेखत अदृश्य झाली. आता तिचा काहीच पत्ता नाही.

'प्रिये, तू नेहमीच माझ्या चित्तास अनुसरून वागायचीस. सुभगे, तू परत ये ना. पाहा ना. हे बालक भयभीत झालं आहे. इकडं तिकडं भटकत

आहे. सुंदरी, तू या तीन लहान बालकांना पाहा तरी. चारही कन्या आणि सर्व मुलगे आता मोठ्या कष्टानं जगतात. त्यांच्यावर लक्ष दे ना. मलाही तहार भूक सतावते. तुझ्या हे ध्यानात येत नाही ?'

जो ब्राह्मण निषादाच्या पत्निरूपापासून मुक्त झाला होता तो लज्जावश होऊन त्या निषादाला म्हणाला, 'आता तू निघून जावंस. तुझी भार्या इथं नाही. ती आता परत येणार नाही.' पण तो निषाद इकडेतिकडे भटकतच राहिला. तेव्हा त्या ब्राह्मणाचे हृदय करुणेने भरून आले. तो म्हणू लागला, 'आता तू जा. मुलांचं रक्षण कर. आता कष्ट करू नकोस.' हे ऐकून त्या निषादाने मधुर वाणीने म्हटले, 'आपण निश्चयानं मुनींत श्रेष्ठ आहात. धर्मात्म्यांत आपण परम पुरुष आहात. विप्रवरा, म्हणून तर आपण आपल्या वाणीनं माझं सांत्वन करता.' त्या निषादाची अशी वचने ऐकून मुनीच्या मनातही शोक दाटून आला व तो म्हणाला, 'निषादा, तुझे कल्याण असो. आता विलाप बंद कर. मीच तुझी प्रिय पत्नी बनलो होतो. इथंच गंगातटावर स्नान करताच मला हे मुनीचं रूप प्राप्त झालं.'

संन्याशाचे बोलणे ऐकून निषादाचीही चिंता दूर झाली. तो त्या ब्राह्मणास म्हणाला, 'विप्रवर, आपण हे काय म्हणता ? आजपर्यंत अशी घटना कधी झालीच नाही. अशी घटना तर सर्वथा असंभव आहे. स्त्री असून कुणी पुरुष होतो ?' या बोलण्याने ब्राह्मणही मनातून थोडा घाबरला व तो गोड शब्दांत म्हणाला, 'धीवरा, आता या बालकांना घेऊन तू त्वरित आपल्या देशास जा. सर्व मुलांची चांगली काळजी घे.' हे ऐकून तो निषाद तेथून न हलता मधुर वाणीने म्हणाला, 'विप्रवर, आपण असं कोणतं पाप केलं होतं की, आपण स्त्री बनलात ?... आपण पुन्हा पुरुष कसे झालात ?'

त्यानंतर ब्राह्मण म्हणाला, 'मी हरिद्वारला भ्रमण करीत असताना एकदाच भोजन करून जनार्दनांची पूजा करायचो. अनेक धर्मकर्मं मी प्रभूंच्या दर्शनासाठी केली. काही काळानंतर भगवान श्रीहरी माझ्यावर प्रसन्न झाले. त्यांनी वर मागण्यास सांगितलं. मी त्यांची माया दिसावी म्हणून वर मागितला. त्यांनी मायेचा अनुभव घेऊ नको म्हणून

म्हटलं. पण मी आग्रह धरला. त्यानुसार मी कुब्जाम्रक (हृषीकेश)-मध्ये गंगास्नान केलं. त्यानंतर मी कन्या झालो. तुमची पत्नी बनलो. आज मी पुन्हा गंगास्नान केलं आणि मी ऋषी बनलो. मी पन्नास वर्षंपर्यंत तुमच्या घरी राहिलो.'

ब्राह्मणाचे हे बोलणे ऐकून तो निषाद आपल्या मुलांसह तेथून निघून गेला. हे पाहून तो ब्राह्मण चकित झाला व पुन्हा तपस्येत मग्न झाला. केवळ वायूचा आहार घेऊन त्याने तपश्चर्या केली. फुलांनी भगवानांची पूजा केली. गंगेच्या स्नानासाठी आलेले ब्राह्मण त्याला म्हणाले, 'द्विज-वर, आपण आज पुर्वाण्हात आपला दंड, कमंडलू आणि अन्य उपकरणं इथं ठेविली होती. मग आपण इतरत्र गेलात तरी कुठं ? आपणांस एकढा उशीर कसा झाला ?' हे ऐकून तो ब्राह्मण मौन झाला. तो मनाशी विचार करू लागला. 'एकीकडं तर पन्नास वर्षांचा काळ गेला. आणि इथं तर अमावास्याही आजच आहे. हे ब्राह्मण म्हणतात, पूर्वाण्हात तू गेलास व अपराण्हात आलास. इतका उशीर कसा झाला ?'

याच वेळी भगवान वराहांनी त्या ब्राह्मणास दर्शन दिले आणि म्हटले, 'ब्राह्मणा, आता असं घाबरून कसं चालेल ? काय तुम्हीं एखादी विशेष गोष्ट पाहिली ?' हे ऐकताच ब्राह्मणाने आपले मस्तक भूमीवर टेकवून, दु:खी बनून म्हटले, 'जगद्गुरो, या ब्राह्मणांच्या बोलण्याचा अर्थ काय ? माधवा, मी निषादयोनीत कन्यारूपानं उत्पन्न होऊन पन्नास वर्षं काढली. पुन्हा गंगेत स्नान केल्यावर मला हे ब्राह्मणरूप प्राप्त झालं. मी तर आपल्याच सेवेत सदा मग्न आहे. पण पत्ता नाही, मी अशा कोणत्या कर्माचं फल भोगलं ? मी तर केवळ मायेचं दर्शन मागितलं होतं. यात कोणतंही पाप नव्हतं. पण फलस्वरूप मला नरकात जावं लागलं.'

ब्राह्मणाच्या मनाची अशी अवस्था पाहून वराहांनी म्हटले, 'ब्राह्मणश्रेष्ठा, आता तू चिंता करू नकोस. मी तर तुला अन्य वर मागण्यास सांगितलं होतं. पण तु मायादर्शनाची याचना केलीस. द्विज-वर, मी तुला वैष्णवी माया दाखविली. विप्रवर, दिन, अपराण्ह, पन्नास वर्षं व निषादाचं घर; या सर्व बाबी तत्त्वत: नाहीतच. हा सर्व त्या

वैष्णवी मायेचा खेळ आहे. तू कोणतंच अशुभ कर्म केलं नाही. तू आता पश्चात्ताप करीत आहेस, हाही एक मायेचा खेळ आहे. तुझं अर्चन भ्रष्ट झालं नाही की, तपस्या नष्ट झाली नाही. पूर्वजन्मीच्या तुझ्या कर्माचं हे फल आहे. तू पूर्वजन्मी एका ब्राह्मण भक्तास अभिवादन केलं नव्हतंस. त्याचं फल तुला भोगावं लागलं. माझे भक्त हे माझंच रूप आहेत. अशा भक्तांना नमस्कार करून लोक मलाच जाणतात. विशेषत: कलियुगात मी ब्राह्मणांचं रूप धारण करून राहातो. ब्राह्मणा, आता तू सिद्ध झाला आहेस. आता तू तुझ्या स्थानावर जा. तुझा प्राणान्त होईल तेव्हा तुला श्वेतद्वीपाची प्राप्ती होईल.'

असे म्हणून भगवान अंतर्धान पावले. त्या ब्राह्मणाने पुन्हा कठोर तपस्या केली. शेवटी ते स्थान मायापुरी वा हरिद्वार या नावाने प्रसिद्ध झाले. येथेच त्याने शरीरत्याग केला व तो श्वेतद्वीपास गेला. तेथे त्याला भगवानांचे सारूप्य प्राप्त झाले. अशी ही मायापुरीची कथा. ही मोठी पुण्यप्रद व सुखदायी आहे. भक्तांपुढे ही सांगितली तर प्रतिष्ठा वाढते. जो व्रती पुरुष हिचा प्रात:काली पाठ करील, हे आख्यान श्रवण करील, त्याची बुद्धी कधीच मायेने लिप्त होणार नाही. त्याला नि:कृष्ठ योनीत जावे लागणार नाही.

## कुब्जाम्रकतीर्थ (हृषीकेश) माहात्म्य, रैभ्यमुनींची कथा

मायेचा वरील प्रकार ऐकून एकशे सव्विसाव्या अध्यायात पृथ्वीने भगवानांना विचारले, 'भगवन्, आपण 'कुब्जाम्रक'तीर्थाचा उल्लेख केलात. आता त्याचं माहात्म्य सांगावं.' भगवान वराहांनी पृथ्वीस याही तीर्थाचे माहात्म्य समजावून दिले. आदिसत्य युगात जेव्हा पृथ्वी जलमय झाली, तेव्हा ब्रह्मदेवांच्या प्रार्थनेवरून भगवानांनी मधू व कैटभ नावांच्या राक्षसांचा वध करून ब्रह्मदेवांचे रक्षण केले, त्या वेळी त्यांची दृष्टी भक्त रैभ्यमुनींवर गेली. ते अत्यंत निष्ठेने भगवंतांची स्तुति-आराधना नित्य करीत. ते युक्तिमान, गुणी, परमपवित्र, कार्यकुशल व जितेंद्रिय पुरुष होते. वर बाहू करून त्यांनी दहा हजार वर्षांची तपस्या केली. एक हजार वर्षे तर त्यांनी केवळ जल भक्षण केले. पाचशे वर्षे त्यांनी केवळ

शेवाळ खाऊन तप केलं. महात्मा रैभ्यांची ही तपस्या पाहून भगवंतांचे हृदय करुणेने विव्हल झाले. त्यावेळी हरिद्वाराच्या थोड्या उत्तरेस जाऊन त्यांनी एका आम्रवृक्षाचा आश्रय घेतला. ते त्या मुनींची तपस्या पाहात होते. भगवंतांचा आश्रय मिळताच तो आम्रवृक्ष थोडा कुबडा झाला. म्हणून हे स्थान 'कुब्जाम्रक' या नावाने प्रसिद्ध झाले. येथे मरण पावलेली व्यक्ती नारायणस्वरूप बनते.

भगवंतांनी कुबड्या आम्रवृक्षाच्या रूपात रैभ्यमुनींना दर्शन दिले. त्यांनी भगवंतांना ओळखले व ते गुडघे टेकून त्यांची स्तुती करू लागले. या स्तुतीने भगवंत प्रसन्न झाले व त्यांनी मुनींना वर मागण्यास सांगितले. हे ऐकून तपस्वी रैभ्यांनी मधुर वाणीने म्हटले, 'भगवन्, आपण जगाचे स्वामी आहात. आपण याचना करणाऱ्याची इच्छा पूर्ण करता. भगवन्, मधुसूदन, आपण जर माझ्यावर प्रसन्न असाल तर जोपर्यंत हे जगत आहे तोपर्यंत आपला निवास इथं असावा. माझी निष्ठा आपणांवर असावी. प्रभो, माझा हा मनोरथ आपण पूर्ण करावा.'

रैभ्यमुनींचे हे मागणे ऐकून भगवंत त्यांना म्हणाले, 'ब्रह्मर्षे, ठीक आहे. असंच होईल' तेव्हा ते मुनी भगवंतांना म्हणाले, 'प्रभो, आपण या प्रधान तीर्थाचा महिमा सांगण्याची कृपा करावी. याच नव्हे, आणखीही तीर्थांचं माहात्म्य आपण सांगावं.' तेव्हा भगवान म्हणाले, 'ब्रह्मन्, तू म्हणतोस ते मी सांगतो. तत्त्वपूर्वक तू ऐक. माझं 'कुब्जाम्रक'तीर्थ परम पवित्र स्थान आहे. याचं सेवन केलं की, सर्व सुखं सुलभतेनं प्राप्त होतात. हे 'कुब्जाम्रक'तीर्थ कुमुदपुष्पाच्या आकृतीत स्थित आहे. इथं केवळ स्नान करण्यानं मानवास स्वर्ग प्राप्त होतो.' यानंतर कुब्जाम्रकतीर्थाचा महिमा त्यांनी सांगितला.

कुब्जाम्रकतीर्थात दुसरे एक तीर्थ आहे ते 'मानस' या नावानें प्रसिद्ध आहे. तेथे स्नान केल्याने मनुष्यास इंद्राच्या नंदवनाची प्राप्ती होते. अप्सरांसहित देवांच्या एक हजार वर्षेपर्यंत आनंदाचा उपभोग घेता येतो. येथून आणखी एक 'मायातीर्थ' नावाचे स्थान जवळच आहे. याच्या प्रभावाने मायेची माहिती होते. या तीर्थात स्नान करणारा पुरुष दहा हजार वर्षेपर्यंत भगवंतांच्या भक्तीत रमतो. माया-

तीर्थात प्राण सोडणारा महान योग्याप्रमाणे भगवंतांच्या लोकांस जातो.

आणखी एका तीर्थाचे नाव 'सर्वकामिक' असे आहे. वैशाखाच्या द्वादशी तिथीस जो कोणी येथे स्नान करील तो पंधरा हजार वर्षेपर्यंत स्वर्गात निवास करील. या तीर्थात प्राणत्याग केल्यास मनुष्य सर्व आसक्तींतून मुक्त होतो. आणखी एक 'पूर्णमुख' नावाचे तीर्थ आहे. गंगेचे जल सर्वत्र शीतल असते. पण ते जेथे उष्ण मिळेल ते पूर्णमुखतीर्थ होय. येथे स्नान केल्याने मनुष्य चंद्रलोकात प्रतिष्ठित होतो. पंधरा हजार वर्षांपर्यंत त्याला चंद्रदर्शनाचा आनंद मिळतो. स्वर्गातून आल्यावर त्याला ब्राह्मणाचा जन्म मिळतो. तो परमात्म्याचा परम भक्त होतो.

येथेच 'करवीर' नावाचे सर्व लोकांना सुख देणारे तीर्थ आहे. माघ शुक्ल द्वादशीस मध्यान्हकाली या करवीरतीर्थात कण्हेरीची फुले उमलतात. या तीर्थात स्नान करणारा मनुष्य स्वतंत्रतापूर्वक सर्वत्र अव्याहत गमन करण्यास समर्थ होतो. या द्वादशीस एखाद्याचा मृत्यू झाल्यास त्याला ब्रह्मदेव, रुद्र आणि नारायण यांच्या दर्शनाचे फल प्राप्त होते. आणखी एक तीर्थ 'पुंडरीक' या नावाचे आहे. ते महान फल देणारे आहे. द्वादशीतिथीस तेथे मध्यान्हकाली रथाच्या चाकाच्या आकृती-सारखा एक कासव निघते. येथे अवगाहन केले तर 'पुंडरीकयज्ञाचे' अनुष्टान केल्याचे फल मिळते.

'कुब्जाम्रक' तीर्थातच आणखी एक तीर्थ आहे. त्याचे नाव 'अग्नितीर्थ.' हेमंत ऋतूत येथील जल उष्ण असते. ग्रीष्मात शीतल होते. यामुळे याचे नाव अग्नितीर्थ पडले आहे. येथेच 'वायव्यतीर्थ' आहे. या तीर्थात जो स्नान करतो, तर्पण करतो, त्याला वाजपेय यज्ञाचे फल प्राप्त होते. हे वायव्यतीर्थ एका सरोवराच्या रूपात आहे. येथे केवळ पंधरा दिवस राहून उपासना केली तर या पृथ्वीवर पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. येथील वनात पिंपळाचे वृक्ष आहेत. येथेच 'शक्रतीर्थ' आहे. इंद्राच्या हातातील वज्राप्रमाणे ते शोभून दिसते. या तीर्थात दहा रात्री उपवास केल्यास, येथे मृत्यू आल्यास भगवंताच्या लोकाची प्राप्ती होते. या शक्रतीर्थाच्या दक्षिणेस पाच वृक्ष उभे आहेत.

वरुणदेवानें बारा हजार वर्षेपर्यंत या 'कुब्जाम्रक'तीर्थात तपस्या केली होती.

येथेच 'सप्तसामुद्रक' नावाचे एक श्रेष्ठ स्थान आहे. या क्षेत्रात स्नान केल्याने मनुष्यास तीन अश्वमेधयज्ञांचे फल मिळते. या तीर्थात वैशाख मासाच्या शुक्लपक्षाच्या द्वादशीस एक विशेष चमत्कार दृष्टीस पडतो. या दिवशी गंगेचे जल कधी दुधासारखे उज्ज्वल रंगाचे दिसते, तर कधी त्यास पिवळचा रंगाची छटा चढते. कधी लाल तर कधी मरकतमण्याच्या रंगाचे दिसते. येथेच आणखी एक 'मानससरोवर' नावाचे तीर्थ आहे. या तीर्थात स्नान केल्याने मानससरोवरास जाण्याचे सौभाग्य प्राप्त होते. येथे इंद्र, रुद्र, मरुद्गण आदी सर्व देवांचे दर्शन होते. येथे जर मनुष्य तीस रात्री राहून मरण पावेल तर मुक्ती प्राप्त होते. हे तीर्थ पन्नास कोसांच्या विस्ताराचे आहे.

या 'कुब्जाम्रक'तीर्थात एक मोठी अद्भुत घटना झाली. भगवंतांच्या भोगाची सामग्री जेथे होती तेथे एक सर्पिण निर्भय होऊन निवास करीत होती. ती आपल्या इच्छेने चंदन, माळा, पूजासामग्री खात असे. एवढचात तेथे एक मुंगूस आले. स्वच्छंदात विहार करणाऱ्या त्या सर्पिणीस त्याने पाहिले. ते मुंगूस व सर्पिणी यांचे भयंकर युद्ध झाले. तो दिवस माघातील द्वादशीचा होता. दुपारचा समय. हा संघर्ष भगवंताच्या मंदिरातच चालला होता. शेवटी सर्पिणी मुंगसास चावली. विषदग्ध मुंगसानेही त्या सर्पिणीस त्वरित मारून टाकले. आता ती नागीण प्राग्ज्योतिषपुराच्या राजाच्या घरी एका राजकुमारीच्या रूपात अवतीर्ण झाली. कोसल देशात ते मुंगूस राजाच्या घरी राजकुमार म्हणून जन्मास आले. तो मोठा रूपवान, गुणवान व सर्व शास्त्रांचा ज्ञाता, सर्व कलांनी युक्त होता.

ती कन्या जर एखाद्या मुंगसास पाहिले तर त्वरित त्याला मारण्यास धावत असे. राजकुमारही एखादी नागीण वा सर्पिण दिसली की तिला मारण्यास तत्पर होत असे. भगवंतांच्या कृपेने कोसल-देशाच्या राजकुमाराचे लग्न त्या कन्येशी झाले. इंद्र व शची यांच्या-

प्रमाणे ते नंदनवनात विहार करू लागले. उपवनात ते आनंदाने एकदा विहार करीत होते. अशी सत्याहत्तर वर्षे झाली. मायेमुळे कोणी कोणास ओळखले नाही. एकदा राजकुमाराची दृष्टी एका सर्पिणीवर गेली. तो तिला मारण्यासाठी सिद्ध झाला. राजकुमारीने प्रतिकार केला तरी तो न जुमानता त्याने त्या सर्पिणीस मारले. तेव्हा राजकुमारीच्या मनात रोष उत्पन्न झाला. पण ती काही बोलली नाही. त्या वेळी राजकुमारीने एका मुंगसास पाहिले. मुंगसाचे दर्शन शुभकारक असते. पण क्रोधवश होऊन राजकुमारी त्यास मारू लागली. राजकुमाराने प्रतिकार केला. तरी प्राग्ज्योतिषपुरनरेशाच्या त्या पुत्रीने शुभ दर्शन देणाऱ्या त्या मुंगसास मारले.

यामुळे राजकुमारास फारच क्रोध आला व त्यानें म्हटले, 'देवी, स्त्रियांसाठी पती नेहमीच आदरास पात्र असतो. मी तुझा पती. पण तू माझी आज्ञा मानली नाहीस. हे मुंगूस मंगलमय, शुभदर्शक आणि राजांची प्रिय वस्तू होती. याचं दर्शन शुभकारक असतं. सांग, तू या मुंगसास मी नको म्हणत असतानाही का मारलंस ?' तेव्हा ती राजकुमारी रागातच म्हणाली, 'मी प्रतिकार केला, तरी आपण त्या सर्पिणीस मारलंत. म्हणून मी मुंगसास मारलं.' तेव्हा राजकुमार कठोर शब्दांत म्हणाला, 'भद्रे, सापाचे दात मोठे तीक्ष्ण असतात. त्याचं विष मोठं तीव्र असतं. हा दुष्ट प्राणी मनुष्यास चावतो, म्हणून मी या विषारी प्राण्यास मारलं. प्रजेचं रक्षण करणं हे राजाचं एक कर्तव्यच आहे. पण या मुंगसाचा अपराध तरी कोणता ? याचं रूप सुंदर होतं. या पवित्र प्राण्यास तू मारलंत ? म्हणून मी आता तुझा पती नाही की तू माझी पत्नी नाहीस. स्त्री अवध्य असल्यानं मी तुझा त्याग केला आहे.'

इतके म्हणून राजकुमार नगरास आला. क्रोधामुळे त्यांच्यातील स्नेह नष्ट झाला होता. हळुहळू ही गोष्ट कोसलनरेशास समजली. त्याने राजकुमारास व त्याच्या वधूस बोलावून घेतले. राजाने म्हटले, 'पुत्रा, तुमच्यांतील अपूर्व व अकृत्रिम स्नेह गेला कुठं ? तुम्ही आता इतके विरुद्ध का वागता ? ही राजकुमारी कार्यकुशल, सुंदर स्वभावाची व

धर्मनिष्ठ आहे. ही कधी अप्रिय वचन बोलत नाही. तू हिचा त्याग का केलास ? तू राजा आहेस. राजधर्म स्त्रीच्या साहचर्याखेरीज पार पडत नाही. स्त्रियांमुळंच पुत्राचं व कुलाचं रक्षण होतं, हेही खरंच आहे.'

आपल्या पित्याचे बोलणे आदरपूर्वक ऐकून, त्यांचे चरण पकडून राजपुत्र म्हणाला, ' पिताजी, आपल्या पुत्रवधूत दोष नाही. पण मी नको म्हणत असताना हिनं एका मुंगसास मारलं. म्हणून मला राग आला व मी हिचा संबंध सोडून दिला. यानंतर वधूनेही आपल्या श्वशुराच्या चरणांना प्रणाम करून म्हटले, ' यांनी एका सर्पिणीस मारलं. तिचा कोणताच अपराध नव्हता. ती अत्यंत भयभीत होती. मी नको म्हणत असतानाही यांनी तिला मारलं. तिचा मृत्यू पाहून मला मोठं दुःख झालं.'

दोघांचे बोलणे ऐकून कोसलनरेशाने सभेत म्हटले, ' पुत्री, या राजकुमारानं सर्पिणीस मारलं, तू मुंगसास मारलंस. मग तुमच्यांत एवढा क्रोध कसा निर्माण झाला ? पुत्रा, मुंगसास मारण्यानं तुला रागावण्याचं कारण काय ? राजकुमारी, सर्पिण मरण पावली तर तुला एवढा क्रोध का आला ?' पित्याचे हे बोलणे ऐकून राजकुमाराने मधुर स्वरात म्हटले, ' महाराज, आपणांस या प्रश्नाचं प्रयोजन काय आहे ? आपण या राजकुमारीस विचारा ना.' तेव्हा राजा म्हणाला, ' पुत्रा, सांग. तुमच्या दोघात असा स्नेह–विच्छेद का झाला ? पित्यानं विचारूनही पुत्रानं उत्तर दिलं नाही तर ते पाप रौरवनरकात घालविणारं असतं, पुत्रा, या गुणशालिनी पत्नीचा तू त्याग का केलास ?' तेव्हा तो राजकुमार ' उद्या मी सर्व सांगीन ' असे म्हणाला.

रात्र समाप्त होताच प्रातःकाली दुंदुभीच्या शब्दांनी सूत, मागध, बंदीजन यांच्या मदतीने कोसलनरेश जागा झाला. एवढ्यात कमलांप्रमाणे डोळे असलेला महान यशस्वी राजकुमार स्नान करून, मंगलद्रव्यांसहित राजद्वारावर उपस्थित झाला. द्वारपालाने राजास सूचना दिली, 'महाराज, आपल्या दर्शनासाठी राजकुमार दाराशी उभा आहे. राजाने त्यास येण्याची अनुमती दिली. विनीत व शुभहृदय राजकुमाराने राजाच्या चरणांना प्रणाम केला. पित्याने राजकुमारास दीर्घा-

युषी होण्याचा आशीर्वाद दिला. तो आपल्या पुत्रास म्हणाला, 'पुत्रा, काल म्हणाला होतास ते आता सांग.'

'महाराज, हे सांगून काही चांगलं फळ प्राप्त होणार नाही. पण आपणांस जर ऐकायचं असेल तर आपण माझ्याबरोबर 'कुब्जाम्रक'-तीर्थासि चलण्याची कृपा करावी. तिथं आपणांस सर्व काही सांगीन.'

'पुत्रा, ठीक आहे.'

ठरल्याप्रमाणे हत्ती, घोडे, रथ, सर्व स्त्रिया यांच्यासह राजा त्या तीर्थास गेला. सर्व नियमांचे पालन करून त्याने अन्न-वस्त्र, सुवर्ण, हत्ती, घोडे, पृथ्वी इत्यादींची दाने दिली आणि एकदा राजाने विचारले, 'वत्सा, आता ती गोपनीय गोष्ट सांग ना. तू माझ्या निर्दोष व सुंदर पुत्रवधूचा परित्याग का केलास?' त्यावर राजकुमार म्हणाला, 'या वेळी आपण झोप घ्यावी. सकाळी मी आपणांस सर्व हकीगत सांगीन.'

रात्र संपल्यावर सकाळ झाली. राजकुमाराने गंगास्नान करून रेशमी वस्त्र धारण करून भगवंतांची पूजा केली. त्या गुरुवत्सल राजकुमाराने पित्यास प्रदक्षिणा घातली. तो म्हणाला, 'पिताजी, चला. आपण माझ्यावरोबर चलावं.' यानंतर राजा, राजकुमार, कमलांप्रमाणे नेत्रांची राजकुमारी असे सर्व त्या निर्माल्यकूटापाशी आले. त्याच ठिकाणी पूर्वी एक घटना घडली होती. त्या स्थानी पोचल्यावर आपल्या पित्याचे दोनही चरण पकडून राजपुत्र म्हणाला,

'महाराज, मी पूर्वजन्मी एक मुंगूस होतो. इथून जवळच एका वृक्षाखाली माझा निवास होता. एकदा मी या निर्माल्यकूटापाशी आलो. इथंच सुगंधित द्रव्यं व विविध पुष्पं खाणारी एक सर्पिण हिंडत होती. तिला पाहून मला क्रोध आला. मी तिच्यावर आक्रमण केलं. तिच्याशी माझं भयंकर युद्ध झालं. त्या दिवशी माघातील द्वादशी तिथी होती. त्या सर्पिणीनं माझ्या नाकास दंश केला. त्यानंतर मीही त्या सर्पिणीस मारून टाकलं. आम्हा दोघांना असा मृत्यू आला. यानंतर मी आपल्या घरी राजपुत्र म्हणून जन्मास आलो. राजन्, या कारणानं मी क्रोधवश बनून त्या सर्पिणीस मारलं.'

राजकुमाराचे बोलणे संपल्यावर राजकुमारी म्हणाली, 'महाराज,

मी पूर्वजन्मी याच निर्माल्यकूटात राहणारी सर्पिणी होते. मृत्यूनंतर मी प्राग्ज्योतिषनरेशाच्या घरी कन्येच्या रूपात जन्म घेतला. आणि आपली पुत्रवधू झाले. राजन्, या क्रोधानं मी त्या मुंगसास मारलं. हेच ते गोपनीय रहस्य.'

पुत्र व पुत्रवधू यांचे बोलणे ऐकून राजा निर्विण्ण झाला. त्याचा अंत 'मायातीर्थां'त झाला. त्या राजकुमारीने व राजकुमारानेही 'पुंडरीक-तीर्थात जाऊन, मनाचा निग्रह करून प्राणांचा त्याग केला. ते श्रेष्ठ स्थानास, भगवान जनार्दनांच्या जवळ गेले. असा हा 'कुब्जाम्रक'-तीर्थाचा महिमा. भगवान वराहांनी हा सर्व ब्राह्मणश्रेष्ठ रैभ्यमुनींना सांगितला. प्रातःकाली उठून तो याचा पाठ करील, जो आपल्या कुलाच्या मागच्या, पुढच्या दहा पिढ्यांचा उद्धार करतो.

## वराहक्षेत्राचा महिमा, गिधाड व शृगाली (कोल्ही)

पृथ्वीने यानंतर भगवान वराहांना अन्य काही तीर्थक्षेत्रांची माहिती विचारली. कोकामुख, कुब्जाम्रक, सौकरव (वराहक्षेत्र) इत्यादी श्रेष्ठ स्थानांचा महिमा त्यांनी तिला निवेदन केला. वराहक्षेत्राचा महिमा त्यांनी तिला समजावून दिला. या क्षेत्राच्या दर्शनाने श्रेष्ठ प्रकारचे पुण्य प्राप्त होते. येथे मृत्यू आल्यास मागच्या–पुढच्या दहा पिढ्यांचा उद्धार होतो. तेथे जाण्याने, भगवंतांचे दर्शन घेण्याने सात जन्मपर्यंत पुरुष धनधान्यांनी समृद्ध बनून श्रेष्ठ कुलात जन्मतो. तो रूपवान, गुणवान व परमात्म्याचा भक्त बनतो. जो मनुष्य वराहक्षेत्रात प्राणांचा त्याग करतो, तो शंख, चक्र, गदा आदी आयुधांनी विभूषित होतो व चतुर्भुजरूप धारण करून श्वेतद्वीपास जातो. येथेच चक्रतीर्थ असून यात स्नान केल्यास अकरा हजार वर्षांपर्यंत विख्यात कुलात जन्म पावून मनुष्य धनधान्याने संपन्न होतो.

पृथ्वीने विचारले, 'भगवन्, असं ऐकलं आहे की, या वराहतीर्थात चंद्रानं आपली उपासना केली. आपण हा प्रसंग विस्तारानं सांगावा.' तेव्हा भगवान म्हणाले, 'देवी, चंद्र हा मला स्वभावतः प्रिय आहे. तप केल्यानंतर मी त्याला देव-दुर्लभ दर्शन दिलं. पण माझं ते रूप त्याला

सहन झालं नाही. तो अचेत झाला. मला पाहाण्याची शक्तीच त्याला उरली नाही. त्यानं डोळे मिटून घेतले. घाबरून तो काही बोलू शकला नाही. तेव्हा मी त्याला म्हटलं, 'परम तपस्वी सोमा, तू तप कशासाठी करीत आहेस ? मी तुझ्यावर प्रसन्न आहे. तुला सर्व काही प्राप्त होईल.' भगवान वराह असे म्हणाल्यावर 'सोमतीर्था'त स्थित असलेला चंद्रमा म्हणाला,

'भगवन्, आपण योग्यांचे स्वामी आहात. जगतात सर्वांत श्रेष्ठ आहात. आपण जर माझ्यावर प्रसन्न झाला असाल तर कृपा करून आपण इथंच निवास करावा. मी इथंच राहीन. माझी आपणांवर निश्चल व अतुल श्रद्धा व भक्ती आहे. यज्ञांत ब्राह्मणसमुदाय माझ्या नावाचा प्रसिद्ध सोमरस पिऊ लागतील. प्रभो, त्याच्या प्रभावानं त्यांना एक परम दिव्य अशी गती प्राप्त होईल. अमावास्येस मला क्षीणता येईल. त्या वेळी पितरांना पिंड दिला जाईल. पौर्णिमेस मी पुनः सुंदर बनीन. अधर्मात माझी बुद्धी कधीच रमणार नाही. मी औषधींचा स्वामी बनीन. महादेव, आपण मला आनंदित करण्यासाठी एखादा वर द्यावा.'

चंद्रास त्याच्या मनासारखा वर देऊन देव अंतर्धान पावले. चंद्राने तेथे एका पायावर उभे राहून पांच हजार वर्षे तप केले होते. ते 'सोमतीर्थ' या नावाने विख्यात झाले. या तीर्थात स्नान करून जो प्रतिदिन दिनाच्या आठव्या भागात भोजन करून उपासना करील, त्य.ला पस्तीस हजार वर्षेपर्यंत ब्राह्मणाचे शरीर प्राप्त होईल. तो वेद-वेदांगांचा पारगामी विद्वान होईल. तो धनवान, गुणवान, दानी व निर्दोष भ.त्त होईल. संसारसागर तरून जाईल. वैशाख शुद्ध द्वादशीस चंद्राचा अस्त झाल्यावर अंधारात एक चंद्रिका दिसेल, तेच सोमतीर्थ समजावे. ही एक आश्चर्याची बाब आहे की, चंद्राचा प्रकाश दिसतो, पण स्वतः चंद्र मात्र दृष्टीस पडत नाही. हेच परम पवित्र सौकरवतीर्थं आणि सोमतीर्थ.

याच ठिकाणी एक शृगाली (कोल्हीण) राहात होती. पूर्वकर्मवश दैवयोगाने ही मरण पावल्यावर या क्षेत्राच्या प्रभावाने पुढल्या जन्मी

गुणवती, रूपवती व चौसष्ट कलांत संपन्न अशी श्यामा* सर्वांगसुंदरी राजाची पुत्री झाली. याच सोमतीर्थाच्या पूर्वभागात 'गृध्रवट' नावाचे एक प्रसिद्ध तीर्थ आहे. तेथे एका गिधाडाचा मृत्यू झाला. त्याला कोणतीच कामना नव्हती, पण त्याला मनुष्याचा जन्म आला.

यासंबंधी सर्व वृत्तांत वराहांनी पृथ्वीस सांगितला. धर्मप्रधान सत्ययुगानंतर त्रेतायुगाचा प्रारंभ झाला. त्यावेळी कांपिल्यनगरात§ ब्रह्मदत्त ¶ नावाचा एक धर्मनिष्ठ राजा राहात होता. त्याचा एक सर्वलक्षण संपन्न असा पुत्र सोमदत्त नावाचा होता. एकदा तो पितरांच्या उद्देशाने मृगांचा शोध घेत घेत शिकारीसाठी वाघ व सिंह यांनी भरलेल्या अरण्यात गेला. पण त्याला पितृकार्यासाठी उपयुक्त अशी वस्तूच दिसली नाही. तो इकडे-तिकडे फिरत होता. त्याच्या उजव्या बाजूने एक कोल्हीण आली. ती मृगावर सोडलेल्या बाणाने विद्ध झाली. व्यथेने तडफडू लागली. या तीर्थातील जल पिऊन ती एका शाखोट (सागाच्या) वृक्षाखाली पडली. तिचे प्राण या सोमतीर्थातच गेले.

याच वेळी सोमदत्तही तहानभुकेने पीडित बनून या गृध्रवट नावाच्या तीर्थावर येऊन पोचला. विश्राम करण्यासाठी तो तेथे थांबला. इतक्यात त्या वडाच्या फांदीवर एक गिधाड बसलेले त्याने पाहिले. त्याने त्यालाही एक बाण मारला. तो पक्षी वृक्षावरून खाली पडला. हृदयास बाण लागल्यामुळे त्याचे प्राणपाखरू उडून गेले. त्या गिधाडास बघून

---

* सुवर्णाच्या रंगाची अत्यंत दीप्तिमती गौरवर्णीय स्त्री श्यामा असते. 'श्यामा गुणवती गौरी दिव्यालंकारभूषिता । चतुरा शीलसम्पन्ना चित्तेनारुधन्ती समा' (पुरुषोत्तममासमाहात्म्य. ३.४५) अथवा 'तप्तकाञ्चनवर्णाभां सा स्त्री श्यामेति कथ्यते.'

§ कांपिल्यनगरी फर्रुखाबाद जिल्ह्यात कायमजंगाहून सहा मैल, फत्तेगडापासून २८ मैल पूर्वोत्तर गंगातटावर आहे. येथेच राजा द्रुपदाची राजधानी होती. द्रौपदीचे स्वयंवर येथेच झाले.

¶ ब्रह्मदत्ताचे चरित्र वाल्मीकिरामायणाच्या बालकांडात, मत्स्यपुराणाच्या १९-२१ अध्यायांत आले आहे. हरिवंश १२.२–२५, शिवपुराण, उमासंहिता ४१ आणि अन्य पुराणांतही हे चरित्र आले आहे.

राजकुमाराच्या मनास मोठी प्रसन्नता वाटली. बाणांना पिसे लावण्यासाठी त्याने त्या गिधाडाचे पंख कापले व ते घेऊन तो घरी गेला, पण या तीर्थावर गिधाडास मृत्यू आल्यामुळे तो कालांतराने कलिंगनरेशाच्या घरी रूपवान, विद्वान व गुणसंपन्न राजपुत्र झाला.

येथे जी शृगाली मरण पावली होती ती कांचीनरेशाच्या घरी राजपुत्री म्हणून जन्मास आली. ती सुंदर, श्यामा, गुणवान व कार्यकुशल होती. तिचा स्वर कोकिळ पक्ष्याप्रमाणे मधुर व सुखदायी होता. कांचीनरेश व कलिंगनरेश यांची प्रीती वाढली व कांची नरेशाची कन्या व कलिंगराजाचा पुत्र यांचा विधिपूर्वक विवाह झाला. कांचीनरेशाने वरपक्षास अनेक रत्ने, आभूषणे, हत्ती, घोडे, दासदासी भेट म्हणून देऊन आनंद केला. कलिंगराजाने वधूसह आपल्या पुत्रास घेऊन आपल्या राजधानीस प्रयाण केले.

विवाहानंतर दंपती प्रेमाने राहात असताना काही वर्षे गेली. त्यांची प्रीती रोहिणी आणि चंद्र यांच्याप्रमाणे निरंतर वाढत होती. वनांत, उपवनांत क्रीडा करून ते आनंदपूर्वक विहार करीत. एकदा त्या राजकुमारीने राजकुमाराशी वार्तालाप करीत असताना म्हटले की, 'मी आपणांस एक रहस्य विचारिते. जर आपला खरा स्नेह असेल तर आपण मला कृपा करून ते रहस्य सांगा.' राजकुमार पत्नीस म्हणाला, 'भद्रे, मी सत्याची शपथ घेऊन सांगतो की, मी तुझ्या मनाची अभिलाषा पूर्ण करण्याचा प्रयत्न अवश्य करीन. देवी, सत्याच्या आधारावर तर हे विश्व उभं आहे. सत्य हेच भगवंताचं रूप आहे. तपस्येचं मूल सत्यच आहे. सत्यावरच आपलं राज्य टिकून आहे. मी कधीही खोटं बोलणार नाही. सांग, मी तुझं कोणतं कार्य करू? हत्ती, घोडे, रथ, रत्नं धन, शिरोमुकुट; इत्यादी मी तुला देऊ?'

यानंतर कांचीनरेशाची कन्या आपल्या पतिदेवाचे चरण पकडून म्हणाली, 'पतिदेव, मी रत्नं, हत्ती, घोडे, रथ यांतील काहीच मागत नाही. मध्यान्हकाली मी एकान्तात निश्चिंतपणानं झोपू शकेन अशी आपण व्यवस्था करावी. मी जितका वेळ झोप घेईन, त्यावेळी श्वशुर, सासू, इतर कुणी यांनी मला पाहू नये.' हे ऐकून कलिंगदेशाच्या

राजकुमाराने म्हटले, 'तू विश्वास ठेव. झोपलेली असताना तुला कुणीही पाहाणार नाही.'

काही काळानंतर कलिंगनरेशाने राजकुमारास राज्यावर अभिषिक्त केले. त्यानंतर त्या नरेशाचा मृत्यू झाला. राजकुमाराचा कारभार विधिपूर्वक सुरू झाला. राजकुमारी ज्या स्थानी झोपायची तेथे कोणीच जात नसे. यथासमय राजकुमारास सूर्याप्रमाणे तेजस्वी असे पांच पुत्र झाले. राजकुमाराने सत्त्याहत्तर वर्षे निष्कंटक राज्य केले. अठ्याहत्तराव्या वर्षी तो एकांतात वसून विचार करू लागला. त्या दिवशी माघमासाची शुक्ल पक्षाची द्वादशी तिथी होती. त्याला वाटले, आपण आपल्या पत्नीस पाहावे. ती एकांतात कोणाची अर्चना करते ? तिचे कोणते व्रत आहे ? निर्जनस्थानात झोपून ती करते तरी काय ? स्त्रीने झोप घेताना व्रत करावे, असे तर कोठें ऐकले नाही. मनूनेही अशा धर्माचा उल्लेख केला नाही. वृहस्पती व धर्मराज यांच्या शास्त्रांतही याचा उल्लेख नाही. पण तिला आपण या अवस्थेत पाहिले तर ती रागावेल, असेही त्याला वाटले. पण ती व्रत तरी कोणते करते ? या इच्छेने राजकुमाराने तिला पाहाण्याचा विचार केला. किन्नरांनी सांगितले आहे की, वशीकरणमंत्राने स्त्री योगीश्वरी वनून वाटेल तेथे जाऊ शकते. अशी शक्ती तिला प्राप्त झाली काय ?

राजकुमार असा विचार करीत असतानाच सूर्य अस्तास गेला. सर्वांना विश्रांती देणारी भगवती रात्र आली. नंतर मंगलमय प्रभातकालचा उदय झाला. मागध, वंदीगण, सूत व वैतालिक यांनी राजाची स्तुती केली. शंख व दुंदुभी यांच्या ध्वनींनी त्याच्या निद्रेचा भंग झाला. अखिल लोकनायक भगवान भास्कराचा उदय झाला. राजकुमाराने विधिपूर्वक स्नान करून रेशमी वस्त्र परिधान केले, त्याने सर्वांना दूर करून म्हटले, 'मी एका व्रतात दीक्षित झालो आहे. म्हणून कोणत्याही स्त्रीनं अथवा पुरुषानं मला स्पर्श करू नये, नाही तर दंडविधानाच्या अनुसार माझा वध होईल.'

कलिंगनरेश या प्रकारे बोलून शीघ्रता पूर्वक राजकुमारीच्या भवनात गेला. त्याने आपल्या स्त्रीस पाहिले. ती पलंगाखाली आसनावर

बसली होती. आपल्या मनात ती इष्टदेवाचे चिंतन करीत होती. तिच्या शिरात मात्र दुःख होत होते. राजकुमारी म्हणत होती, 'मी पूर्वजन्मी असं कोणतं दुष्कर्म केलं आहे, ज्यामुळं माझी अशी दयनीय अवस्था झाली आहे? मी अनाथाप्रमाणं क्लेश सहन करीत आहे. माझ्या पतिदेवांनाही याचा पत्ता नाही. माझं व्रत सर्व प्रकारांनी विकृतच म्हटलं जाईल. माझं सौभाग्य प्रकट होईल. जेव्हा मी कधी तरी सौकरवक्षेत्रास जाईन. माझ्या हृदयातील रहस्य मी माझ्या पतीस सांगीन.'

कलिंगनरेश आपल्या पत्नीचे बोलणे ऐकत होता. त्याने तिचे दोनही हात पकडून म्हटल, 'भद्रे, तू हे काय करीत आहेस? तू स्वतःलाच असा दोष का लावतेस? तू प्रारब्धाच्या गोष्टी कशासाठी करतेस? तुला एक महान शिरोरोग आहे. तो बरा करण्यासाठी तुला अष्टांगकुशल वैद्य मिळत नाही का ? वायू, कफ, पित्त आदी रोगांनी तुला संनिपात झाला आहे. तुला पित्ताचा प्रकोप झालेला दिसतो. तू व्रताच्या निमित्तानं असे क्लेश का भोगतेस? तू म्हणतेस 'सौकरवक्षेत्रात जाऊ.' असं का म्हणतेस? तिथं विशेष असं काय आहे?'

हे सर्व ऐकून राज कुमारीस संकोच वाटला. ती दुःखाने पीडित झाली होती. ती स्वामीचे चरण पकडून म्हणाली, 'महाराज, आपण माझ्यावर प्रसन्न व्हावं. माझा वृत्तांत जन्मान्तरीय कर्मांशी संबंधित आहे.' तेव्हा तो म्हणाला, 'देवी, माझ्यासमोर गोपनीय असं काय आहे? तू सर्व काही सांग ना.' पतीचे बोलणे ऐकून तिचे डोळे आश्चर्याने भरून आले. ती मधुर वाणीने म्हणाली, 'प्राणनाथ, शास्त्रांना अनुसरून पतीच स्त्रीचा स्वामी आहे. तोच धर्म, अर्थ व सर्वस्व आहे. पतीच तिचा परमात्मा आहे. आपण जे विचारता ते सर्व मी सांगितलं पाहिजे. पण माझ्या मनातील सांगण्यास मी असमर्थ आहे. महाराज, हे दुःख माझ्या शरीरापासून दूर होणं असंभव आहे. आपण सदा सुखात वेळ घालविता. ही तर चांगलीच गोष्ट आहे. स्वामी, माझ्यासारख्या अनेक स्त्रिया अंतःपुरात आहेत. त्यांना आपण विविध प्रकारचं अन्न व उत्तम भूषणं देता. त्या आपली सेवाही करतात. मग माझ्याशी काय तात्पर्य ? राजन्, आपण हत्ती, रथ, घोडे यांवर बसून यात्रा करता हे ठीक आहे. पण आपण मला आता अधिक

विचारू नये. आपण माझे इष्ट देव आहात. गुरू आहात. साक्षात सनातन यज्ञपुरुष आहात. माझ्यासाठी आपणच धर्म, अर्थ, काम, यश, स्वर्ग, सर्व काही आहात. सत्य बोलणं, हा सर्व पतिव्रतांचा धर्म आहे. पण आपण माझ्या पीडेसंबंधी आता विचारू नये.'

हे सर्व ऐकून कलिंगनरेशाने मधुर वाणीने म्हटले, 'देवी, मी तुझा पती आहे. असं असताना मी विचारीन तेव्हा तू शुभ असो, अशुभ असो, मला सर्व सांगितलं पाहिजेस. धर्माच्या मार्गावर असलेल्या पतिव्रतेनं गुप्त गोष्ट पतीसमोर प्रकट करावी. जी पत्नी पतीपासून एखादी बाब लपविते तिला सती म्हणत नाहीत. यशस्विनी, तू तुझी गुप्त बाब मला सांग.' तेव्हा ती म्हणाली, 'प्राणनाथ, राजा, देव, गुरू व ईश्वरासारखा पूज्य आहे. महाराज, ऐकावं. माझं कार्य तसं फार गुप्त नाही. तरी मी आपणांस प्रार्थना करते, स्वामी, आपण आपल्या राज्यावर आपल्या ज्येष्ठ राजकुमारास बसवावं. आपल्या कुलास अनुसरून हे होईल आणि आपण माझ्याबरोबर सौकरव(वराह)क्षेत्रास येण्याची कृपा करावी.'

पत्नीच्या या बाबीस कलिंगनरेशाने अनुमती दिली. तो म्हणाला, 'सुंदरी, तू सांगतेस त्याप्रमाणं मी ज्येष्ठ पुत्रास राज्यावर बसवितो.' असे म्हणून मंत्र्यांना सांगून राज्यभिषेकाची तयारी केली. पुत्रास यथोचित उपदेश केला. मंत्र्यांना नीट समजावून सांगितले. आणि तो कलिंगनरेश सौकरव( वराह )क्षेत्रास जाण्यासाठी तयार झाला. त्याच्या बरोबर अनेक स्त्री-पुत्र हत्ती, घोडे, रथ यांवर बसून निघाले.

यानंतर कलिंगनरेश 'सौकरव'तीर्थास पोचला. तेथे त्याने धनधान्याचे दान केले. नंतर राजाने आपल्या राणीला विचारले, 'सुंदरी, आज माझ्या जीवनास हजार वर्षं पूर्ण झाली. आता तू मला तुझी परम गोपनीय गोष्ट सांग.' यावर ती राणी राजाचे दोन्हीही चरण पकडून म्हणाली, 'महाभाग, आपण मला ती गोष्ट विचारीत आहात ती मी आपणांस तीन रात्रींचा उपवास केल्यानंतर सांगीन.' राजाने ही अट कबूल केली. दंपतीने तीन रात्र उपवास करून भगवान विष्णूंना प्रणाम केला. राजकुमारीने आपले अलंकार अंगावरून उतरविले आणि

विष्णुवराहांना अर्पण केले. ती नरेशास म्हणाली, ‘ यावं. नाथ, आपण दोघं एकान्तात जाऊ. आपणांस मी गोपनीय बाब सांगते. ’

त्यानंतर कलिंगनरेश व कांचीराजकुमारी एकान्तस्थानात गेले. राजकुमारीने तेथे म्हटले, ‘राजन्, मी पूर्वजन्मी एक शृगाली होते. माझा जन्म तिर्यक्- योनीत झाला होता. मृगांच्या मागं लागून सोमदत्त नावाच्या राजकुमारानं बाण सोडून मला विद्ध केलं. त्या बाणाचं तीव्र चिन्ह अजूनही माझ्या शिरावर आहे. आपण ते पाहाण्याची कृपा करावी. या दोषानं माझ्या डोक्यात नेहमी वेदना होतात. त्यानंतर कांचीनरेशाच्या कुलात माझा जन्म झाला. संयोगवश मी आपली पत्नी बनले. सौकरवक्षेत्राच्या प्रभावानं अशी सिद्धी मला प्राप्त झाली. प्राणनाथ, आपणांस प्रणाम असो.’ इतके म्हणून ती गप्प झाली.

आता राजकुमारासही आपल्या पूर्वजन्माची स्मृती आली. तो म्हणाला, ‘ महाभागे, पाहा. मीही पूर्वजन्मी एक गिधाड होतो. त्याच सोमदत्तानं बाणानं माझा वध केला. या तीर्थाच्या प्रभावानं माझाही जन्म कलिंगदेशाच्या राजाच्या पोटी झाला. मी त्या राज्याचा अधिकारी झालो. सुशोभने, आज माझ्या हातात सिद्धीही आली आहे.’

ही सर्व भाषणे ऐकून तेथे जमलेले सर्व लोक, प्रेमी भक्त हानि-लाभाचा विचार सोडून शुभ ध्यानात तत्पर झाले. त्यांनी चतुर्भुज रूप धारण करून शंख, चक्रादी आयुधांनी संपन्न होऊन श्वेतद्वीपाकडे प्रयाण केले. जो मनुष्य नियमपूर्वक राहून या तीर्थी निवास करतो, ज्याचा मृत्यू येथे होतो, त्याला श्वेतद्वीपाची प्राप्ती अगत्याने होते.

येथेच एक आखेटकतीर्थ आहे. येथे स्नान करणारा प्राणी नंदन-वनात पोचून अकरा हजार वर्षांपर्यंत परमानंदाचा उपयोग घेतो. स्वर्गातून च्युत झाल्यावर तो चांगल्या कुलात जन्म घेऊन परमात्म्याचा भक्त होतो. जो मनुष्य येथील ‘ गृध्रवट ’ नावाच्या तीर्थात स्नान करून संध्या, तर्पण आदी कर्मे करतो, त्याला या प्राण्याच्या प्रभावाने नऊ हजार नऊशे वर्षेपर्यंत इंद्रलोकात देवांच्यासह आनंदाचा उपभोग घेता येतो.

नारायणांकडून या स्थानाची अशी महती ऐकल्यावर पृथ्वी मधुर

वाणीने म्हणाली, ' देवा, कोणत्या कर्माच्या फलरूपानं प्राणी या तीर्थास येतो ? इथं स्नान केल्यानं व मरण्यानं काय प्राप्त होतं ?' याही प्रश्नांची उत्तरे भगवान वराहांनी दिली. ज्या मनुष्यांनी पूर्वजन्मी सद्धर्माचे पालन केले आहे, वाईट कर्मे काही कर्मदोषाने केली असल्याने जे पशुयोनीत जन्मास आले, ते तीर्थस्नान, जप, महान दान, देवतार्चन यांनी त्यांचा या तीर्थाशी संयोग होतो.

येथील तीर्थाचे दर्शन व अवगाहन यांच्या प्रभावाने पाप नष्ट होते. धर्मानुमोदित अशा या वराहक्षेत्राची गती मोठी गहन आहे. याच पुण्याच्या प्रभावे ती शृगाली व तो गृध्र मनुष्ययोनी प्राप्त करून साम्राज्याचे अधिकारी बनले. येथेच एक ' वैवस्वत ' या नावाचे तीर्थ आहे. येथे पुत्राच्या प्राप्तीने सूर्याने कठोर तपस्या केली होती. नंतर त्याने दहा हजार वर्षांपर्यंत निरंतर चांद्रायणव्रतही केले. सात हजार वर्षेपर्यंत त्याने केवळ वायूचा आहार घेतला. शेवटी त्याला भगवंतांनी वर मागण्यास सांगितले, तेव्हा तो म्हणाला, ' भगवान, आपण माझ्यावर जर प्रसन्न असाल तर मला एक पुत्र द्यावा.' तेव्हा भगवान वराहांनी त्याला ' यम, व ' यमुना ' अशी दोन जुळी संताने दिली. तेव्हापासून ' सौकरव ' क्षेत्राच्या अंतर्गत असे हे ' वैवस्वततीर्थ ' प्रसिद्धीस आले. जो येथे स्नान करून भोजन करतो, त्याला दहा हजार वर्षांपर्यंत सूर्यलोकात प्रतिष्ठा प्राप्त होते. जर कोणाचा येथे सहसा मृत्यू झाला तर तो यमपुरीत जात नाही. असे हे या तीर्थाचे आख्यानही पवित्र आहे. सौकरवतीर्थ सर्व तीर्थांत परम श्रेष्ठ आहे. जो दुसऱ्याची निंदा करतो त्याला याचे माहात्म्य सांगू नये. ज्याला भगवंताबद्दल श्रद्धा आहे, जो वेदज्ञानात श्रेष्ठ आहे, ज्याने दीक्षा घेतली आहे, जो सर्व शास्त्रे जाणतो, त्यासच हे आख्यान सांगावे. प्रातःकाली उठून जो या तीर्थाच्या माहात्म्याचा पाठ करतो, तो जणू बारा वर्षांपर्यंत भगवानांचेच ध्यान करतो. त्याला शाश्वत मुक्ती सुलभ होते. जो याच्या एका अध्यायाचा पाठ करतो, त्याच्याही दहा कुलांचा उद्धार होतो.

## वराहतीर्थान्तर्वर्ती आदित्यतीर्थ, खंजरीटाची कथा

भगवान वराहांकडून वराहक्षेत्राचा वरील महिमा ऐकून पृथ्वी

संतुष्ट होऊन म्हणाली, ' प्रभो, वराहक्षेत्रात मरण पावलेला प्राणी मनुष्याच्या जन्मास येतो. हे क्षेत्र निःसंशय फार पवित्रच आहे. आता आपण एखादा दुसरा प्रसंग सांगावा. गायन, वादन, नृत्य, जागरण, गोदान, अन्नदान, जलदान केल्याचं अथवा गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य आदींनी आपली पूजा केल्याचं फळ कोणतं असतं ? जप व यज्ञ करणाऱ्या माणसास कोणती गती मिळते ?'

त्यावर भगवान वराह म्हणाले,' देवी, ही कथा अत्यंत पुण्यप्रद व सुख देणारी आहे. पूर्वी या सौकरवक्षेत्रात एक खंजरीट* पक्षी राहात होता. त्याने एकदा अनेक किडे खाल्ले. म्हणून त्याला अजीर्ण होऊन तो मरणासन्न झाला. आणि तो या सूकरक्षेत्रातच मरण पावला. एवढ्यात अनेक बालके इकडून तिकडून दौडत, खेळत येऊन म्हणू लागली, ' आपण याला पकडावं,' पण या विचाराने त्यांच्यांत भांडण लागले. ' मी मी, माझा ' म्हणण्यात ते झगडा करू लागले. एका बालकाने त्याला उचलले, आणि गंगेत फेकून दिले. अशा रीतीने तो मृत पक्षी गंगेच्या जलाने धुतला गेला. तो गंगेत जेथे फेकला गेला ते आदित्य-तीर्थ होते. त्या तीर्थाच्या प्रभावाने तो पक्षी उत्तम यज्ञ करणाऱ्या, धन व रत्ने यांनी परिपूर्ण असणाऱ्या एका वैश्याच्या घरी जन्मास आला. तो मोठा रूपवान, गुणवान, विवेकी, पवित्र आणि भगवंतांवर भक्ती ठेवणारा निघाला.

हा बालक आता बारा वर्षांचा झाला. एके दिवशी त्याचे माता-पिता सुखाने वसले असताना त्याची दृष्टी त्यांच्यावर गेली. त्यांना पृथ्वीवर डोके ठेवून तो म्हणाला, ' पिताजी, आपण जर माझं प्रिय करणार असाल तर मला एक वर द्यावा. आपण दोघांनीही मला कोणतीच बाधा आणू नये. पिताजी, आपण माझे गुरू आहात. मी सत्याची शपथ घेऊन सांगतो की आपण जे म्हणाल ते होईल.' पुत्राचे हे बोलणे ऐकून त्याच्या मातापित्यांना अत्यंत हर्ष झाला. ते म्हणाले, ' पुत्रा, तू जे म्हणशील ते आम्ही करू. तू विश्वासपूर्वक सांग. आपल्या तीन हजार गायी दूध देणाऱ्या आहेत. तू त्यांना वाटेल त्यांना

* खंजरीट म्हणजे खंजन, खंडरिच, Wagtail, धोबीण, ताजवा पक्षी

देऊन टाक. तू सर्व व्यापार वाटल्यास हातात घे. तू आपलं धन मित्रांना वाटून दे. धन, धान्य, रत्नं आदींनाही देऊन टाक. चांगल्या कुलातील कन्या तुझ्यासाठी प्राप्त होतील. पुत्रा, तुझ्या मनात यज्ञ करायचा असेल तर तू करू शकतोस. त्याच्यासाठी आठ-आठ बैलांचे शंभर नांगर आपणांपाशी आहेत. अनेक ब्राह्मणांना भोजन देऊन तू तृप्त कर.'

आपल्या मातापित्यांचे हे बोलणे ऐकून पुत्राने त्यांचे चरण पकडले व म्हटले, 'गोदान द्यावं हा माझा या समयी हेतू नाही. मित्रांची मला कसलीच चिंता नाही. मला विवाह नको, की यज्ञाचं फल नको. व्यापार, शेती, गोरक्षण यांबद्दल माझ्या मनात आसक्ती नाही. पित्ताजी, माझ्या मनात भगवान नारायणांचं क्षेत्र– सौकरव– स्थान तेवढं आहे.' त्याचे मातापिता दोघेही भगवान वराहांचे उपासक होते. पुत्राकडून त्याची चिंता समजताच दोघांनाही अतिदुःख होऊन ते विलाप करू लागले. माता म्हणू लागली,

'मुला, आत्ता तर तुझं वय तेरा वर्षांचं आहे. भगवान नारायणांना शरण जाण्याची चिंता तुला या वयात कशी लागली? जेव्हा तुझं आयुष्य वाढेल तेव्हा तू या बाबीचा विचार कर. आता तर मी भोजन घेऊन तुझ्या मागं असते. पुत्रा, तू 'सौकरव' क्षेत्रात जाण्याची इच्छा आताच का धरतोस? तू तर अजून थानपिता बच्चा आहेस. माझे स्तन धन्य आहेत. कारण त्यांतून सदा दूध स्रवत असतं. पुत्रा, स्पर्शसुखाची आशा धरणाऱ्या मातेसंबंधी तू काय विचार केलास? तू रात्री झोपताना कूस बदलतोस तेव्हाही 'आई, आई' म्हणून बोलतोस. आणि याच वयात वराहक्षेत्राचं नाव घेतोस? तू जेव्हा खेळतोस तेव्हा अन्य स्त्रियाही तुला स्पर्श करतात. वत्सा, कुणी तुझा अपराध तर नाही केला? नोकरांनी कटू शब्द तर नाही उच्चारले? तुला भीती दाखविण्यासाठी मी हातात छडी तर नाही घेतली? पुत्रा, मग तुला हे वैराग्य आलं कुठून?'

मातेचे हे बोलणे ऐकून पुत्र मधुर स्वरात म्हणाला, 'माते, मी तुझ्या गर्भात राहात होतो. तुझ्याच उदरातून माझा जन्म झाला. तुझ्याच मांडीवर मी खेळलो. प्रेमानं मी तुझंच स्तनपान केलं आहे. तू माझ्यावर

खूप प्रेम करतेस. पण पूजनीय माते, आता तू या मोहाचा परित्याग कर. हे जगत एका महासागराप्रमाणं घोर आहे. इथं प्राणी येतात, जातात. काही लोक गेले आहेत. काही चालले आहेत. जीव नष्ट होतो. कुणाचा जन्म कुठं झाला, त्याचा संबंध कसा वाढला, कोण कुणाची माता झाली, कोण कुणाचा पिता झाला, यांचा काहीच पत्ता नसतो. हजारो मातापिते, शेकडो पुत्र आणि स्त्रिया प्रत्येक जन्मात येतात, जातात. ते कोण कुणाचे असतात ? आपणही कुणाचे आहोत ? म्हणून आई, या चिंतेत पडून तू विचार करू नकोस.'

पुत्राचे हे बोलणे ऐकून त्याच्या मातापित्यांना अत्यंत आश्चर्य वाटलं. ते पुन्हा म्हणाले, 'पुत्रा, तुझं बोलणं मोठं मार्मिक वाटतं. याचं रहस्य तर समजावून सांग.' तेव्हा त्याने आपल्या माता-पित्यांना म्हटले, 'पूज्यवर, याचं रहस्य आपणांस समजावून घ्यायचं असेल तर आपण 'वराहक्षेत्रा'चं रहस्य विचारावं. आपण 'सौकरवक्षेत्रा'स यावं. तिथंच हे रहस्य आपण विचारावं. तिथंच मी एक आश्चर्यकारक गोष्ट आपणांस सांगीन. पिताजी, 'सौकरवक्षेत्रां'त एक 'सूर्यतीर्थ' आहे. तिथं आपण जाऊ.' माता-पित्यांनी त्याला 'ठीक आहे' असे उत्तर दिले.

त्याच्या मातापित्यांनी सौकरवतीर्थास जाण्याचा संकल्प केला. सर्व प्रकारची द्रव्ये घेऊन ते सौकरवतीर्थाकडे निघाले. त्यांनी आपल्या-जवळील सर्व धनवैभव भगवान नारायणांना समर्पण केले. माघमासाच्या त्रयोदशीस पूर्वाह्णकालात आपले स्वजन व बंधुबांधव यांच्यासह त्यांनी शुभ मुहूर्तावर यात्रा सुरू केली. भगवान नारायणांचे दर्शन होणार, या विचाराने त्यांच्या मनास अत्यंत हर्ष झाला. ते सर्व वैशाखाच्या द्वादशी तिथीस सौकरवतीर्थास आले. तेथे त्यांनी विधिपूर्वक स्नान करून पित-रांना तर्पण केले. त्या वैश्याने आपल्या वीस हजार गायींचे दान केले. विपुल धन व रत्ने यांचीही त्याने दाने केली.

अशा प्रकारे ते सर्व त्या क्षेत्री राहात असताना धान्यांचे, वृक्षांचे संवर्धन करणारा वर्षाऋतू आला. कदंब, कुटज आणि अर्जुन वृक्ष पुष्पांनी शोभू लागले. नद्या गर्जू लागल्या. मोरांच्या मधुर स्वरांनी, भ्रमरांच्या

गुंजारवांनी तो ऋतू शोभू लागला. नंतर शरद्ऋतूचा व अगस्त्यनक्षत्राचा उदय झाला. तडागांचे जल स्वच्छ झाले. त्यांत कमल, कुमुद अशी फुले फुलू लागली. शीतल, सुगंधी, सुखदायक वायू वाहू लागला. हाही ऋतू हळूहळू संपत चालला व शेवटी कार्तिक महिन्याची शुक्ल एकादशी आली. त्या दिवशी त्या वैश्य दंपतीने स्नान केले. रेशमी वस्त्र धारण करून आपल्या पुत्रास ते म्हणाले, 'पुत्रा, आम्ही इथं सहा महिने सुख-पूर्वक राहिलो. आज द्वादशी तिथी आहे. आता तू आम्हांस ती गोपनीय कथा सांग.'

त्यावर तो धर्मात्मा पुत्र मधुर वाणीने म्हणाला, 'महाभाग, आपण जीसंबंधी विचारलं ती गोष्ट मोठी गोपनीय व रहस्यपूर्ण आहे. मी उद्या प्रातःकाली ती आपणांस सांगीन. पिताजी, आज द्वादशी आहे. या पुण्य अवसरी विष्णूंच्या भक्तीत तत्पर होऊन दान करणारी व्यक्ती भगवत कृपेनं संसारसागर तरून जाते.'

अशी चर्चा चालू असताना मध्यरात्र झाली. नंतर सूर्यमंडल उदित झाले. बालकाने यथाविधी स्नान करून रेशमी वस्त्र परिधान केले. शंख, चक्र, गदा धारण करणाऱ्या भगवान श्रीहरींना त्याने प्रणाम करून मातापित्यांचे चरण पकडून म्हटले, 'महाभाग, जी रहस्यपूर्ण बाब ऐकण्यासाठी आपण या सौकरवक्षेत्री आलात ती अशी आहे. मी पूर्वजन्मी एक खंजरीट पक्षी होतो. एकदा मी खूपसे किडे खाल्ले. मला अजीर्ण झालं. मला इकडून तिकडं फिरणं अशक्य झालं. त्याच वेळी मुलांनी काही खेळ केला. त्यांनी मला एकमेकांच्या हातांत फेकून दिलं. याच वेळी एका बालकानं मला इथल्या 'आदित्यतीर्था'त फेकून दिलं. तिथं माझा प्राण गेला. माझ्या मनात कोणतीच अभिलाषा नव्हती. तरी त्या तीर्थाच्या प्रभावानं मी आपल्या घरी पुत्राच्या रूपानं जन्मास आलो. अशी तेरा वर्षं मी आपणांबरोबर काढली. हीच ती रहस्यपूर्ण बाब होय.'

यानंतर त्यास मातापिता म्हणाले, 'पुत्रा, तू म्हणशील ते कर्म आम्ही आनंदानं करू.' त्यांनी शास्त्रानुसार धर्मानुष्ठान करून आपल्या

देहांचा त्याग केला. ते या जगतातून श्वेतधामास गेले. जे लोक त्यांच्या बरोबर गेले होते ते योगात रमले. त्यांच्या शरीरातून कमलासारखा गंध येत असे. अशा रीतीने या क्षेत्राशी संबंध येणाऱ्या पशुपक्ष्यांनाही श्वेतद्वीपाची प्राप्ती होते. जी व्यक्ती प्रातःकाली या आख्यानाचा पाठ करील ती आपल्या मागल्या-पुढल्या दहा पिढ्यांचा उद्धार करते. मूर्ख, पापी, शास्त्रनिंदक, चहाडखोर यांच्या समोर याचा पाठ करू नये. ब्राह्मणांच्या समाजात, एकांतात याचे अध्ययन करावे. कारण संसारापासून मुक्त होण्यासाठी हेच एक परम साधन आहे.

## कोकामुख– बदरी– क्षेत्राचे माहात्म्य

पृथ्वीच्या विचारण्यावरून भगवान वराहांनी तिला हिमालयाच्या उतरणीवरील कोकामुखतीर्थाचे नाव सांगितले. लोहार्गल नावाच्या तीर्थास भगवान वराह तर एक क्षणही सोडीत नाहीत. त्यांनी तिला एकशेचाळिसाव्या अध्यायात पुन: कोकामुखतीर्थाचे माहात्म्य सांगितले. मुख्य पर्वतापासून जेथे सतत जलबिंदू पडतात त्या स्थानास ‘जलबिंदु’-तीर्थ म्हणतात. जेथे पर्वतापासून मुसळधार जलधारा पडते त्या तीर्थास ‘विष्णुधारा’ असे नाव आहे. जो येथे दिनरात उपवास करून स्नान करतो, त्याला एक हजार ‘अग्निष्टोमयज्ञां–’चे फल प्राप्त होते. या ‘विष्णुधारा’तीर्थात मरण्याचे सौभाग्य ज्याला प्राप्त होते, त्याला भगवंतांच्या मूर्तीचे नित्य दर्शन होते. याच ‘कोकामुख’तीर्थात एक ‘विष्णुपद’ नावाचे तीर्थ आहे. येथे भगवंतांची मूर्ती आहे. येथे स्नान करून एक रात्र निवास केला की प्राण्यास ‘क्रौंच’द्वीपात जन्म घेता येतो.

याच ‘कोकामुख’मंडलात ‘चतुर्धारा’ नावाचे एक स्थान आहे. तेथे उंच पर्वतावरून जलाच्या धारा पडतात. जो मनुष्य पांच रात्री येथे राहून स्नान करतो, त्यास कुशद्वीपात जन्म मिळतो व शेवटी तो भगवंतांच्या धामास जातो. कर्मफलास सुखात परिवर्तित करणारे एक तीर्थ ‘अनित्य’ या नावाने प्रसिद्ध आहे. येथे एक दिनरात राहिल्याने, स्नान केल्याने मनुष्यास पुष्करद्वीपात जन्म मिळतो. तो सर्व पापांपासून

मुक्त होऊन भगवंतांच्या लोकास जातो. तेथेंच आणखी एक स्थान 'ब्रह्मसर' या नावाचे आहे. या गोपनीय स्थानी शिलातलावर एक पवित्र जलधारा सतत पडत असते. जो भक्त पांच रात्री येथे निवास करून स्नान करतो, त्यास सूर्यलोकाची प्राप्ती होते. तोही शेवटी भगवंतांच्या धामास जातो.

याच परिसरात एक गुप्त स्थान 'धेनुवट' नावाचे आहे. येथे उंच शिलेवरून एक मोठी जलधारा पडते. जो पुरुष प्रतिदिन येथे स्नान करतो, सात रात्री येथे राहतो, त्याला सात समुद्रांचे स्नान घडते. त्याला परमेश्वराची उपासना घडून तो सात द्वीपांत विहार करतो. शेवटी ध्यान, भजन करून तो भगवंतांस जाऊन मिळतो. येथेच एक 'कोटि-वट' नावाचे गुप्त क्षेत्र आहे. तेथे वटवृक्षाच्या मूळापासून एक धारा निघते. येथे एक रात्र निवास करून स्नान केल्याने मनुष्यास वटवृक्षाच्या पानांच्या संख्येच्या हजारपट वर्षे रूप व संपत्ती यांनी समृद्ध बनता येते. मृत्यूनंतर तो अग्नीसारखा तेजस्वी बनून भगवंतांच्या लोकास जातो.

याच क्षेत्रात 'पापप्रमोचन' नावाचे एक गुप्त क्षेत्र आहे. जो येथे एक दिनरात्र राहून स्नान करतो, तो चारही वेदांत पारंगत होतो. तेथेंच एक कौशिकी नावाची नदी आहे. जो मानव येथे पांच दिनरात्र निवास करून स्नान करतो, तो इंद्रलोकात जातो. कौशिकीनदीपासून येथे एक धारा वाहते. जो मनुष्य एक रात्र राहून तीत स्नान करतो, त्यास यम-लोकीचे घोर कष्ट सहन करावे लागत नाहीत.

बदरिक्षेत्रात आणखी एक विशिष्ट स्थान आहे. याच्या प्रभावाने मनुष्य संसारसागर तरून जातो. या स्थानाचे नाव 'दंष्ट्राङ्कुर' आहे. कोकानदीचे उद्‌गमस्थान हेच आहे. या गुह्य स्थानास जाणणे फार कठीण आहे. येथे एक दिनरात राहून स्नान केल्यास मानव 'शाल्मलि'-द्वीपात जन्म घेतो. भगवंताच्या उपासनेत मग्न राहून शेवटी त्यांच्या संनिकट पोचतो. येथेच एक फलदायक आणखी एक गुप्त स्थान आहे. त्याला 'विष्णुतीर्थ' म्हणतात. तेथे पर्वताच्या पायथ्यापासून जलधारा निघून कोकानदीस मिळते. त्या जलास 'त्रिस्रोतस्' म्हणतात. हे स्थान सर्व संसारापासून मुक्त करणारे आहे. येथे स्नान करणारा मनुष्य

वायुदेवाच्या लोकास जातो. शेवटी भगवंतांना जाऊन मिळतो.

येथे कौशिकी व कोका यांच्या संगमावर एक श्रेष्ठ स्थान आहे. त्याच्या उत्तर भागात 'सर्वकामिका' नावाची शिला आहे. तेथे स्नान करून जो एक दिनरात राहतो, त्याची उत्पत्ती एका प्रशस्त व विशाल कुळात होते. त्याला जातिस्मरता (पूर्वजन्मीचे स्मरण) नावाची सिद्धी प्राप्त होते. या कौशिकी-कोका-संगमात स्नान केल्याने त्याला स्वर्ग वा भूमंडल जे हवे ते प्राप्त होते. या स्थानी परमात्म्याची आराधना करून प्राणत्याग करणारा मनुष्य सर्व आसक्तींपासून मुक्त होऊन भगवंतांच्या लोकी जातो.

कोकामुखक्षेत्रात एक 'मत्स्यशिला' नावाचे गुह्य स्थान आहे. या स्थानावर कौशिकीनदीपासून निघालेल्या तीन धारा पडतात. येथे स्नान करताना जर मत्स्य दिसला तर स्वतः भगवान नारायण भेटले, असे समजावे. मत्स्यास पाहिल्यावर मनुष्याने त्याचे पूजन करावे. मध व लाह्या यांनी अर्घ्य द्यावा. जो या गुप्त स्थानात राहून स्नान करतो तो मेरू पर्वताच्या उत्तर भागातील 'पद्मपत्र' नावाच्या स्थानावर निवास करतो. काही दिवसांनंतर तो हे गोपनीय स्थान सोडून भगवंतांना जाऊन मिळतो.

या कोकामुखक्षेत्राचा विस्तार पांच योजनांचा आहे. हे जाणल्यास मनुष्य पापकर्मांनी लिप्त होत नाही. याच्या दक्षिणेस 'शिलाचंदन' नावाचे एक स्थान आहे. हे देवांनाही दुर्लभ आहे. भगवंत येथे वराहरूप धारण करून राहातात. पुरुषाच्या आकृतीने ते उंच मुख व दाढा यांनी अखिल विश्वास पाहातात. त्यांची उपासना करणारा सर्व पापांपासून मुक्त होतो. असे हे 'कोकामुखस्थान' गुह्यांतील गुह्य असून सिद्धांसाठी परम सिद्धिदाता आहे. 'कोकामुख' हे सर्वोत्तम स्थान आहे. येथे जाऊन दर्शन स्नानादी केल्याने मनुष्य आपल्या मागल्या–पुढल्या दहा पिढ्यांचा उद्धार करून घेतो. येथे दैवयोगाने शरीराचा त्याग घडला तर तो भगवद्– भक्ताच्या कुळात जन्म घेतो. तो धर्माचा प्रचारक होतो. जो मानव प्रातःकाळी या माहात्म्याचे श्रवण करतो, तो शरीरत्यागानंतर भगवंतास जाऊन मिळतो. त्याच्या पांचशे जन्मांतील पातके

संपतात. तो परमेश्वराचा भक्त होतो.

## बदरिकाश्रमाचे माहात्म्य

एकशेएकेचाळिसाव्या अध्यायात भगवान वराहांनी वसुंधरेस बदरिकाश्रमाचा महिमा वर्णन करून सांगितला आहे. हिमालयपर्वतावर एक अत्यंत गुह्य स्थान आहे. ते देवांसाठीही दुर्लभ आहे. त्यालाच 'बद-रिकाश्रम ' म्हणतात. त्याच्यावर जगताचा उद्धार करण्याची शक्ती आहे. तेथे गेल्याने सर्व मनोरथ पूर्ण होतात. त्या उंच पर्वताशिखरावर 'ब्रह्मकुंड' नावाचे एक प्रसिद्ध स्थान आहे. तेथे भगवान हिमात स्थिर असतात. जो मनुष्य येथे तीन दिनरात राहून निवास करतो, स्नान करतो, त्याला 'अग्निष्टोम 'यज्ञाचे फल मिळते. येथे प्राणत्यागाचा प्रसंग आल्यास त्याला भगवंतांचा लोक मिळतो. त्याच उत्तम क्षेत्रात 'अग्निसत्यपद' नावाचे एक स्थान आहे. येथे हिमालयाच्या तीन शिखरांवरून जलधारा पडतात. जो मानव येथे तीन दिनरात्र राहून स्नान करतो, तो सत्यवादी व सर्व कार्यांत परम कुशल बनतो. तेथील जलाचा स्पर्श करून जो प्राणत्याग करतो, तो भगवंतांच्या लोकात आनंदाने निवास करतो.

याचा बदरिकाश्रमात 'इंद्रलोक' नावाचा एक आश्रम आहे. येथे इंद्राने भगवंतांना संतुष्ट केले होते. हिमालयाच्या शृंगांवरून येथे एक मोठी धारा पडते. तेथील विशाल शिलातलावर धर्माचे स्थान आहे. तेथे माणसाने एक रात्र राहून स्नान केले तर तो सत्यवक्ता व पवित्र बनून 'सत्यलोका'त प्रतिष्ठा पावतो. याच ठिकाणी 'पंचशिख' नावाचे एक तीर्थ आहे. येथे हिमालयाच्या पांच शिखरांवरून धारा वाहतात. या पांच धारा पांच नद्यांच्या स्वरूपात प्रवाहित होतात. येथे जो मानव स्नान करतो, त्याला 'अश्वमेध'यज्ञाचे फल मिळते. दुष्कर तप करून जो कोणी येथे प्राण सोडतो त्यास भगवंतांच्या लोकाची प्राप्ती होते. याच क्षेत्रात 'चतुःस्रोत 'नावाचे एक प्रसिद्ध स्थान आहे. हिमालयाच्या चारही दिशांनी जलधारा येथे वाहातात. जो मनुष्य येथे एक रात्र निवास करून स्नान करतो, तो स्वर्गात आनंदाने निवास करतो. तेथून भ्रष्ट होताच मनुष्यजन्म घेऊन भगवंतांचा भक्त होतो.

याच क्षेत्रात ‘ वेदधार नावाचे एक तीर्थ आहे. येथेच ब्रह्मदेवांच्या मुखांतून चार वेद प्रकट झाले होते. उंच शिलेवर येथे चार धारा पडतात. जो मनुष्य चार रात्री येथे राहून स्नान करतो, तो चारही वेदांच्या अध्ययनाचा अधिकारी बनतो. येथे प्राणत्याग करणारा भगवंतांच्या लोकात प्रतिष्ठित होतो. येथेच ‘ द्वादशकुंड ’ नावाचे एकस्थान आहे. येथे वराहांनी बारा सूर्यांना स्थापित केले आहे. येथील पर्वत-शृंगाची मुळे विशाल आहेत. त्याच्या खाली अनेक शिला आहेत. कोणत्याही द्वादशी तिथीस येथे स्नान केल्यास मनुष्यास द्वादश सूर्यांच्या स्थानात निवास मिळतो. येथे प्राणत्याग केल्यास भगवंतांच्या लोकाची प्राप्ती होते.

येथेच ‘ सोमाभिषेक ’ या नावाचे एक प्रसिद्ध तीर्थ आहे. येथे भगवंतांनी चंद्राला ब्राह्मणांच्या राजाच्या रूपात अभिषेक केला. त्या अत्रिनंदन सोमाने त्यांना संतुष्ट केले होते. चौदा कोटी वर्षांची तपस्या केल्याने भगवंतांच्या कृपेने चंद्रास परम सिद्धी प्राप्त झाली. हे सर्व जगत व उत्तम औषधी यांच्यावर चंद्राचे स्वामित्व आहे. याच स्थानावर इंद्र, स्कंद व मरुद्गण प्रकट व विलीन होतात. येथील सर्व वस्तू सोममय बनून शेवटी भगवंतांत स्थित होतात. येथील ‘ सोमगिरी ’ स्थानावर, भूमीवर व कुंडात, विशाल वनात धारा पडतात. जो मनुष्य तीन रात्री येथे राहून स्नान करतो त्याला सोमलोक प्राप्त होतो. अत्यंत कठोर तप केल्यास येथे मृत्यू आल्यास भगवंतांचा लोक प्राप्त होतो.

य.च बदरिकाश्रमात ‘ उर्वशीकुंड ’ नावाचे एक गुप्त क्षेत्र आहे. तेथे उर्वशी नावाची एक अप्सरा भगवंतांची उजवी मांडी विदीर्ण करून प्रकट झाली होती. देवांच्या कार्यासाठी भगवंत येथे निरंतर तप करतात, पण त्यांना कोणीच जाणीत नाहीत. ते स्वत:ला मात्र जाणतात. येथे तपश्चर्या अनेक वर्षे करूनही इंद्र, ब्रह्मदेव, महेश्वर इत्यादींना त्यांचे रहस्य समजले नाही.

भगवंतांनी येथे कोटयवधी वर्षे तपस्या केली. त्या वेळी देवांनाही माहीत नसलेल्या गुप्तस्थानी भगवंत होते. त्यामुळे देवांना महान दुःख होऊन ते विस्मयात सापडले. भगवंत तपस्येत लीन असून सर्वांना

पाहात होते, पण त्यांच्या योगमायेमुळे त्या सर्व देवांना मात्र ते दिसत नव्हते. तेव्हा सर्व देवांनी ब्रह्मदेवांना म्हटले, ' पितामह, भगवान विष्णूंच्या शिवाय जगात शांती मिळत नाही.' देवांचे हे म्हणणे सांगण्यासाठी लोक पितामह ब्रह्मदेव भगवंतांकडे निघाले. या वेळी ते योगमायेच्या पटापलीकडे लपलेले होते. म्हणून ब्रह्मदेवांना त्यांचे दर्शन झाले नाही. देव, गंधर्व, सिद्ध, ऋषिगण परम प्रसन्न होऊन भगवंतांची स्तुती करण्यासाठी तत्पर झाले. इंद्रादी देवांनी त्यांची प्रार्थना करताना म्हटले,

' नाथ, आपलं दर्शन होत नसल्यानं आम्ही सर्व दु:खी व उत्साहहीन बनलो आहोत. हृषीकेश, आपण अनुग्रह करून आमचं रक्षण करावं.'

देवांची अशी प्रार्थना ऐकून भगवंतांनी त्यांना दर्शन दिले. त्यांना पाहाताच देव शांत झाले. अशीही या उर्वशीतीर्थाची विशेषता आहे. जो मनुष्य या तीर्थात एक रात्र राहून स्नान करतो, तो संपूर्ण पापांपासून मुक्त होतो. तो ' उर्वशी 'लोकात जाऊन अनंत समयपर्यंत क्रीडा करीत राहातो. उपासना करताना जर भक्ताचा येथे प्राण गेला तर तो पापमुक्त होऊन भगवंतांत लीन होतो. अशा रीतीने या बदरिकाश्रमात भगवान विष्णूंच्या स्थानाची भावना जागृत असते. जी व्यक्ती या माहात्म्याचा पाठ करील, श्रवण करील ती ध्यान व योग यांत रमून मुक्तीची अधिकारी होईल. तिला आत्मतत्त्व प्राप्त होऊन परमगती मिळेल.

## मंदारक्षेत्राचा महिमा

एकशेत्रेचाळिसाव्या अध्यायात भगवान वराहांनी पृथ्वीला मंदारक्षेत्राचा महिमा सांगितला आहे. गंगेच्या दक्षिणतटावर आणि विंध्यपर्वताच्या मागील भागी भगवंतांचे एक गुह्यस्थान आहे. त्याला त्यांचे भक्त मंदार या नावाने ओळखतात. त्रेतायुगात ' राम ' या नावाचा परम प्रतापी पुरुष प्रकट होईल. व तेथे भगवंतांच्या मूर्तीची स्थापना करील, यात संदेह नाही. मंदारचे रहस्य अत्यंत गोपनीय आहे. एकदा मंदारावर सर्वत्र फुले उमलली होती. भगवंत तेथे विहार करीत होते. त्यांनी एक सुंदर पुष्पास खुडून आपल्या हृदयाशी धरले. तेव्हापासून विंध्यपर्वतावर

त्यांचे चित्त मंदारात संलग्न झाले.

अकरा कुंडे येथील शोभा वाढवितात. भगवंत तेथे मंदार नावाच्या वृक्षाखाली निवास करतात. विंध्यपर्वताच्या उतरणीला हे परम सुंदर स्थान अत्यंत दर्शनीय आहे. त्या महान वृक्षात, मंदारात एक मोठ्या आश्चर्याची वाव आहे. हा विशाल वृक्ष द्वादशी व चतुर्दशी या तिथींना फुलतो. दुपारी ही फुले दिसू शकतात. पण अन्य दिवशी मात्र ती कोणासच दिसत नाहीत. येथे जो मानव एक समय भोजन करून निवास करील, स्नान करील तर त्याचा आत्मा शुद्ध होऊन तो परमगतीस जाईल.

त्याच्या उत्तरेस 'प्रापण' नावाचा एक पर्वत आहे. तेथून दक्षिणेस तीन धारा वाहातात. मेरूच्या दक्षिण शिखरावर 'मोदन' नावाचे एक स्थान आहे. पूर्व व उत्तर यांच्या मध्ये 'वैकुंठकारण' नावाचे एक गुह्य स्थान आहे. तेथे एक हळदीप्रमाणे चमकणारी धारा वाहाते. जो मानव येथे एक रात्र राहून स्नान करतो, त्याला स्वर्ग प्राप्त होतो. तो आपल्या सर्व कुलांचा उद्धार करतो. विंध्यगिरीच्या शिखरावर मेरू शिखरावरून 'समस्रोत' नावाची एक धारा वाहून एका खोल तलावाच्या रूपात परिवर्तित होते. मनुष्याने येथे राहून एक रात्र निवास करावा. स्नान करावे. येथे प्राणत्याग केल्याने सर्व बंधने तुटतात.

मंदारच्या पूर्वभागात 'कोटरसंस्थित' नावाच्या स्थानात मुसळाच्या आकाराची एक पवित्र धारा पडते. तेथे पांच दिवस राहून, स्नान करून स्वर्गसुख प्राप्त होते. तेथे अत्यंत कठीण कर्म संपादन करून भगवंतांच्या लोकाची प्राप्ती होते. तेथे मंदाराच्या दक्षिण व पश्चिम भागांत सूर्याप्रमाणे चमकणारी धार पडते. तेथे मनुष्याने एक रात्र राहून स्नान करावे. मेरूच्या पश्चिमभागात ध्रुवाच्या स्थानी राहून भक्तिपरायण मनुष्याचा मृत्यू होतो, तेव्हा त्यास भगवंतांचा बोध प्राप्त होतो. येथून तीन कोस दूरवर दक्षिणदिशेसच 'गभीरक' नावाचे एक गृह्य स्थान आहे. तेथे खोल पाण्याचे एक सरोवर आहे. तेथे आठ दिवस राहून स्नान केल्यास स्वच्छंद गमन करण्याची शक्ती

प्राप्त होते. मेरू पर्वतावरील ' मंदार ' नावाचे स्थान ' स्यमंतपंचक ' या नावाने प्रसिद्ध आहे. येथे सदा भगवंतांचा निवास असतो. विंध्याच्या उंच शिलेवर दक्षिणेस चक्र, डावीकडे गदा व पुढे नांगर व मुसळ आणि शंख विराजमान होतात. हे गृह्य रहस्य आहे. जो मनुष्य भगवंतांना शरण जाईल त्यालाच हे रहस्य समजेल.

## सोमेश्वरलिंग, मुक्तिक्षेत्र, त्रिवेणी इत्यादी

एकशेचव्वेचाळिसाव्या अध्यायात भगवंतांनी पृथ्वीस सोमेश्वर-मुक्तिनाथ, त्रिवेणी इत्यादी तीर्थांचे माहात्म्य सांगितले आहे. ' शाल-ग्राम ' (मुक्तिनाथ) नावाचे एक परम प्रसिद्ध स्थान आहे. पूर्वी द्वापरयुगात यदुवंशात शूरसेना नावाची एक कुशल व कर्मठ व्यक्ती होऊन गेली. त्याच्या पुत्राचे नाव वसुदेव होते. त्याच्या सहधर्मिणीचे नाव देवकी होते. याच देवकीच्या पोटी भगवंत अवतार धारण करणार होते. देवांच्या शत्रूंचे मर्दन करणे हे त्यांच्या अवतारांचे मुख्य कार्य होय. त्या वेळी त्यांची प्रसिद्धी ' वासुदेव ' या नावाने होईल. यादवांच्या शूर-सेनाच्या काळात एक श्रेष्ठ महर्षी सालंकायन भगवंतांची आराधना करीत भ्रमण करीत होते. प्रथम त्यांनी मेरुगिरीच्या शिखरावर जाऊन पुत्रासाठी उपासना केली. त्यानंतर ते ' पिंडारक '* क्षेत्रात आले. नंतर ते लोहार्गलक्षेत्रा ** त आले व त्यांनी एक हजार वर्षेपर्यंत तप

---

* या क्षेत्राचा उल्लेख महाभारतात अनेक ठिकाणी व भागवतात ११.१.११-मध्ये आला आहे. आता याचे नाव ' पिंडार ' असून हे द्वारकेहून २० मैल दूर जाम-नगर जिल्ह्यात कल्याणपूर तालुक्यात आहे.

**-एक लोहार्गल (लोहागर) राजस्थानात नवलगढापासून वीस मैल दूर आहे. येथे दूरवरून लोक अस्थिविसर्जनासाठी येतात.

येथे अस्थी काही क्षणांत जलरूप होतात. चैत्रात सोमवती अमावास्येस व भाद्र-पदातील अमावास्येस येथे मोठी यात्रा भरते. येथे खाकीजीचे मंदिर मुख्य आहे. श्रीरामानंदसंप्रदायाचे हे मोठे स्थान आहे. येथील मुख्य तीर्थ पर्वतातून निघालेल्या सात धारांचे आहे. पर्वताखाली ब्रह्महृद आहे, असे सांगतात. त्यातून या धारा वाहातात.

नंदलाल दे यांच्या मतानुसार हे स्थान हिमालयाच्या कूर्माचलाच्या अंतर्गत चंपावतीपासून तीन मैलांवरील ' लोहाघाट ' आहे.

केले. ब्रह्मर्षी सालंकायनांनी खूप शोध केला, पण त्यांना भगवंतांचे दर्शन झाले नाही.

भगवान शंकरही तेथे शिलारूपाने विराजमान आहेत. तेथेच भगवंत शालग्रामशिलेच्या रूपाने राहातात. येथील चक्रांकित शिला ही त्यांचीच रूपे आहेत. येथील काही शिला 'शिवनाभा' व काही 'चक्रनाभा' या नावांनी प्रसिद्ध आहेत. हा शिवरूप पर्वत सोमेश्वर या नावाने प्रसिद्ध आहे. चंद्र आपला शाप मिटविण्यासाठी येथे एक हजार वर्षेपर्यंत तप करीत होता. त्यामुळे तो शापमुक्त झाला व त्याने भगवान शंकरांची स्तुती केली. भगवान शंकर तीमुळे प्रसन्न झाले. ते 'सोमेश्वर-लिंगा'च्या रूपाने प्रकट झाल्यावर त्यांना चंद्र म्हणाला,

'ज्यांचं स्वरूप सौम्य आहे, उमादेवी ज्यांची पत्नी आहे, भक्तां-वर कृपा करण्यासाठी जे सदा आतुर आहेत, अशा पंचमुख भगवान त्रिलोचन नीलकंठ शंकरांना मी प्रणाम करतो. ज्यांच्या ललाटावर चंद्रमा सुशोभित आहे, ज्यांच्या हातात पिनाकधनुष्य आहे, भक्तांना अभय देणे हा ज्यांचा स्वभाव आहे, अशा दिव्य रूपधारी देवेश्वर शंकरांना मी प्रणाम करतो. ज्यांच्या हातांत त्रिशूल व डमरू आहे, अनेक प्रकारच्या मुखांचे गण ज्यांची सदा सेवा करतात, त्या भगवान वृषध्वजांना मी प्रणाम करतो. जे त्रिपुर, अंधक व महाकाल नावांच्या भयंकर असुरांचे संहारक आहेत, जे हत्तीचे चर्म पांघरतात, अशा प्रल-यात अचल राहाणाऱ्या भगवान शंकरांना मी प्रणाम करतो. जे सर्पाचं यज्ञोपवीत वापरतात, रुद्राक्षांची माळ घालतात, भक्तांची इच्छा पूर्ण करणं हा ज्यांचा स्वाभाविक धर्म आहे, जे सर्वांचे शासक आहेत, त्या अद्भुत रूपधारी भगवान शंकरांना मी प्रणाम करतो. सूर्य, चंद्र आणि अग्नी ज्यांचे नेत्र आहेत, मन व वाणी ज्यांच्या ठिकाणी पोचू शकत नाही, ज्यांनी आपल्या जटासमूहातून गंगेस प्रकट केलं आहे, ज्यांनी आपला आश्रम हिमालयपर्वताच्या कैलासशिखरावर केला आहे, अशा भगवान शंकरांना मी प्रणाम करतो.'

चंद्राची ही प्रार्थना ऐकून भगवान शंकर प्रसन्न झाले व म्हणाले, 'गोपते, एक वर माग' तेव्हा चंद्र म्हणाला, 'भगवन्, आपण जर वर

देऊ इच्छिता तर आपण माझ्या या 'सोमेश्वरलिंगा'त सदा निवास करावा. यावर श्रद्धा राखणाऱ्याचा मनोदय पूर्ण करावा.' त्यावर देवेश्वर शंकरांनी म्हटले, 'शीत किरणांच्या स्वामी शशांका, भगवान विष्णूंच्या सहित मी इथं नेहमी निवास करीत असतो. तूही माझ्याच स्वरूपाचा आहेस. पण मी आजपासून इथं विशेष रूपानं राहीन. येथील लिंगाची पूजा करणारा सदा पूजाफल प्राप्त करील. तुझं कल्याण असो. मी तुला देवदुर्लभ वर देतो. इथं पूर्वी सालंकायनमुनींनी तप केलं होतं. त्यांच्या तपस्येच्या प्रभावानं भगवान विष्णूंनी इथं राहाण्याचा वर दिला होता. म्हणून कलानिधे, आम्हां दोघांचा निवास इथंच राहील. श्रीहरींच्या द्वारे अधिष्ठित पर्वताचं नाव 'शालग्रामगिरी' राहील व मी 'सोमेश्वर' या नावानं स्थित होईन. या दोनही पर्वतांचा संबंध राखणाऱ्या या शिला 'विष्णुशिला' व 'शिवशिला' या नावांनी प्रसिद्ध होतील.

'पूर्वी रेवानंही माझ्या प्रसन्नतेसाठी तपस्या केली होती. तिची इच्छा होती की, तिला भगवान शिवांसारखा पुत्र व्हावा. मी तर विचार केला की, मी कुणाचाच पुत्र नाही. मग आता काय करावं? सोमा, मी त्या वेळी खूप विचार करून म्हटलं, 'देवी, तू माझी अपार भक्ती केली आहेस. तेव्हा मी पुत्र बनून गणेशासह लिंगरूपानं तुझ्या गर्भात निवास करीन.' या प्रकारे रेवानं माझं सांन्निध्य प्राप्त करून ती इथं आली. तेव्हापासून या स्थानाची प्रसिद्धी 'रेवाखंड' या नावानं झाली. गंडकीही सुकलेली पानं खाऊन, वायू पिऊन शंभर वर्षांपर्यंत तपस्या करीत होती. ती त्या वेळी भगवान विष्णूंचं चिंतन करीत होती. शेवटी जगताचे स्वामी विष्णू स्वतः तेथे आले आणि म्हणाले, 'पुण्यमयी गंडकी, मी तुझ्यावर प्रसन्न आहे. सुव्रते, तू माझ्यापासून एक वर माग.'

'याच्या पूर्वीही गंडकीस एकदा शंख, चक्र, गदा धारण करणाऱ्या भगवंतांचं दर्शन झालं होतं. पण त्या प्रभूंचं वचन ऐकून गंडकीनं त्यांना साष्टांग प्रणाम केला व ती स्तुती करताना म्हणाली, 'भगवन्, मी आपल्या ज्या रूपाचं दर्शन घेतलं आहे, ते देवांनाही दुर्लभ आहे. हे स्थावरजंगम संपूर्ण जग आपल्या कृपेचाच प्रसाद आहे. ज्या समयी आपण नेत्र बंद करता त्या वेळी सारं विश्व संहृत होतं. श्रुतीच्या निर्देशा-

नुसार जे अनादी, अनंत व असीम ब्रह्म आहे, ते आपणच आहात. महाविष्णू, जो आपणांस जाणतो, तो वेदाचा तत्त्वज्ञ पुरुष आहे. आपली आदिशक्ती, योगमाया व प्रधान प्रकृती या नावांनी प्रसिद्ध आहे. आपण अव्यक्त, चित्स्वरूप, निर्गुण, निरंजन, निर्विकार व आनंदस्वरूप, परम शुद्ध महात्मे आहात. आपण स्वतः सृष्टीच्या रचनेपासून पृथक राहाता. आपली योगमाया सर्व कार्यांचं संपादन करते. आपल्या निरंजन स्वरूपास मी मूर्ख अवला यथार्थत्वानं कशी जाणू शकू ?'

'गंडकीच्या या प्रार्थनेनं प्रभावित होऊन भगवान विष्णूंनी म्हटलं, 'देवी, तुझ्या इच्छेस येईल असा इतरांना दुर्लभ वर तू माग–' हिमांशा, यावर जनतेस तारणाऱ्या त्या गंडकीनं श्रीहरींस हात जोडून नम्रतापूर्वक मधुर वचनांनी म्हटलं– 'भगवन्, आपण प्रसन्न झाला असाल तर मला अभिलाषित वर देण्याची कृपा करावी. आपण माझ्या गर्भात यावं.'

यावर भगवान विष्णू प्रसन्न होऊन विचार करू लागले. माझ्यासह सदा राहणाऱ्या या गंडकींने कसा अद्‌भुत वर मागितला आहे ! हिला वर अवश्य द्यावा. म्हणून ते प्रसन्नतेने म्हणाले, 'देवी, मी शालग्रामशिलेच्या रूपात तुझ्या गर्भात निवास करीन. माझ्या संनिधीमुळं तू नद्यांत श्रेष्ठ मानली जाशील. तुझं दर्शन, जलपान, अवगाहन केल्यानं मनुष्याचं मन, त्याची वाणी, त्याचं कर्म यांची पापांपासून सुटका होते: तुझ्या जलात जो स्नान करतो, देवांना, ऋषींना, पितरांना तर्पण करतो, तो आपल्या पितरांना स्वर्गात पोचवितो, माझा प्रिय बनून स्वतः ब्रह्मलोकात जातो. तुझ्या तटावर मृत पावलेले प्राणी माझ्या लोकास येतात.'

अशा रीतीनं गंडकीस वर देऊन भगवान विष्णू अंतर्धान पावले. भगवान शंकरांनी चंद्रास प्रभा दान करून त्याच्या अंगावरून हात फिरविला. तेव्हा तो पुन्हा स्वच्छ झाला. याच सोमेश्वराच्या लिंगाच्या दक्षिणभागी रावणाने बाण मारून पर्वतास भेदले होते. येथून एक पवित्र जलधारा निघाली. येथे स्नान करणाऱ्याचे पाप ती हरण करते. या तीर्थाचे नाव 'बाणगंगा' आहे. सोमेश्वराच्या पूर्वभागात रावणाचे

तपोवन आहे. येथे तीन रात्र राहून तपस्या व नृत्यकार्य रावणाने केले होते. भगवान शंकर प्रसन्न झाले व त्यांनी रावणास वर दिला. म्हणून या स्थानास ' नर्तनालय ' म्हणतात. बाणगंगेत स्नान करून बाणेश्वराचे दर्शन घेतल्यास गंगेत स्नान केल्याचे पुण्य मिळते. देवांप्रमाणे स्वर्गात आनंद भोगण्याचे सौभाग्य प्राप्त होते.

याच वेळी वराहांच्या शालग्रामक्षेत्रात सालंकायनमुनीही महान तप करीत होते. त्यांच्या मनात शिवांप्रमाणे पुत्राची इच्छा होती. मुनींचा हा भाव पाहून शिवांनी आपले एक सुंदर, सुखप्रद रूप निर्माण केले. आपल्या योगमायेने ते सालंकायनांचे पुत्र झाले व त्यांच्या दक्षिण-भागी विराजले. पण मुनींनी हे जाणले नाही. ते भगवान वराहांच्या आराधनेत तत्पर होते. तेव्हा शंकराच्याच दुसऱ्या मूर्तीने, नंदीने हसून सालंकायनमुनींना विचारले, ' मुनिवर, आपण आता उपासना थांबवावी. आपला मनोरथ सिद्ध झाला आहे. '

नंदीचे हे बोलणे ऐकून मुनिवर सालंकायनांचे मुख प्रसन्नतेने चमकू लागले. ते आश्चर्याने म्हणाले, ' जर माझ्या तपाचा उदय होणार असेल तर भगवान विष्णूंनी मला अगत्यानं दर्शन द्यायला हवंय, ते जोपर्यंत मला दर्शन देत नाहीत, तोपर्यंत मी तपस्येपासून विरत होणार नाही. ' नंतर ते नंदीस म्हणाले, ' पुत्रा, मी तुला आज्ञा देतो. तू योगाचा आश्रय घेऊन मथुरेस जा. तिथं माझा एक पवित्र आश्रम आहे. तिथं खूप मोठी गोसंपत्ती आहे. तिथं आमुष्यायण नावाचा माझा एक शिष्य आहे. त्याला घेऊन तू त्वरित इथं ये. '

सालंकायनमुनींची आज्ञा होताच नंदी मथुरेस गेला. तेथे त्याने आश्रमाचा शोध घेऊन आमुष्यायणाची भेट घेतली. नंदी आमुष्यायणा-सह गोधन घेऊन परत निघाला. अनेक दिवसांनी तो गंडकीनदीच्या तीरावर त्रिवेणीसंगमापाशी आला. ' देविका ' नावाची एक नदी तेथे येऊन तपस्या करीत होती. पुलस्त्य व पुलह मुनींच्या आश्रमापाशी ही नदी गंगेस मिळाली. या तीन नद्यांचा संगम ' त्रिवेणीसंगम ' या नावाने प्रसिद्ध झाला. पुढे ' कामिक ' तीर्थ असे याचे नाव झाले. या तीर्थाने पितृगण प्रसन्न होतात. येथे भगवान शंकराचे एक लिंग आहे.

यालाच ‘त्रिजलेश्वर’ महादेव असे म्हणतात. याच्या दर्शनाने मुक्ती सुलभ होते. सर्व पापे दूर होतात.

भगवान वराहांनी अशी माहिती दिल्यावर पृथ्वी म्हणाली, ‘प्रभो, मी तर ऐकलं होतं की, त्रिवेणी केवळ प्रयागात आहे. इथं महेश्वर ‘शूलटंक’, ‘सोमेश्वर’ या नावांनी प्रसिद्ध आहेत. स्वत: श्रीहरीही ‘वेणीमाधव’ या नावानं विराजतात. इथं गंगा, यमुना, सरस्वती यांचा संगम आहे, या ‘तीर्थराजा’त स्नान केल्यानं मनुष्यास मुक्ती मिळते. मग आपण गंडकीचं ‘त्रिवेणी–’ स्थान सांगता, हे कोणतं ?’

यावर भगवान वराहांनी पृथ्वीला एक प्राचीन इतिहास सांगितला. हिमालयपर्वताच्या रमणीय स्थलावर देवांचा निवास असतो. येथे भगवान विष्णूंनी जगताच्या हितासाठी तपस्या सुरू केली. काही दिवसानंतर त्यांच्या मूर्तीतून एक दिव्य तेज प्रकट झाले. त्यामुळे चर व अचर जगत जळू लागले. विष्णूंच्या कपोलास घाम आला. त्या स्वेदापासून गंगानदी प्रवाहित झाली. या अद्‌भुत घटनेचे सर्वांना आश्चर्य वाटले. भगवान शंकर, ब्रह्मदेव यांनी गंगेच्या उद्‌गमस्थानाचा शोध घेतला. भगवान शंकर थोडा वेळ ध्यानस्थ बसले. नंतर ते म्हणाले, ‘मी या गंगेचं उगमस्थान दाखवितो.’ यानंतर ते उमादेवी, गण, इतर देव भगवान विष्णूंच्या तपस्यास्थानापाशी आले. त्यांनी म्हटले, ‘भगवन्, आपण समर्थ आहात. अखिल जगत आपणांपासून निर्माण झालं आहे. आपण कोणत्या हेतूनं तप करीत आहात ? सर्व जगत आपलाच आश्रय घेऊन आहे. आपण सर्वांचे अधिष्ठाते आहात. आपणांसाठी कोणता पदार्थ दुर्लभ आहे ? आपण हे कठोर तप कशासाठी आचरता ?’

विष्णूंनी त्यांना प्रणाम करून म्हटले, ‘मी जगताच्या हितकामनेसाठी तप करण्यास उद्यत झालो आहे. आपल्या दर्शनाची मोठीच उत्सुकता होती. आपलं दर्शन झाल्यानं माझा मनोरथ सफल झाला.’

‘भगवन्’, शंकर म्हणाले, ‘हे मुक्तिक्षेत्र आहे. याच्या दर्शनानं मनुष्य मुक्तीचा अधिकारी होईल. कारण आपल्या गंडस्थलापासून प्रकट झालेली ही ‘गंडकी’नदी नद्यांत श्रेष्ठ होईल. आपण जगताचे स्वामी आहात. आपला निवास इथंच असेल. आपल्या सहवासात इथंच

मी शिव, ब्रह्मा, सर्व देव, ऋषी, यज्ञ व तीर्थ यांचा निवास या गंडकीनदीत होईल . प्रभो, जो मनुष्य पूर्ण कार्तिकमासात इथं स्नान करील, त्याची सर्व पापं नष्ट होतील. त्याला मुक्ती मिळेल. इथं स्नान केल्यास गंगा-स्नानाचं फल प्राप्त होईल. केवळ गंगाच हिच्यापेक्षा श्रेष्ठ आहे, भुक्ती, मुक्ती देणाऱ्या या पुण्यमयी गंडकीस 'देविका' नावाची नदी मिळेल. थोड्याच अंतरावर पुलस्त्य व पुलह मुनींचे आश्रम आहेत. याच वेळी ब्रह्मदेवांच्या शरीरातून एक पुण्यमय नदी निर्माण होऊन गंडकीस मिळेल. म्हणून या स्थानास त्रिवेणी हे नाव प्राप्त होईल.'

यानंतर भगवान वराहांनी आणखी एक प्रसंग पृथ्वीस सांगितला. वेदविद्याविशारद कर्दममुनींना दोन पुत्र होते. जय व विजय अशी त्यांची नावे होती. ते दोघें यज्ञविद्येत निपुण व वेदवेदांगांचे पारगामी विद्वान होते. भगवान श्रीहरींवर त्यांची भक्ती होती. अशा या दोन परमकुशल ब्राह्मणांना राजा मरुताने यज्ञासाठी बोलविले. यज्ञ समाप्त झाल्यावर राजाने या बंधूंची पूजा केली. त्यांना भरपूर दक्षिणा दिली. ते घरी आले व दक्षिणा वाटू लागले. या वेळी त्यांच्यांत संघर्ष झाला. मोठा पुत्र जय धनाची बरोबर वाटणी करू इच्छीत होता. विजय म्हणत होता, 'ज्यानं अर्जन केलं, त्याचं हे धन आहे.' तेव्हा जय म्हणाला, 'मी शक्ति-हीन समजून तू असं म्हणतोस का ? सर्व संपत्ती तू घेऊ पाहातोस.मला काहीच मिळू नये अशी तुझी इच्छा दिसते. जा. तू ग्राह (सुसर)होशील.' त्यावर विजयनेही म्हटले,' धनाच्या लोभानं तू अंधा बनला आहेस, तू मदांध हत्ती होशील.'

अशा रीतीने शापग्रस्त होऊन हे दोन बंधू मगर व हत्ती झाले. विजय गंडकीनदीत जातिस्मर (पूर्व जन्मीची आठवण ठेवणारा) ग्राह बनला. आणि जय त्रिवेणीक्षेत्रात हत्ती झाला. हा हत्ती आपली स्त्री व मुले यांच्यासह क्रीडा करीत त्या वनात राहू लागला. अशी कित्येक हजार वर्षे गेली. एकदा तो हत्ती हत्तिणींच्या झुंडीसह त्रिवेणीसंगमात आला. तेथे तो स्नान करू लागाला. तो हत्तिणींवर जल शिपडीत होता. हत्तिणी त्याच्यावर शिपडीत होत्या. तो सोंडेने जल पीत होता. हत्तिणींना पाजीत होता. अशा प्रसन्न वृत्तीने तो त्या जलात क्रीडा करीत होता.

याच वेळी त्या संगमातील मगराने पूर्वीचे वैर स्मरून त्या हत्तीचा पाय अत्यंत दृढतेने पकडला. यानंतर हत्तीनेही त्यावर आपल्या दातांनी प्रहार केला. तो मगर त्या हत्तीस खोल पाण्यात ओढू लागला. हत्ती जलाबाहेर येऊ पाहात होता. मगर त्याला पाण्यात खेचण्याच्या प्रयत्नात होता. असे युद्ध दोघांत कित्येक हजार वर्षे चालले.

या दोघांच्यांतील संघर्षाने तेथील सर्व प्राण्यांना अतिशय पीडा पोचली. अनेक प्राण्यांना जीव गमवावा लागला. त्या क्षेत्राच्या स्वामीने, जलेश्वराने श्रीहरींना या संघर्षाची कल्पना दिली. भगवानांनी सुदर्शन चक्राने मगरीपासून हत्तीची मुक्तता केली. श्रीहरी आपले चक्र वारंवार वापरीत. या चक्राचा आघात शिलांवरही होई. शिलांवर चक्राची चिन्हे उमटत. त्यामुळे या शिला वज्रकीटकांद्वारे कुरतडल्यासारख्या दिसू लागल्या. असा या क्षेत्राचा महिमा.

भगवान वराहांनी आणखी एक प्रसंग याच एकशेचव्वेचाळिसाव्या अध्यायात सांगितला आहे. राजा भरत एकदा पुलह–पुलस्त्यमुनींच्या आश्रमाजवळ जाऊन 'त्रिजलेश्वर' भगवानाची पूजा करू लागला. त्याला संसारापासून विरक्ती निर्माण झाली. मृगाच्या शरीरापासून मुक्त होऊन तो जडभरत झाला. या जन्मीही त्याने प्रभूंची पूजा केली, म्हणून त्यांना जडेश्वर वा जलेश्वर असे नाव मिळाले. भक्तिपूर्वक त्यांची पूजा केली की, योगसिद्धी प्राप्त होते. भगवंतांनी जेथे सुदर्शनचक्र चालविले तेथे 'चक्रतीर्थ' निर्माण झाले. येथे स्नान करून मनुष्य तेजाने संपन्न होतो. सूर्यलोकात त्याला प्रतिष्ठा प्राप्त होते. भगवान शंकरही तेथेच असल्याने या क्षेत्रास 'हरिहरक्षेत्र' या नावाने प्रसिद्धी मिळाली.

येथेच 'त्रिधारक' नावाचे तीर्थ आहे. त्याच्या पूर्वभागी 'हंसतीर्थ' आहे. येथे एकदा शिवरात्रीस मंदिरात उत्सव चालू होता. अनेक प्रकारचे नैवेद्य समर्पण करून शंकरांची उपासना सुरू होती. एवढ्यात एक भुके-लेला कावळा त्या अन्नावर तुटून पडला. त्याने घास तोंडात धरला दुसऱ्या एका कावळ्याने पहिल्याशी झगडा सुरू केला. दोघेही झुंजत असताना एका कुंडात पडले. पडत असताना त्यांची आकृती हंसाप्रमाणे झाली.

ते तेव्हा वाहेर आले तेव्हा त्यांचा प्रकाश चंद्राप्रमाणे प्रकाशत होता. या घटनेचे लोकांना आश्चर्य वाटले. तेव्हापासून या स्थानास लोक 'हंस-तीर्थ' म्हणू लागले. फार पूर्वी यक्षांनी येथे भगवान शंकरांची आराधना केली होती. तेव्हापासून 'यक्षतीर्थ' असेही त्या स्थानास म्हणू लागले. या स्थानास स्नान केले तर मनुष्य यक्षलोकास जातो.

## शालग्रामक्षेत्राचे माहात्म्य

एकदा धरणीने भगवान वराहांना विचारले, 'भगवन्, आपण सर्व देवांचे स्वामी आहात. मुनिवर सालंकायनांनी त्या मुक्तिप्रद क्षेत्रात तपस्या करून कोणतं कार्य केलं? कोणती सिद्धी प्राप्त केली?' भगवान वराहांनी वसुंधरेस सालंकायनमुनींचा वृत्तांत सांगितला. हे मुनी तेथे दीर्घकालपर्यंत तपस्या करीत होतें. त्यांच्यापुढे शालाचा एक उत्तम वृक्ष होता. त्याचा सुगंध सर्वत्र फैलावला होता. या वेळी त्यांची दृष्टी त्या शालवृक्षावर पडली. ते त्या विशाल वृक्षाखाली गेलें आणि विश्रांती घेऊ लागले. त्यांच्या मनात भगवानांच्या दर्शनाची अभिलाषा निर्माण झाली. या वेळी ते मुनी शालवृक्षाच्या पूर्वभागी पश्चिमेस मुख करून वसले होते. भगवंतांच्या मायेने त्यांना ज्ञानशून्य केले. ते त्यांना पाहू शकले नाहीत.

काही दिवसांनंतर वैशाखमासातील द्वादशी तिथी आली. तेव्हा त्यांना पूर्व दिशेस भगवंतांचे दर्शन झाले. व्रत करणाऱ्या मुनींनी त्यांना वारंवार प्रणाम केला. त्यांची त्यांनी वेदमंत्रांनी स्तुती केली. भगवंतांच्या प्रखर तेजामुळे या वेळी मुनींचे डोळे दिपून गेले. ते नेत्र वंद करून भगवंतांची स्तुती करू लागले. त्यांनी प्रभूंना वृक्षाच्या दक्षिणभागास पाहिले. ते त्यांच्या समोर जाऊन वसले. 'ऋग्वेदांतील' स्तोत्रांनी त्यांनी भगवंतांची स्तुती केली. तेव्हा भगवंत शालवृक्षाच्या पश्चिमभागी गेले. तेव्हा ते मुनीही पश्चिमभागी आले. त्यांनी 'यजुर्वेदातील' मंत्रांनी भगवंतांची स्तुती केली. त्यानंतर भगवंत उत्तरदिशेस गेले. मुनींनी तेथे जाऊन 'सामवेदातील' मंत्रांनी त्यांची स्तुती केली. ऋषिवर सालं-

कायनांच्या स्तुतीनें भगवंत संतुष्ट होऊन म्हणाले,

'मुनिवर सालंकायन, तुमच्या स्तुतीनं मी संतुष्ट झालो आहे. तपस्येच्या फलाच्या रूपानं तुम्हांस सिद्धी प्राप्त होईल.'

'हरे,' सालंकायनमुनी विनयपूर्वक म्हणाले, 'मी भूमंडलावर नित्य भ्रमण करून तप करीत असतो. पण निश्चित रूपानं मला आजच आपलं शुभ दर्शन झालं. आपण माझ्यावर प्रसन्न असाल, वर देणार असाल तर जगन्नाथा, भगवान शिवांसारखा मला पुत्र द्यावा.' तेव्हा भगवंत म्हणाले, 'मुनीश्वर, शिवांचीच एक दुसरी मूर्ती नंदिकेश्वर या नावानं त्यांच्या उजव्या अंगापासून पुत्ररूपानं प्रकट झाली आहे. ब्राह्मणदेवा, आता तुम्ही तपापासून उपरत व्हावं. योगमायेच्या शक्तीनं संपन्न होऊन ते या वेळी माझ्याबरोबर व्रजात विराजत आहेत. आपला शिष्य आमुष्यायणास मथुरेहून बोलावून ते शूलपाणींच्या रूपात इथं उपस्थित झाले आहेत. आता आणखी एक गुप्त रहस्य सांगतो. आजपासून हे क्षेत्र 'शालग्राम' या नावानं ओळखलं जाईल. आपण हा जो वृक्ष इथं पाहिलात ते माझंच रूप आहे. भगवान शंकरांशिवाय या गुप्त वाबीस अन्य कुणीही जाणीत नाही. मी योगमायेनं लपून असतो. पण तुमच्या तपानं प्रकट झालो आहे.'

सालंकायन मुनींना असे म्हणून भगवंत अंतर्धान पावले. त्या वृक्षाला प्रदक्षिणा करून मुनीही आपल्या आश्रमास निघून गेले. यानंतर वराहांनी वसुंधरेस आणखी एका आश्चर्यकारक स्थानाचा परिचय करून दिला. येथेच 'शंखप्रभ' नावाचे एक परम गुह्य क्षेत्र आहे. येथे द्वादशीस रात्री शंखाचा ध्वनी ऐकू येतो. या क्षेत्राच्या दक्षिणभागी 'गदाकुंड' नावाचे एक तीर्थ आहे. येथून एक जलस्रोत प्रवाहित होतो. येथे तीन दिवस राहून स्नान करावे. त्याला वेदांतवादी ब्राह्मणासारखे फल मिळते. जर मनुष्याचा प्राण या क्षेत्रात गेला, तर तो हातात गदा धारण करून, विशालकाय होऊन भगवंताच्या लोकास जातो.

येथेच 'देवहृद' या नावाचे आणखी एक क्षेत्र आहे. येथील सुंदर व अगाध जलाचे देवसरोवर सर्वांना सुख देते. हे सरोवर सदा जलाने परिपूर्ण असते. त्यात अनेक मत्स्य चक्राच्या चिन्हाने युक्त

असतात. येथे एक आश्चर्यकारक घटना निरंतर घडते. भगवंतांवर श्रद्धा असेल तरच हे अलौकिक दृश्य दिसते. पापी पुरुषास हे दिसत नाही. या परम पवित्र देवहृदात सूर्योदयाच्या समयास सोनेरी रंगाची छत्तीस सुवर्णकमळे दिसतात. मध्यान्हकालपर्यंत ही दृष्टीस पडतात. यात स्नान केल्याने मानसिक, वाचिक व शारीरिक मळ धुतला जातो. तो शुद्ध बनून स्वर्गास जातो. जी व्यक्ती येथे दहा दिवस निवास करून स्नान करते, तिला दहा अश्वमेधयज्ञांचे फल प्राप्त होते.

येथेच श्रीकृष्णांच्या मूर्तीपासून 'कृष्णगंडकी'चा जन्म झाला आहे. येथेच 'त्रिशूलगंगा' नावाची विशाल नदी शिवांच्या शरीरापासून निघाली. तीही येथेच आहे. या दोन नद्यांच्या मध्ये हे तीर्थ आहे. या स्थानास 'सर्वतीर्थकदंबक' म्हणतात. येथील कदलीवन शिववनाचे सौंदर्य वाढविते. निचुल (कडूलिंब) जायफळ, नागकेशर, खजूर, अशोक, बकुल, आम्र, प्रियालक, नारळ, सुपारी, चंपा, जांभूळ, धव, नारंगी, बोर, मातुलुंग, केतकी, मल्लिका, (चमेली) यूथिका, (जुई); इत्यादी अनेक फळांच्या व फुलांच्या वृक्षांनी येथील शोभा वाढते. देव आपल्या पत्नींसह येथे येऊन आनंद लुटतात. या परम पुण्यमय सरोवरात त्या दोन महान नद्यांचा संगम आहे. येथे स्नान केल्याने शंभर अश्वमेध-यज्ञांचे फल प्राप्त होते. वैशाखमासात येथे स्नान केल्याने एक हजार गायींचे दान केल्याचे फल मिळते. माघमासात स्नान केल्यास प्रयागात स्नान केल्याचे फळ प्राप्त होते. कार्तिकमासात जेव्हा सूर्य तुलाराशीत असतो, तेव्हा येथे विधिपूर्वक स्नान केल्यास निश्चयाने मुक्तिफलाचा लाभ मिळतो.

असे हे 'हरिहरात्मक' क्षेत्र आहे. 'मुक्तिक्षेत्र', 'रुरुखंड' 'त्रिवेणीसंगम', गंडकीसंगम', 'शालग्रामक्षेत्र,' अशा विविध क्षेत्रांचा महिमा भगवंतांनी पृथ्वीस सांगितला. जो मनुष्य प्रातःकाळी उठून या माहात्म्याचा पाठ करतो, त्याच्या एकवीस पिढयांचा उद्धार होतो. असा मनुष्य मृत्युसमयी मोहग्रस्त होत नाही. तो भगवंतांच्या धामास जातो.

## रुरुक्षेत्र व हृषीकेश यांचे माहात्म्य

यानंतर भगवंतांनी पृथ्वीस ' रुरु ' खंडाची प्रसिद्धी कशी झाली, तेथे त्यांचा आश्रम कसा झाला, यांसंबंधी माहिती दिली. पूर्वी भृगुवंशात देवदत्त नावाचा एक वेद वेदांगपारंगत विद्वान ब्राह्मण होता. तो आपल्या पवित्र आश्रमात राहून दहा हजार वर्षांपर्यंत तपश्चर्या करीत राहिला. यामुळे इंद्राच्या मनात चिंता निर्माण झाली. त्याने कामदेव, वसंतऋतू, गंधर्वांसह प्रम्लोचा नावाची अप्सरा, यांना बोलावून तपस्येत विघ्न आणण्यास सांगितले. ती अप्सरा मुनिवर देवदत्ताच्या आश्रमात आली. तेथे अनेक प्रकारचे वृक्ष, लता, कोकिळांचा समूह यांनी शोभा वाढली होती. आम्रमंजिऱ्या, भ्रमरांचे गुंजन, गंधर्वांचे संगीत, शीतल, मंद व सुगंधित वायू, यांनी अनुरागाचे उद्दीपन केले. अत्यंत स्वच्छ, सुगंधित व मधुर जलाने सरोवर भरले होते. त्याच्यात कमलांचा समुदाय फुलला होता. याच वेळी सुंदर अप्सरेने अत्यंत मधुर संगीताची तान छेडली. कामदेवाने आपले पुष्पधनुष्य खेचले. शांतचित्ताच्या देवदत्तावर त्याचे प्रयोग सुरू झाले.

रम्य आलापांनी उत्तम व्रती मुनिवर देवदत्ताचे चित्त क्षुब्ध झाले. तो आता आश्रमात फिरू लागला. त्याच वेळी सुंदर अवयवांनी शोभणारी प्रम्लोचा त्याला दिसली. ती त्या वेळी चेंडू खेळत होती. तिची दृष्टी पडताच मुनिवरास कामदेवाने विद्ध केले. त्याच वेळी मलयवायूचा झोत येऊन प्रम्लोचाच्या अंगावरील वस्त्र उडाले. आता मुनी स्वतःस सावरू शकला नाही. त्याने विचारले,

' सुभगे, तू कोण आहेस ? या उपवनात कशी आलीस ?' शेवटी तिच्या संमतीने तो तिच्याजवळ राहिला व त्याने नाना प्रकारचे भोग भोगले. त्यांत आसक्त झाल्याने त्यांना दिनरातींचेही बंधन राहिले नाही. असे खूप दिवस गेले. एके दिवशी मुनींचा विवेक जागा झाला. त्याची अज्ञान रूपी निद्रा संपली. तो म्हणू लागला, ' अहो, भगवान श्रीहरींची माया पाहा कशी आहे ! तिच्याच प्रभावानं मी मोहात फसलो. दैवाच्या अधीन होऊन मला असं कुत्सित कार्यं करावं लागलं.

सुभषित असं सांगते की, नारी अग्नीच्या कुंडाप्रमाणे आहे. पुरुष घृताच्या घड्यासारखा आहे. पण मला हे पटत नाही. तुपाचा घडा अग्नीवर ठेवला की विरघळतो. पण अग्नीस पाहाताच नाही. पण पुरुषमात्र स्त्रीस पाहाताच विरघळतो. पण यात स्त्रीचा तरी काय अपराध ? कारण मी स्वतःच आपल्या इंद्रियांवर विजय मिळविण्यास असमर्थ ठरलो.'

एवढा त्याच्या मनास पश्चात्ताप झाल्यावर त्याने प्रम्लोचा अप्सरेस पाठवून दिले. तो मनाशी विचार करू लागला, 'या स्थानात विघ्न आलं. आता या आश्रमाचा आपण त्याग करावा. तीव्र तपश्चर्या करून आपलं शरीर सुकवून टाकू.' असा निश्चय करून ते मुनी भृगुमुनींच्या आश्रमात गेले. तेथे गंडकीनदीत स्नान करून त्यांनी देवांना व पितरांना तर्पण केले. भगवान विष्णूंची व शिवांची मनापासून पूजा केली. आणि भगवान शंकरांच्या दर्शनाच्या अभिलाषेने त्याने भृगुतुंगावर * कठोर तपस्या सुरू केली. अनेक दिवसांनी त्याच्यावर भगवान शिव प्रसन्न झाले. त्यांच्या लिंगरूपातून जलाच्या धारा प्रकट झाल्या. भगवान म्हणाले,

'मुने, इकडं पाहा. मी शिव आहे. मीच विष्णू आहे, हेही तू जाणलं पाहिजेस. आम्हा दोघांत तत्त्वतः काही भेद नाही. यापूर्वीच्या तपस्येत मी व विष्णू यांच्यांत तू भेद मानीत होतास. म्हणून तीत विघ्नं आली. तुझी तपस्या क्षीण झाली. आता तू आम्हां दोघांना समानभावानं पाहा. यामुळं तुला त्वरित सिद्धी प्राप्त होईल. जिथं तू तपस्या केलीस, जिथून अनेक शिवलिंगं प्रकट झाली, ते स्थान 'संगम' या नावानं प्रसिद्ध होईल. या गंडकीतीर्थात स्नान करून जो या लिंगांची पूजा करील, त्याला उत्तम प्रकारचं फल प्राप्त होईल.'

मुनिवरास हा वर देऊन भगवान शिव अंतर्धान पावले. इकडे मुनीच्या संपर्काने प्रम्लोचा गर्भवती झाली होती. आश्रमापाशीच तिला एक कन्या झाली. तिला तिथेच सोडून अप्सरा स्वर्गात निघून गेली. तिला 'रुरु' नावाच्या मृगांनी पाळून सांभाळले, म्हणून तिचे नाव

* श्री. नंदलाल दे यांच्या मतानुसार हे स्थान गंडकीच्या पूर्वोत्तरतटावरील नेपाळमधील 'मुक्तिनाथ' पर्वतच आहे. महाभारतातही या स्थानाचा उल्लेख आहे.

‘ रुरु ’ झाले. ती आपल्या पित्याच्या, देवदत्ताच्या आश्रमात राहात असे. अनेक युवकांना ती आपली पत्नी म्हणून हवीशी वाटे. पण तिने कोणाच न ऐकता भगवान विष्णूंची तपस्या सुरू केली. सुकलेली पाने खाऊन तिने कठोर व्रत धारण केले. नंतर केवळ वायू भक्षण करून ती तप करू लागली. अशा रीतीने शंभर वर्षांपर्यंत तिने तपश्चर्या केली. तेव्हा प्रत्यक्ष भगवान तिच्यासमोर प्रकट झाले. नियंत्रित इंद्रियांच्या कन्येसमोर स्वतः भगवान नियंत्रित रूपात प्रकट झाले. म्हणून त्या स्थानाचे नाव ‘ हृषीकेश ’ झाले.

हृषीकाणि नियम्याहं यतः प्रत्यक्षतां गतः ।
‘ हृषीकेश ’ इति ख्यातो नाम्ना तत्रैव संस्थितः ।।
(१४६.७३)

भगवंत प्रकट होऊन तिला म्हणाले, ‘ बाले, तुझ्या या तपस्येनं मी संतुष्ट झालो आहे. तुझ्या इच्छेस येईल तो वर तू माग. कोणतीही दुर्लभ वस्तू मी तुला द्यायला तयार आहे.’ तेव्हा रुरु नावाच्या त्या दिव्य कन्येने वारंवार प्रणाम करून म्हटले, ‘ जगत्पते, आपण जर मला वर देणार असाल, तर आपण याच रूपात इथं विराजमान होण्याची कृपा करावी.’ तेव्हा प्रभूंनी त्या बालेस म्हटले, ‘ बाले, तुझं कल्याण असो. मी तर इथंच राहीन. तू आणखी एखादा वर मागून घे.’ तेव्हा भगवंतांना प्रणाम करून ती म्हणाली, ‘ देवा, आपण जर प्रसन्न असाल तर हे क्षेत्र माझ्याच नावानं प्रसिद्ध व्हावं, अशी माझी इच्छा आहे. याखेरीज माझी कोणतीच इच्छा नाही.’ तेव्हा भगवंत तिला पुन्हा म्हणाले, ‘ सुभगे, तसंच होईल. तुझं हे शरीर सर्वोत्तम तीर्थ होईल. हे सर्व क्षेत्रच तुझ्या नावानं विख्यात होईल. या तीर्थात तीन रात्र राहून जो स्नान करील, तो माझ्या दर्शनानं पवित्र होईल, यात कसलाच संशय नाही. त्याची सर्व पापं नष्ट होतील.’ अशा प्रकारे रुरूला वर देऊन भगवान अंतर्धान पावले.

## 'गोनिष्क्रमण'तीर्थाचे माहात्म्य

यानंतर भगवान वराहांनी आणखी एका तीर्थस्थानाचे माहात्म्य पृथ्वीस सांगितले. हिमालयाच्या शिखरावर भगवंतांचे 'गोनिष्क्रमण' नावाचे एक क्षेत्र आहे. तेथे पूर्वी सुरभी आदी गायी समुद्रातून बाहेर येत. फार पूर्वी और्व नावाचे एक प्रजापती होते. त्यांनी येथे दीर्घकाल-पर्यंत निष्काम भावनेने तपस्या केली. त्या ठिकाणी काही काळानंतर फुलांसहित लक्ष्मी तेथे प्रकट झाली. तेव्हा तेथे आणखी तपस्वी ब्राह्मण आले. याच वेळी भगवान शंकरही फिरत फिरत तेथे आले.

एकदा और्वमुनी काही कमलपुष्पांसाठी हरिद्वारला गेले होते, तेव्हा महादेवांनी आपल्या उग्र तेजाने और्वमुनींचा प्रिय आश्रम भस्म करून टाकला. आणि ते आपल्या निवासस्थानी हिमालयावर गेले. त्याच वेळी और्वमुनी पत्रपुष्पांची परडी घेऊन आपल्या आश्रमाकडे आले. मुनी जरी शांत व मृदू स्वभावाचे, क्षमाशील, सत्यव्रती होते, तरी फुलं, फलं, जल यांनी संपन्न असलेला आपला आश्रम दग्ध झालेला पाहून त्यांना फार क्रोध आला. दुःखाने त्यांचे डोळे भरून आले. क्रोधाने त्यांनी शाप दिला, 'अनेक फुलं, फलं, उदक यांनी समृद्ध असा माझा आश्रम ज्यांनी जाळला असेल तो दुःखानं संतप्त होऊन जगात भटकत फिरेल.'

यामुळे भगवान शंकर स्वतः जगताचे स्वामी असले तरी व्याकुळ बनून पार्वतीला म्हणाले, 'प्रिये, और्वमुनींची कठोर तपस्या पाहून देव-समुदाय अत्यंत दुःखी झाला होता. म्हणून देवांनी प्रार्थना केली की, या और्वांपासून वाचण्याचा उपाय करावा. तेव्हा मी और्वांच्या आश्रमास जाऊन, तिसरा नेत्र उघडून, आश्रम भस्म केला. परंतु त्यामुळं और्व-मुनींस महान दुःख झालं. त्याच्या क्रोधानं माझ्याही मनास मोठीच व्यथा झाली आहे.'

महाभाग शंभू अशांत होऊन इकडे तिकडे भटकू लागले. पण त्यांना शांतता वाटेना. पार्वतीने भगवान शंकरांना म्हटले, 'आता आपण नारायणांकडं जाऊ. संभव आहे की, त्यांच्या उपायानं आपणांस

शांतता प्राप्त होईल. अथवा नारायणांना घेऊन आपण सर्वच और्वमुनीं-कडं जाऊ. त्यांना प्रार्थना करू. त्यांना त्यांचा शाप परत घेण्याची विनंती करू. कारण आपण सर्वच आता जळू लागलो आहोत.'

तेव्हा त्या सर्वांनी तसा प्रयत्न केला. और्वांनी उत्तर दिले. 'माझा शाप तर कधी खोटा ठरणार नाही. हां. एक उपाय आहे. सुरभी गायींना घेऊन आपण रुद्रांकडं जावं. त्यांच्या दुधानं त्यांना स्नान घालावं. तरच आपली या शापातून मुक्तता होईल.' त्या वेळी भगवंतांनी महान शक्ति-शालिनी सत्त्याहत्तर सुरभी गायी स्वर्गातून खाली उतरविल्या. त्यांच्या दुधाने रुद्रांना स्नान घातल्यावर सर्वांचा दाह थांबला. तेव्हापासून या स्थानास 'गोनिष्क्रमण'तीर्थ असे नाव मिळाले. जो मनुष्य येथे एक रात्र निवास करून स्नान करतो तो 'गोलोका'त जातो. या तीर्थात जर त्याचा मृत्यू झाला तर त्यास शंख, चक्र, गदा यांनी संपन्न होऊन भगवं-तांच्या लोकात प्रतिष्ठा प्राप्त होते.

येथे गायींच्या मुखांतून बाहेर पडलेला एक अत्यंत श्रुतिसुखद शब्द ऐकू येतो. एकदा ज्येष्ठ मासाच्या शुक्लपक्षाच्या द्वादशीतिथीस भगवंतांनी असा सुसंस्कृत शब्द ऐकला. असेच 'गोस्थल' नावाचेही एक पवित्र क्षेत्र आहे. त्याच्या प्रभावाने सर्व पापे नष्ट होतात. या स्थानाच्या माहात्म्याचा जो पाठ करील, त्याला उत्तम गती प्राप्त होईल. भगवं-तांच्या धामात तो सुशोभित होईल. या स्थानात भगवंतांचा नेहमी निवास असतो. येथे गंगेची धारा पूर्वेकडून पश्चिमेस वाहाते.

## स्तुतस्वामीचे माहात्म्य

एकशेअठ्ठेचाळिसाव्या अध्यायात भगवान वराहांनी स्तुतस्वामीचे माहात्म्य पृथ्वीस निवेदन केले. भगवान वराह म्हणाले, 'महाभागे, आता मी तुला आणखी एका स्थानाची महती सांगतो. या स्थानाचं नाव आहे स्तुतस्वामी. द्वापरयुगात मी तिथं निवास करीन. त्या वेळी वसुदेव माझा पिता होईल. देवकी माता. माझं नाव कृष्ण होईल. त्या वेळी मी सर्व असुरांचा संहार करीन. त्या वेळी माझे पांच शिष्य— शांडिल्य, जाजली, कपिल, उपसायक, भृगू असतील. मी वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न

आणि अनिरुद्ध या चार रूपांत राहीन. आमची उपासना करून अनेक व्यक्ती मुक्त होतील. देवी, हे वराहपुराण जगताच्या उद्धाराचं परम साधन व महान शास्त्र आहे. शांडिल्यप्रभृती माझे शिष्य या परम साधनाचा प्रचार करतील.'

या 'स्तुतस्वामी' क्षेत्रापासून जवळजवळ पांच कोसांवर दूर पश्चिमेस एक कुंड आहे. त्याचे जल भगवंतांना फार प्रिय असते. त्या अगाध सरोवराचे पाणी सुवर्ण अथवा मरकतमणी यांच्यासारखे चमकदार असते. या सरोवरात पांच दिवस राहून स्नान केल्यास सर्व पापे धुतली जातात. याच्या जवळच 'धूतपाप' नावाचे एक तीर्थ आहे. ते मणिपुरगिरीवर आहे. त्यावर निवास करणाऱ्या प्राण्यांचे पाप जोपर्यंत समाप्त होत नाही तोपर्यंत त्यांवर जलधारा कधीच पडत नाहीत. ही एक मोठी आश्चर्याची बाब आहे. सर्व पापे नष्ट झाल्यावरच प्राण्यांवर तेथे धारा पडते. असाच एक तेथे पिंपळाचा वृक्षही आहे.

यानंतर पृथ्वीने विचारले, 'भगवन्, आपण स्तुतस्वामी असं म्हणता. या स्तुतस्वामी शब्दाचा अभिप्राय तरी काय आहे?' तेव्हा भगवंत म्हणाले, 'वसुंधरे, जेव्हा मी 'मणिपुर' नावाच्या स्थानी होतो, तेव्हा मंत्रांच्या साह्यानं ब्रह्मादींनी माझी स्तुती केली. परम सौभाग्यवती देवी, याच कारणानं नारद, असित, देवल व पर्वत या नावांच्या मुनिगणांनी भक्तीनं संपन्न होऊन त्या मणिपूरपर्वतावरील माझं नाव 'स्तुतस्वामी' ठेविलं. तेव्हापासून याच नावानं मी प्रसिद्ध झालो. भद्रे, मी तुला अखिल धर्मांना आश्रय देणारं हे 'श्रीस्तुतिस्वामींचं माहात्म्य' सांगितलं. आता आणखी काय ऐकण्याची इच्छा आहे?'

## द्वारकामाहात्म्य

पृथ्वीच्या विनंतीवरून भगवान वराहांनी तिला द्वारकेचा महिमा ऐकविला. ते म्हणाले, 'द्वापरयुगात यादवांच्या कुलात कुलोद्धारक 'शौरिवसुदेव' नावाचा माझा पिता होईल. त्या वेळी विश्वकर्म्यानं निर्माण केलेल्या पुरीत, द्वारकेत मी पांचशे वर्षांपर्यंत निवास करीन. त्याच वेळी दुर्वास नावाचे एक ऋषी माझ्या कुलाला शाप देतील. त्या

ऋषींच्या शापानं संतप्त झाल्यामुळं वृष्णी, अंधक, भोज या कुळांतील व्यक्तींचा संहार होईल. त्या वेळी जांववती नावाची माझी एक प्रिय पत्नी असेल. ती माझ्या सुखाची साधिका बनेल. तिच्यापासून एक भाग्यशाली पुत्र होईल. तो सांव या नावानं विख्यात होईल.'

यानंतर भगवंतांनी वैष्णवांना सुख देणाऱ्या द्वारकेतील स्थानांचे वर्णन केले. 'पंचसर' या नावाचे एक विख्यात गुह्य क्षेत्र आहे. या क्षेत्रात भक्तिभावाने स्नान करावे. त्याला अप्सरांनी भरलेल्या स्वर्गाचा लाभ होतो. या 'पंचसर' धामात प्राणाचा त्याग करणारा मनुष्य वैकुंठास जातो. याच समुद्रात मकराच्या आकृतीचे एक स्थान आहे. तेथे अनेक प्रकारचे मत्स्य आहेत. पण ते जलात स्नान करणाऱ्या व्यक्तींना काहीच त्रास देत नाहीत. मानव त्या जलात जेव्हा पिंडांना फेकतात तेव्हाच ते त्यांना ग्रहण करतात. पापी मनुष्याने दिलेल्या पिंडांचा स्वीकार ते करीत नाहीत.

याच द्वारकाक्षेत्रात 'पंचपिंड' नावाचे एक परम गुह्य स्थान आहे. तेथे अगाध जल आहे. त्याला पार करणे अतिशय अवघड आहे. त्याचा विस्तार एका कोसाचा आहे. मनुष्याने पांच रात्र तेथे राहून भगवंतांना अभिषेक करावा. त्यामुळे त्यांना इंद्रासमान आनंद भोगता येतो. जर तेथे त्याचा प्राण जाईल तर तो भगवंतांच्या धामास जाईल. याच द्वारकेत एक हंसकुंड नावाचे एक विख्यात तीर्थ आहे. तेथे 'मणिपूर' पर्वतावरून एक धारा पडते. या तीर्थात सहा दिवस राहून स्नान करण्याचा महिमा मोठा आहे. तो मनुष्य आसक्तिरहित होऊन वरुणलोकाचा आनंद उपभोगू शकतो. या हंसतीर्थास शरीराचा त्याग केला तर त्याला भगवंतांचा लोक प्राप्त होतो. याच द्वारकेत 'कदंव' नावाचे एक स्थान आहे. येथे वृष्णिकुलातील शुद्ध व्यक्ती भगवंतरूप झाल्या. येथे मनुष्याने चार रात्रींपर्यंत निवास करावा. भगवंतांना अभिषेक करावा. असे केल्याने तो निःसंदेह ऋषींच्या लोकास जाईल.

याच द्वारकेत 'चक्रतीर्थं' नावाचे एक प्रसिद्ध व श्रेष्ठ स्थान आहे. तेथे मणिपूरपर्वतावरून पांच धारा पडतात. पांच दिवस राहून

येथे अभिषेक करणारा मनुष्य दहा हजार वर्षांपर्यंत स्वर्गसुखाचा अनुभव घेतो. लोभ व मोह सोडून मनुष्याने येथे प्राण सोडल्यास तो भगवंतांच्या धामास जाऊन पोचतो. याच द्वारकेत 'रैवतक' नावाचे एक तीर्थ आहे. तेथे भगवंत लीला करीत असल्याने ते स्थान फार प्रसिद्ध आहे. अनेक लता, वल्लरी, फुले यांनी हे स्थान नेहमी शोभून दिसते. त्याच्या दहाही दिशांना अनेक वर्णांचे फत्तर व गुहा आहेत. वापी व कंदरे यांनी हे स्थान समृद्ध आहे. येथे राहून मनुष्याने सहा दिवस अभिषेक करावा. मग तो कृतकृत्य होऊन चंद्रलोकास जाईल.

येथील एक गोष्ट अलौकिक आहे. धर्माचे अभिलाषी प्राय: सर्व पुरुष हे दृश्य पाहू शकतात. तेथे सर्व वृक्षांची वहुतेक पाने गळून पडतात. पण एकही पान कोणासच दिसत नाही. सर्व पाने विमलजलात सामावून जातात. एक विशाल वृक्ष भगवंतांच्या पूर्वभागात व एक पार्श्वभागात आहे. देवांनाही या वृक्षांचे दर्शन होणे अवघड आहे. पांच कोसांच्या विस्ताराचे हे स्थान महान वृक्षांनी अत्यंत शोभायमान आहे. सुंदर गंधाची पद्मे आणि उत्पले यांनी हा परिसर समृद्ध आहे. जलपूर्ण तलाव व त्यांत अनेक मत्स्य यांनी हा भाग शोभून दिसतो. मनुष्याने आठ दिवस येथे राहून अभिषेक केल्यास तो अप्सरांनी युक्त अशा दिव्य नंदनवनात विहार करतो.

याच द्वारकाक्षेत्रात 'विष्णुसंक्रम' नावाचे एक स्थान आहे. येथे 'जरा' नावाच्या व्याधाने वाणाने भगवंतांना मारले होते. तेथे भगवंतांची मूर्ती आहे. तेथे एक कुंडही आहे. हे स्थान 'मणिपूर' पर्वतावर आहे, असे समजते. येथे एक धारा पडते. येथे निवास करणारा मनुष्य भगवंतांच्या धामास जातो. भगवंतांचे हे द्वारकाक्षेत्र दहा दिशांना तीस योजनांच्या प्रमाणात पसरले आहे. येथे भगवंतांचे दर्शन घेतल्यास त्वरित परमगती प्राप्त होईल. जो प्रातःकाली उठून या माहात्म्याचे अध्ययन करील, त्याच्या एकवीस पिढ्यांचा उद्धार होईल.

## सानन्दूरमाहात्म्य

यानंतर पृथ्वीदेवीस भगवंतांनी सानन्दूरमाहात्म्य सांगितले.

'सानन्दूर' नावाचे एक प्रसिद्ध गुप्त स्थल भगवंतांचे निवासस्थान आहे. हे समुद्राच्या उत्तरेस व मलयगिरीच्या दक्षिणेस आहे. तेथे भगवंतांची एक आश्चर्यकारक प्रतिमा आहे. काही लोक तिला लोखंडाची, काही तांब्याची, काही कास्याची, तर काही शिशाची समजतात. काही प्रस्तराचीही मानतात.

या 'सानन्दूर' क्षेत्राशी संलग्न असे 'संगमन' नावाचे एक परमगुह्य क्षेत्र आहे. राम व समुद्र यांच्या भेटीचे हे स्थान आहे. येथे स्वच्छ जलाचे एक कुंड आहे. अनेक वल्लरी, लता, पक्षी यांनी हे स्थान शोभून दिसते. समुद्राच्या जवळच हे स्थान आहे. अनेक सुगंधित कुमुदे व कमले यांनी याची शोभा वाढविली आहे. मनुष्याने येथे सहा दिवस राहावे. येथे अवगाहन करावे. याच क्षेत्रात 'शक्रसर' नावाचे एक विख्यात परम गुह्य क्षेत्र आहे. तेथून पूर्वभागी काही दूरच्या स्थानावर हे क्षेत्र आहे. त्या कुंडाच्या मध्यभागी विषमरूपाने चार धारा पडतात. त्या धारांचे जल अत्यंत निर्मल आहे. चार दिवस राहून मनुष्याने येथे स्नान करावे. येथील तलावाचे नाव 'शक्रसर' असून येथे कोणी प्राण सोडल्यास तो भगवंतांच्या धामात आनंदाने निवास करतो.

येथेही एक आश्चर्य पाहाण्यासारखें आहे. ज्याचे अंतःकरण पवित्र आहे, जो श्रद्धावान आहे, त्यालाच हा चमत्कार दिसतो. या दृश्याने पुरुष संसारसागर तरून जातो. तेथे चारही दिशांनी चार धारा पडतात. तेथे पडणारे जल कधी अधिक होत नाही की, कमी होत नाही. त्याची स्थिती सदा समान असते. भाद्रपद मासाच्या शुक्लपक्षातील द्वादशीतिथीस कानांना सुखविणारे गीत उच्चारित होते.

शूर्पारक नावाचे एक परम प्रसिद्ध क्षेत्र आहे. ते परशुराम व श्रीराम यांच्या आश्रमांनी सुशोभित आहे. हे पावन स्थल समुद्राच्या तटावर आहे. तेथे शाल्मलिवृक्षाच्या खाली भगवंताचा निवास असतो. येथे पांच दिवस राहून मनुष्याने स्नान करावे. त्याला त्यामुळे ऋषिलोकातील अरुंधतीचे दर्शन होईल. येथेही एक आश्चर्याची बाब आहे. जो एकदाच भगवंतांना नमस्कार करतो, तो बारा वर्षांच्या नमस्कारांचे फल प्राप्त करून घेतो. या शूर्पारकक्षेत्रात निष्ठावान पुरुषाने भगवंतांचे

दर्शन घेतले तर त्यास मायेची बाधा होत नाही.

याच 'सानन्दूर' क्षेत्रात भगवंतांचे एक परम गुह्य स्थान आहे. वायव्येस असलेल्या या क्षेत्राचे नाव 'जटाकुंड' आहे. हे स्थान मलयाचलाच्या दक्षिणेस व समुद्राच्या उत्तरेस आहे. येथे राहून पांच दिवस स्नान करणारा मनुष्य अगस्त्यमुनींच्या आश्रमात आनंदाने निवास करतो. असा हा या क्षेत्राचा महिमा. हा ऐकल्याने भगवान श्रीहरींतील भक्ती व श्रद्धा वाढते. हे क्षेत्र गुन्ह्यांतील गुह्य व सर्वोत्तम स्थान आहे. या 'सानन्दूर' क्षेत्रात नऊ प्रकारची भक्ती करणाऱ्या मनुष्यास परम सिद्धी प्राप्त होते.

## लोहार्गलक्षेत्राचे माहात्म्य

यानंतर भगवान वराहांनी एकशेएकावन्नाव्या अध्यायात लोहार्गलक्षेत्राचे माहात्म्य पृथ्वीस सांगितले. 'सिद्धवट' नावाच्या स्थानापासून तीस योजनांवर म्लेच्छांचा देश आहे. त्याच्या मध्यदक्षिणभागात हिमालयपर्वत आहे. तेथेच 'लोहार्गल'* नावाचे प्रसिद्ध गुप्त क्षेत्र आहे. तेथे पंधरा आयामांचे क्षेत्र चार-पाच योजनांपर्यंत पसरले आहे. हे स्थान पापी लोकांसाठी दुर्गम आणि दुःसह आहे. पण सदा चित्तात भगवानांना साठविणाऱ्यांना सुलभ आहे. भगवंतांचा निवास या स्थानाच्या उत्तरदिशेस आहे. तेथे त्यांची सुवर्णमयी प्रतिमा आहे.

एकदा या स्थानावर सर्व दानवांनी आक्रमण केले. मायेच्या बलाने त्यांनी भगवंतांची अवहेलनाही केली. तेव्हा ब्रह्मदेव, रुद्र, स्कंद, इंद्र, मरुद्‌गण, आदित्य, वसुगण, वायू, अश्विनीकुमार, चंद्रमा, बृहस्पती, इत्यादी देवांना भगवानांनी सुरक्षित केले. आपल्या तेजस्वी सुदर्शनचक्राने सर्व निशाचरांचा संहार केला. यामुळे देवगणांना आनंद झाला. तेव्हापासून या क्षेत्राचे नाव 'लोहार्गल' झाले. प्रबल शक्तिशाली देवांच्या प्रतिमांची प्रतिष्ठाही येथे झाली. या स्थानावरील भगवंतांच्या मूर्तीचे दर्शन घेणारा त्यांचा भक्त होतो. जो मनुष्य तीन दिवस राहून

---

*या क्षेत्राचे वर्णन मागे एकशेचाळिसाव्या अध्यायात आले आहे. हे लोहानदीवर 'लोहाघाट' या नावाने प्रसिद्ध आहे.

येथे शास्त्रविहित कर्म करतो, येथील कुंडात स्नान करतो, तो कित्येक सहस्त्र वर्षे स्वर्गात आनंद उपभोगतो.

एकदा भगवंतांनी एका अश्वाची रचना करून अखिल आभूषणांनी त्यास अलंकृत केले. तो अश्व श्वेतकमल, शंख, कुंदपुष्पे यांनी शोभून दिसत होता. धनुष्य, अक्षसूत्र, कमंडलू घेऊन भगवंतांनी त्यावर बसून यात्रेस आरंभ केला. ते श्वेतपर्वतावर आले. तेथे कुरुवंशी राहात होते. त्यांना त्या स्थानावरून भगवंतांनी दूर केले. तरी तो अश्व आकाशात शांत, जसाच्या तसा सुरक्षित होता. तेव्हापासून पुरुष उत्तम कुलातील अश्वावर बसून स्वर्गाची यात्रा करू लागले.

'पंचसार' नावाचे एक प्रसिद्ध स्थान आहे. तेथे शंखासमान शुभ्र रंगाच्या तीव्र गतीने पडणाऱ्या चार धारा आहेत. त्या ठिकाणी चार दिवस राहणारी व्यक्ती 'चैत्रांगद' लोकात जाऊन गंधर्वांसह विहार करते. तेथे प्राणत्याग करून भगवंतांच्या लोकास जाते. येथेच 'नारदकुंड' नावाचे एक विख्यात स्थान आहे. तेथे तालवृक्षासारख्या पांच मोठ्या धारा पडतात. या तीर्थात एक दिवस निवास व स्नान केल्याने पुरुषास देवर्षी नारदांच्या दर्शनाचे सौभाग्य प्राप्त होते. येथेच एक 'वसिष्ठ'कुंड आहे. यात तीन धारा पडतात. येथे पांच रात्री राहून स्नान केल्यास मनुष्यास वसिष्ठांच्या लोकात राहिल्याचे समाधान मिळते.

या 'लोहार्गल'क्षेत्रात एक पंचकुंड नावाचे तीर्थ आहे. येथे हिमालयातून पांच धारा पडतात. येथे पांच दिवस राहून, स्नान करून 'पंचशिख'स्थानावर निवास करतो. येथेच 'सप्तर्षिकुंड' नावाचे एक अन्य तीर्थ आहे. येथे स्नान केल्याने पुरुष ऋषींच्या लोकात राहून आनंदाने निवास करतो. येथे 'अग्निसर' नावाचे आणखी एक विख्यात कुंड आहे. येथे आठ रात्री राहून स्नान केल्यास प्राण्यांना सर्व सुखांचा भोग भोगता येतो. त्यांना अंगिरा मुनींचा लोक प्राप्त होतो. याच क्षेत्रात 'उमाकुंड' या नावाचे एक स्थान प्रसिद्ध आहे. येथेच भगवान शंकरांच्या परम सुंदर पत्नीचे, गौरीचे प्राकट्य झाले. येथे दहा रात्री राहून स्नान करावे. त्यामुळे गौरीचे दर्शन सुलभ होते, तिच्या लोकात

सानंद निवास करता येतो.

भगवान शंकरांशी उमेचा विवाह येथेच झाला होता. यात हंस, कारंडव, चक्रवाक, सारस आदी पक्षी सदा निवास करतात. हिमालय-पर्वतावरून निर्मल जलाच्या तीन धारा येथे पडतात. मनुष्याने बारा दिवस येथे निवास व स्नान केल्यास त्यास रुद्रलोकातील आनंद मिळतो. येथेच 'ब्रह्मकुंड' नावाच्या स्थानी चार वेदांची उत्पत्ती झाली. याच्या उत्तरपार्श्वभागात सुवर्णाच्या रंगाची एक स्वच्छ धारा वाहाते. याच स्थानी ऋग्वेदाचा ध्वनी झाला. पश्चिमभागी यजुर्वेदाची, दक्षिणभागी अथर्ववेदाची धारा वाहाते. येथे सात रात्री निवास करून स्नान केल्यास ब्रह्मलोकाची प्राप्ती होते. अशी ही या 'लोहार्गल'क्षेत्राची मोठी रहस्यमय कथा आहे. सिद्धी जाणण्याची इच्छा करणाऱ्यानेही ही समजावून घ्यावी. हा प्रसंग सर्व आख्यानांत उत्तम, धर्मांत सर्वोत्कृष्ट व पवित्रांत पवित्र आहे. याचा पाठ करण्याने, ऐकण्याने मातापित्यांच्या कुलांच्या दहा-दहा पिढ्यांचा उद्धार होतो.

## मथुरातीर्थाचे माहात्म्य

यानंतर भगवान वराहांनी पृथ्वीस मथुरातीर्थाची माहिती एकशे-बावन्नाव्या अध्यायात दिली. मथुरेसारखे तीर्थ आकाश, पाताल व पृथ्वी, या तीनही लोकांत नाही. या पुरीत भगवंतांचा कृष्णावतार झाला. म्हणून हे पुष्कर, प्रयाग, उज्जैन, काशी आणि नैमिषारण्य; यांपेक्षाही मोठे क्षेत्र आहे. येथे विधिपूर्वक निवास केल्यास मनुष्य आवागमनापासून मुक्त होतो. वाराणसीत हजार वर्षे राहिल्याने ज्या फलाची प्राप्ती होते, ते फल मथुरेत एका क्षणाच्या निवासाने मिळते. कार्तिकमासात पुष्करक्षेत्रात राहिल्याने जें पुण्य प्राप्त होते ते मथुरेत निवास करून सहज मिळते. केवळ 'मथुरामंडला'चे नाव ऐकूनच वा उच्चारून मनुष्याची सर्व पापांतून मुक्तता होते. भूमंडलावरील सर्व तीर्थे मथुरेत आहेत. कारण येथे साक्षात भगवान श्रीहरी गुप्तरूपाने निरंतर निवास करतात. कुब्जाम्रक, सौकरव, मथुरा, ही विशिष्ट तीर्थे आहेत. येथे योगतपादी साधना न करतानाही सिद्धी प्राप्त होते, यात

संशय नाही.

द्वापरयुग आले की भगवंत येथे राजा ययातीच्या वंशात अवतार धारण करतील. त्यांची जात क्षत्रिय राहील. कृष्ण, बलराम, प्रद्युम्न, अनिरुद्ध या चारांसह भगवंत तेथे शंभर वर्षे निवास करतील. भगवंतांची ही चार रूपे क्रमशः चंदन, सुवर्ण, अशोक व कमल यांच्या रूपासारखी होतील. त्यावेळी धर्माचा द्वेष करणारे बत्तीस महाभयंकर असे कंसादी दैत्य निर्माण होतील. त्यांचा भगवंत संहार करतील. तेथे सूर्याची पुत्री यमुनेचा सुंदर प्रवाह जवळूनच वाहातो. मथुरेत अनेक गुप्त तीर्थे आहेत. त्यांत स्नान केल्याने मनुष्यास भगवंतांची गती प्राप्त होते.

मथुरामंडळात 'विश्रांती' नावाचे एक तीर्थ तीन लोकांत प्रसिद्ध आहे. याला दोनदा प्रदक्षिणा केल्याने विष्णुलोकाचा लाभ होतो. येथेच कनखल नावाचे एक गुप्त क्षेत्र आहे. येथे केवळ स्नान केल्याने मनुष्य स्वर्गाचा धनी बनतो. 'बिंदुक' नावाच्या विख्यात तीर्थात स्नान केल्यास भगवंतांच्या लोकात प्रतिष्ठा मिळते.

याच तीर्थासंबंधी एक प्राचीन प्रसंग आहे. पांचालदेशात प्रसिद्ध कांपिल्यनगरात राजा ब्रह्मदत्त राहात होता. तेथेच तिंदुक नावाचा न्हावी राहात होता. अनेक वर्षांनंतर त्याचा परिवार क्षीण झाला व पीडित होऊन तो तेथून मथुरेस आला. एका ब्राह्मणाच्या घरी राहू लागला. तेथे अनेक कामे करून तो प्रतिदिन यमुनेत स्नान करायचा. दीर्घकालानंतर त्याचा मृत्यू या तीर्थात झाला. दुसऱ्या जन्मी तो जातिस्मर ब्राह्मण झाला.

याच तीर्थात 'सूर्यतीर्थ' नावाचे एक तीर्थ सर्व पापांना नष्ट करणारे आहे. येथेच विरोचनपुत्र बलीने सूर्याची उपासना केली होती. सूर्याने प्रसन्न होऊन तपाचे कारण विचारले. बलीने म्हटले, 'देवेश्वरा, माझा निवास पाताळात असतो. या वेळी मी राज्यापासून वंचित झालो आहे. मी धनहीन आहे. तेव्हा सूर्याने बलीला आपल्या मुकुटातून चिंतामणी काढून दिला. तो घेऊन बळी पातालात गेला. येथे स्नान केल्यास मनुष्याची सर्व पापे दूर होतात. ध्रुवतीर्थ, कोटितीर्थ, वायुतीर्थ, अशा आणखी तीर्थांची माहिती भगवंतांनी पृथ्वीस दिली.

## मथुरा, यमुना व अक्रूरतीर्थ

भगवान वराहांनी आणखी तीर्थांचा वृत्तांत पृथ्वीस सांगितला. 'शिवकुंडा'च्या उत्तरेस 'नवक' नावाचे एक पवित्र क्षेत्र आहे. तेथे स्नान करणाऱ्या प्राण्यास सौभाग्य प्राप्त होते. या तीर्थासंबंधी एक प्राचीन प्रसंग आहे. पूर्वी नैमिषारण्यात एक दुष्ट निषाद राहात होता. एकदा तो चतुर्दशीस मथुरेस आला. त्याच्या मनात यमुनेत पोहण्याची इच्छा झाली. पोहताना तो 'संयमन' नावाच्या तीर्थात आला व तेथेच त्याचा प्राण गेला. पुढल्या जन्मात तो निषाद क्षत्रियवंशात उत्पन्न होऊन सर्व भूमंडलाचा स्वामी झाला. त्याची राजधानी सौराष्ट्रात होती. कालांतराने तो 'यक्ष्मधनु' या नावाने विख्यात झाला.

त्याचा विवाह काशिराजाची सुंदर कन्या पीवरीशी झाला. यक्ष्मधनूच्या आणखी काही राण्या होत्या. पण सर्वांत त्याला पीवरी अधिक प्रिय होती. तो तिच्यावरोबर भवने, उद्याने, उपवने, नदीतट येथे विहार करून राज्यसुखाचा उपभोग घेऊ लागला. त्याला सात पुत्र व पांच कन्या झाल्या. यक्ष्मधनूने सत्याहत्तर वर्षे राज्य केले. एकदा तो शयन करीत असताना अकस्मात त्याला मथुरेच्या संयमनतीर्थाची आठवण झाली व त्याच्या मुखातून 'हाय हाय' असा शब्द बाहेर आला. तेव्हा पट्टराणी पीवरी म्हणाली,

'राजन्, आपण काय म्हणालात ?'

'राणी, मादक वस्तू घेतल्यानं, चित्त विक्षिप्त झाल्यानं मुखातून असंबद्ध शब्द बाहेर पडतात. मी झोपेत होतो, तू आता फार विचारू नकोस.'

पण राणीने आग्रह धरल्यावर यक्ष्मधनू तिला म्हणाला, 'शुभानने, तुला जर माझी हकीगत ऐकायची असेल तर तू मथुरेस चल. तिथं मी तुला सर्व काही सांगीन. ग्राम, रत्न, खजिना, जनता यांना पुत्राच्या स्वाधीन करून आपण जाऊ. देवी, विद्येसारखा नेत्र नाही. धर्मासारखं बल नाही. रागासारखं दुःख नाही. त्यागासारखं दुसरं सुख नाही

संसाराचा संग्रह करण्यापेक्षा त्यागात मोठंच समाधान आहे.'

राजा यक्ष्मधनूने या प्रकारे आपल्या पुत्रास राज्याभिषेक करून तो पीवरीसह मथुरेस आला. मथुरा त्यावेळी देवांच्या अमरावतीप्रमाणे शोभत होती. बारा तीर्थांची ती पुरी मानवांची सर्व पापे नष्ट करणारी होती. या नगरीचे दर्शन झाल्याने दोघांना आनंद वाटला. पीवरीने राजास येथे येण्याचा हेतू विचारला. तेव्हा राजा तिला म्हणाला, 'प्रथम तू आपलं रहस्य सांग. नंतर मी माझं सांगीन.'

त्यावर पीवरी म्हणाली, 'प्रथम माझा निवास गंगातटावर होता. त्यावेळीही माझं नाव 'पीवरी'च होतं. एकदा मी कार्तिकी द्वादशीस मथुरेचं दर्शन घेतलं. नावेतून यमुना पार करताना मी एकदम 'धारापतन'तीर्थात पडले. तिथं पाणी खोल असल्यानं माझा प्राण गेला. पण या तीर्थाच्या प्रभावानं मी काशीच्या नरेशाची कन्या झाले आणि आपणांबरोबर माझा विवाह झाला.'

यानंतर राजा यक्ष्मधनूने आपल्या संयमनतीर्थातील मृत्यूची हकीगत तिला सागितली. नंतर दोघेही मथुरेत राहू लागले. यमुनेत स्नान करण्याचा त्यांचा निश्चय होता. प्रतिदिन नियमाने ते भगवंतांचे दर्शन घेत. कालांतराने त्यांनीही शरीराचा त्याग केला व ते भगवंतांच्या लोकात गेले.

याच मथुरेत 'मधुवन' नावाचे एक सुंदर स्थान आहे. तेथेच 'कुंदवन' नावाचे भगवंतांचे स्थान आहे. तेथे गेल्याने व्यक्ती सफल-मनोरथ होते. येथील वनांतील एक प्रधान वन 'काम्यकवन' नावाचे आहे. येथे स्नान केल्याने मनुष्यास भगवंतांचा लोक प्राप्त होतो. येथील 'विमलकुंडा'त स्नान केल्याने प्राण्याचे सर्व पाप धुतले जाते. पांचव्या वनास 'बकुलवन' म्हणतात. येथे स्नान केल्याने मनुष्यास 'अग्निलोका'ची प्राप्ती होते. यमुनेच्या त्या टोकावर 'भद्रवन' नावाचे एक सहावे वन आहे. येथे गेल्यास नागलोकाची प्राप्ती होईल. 'खदिरवन' सातवे व 'महावन' आठवे आहे. नवव्या वनाचे नाव 'लौहजंघवन' असून लौहजंघ त्याचे रक्षण करतो. दहाव्या वनाचे नाव 'बिल्ववन' असून येथे जाण्याने ब्रह्मदेवांच्या लोकात प्रतिष्ठा मिळते.

'भांडीर' हे अकरावे वन असून त्याच्या दर्शनाने मनुष्य मातेच्या गर्भात येत नाही. बारावे 'वृंदावन' असून तेथील अधिष्ठात्री वृंदादेवी आहे. हे सर्व पापांचा संहार करणारे स्थान आहे. वृंदावनास जाऊन जो गोविंदांचे दर्शन घेतो, त्याला यमपुरीस जावे लागत नाही.

यमुनेश्वरतीर्थाच्या 'धारापतना'त स्नान केल्यावर मनुष्यास स्वर्गाचा आनंद मिळतो. त्याच्यापुढे नागतीर्थ आहे. येथेच 'घंटाभरण' तीर्थ असून येथे स्नान केल्याने मनुष्य सूर्यलोकात जातो. येथेच एक 'सोमतीर्थ' असून द्वारयराज येथे चंद्र भगवानांचे दर्शन घेतो. येथे अभिषेक केल्यास मनुष्य चंद्रलोकात निवास करतो. येथेच सरस्वती-नदी वरून उतरते. हे पवित्र स्थान सर्व पापे हरण करणारे आहे.

मथुरेच्या पश्चिमेस ऋषिगण निरंतर भगवंतांची पूजा करतात. प्राचीन काली येथेच ब्रह्मदेवांच्या मनापासून 'मानसतीर्थ' निर्माण झाले. येथे स्नान करणाऱ्यास स्वर्ग मिळतो. येथे भगवान श्रीगणेशांचे एक तीर्थ आहे. याच्या प्रभावाने पाप दूर होते. येथे चतुर्थी, अष्टमी व चतुर्दशी या तिथींना स्नान केले तर गणेशांच्या प्रभावाने मनुष्यास दुःख होत नाही. येथून जवळच दुष्कर असे 'शिवक्षेत्र' आहे. येथे राहून भगवान शंकर मथुरापुरीचे रक्षण करतात.

आणखी एक दुर्लभ असे अक्रूरतीर्थ येथेच आहे. अयन[1], विषुव[2] आणि विष्णुपदी[3]च्या शुभ अवसरास भगवंत कृष्णरूपाने येथे राहातात. सूर्यग्रहणाच्या पर्वणीस येथे स्नान केल्याने मनुष्यास 'राजसूय' आणि 'अश्वमेध' यज्ञाचे फळ मिळते. या तीर्थाचा एक प्राचीन इतिहास आहे. येथे पूर्वी एक सुधन नावाचा धनी भक्त राहात होता. हा वैश्य स्त्री-पुत्र व बंधुबांधव यांच्यासहित भगवंतांची उपासना करून गंध, पुष्प, धूप,

---

१. सूर्याचे कर्कराशीत येण्याने दक्षिणायन व मकरराशीत येण्याने उत्तरायण होते. सूर्याच्या ह्या षाण्मासिक गती व स्थितीस 'अयन' म्हणतात.

२. ज्या समयास दिन व रात यांचे मान बरोबर होते, तेव्हा त्याला 'विषुव' म्हणतात. २१ मार्च व २३ सप्टेंबर; हे साधारणतः हे दिवस होत.

३. वृषभ, सिंह, वृश्चिक व कुंभ या राशींच्या सूर्यसंक्रांतींना 'विष्णुपदी' म्हणतात.

दीप अर्पण करी. श्रीहरींची पूजा करी. प्राय: एकादशीस याच अक्रूर-तीर्थात येऊन तो भगवंतांपुढे नृत्य करी.

एकदा तो रात्री जागरण, नृत्य व कीर्तन करण्याच्या उद्देशाने आला होता. तेव्हा एका ब्रह्मराक्षसाने त्याचे पाय पकडले. त्याची आकृती मोठी भयानक असून त्याचे केस वर उभे राहिले होते. त्याने सुधनास विचारले, 'वैश्या, आज मी तुला खाऊन तृप्त होईन.' तेव्हा सुधन म्हणाला, 'राक्षसा, तू थोडी वाट पाहा. मी तुला पर्याप्त भोजन देईन. नंतर तू माझ्या शरीरास भक्षण करावंस. या वेळी मी देवेश्वरां-समोर नृत्य व जागरण करीत आहे. मी हे आपलं व्रत पूर्ण करून सूर्योदय होताच तुझ्याजवळ येईन. मग तू मला खाऊन टाक. पण माझ्या व्रताचा भंग तू नको करूस.' तेव्हा ब्रह्मराक्षस आदराने व मधुर वाणीने म्हणाला, 'साधो, तू ही असत्य गोष्ट का सांगतोस ? असा कोण मूर्ख आहे की, जो राक्षसाच्या तावडीतून सुटल्यावर पुन: परत येईल ?'

तेव्हा वैश्यवर त्याला म्हणाला, 'सर्व जगाचं मूळ सत्यच आहे. सत्यावरच अखिल जगाची प्रतिष्ठा आहे. वेदाचे पारगामी ऋषिलोक सत्याच्या बलावरच सिद्धी प्राप्त करून घेतात. मी जरी कर्मवश होऊन वैश्यकुलात जन्मलो असलो तरी मी निर्दोष आहे. ब्रह्मराक्षसा, मी प्रतिज्ञेवर सांगतो की, नृत्य व जागरण करून अगत्यानं मी परत येईन. सत्यानंच कन्येचं दान होतं. ब्राह्मण सदा सत्य बोलतो. सत्यानंच राजाचं राज्य चालतं. सत्यानंच पृथ्वी सुरक्षित आहे. सत्यानंच स्वर्ग सुलभ होईल, आणि सत्यानंच मोक्ष मिळतो. मी जर परत आलो नाही तर पृथ्वीचं दान देऊन ते जर दिलं नाही तर जे पाप लागतं, ते मला लागेल. क्रोधानं जो पत्नीचा त्याग करील त्याचं पाप मला लागेल. मी न आलो तर मला पंक्तिभेदाचं पाप लागेल. ब्राह्मणाची हत्या, मदिरेचं पान, चोरी, व्रतभंग केल्याचं पापही मला लागेल.'

सुधनाचे हे बोलणे ऐकून ब्रह्मराक्षस संतुष्ट झाला. तो म्हणाला, 'बंधू, तू वंदनीय आहेस. आता तू जाऊ शकतोस' त्यानंतर कलामर्मज्ञ वैश्याने भगवंतांपुढे नृत्य केले. दुसऱ्या दिवशी 'ॐ नमो नारायणाय' या मंत्राचा प्रातःकाली उच्चार करून त्याने यमुनेत स्नान केले. भगवं-

तांचे दर्शन घेतले. तेव्हा भगवंतांनी एक दुसरे रूप धारण करून त्याला विचारले,

'तू इतक्या त्वरेनं कुठं निघालास ?'

'मी आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी ब्रह्मराक्षसापाशी जात आहे.'

'अनघा, तू आता तिथं जाऊ नकोस. जीवित राहिलास तरच धर्मानुष्ठान करता येतं.'

'महाभाग, मी त्या ब्रह्मराक्षसापुढं अवश्य जाईन. माझी सत्य प्रतिज्ञा त्यामुळं खरी होईल. भगवंतापुढं नृत्य व जागरण करण्याचं माझं व्रत होतं. ते सुखानं संपन्न झालं आहे.' असे म्हणून तो तेथून गेला व ब्रह्मराक्षसापाशी आला आणि म्हणाला,

'राक्षसा, आता तू मला तुझ्या इच्छेनुसार खा.'

'वैश्यवर, तू सत्य व धर्म यांचं पालन करणारा साधुपुरुष आहेस. तुझं कल्याण असो. मी तुझ्या वर्तनानं संतुष्ट झालो आहे. महाभाग, आता तू मला तुझं नृत्य व जागरण यांचं पुण्य दे. तुझ्या प्रभावानं माझा उद्धार होईल.'

'राक्षसा, मी तुला रात्रीच्या जागरणाचं वा नृत्याचं पुण्य देऊ शकत नाही. अर्धी रात्र, एक प्रहर अथवा अर्धा प्रहर जागरणाचंही पुण्य मी देऊ शकत नाही.'

'फक्त एका नृत्याचं पुण्य तू मला द्यावंस.'

'मी हेही पुण्य तुला देऊ शकत नाही. पण ठरल्याप्रमाणं मी आलो आहे. मला हे सांग की, तू कोणत्या कर्मानं ब्रह्मराक्षस झालास ? काही विशेष गुपित नसेल तर मला सांग.'

'वैश्यवर, तू असं का म्हणतोस ? मी तर तुझ्यापाशीच राहाणारा आहे. माझं नाव अग्निदत्त आहे. पूर्वजन्मी मी वेदाभ्यासी ब्राह्मण होतो. परंतु चौर्यकर्मानं मला ब्रह्मराक्षस व्हावं लागलं. दैवयोगानं तुझी भेट झाली. आता तू माझ्यावर उपकार करण्याची कृपा कर. वैश्य, तू एकाच नृत्याचं पुण्य मला दे. त्यानं माझा उद्धार होईल.'

'राक्षसा, मी माझ्या एका नृत्याचं फल तुला दिलं आहे.'

या पुण्याच्या प्राप्तीने ब्रह्मराक्षसाचा उद्धार झाला. त्याची मुक्तता झाली. याच वेळी त्या ब्रह्मराक्षसासमोर शंख, चक्र, गदा व पद्म धारण करणारे श्रीहरी प्रकट झाले. त्या वेळी श्रीहरींची आभा परम दिव्य होती. भगवान त्या वैश्याला म्हणाले, 'तू आता सपरिवार या माझ्या दिव्य विमानातून विष्णुलोकास चल.' असे म्हणून श्रीहरी तेथेच अंतर्धान पावले. सुधनही सपरिवार, सशरीर विष्णुलोकास गेला. असा हा अक्रूरतीर्थाचा महिमा आहे. कार्तिकमासाच्या शुक्ल द्वादशीस जो या तीर्थात स्नान करील त्याला 'राजसूय'यज्ञाचे फल प्राप्त होईल.

## मथुरामंडलाची वृन्दावनादी तीर्थे

एकशे छप्पन्नाव्या, सत्तावन्नाव्या अध्यायांत भगवान वराहांनी पृथ्वीस वृंदावनादी स्थानांचे माहात्म्य सांगितले. येथील 'वत्सक्रीडन'-क्षेत्रात लाल रंगाच्या अनेक शिला आहेत. येथे स्नान करण्याने मनुष्यास वायुदेवाचा लोक प्राप्त होतो. येथेच 'भांडीर'वन ही आहे. अनेक फुलांच्या वृक्षांनी येथील शोभा वाढवलेली असते. येथे स्नान केल्याने मनुष्याची सर्व पापे नष्ट होतात. त्याला इंद्रलोकाची प्राप्ती होते.

वल्लरी व लता यांनी आच्छादित असे येथे रमणीय वृंदावन असून देव, दानव, सिद्ध यांनाही हे दुर्लभ आहे. गायी व गोपाल यांच्यासह भगवंतांनी येथे कृष्णावतारात क्रीडा केली. येथे एक रात्र निवास करून कालिंदीत स्नान केल्याने मनुष्यास गंधर्वलोकाची प्राप्ती होते. येथेच एक दुसरे तीर्थ 'केशिस्थल' नावाचे आहे. वृंदावनातील या स्थानावर केशी नावाच्या दैत्याचा वध झाला होता. या तीर्थात पिंडदान केल्याने गयेत पिंड दिल्याचे श्रेय मिळते. येथे स्नानदान केल्यास 'अग्निष्टोम'-यज्ञाचे फल मिळते. येथेच द्वादशादित्य तीर्थापाशी यमुना वाहाते. येथेच कालियनाग आनंदपूर्वक निवास करीत होता. भगवंतांनी त्याचे दमन करून तेथे द्वादशादित्यांची स्थापना केली. या तीर्थात स्नान केल्याने मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. या स्थानास 'हरिदेव'क्षेत्र व 'कालियहृद' म्हणतात. या 'हरिदेव'क्षेत्राच्या उत्तरेस व 'कालिय-

ह्रदा 'च्या दक्षिणेस ज्याचे पंचभौतिक शरीर सुटते, त्याला पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही.

याच यमुनेच्या पलीकडील तीरावर 'यमलार्जुन' नावाचे तीर्थ आहे. येथेच शकट छिन्नभिन्न झाल्याचे सांगतात. येथे स्नान व उपवास यांचे अनंत फल आहे. ज्येष्ठमासाच्या शुक्ल द्वादशीस या तीर्थात स्नान व दान केल्याने महान पातकी मनुष्यासही परम गती प्राप्त होते. असे हे मथुरातीर्थ महान आहे. अनेक नामांची वने त्याची शोभा वाढवितात. तेथे स्नान केल्याने मनुष्य भगवान रुद्रांच्या लोकात जातो. यमुनेच्या दुसऱ्या तीरावर 'भांडह्रद' नावाचे विख्यात व दुर्लभ तीर्थ आहे. येथे आदित्यगण प्रत्येक दिवशी दृष्टीस पडतात. येथे मनुष्याने स्नान केल्यास तो सर्व पापांपासून मुक्त होतो. जवळच स्वच्छ जलाने भरलेले 'सप्त-सामुद्रिक' तीर्थ आहे.

येथेच मथुरामंडलात 'गोपीश्वर' नावाचे एक विख्यात तीर्थ आहे. येथे हजारो गोपी भगवान कृष्णांना आनंदित करण्यासाठी आल्या होत्या. येथेच श्रीकृष्णांनी रासलीला केली. येथेच त्यांनी बालपणी यमलार्जुनाच्या दोन वृक्षांना तोडून टाकले होते. येथेच इंद्राने एका कूपापाशी रत्ने आणि औषधी यांनी संपूर्ण जलपूर्ण कलशांनी गोपवेष-धारी श्रीकृष्णांना अभिषेक केला होता. तेव्हापासून या कूपास 'सप्त-सामुद्रिक' हे नाव मिळाले. येथे स्नान केल्यास मनुष्याच्या सत्याहत्तर पिढ्यांचा उद्धार होतो. सोमवती अमावास्येस येथे पिंडदान केल्याने पितर कोटयवधी वर्षे तृप्त होतात.

येथेच 'वसुपत्र' नावाचे एक विख्यात तीर्थ आहे. मथुरेच्या दक्षिणभागी 'फाल्गुनक' व पश्चिमेस धेनुकासुराचे 'तालवन' आहे. येथेच 'संपीठककुंड' नावाचे तीर्थ स्वच्छ जलाने भरलेले आहे. कृष्णावतारात भगवंतांनी सूर्याची आराधना केली होती. म्हणून त्यांना सांबासारखा गुणवान, रूपवान पुत्र झाला. येथे भाद्रपदमासातील कृष्ण-पक्षाच्या सप्तमीस प्रखर तेजाचा सूर्य चमकत असतो. येथे मनुष्याने सावध राहून स्नान करावे. त्याला जगतात दुर्लभ असे काही वाटणार नाही. तो संपूर्ण संपत्तीचा दाता होईल. प्राचीनकाळी राजा शन्तनूनेही

या स्थानावर तपस्या केली होती. त्यामुळे त्यास भीष्म नावाचा पराक्रमी पुत्राचा लाभ झाला.

## मथुरातीर्थाची प्रदक्षिणा

एकशेअठ्ठावन ते एकशेसाठ अध्यायांत भगवान वराहांनी मथुराक्षेत्राचे* आणखी विस्ताराने वर्णन केले आहे. येथे अनेक ठिकाणी स्नान करून मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. वर्षाऋतूस मथुरा विशेष आल्हाददायक वाटते. हरिशयनीच्या नंतर चार महिने तर तीत जणू सप्त द्वीपांची पुण्यतीर्थे निवास करण्यास येतात. येथे श्रीकृष्णांचे कमलासारखे रूप पाहून मनुष्याचे सात जन्मांचे पाप नाहीसे होते.

एकदा धरणीने विचारले, 'भगवान, सर्व तीर्थं पशू, भूत, पिशाच व विनायक या उपद्रवी प्राण्यांना बाधित होतात. पण ही मथुरापुरी कोणत्या देवामुळं एवढी सुरक्षित राहिली आहे ?' या प्रश्नाचे सविस्तर उत्तर भगवान वराहांनी दिले. भगवंतांच्या प्रभावामुळे विघ्नकारी शक्ती या क्षेत्री कोणासही बाधक होत नाहीत. रक्षणासाठी सदैव दिक्पाल व लोकपाल यांची नियुक्ती असते. पूर्वेस इंद्र, दक्षिणेस यम, पश्चिमेस वरुण, उत्तरेस कुबेर व मध्यभागी उमापती महादेव या पुरीचे रक्षण करीत असतात. जो मथुरेस घर करून राहील तो जीवन्मुक्त पुरुषाचे चार भुजांचे विष्णुरूप समजावा.

येथील निर्मल जलाच्या 'मथुराकुंडाची' एक आश्चर्यकारक गोष्ट आहे. हेमंतऋतूत याचे जल उष्ण राहाते. ग्रीष्मऋतूत बर्फाप्रमाणे शीतल असते. वर्षाऋतूत येथील पाणी वाढत नाही, की ग्रीष्मऋतूत ते कमी होत नाही. मथुरेत पावलोपावली तीर्थे आहेत. त्यांत स्नान करून मनुष्य सर्व पापांतून मुक्त होतो. 'मुचुकुंदतीर्थ' नावाचे एक दिव्यक्षेत्र

---

* मथुरेचे माहात्म्य आपण नारदपुराणात, पद्मपुराणात पाहिले आहे. स्कंदपुराणातही या क्षेत्राचे माहात्म्य आले आहे. सप्तपुऱ्यांतील ही मथुरापुरी पूर्वी मधुरा वा मधुपुरी होती. (वाल्मीकिरामायण, उत्तरकांड ७.१०८) येथे वराहपुराणात या क्षेत्राची सीमा वीस योजने सांगितली आहे. ह्युएन्त्सँगने या पुरीचा विस्तार चार मैलांचा सांगितला आहे.

आहे. येथे देवासुरसंग्रामानंतर राजा मुचुकुंदाने शयन केले होते. येथे स्नान केल्याने अभीष्ट फलाची प्राप्ती होते.

भगवान केशवांच्या नामसंकीर्तनाने पूर्वजन्मीचीही सर्व पापे नष्ट होतात. कार्तिक शुद्ध अक्षय नवमीस भगन्नामकीर्तन करीत मथुरेची प्रदक्षिणा केल्यास मनुष्य सर्व पापांतून मुक्त होतो. कार्तिकमासाच्या शुक्ल अष्टमीस व्रती साधकाने मथुरेत येऊन 'विश्रांतितीर्था'त स्नान करून देवांचे व पितरांचे पूजन करावे. दीर्घविष्णू व केशवदेव यांचे नंतर दर्शन घ्यावे. त्या रात्री ब्रह्मचारी राहून उपवास करावा वा अल्पाहार घ्यावा. सायंकाळीही दंतधावन करावे. स्नान करून धूतवस्त्र नेसावे. मौनव्रत धारण करून तिल, तांदूळ व कुश घेऊन पितरांची व देवांची पूजा करावी. नवमीस प्रातःकाळी ब्रह्ममुहूर्तावर संयमपूर्वक पवित्र होऊन सूर्योदयाच्या आधीच प्रदक्षिणेंस प्रारंभ करावा.

प्रातःकाली स्नान 'दक्षिणकोटि' तीर्थात करावे. बालब्रह्मचारी हनुमंतास प्रसन्न करावे. हनुमंताची पूजा, प्रार्थना करावी. यात्रा करताना 'वसुमती'देवीचे दर्शन घ्यावे. येथे राजांच्या आयुधांचे रक्षण करणारी, सर्व भयांना दूर करणारी 'अपराजिता' देवी आहे. तिचेही दर्शन घ्यावे. नंतर 'कंसवासनिका', 'औग्रसेना', 'चर्चिका', 'वधूटी' देवींचे दर्शन घ्यावे. या देवी दानवांचा पराजय करणाऱ्या व देवांना विजय देणाऱ्या आहेत. आठ मातृका, गृहदेवी, वास्तुदेवी यांचे दर्शन घेऊन यात्रेस आरंभ करावा 'दक्षिणकोटि 'तीर्थापर्यंत यात्रा मौन राहून करावी. येथे स्नान, पितृतर्पण, देवदर्शन, प्रणाम करून कृष्णद्वारे पूजित भगवती 'इक्षुवासा 'स प्रणाम करावा. यानंतर 'वासपुत्र', 'अर्कस्थल', 'वीरस्थल', 'कुशस्थल', 'पुण्यस्थल' आणि अनेक पापांचा नाश करणारे 'महास्थल' यांचे दर्शन घेऊन 'हयमुक्ति' 'सिंदूर' आणि 'सहायक' या स्थानांवर जावे.

याविषयी एक प्राचीन प्रसंग आहे. प्राचीन काळी कोणी एक राजकुमार घोड्यावर स्वार होऊन मथुरेची प्रदक्षिणा सुखाने करीत होता. पण मध्येच घोड्यासहित त्याच्या नोकरास मुक्ती मिळाली. पण तो राजकुमार मात्र या जगतात राहिला. म्हणून ज्याला ज्येष्ठ फल हवे

असेल त्याने परिक्रमा पायांनीच करावी. या ‘हयमुक्ति’तीर्थाचे दर्शन घेतल्यास पापांपासून मुक्ती मिळते. मध्येच ‘शिवकुंड’ नावाचे एक तीर्थ आहे. भगवान कृष्णांना विजयी बनविणाऱ्या ‘मल्लिका’ देवीचेही दर्शन घ्यावे. ‘कदंबखंडा’ची यात्रा करून सपरिवार ‘चर्चिका’ योगिनीचे दर्शन घ्यावे. नंतर सर्व पापांचे हरण करणाऱ्या ‘वर्षखात’ नावाच्या श्रेष्ठ कुंडावर जाऊन स्नान व तर्पण करावे.

येथे भूतांचे अध्यक्ष भगवान महादेव राहातात. यांच्या पुढे ‘कृष्णलीला सेतुबंध’ आणि ‘वलिहृद’ या नावांची कुंडे आहेत. येथे श्रीकृष्णांनी जलविहार केला होता. थोडे पुढे गेल्यावर ‘स्तम्भोच्चय’ नावाचे एक शिखर लागते. याचे पूजन करून श्रीकृष्णांनी याला सजविले होते. यानंतर ‘नारायणस्थान’, ‘कुब्जिका’, ‘वामनस्थान’ यांना जावे श्रीकृष्णांचे रक्षण करणाऱ्या ‘विद्येश्वरी’चे दर्शन घ्यावे. कंसास मारण्याची इच्छा धरून श्रीकृष्ण, बलराम व गोप यांनी देवीच्या संकेताने येथेच विचारविनिमय केला होता. तेव्हापासून तिला ‘सिद्धिदा’, ‘भोगदा’, ‘सिद्धेश्वरी’, ‘संकेतेश्वरी’ अशी नावे मिळाली. यानंतर ‘गोकर्णेश्वरी’चे दर्शन घेतल्यावर सरस्वती व नदी घेऊन विघ्नराज गणेश यांचे दर्शन घ्यावे.

यानंतर विपुल पुण्य देणाऱ्या ‘गार्ग्यतीर्थ’, भद्रेश्वरतीर्थ’, ‘सोमेश्वरतीर्थ’ यांच्याकडे जावे. ‘सोमेश्वरतीर्था’त स्नान करून भगवान सोमेश्वरांचे दर्शन घ्यावे. नंतर ‘घण्टाभरणक’, ‘गरुडकेशव, ‘धारालोपनक’, ‘वैकुंठ’, ‘खण्डवेलक,’ ‘मंदाकिनी’ ‘संयमन’, ‘गोपतीर्थ,’ ‘मुक्तिकेश्वर,’ वैलक्षगरुड’, ‘महापातकनाशन’ इत्यादी तीर्थांना जावे. नंतर भगवान शिवांना प्रार्थना करावी, ‘देवेशा, आपण मुक्ती देणारे प्रधान देव आहात. सप्तर्षींनीही पृथ्वीची प्रदक्षिणा करताना आपली स्तुती केली होती. मीही आपणांस प्रार्थना करीत आहे. आपल्या आज्ञेनं माझी परिक्रमा पूर्ण व्हावी.’ यानंतर ‘विश्रांतिसंज्ञक’ तीर्थास जाऊन तेथे स्नान व तर्पण करावे.

त्यानंतर श्रीकृष्णांची बहीण आर्तिहरा भगवती ‘सुमंगला’देवीच्या मंदिरात जाऊन मथुरायात्रेच्या सिद्धीसाठी तिला प्रार्थना करावी,

'शिवे, तू सर्व मंगल कार्य संपन्न करणारी आहेस. तुझ्या कृपेनं सर्व प्राण्यांचे मनोरथ पूर्ण होतात. तू प्रसन्न हो व माझी ही प्रदक्षिणा सफल कर.' यानंतर 'पिप्पलेश्वर' महादेवांचे दर्शन घ्यावे. पिप्पलादमुनींनी येथे त्यांची अर्चना केली होती. हे मुनी परिक्रमा करताना थकून गेले. या ठिकाणी भगवंतांनी त्यांचा थकवा दूर केला. या स्थानी मुनींनी भगवान शंकरांची स्थापना केली. तेव्हा त्यांची यात्रा सफल झाली. म्हणून त्यांचे दर्शन शुभसूचक असते. मथुरेतील सर्व देवांनी व देवींनी भगवान सूर्यास महत्त्वाचे स्थान दिले आहे. म्हणून 'सूर्यतीर्था'स जाऊन, तेथे स्नान करून प्रदक्षिणा पूर्ण करावी. मथुरेच्या प्रदक्षिणेत जितकी पावले व्यक्तीची पडतात, तितक्या व्यक्तींना सूर्यलोकात स्थान मिळते. मथुरेची परिक्रमा करणाऱ्या मनुष्याची सर्व पापे नष्ट होतात. प्रदक्षिणेची वार्ता ऐकणाराही सर्व अपराधांपासून मुक्त होतो व त्याला परमपद प्राप्त होते.

## देववन व चक्रतीर्थ

भगवान वराहांनी पृथ्वीस मथुरेतील आणखी काही तीर्थांचा परिचय करून दिला. या मथुरामंडलात एकूण बारा वने असून त्यांची नावे मधुवन, तालवन, कुंदवन, काम्यकवन, बहुवन, भद्रवन, खदिरवन, महावन, लौहवन, बिल्ववन, भांडीरवन, आणि वृंदावन; अशी आहेत. ही सर्व श्रेष्ठ असून भगवंतांना अत्यंत प्रिय आहेत. लौहवनाच्या प्रभावाने सर्व पापे दूर होतात. बिल्ववन तर देवांनाही प्रिय आहे.

मथुरेच्या उत्तरभागात 'चक्रतीर्था'चा महिमा विशेष आहे. पूर्वी जंबूद्वीपाची शोभा वाढविणारे 'महागृहोदय' नावाचे एक उत्तम नगर होते. या दिव्य नगरात एक वेदज्ञ ब्राह्मण राहात होता. एकदा तो आपल्या पुत्रास घेऊन शालग्राम (मुक्तिनाथ) नावाच्या तीर्थास गेला. व तेथे निवास करून राहिला. त्याला तेथे कान्यकुब्ज नावाच्या स्थानाच्या सिद्धपुरुषाचे दर्शन झाले. तो नेहमी कल्पग्रामास जात असे. तो कल्पग्रामाची प्रशंसा करी. ही ऐकून या ब्राह्मणास वाटले की, आपणही कल्पग्रामास जावे. त्याने सिद्धपुरुषास प्रार्थना केली, 'मित्रवर, आपण सिद्ध-

पुरुष आहात. आपण एकदा मला कल्पग्रामास घेऊन जावं ना.' तेव्हा त्याला तो सिद्धपुरुष म्हणाला,

'द्विजवर, तिथं तर केवळ सिद्ध पुरुषच जाऊ शकतात. सामान्य व्यक्तींना तिथं प्रवेश नाही.'

'मलाही आत्मयोगाची शक्ती सुलभ आहे. तिच्या साह्यानं मी पुत्रासह तिथं जाऊ शकेन.' हे ऐकून त्या सिद्धपुरुषाने आपल्या उजव्या हातात त्या वेदज्ञ पुरुषास व डाव्या हातात त्याच्या बुद्धिमान पुत्रास घेऊन तो कल्पग्रामास आला. ते पिता-पुत्र कल्पग्रामातच राहू लागले. काही दिवसांनंतर ब्राह्मणाच्या शरीरात व्याधी निर्माण झाली. वृद्धावस्था आली होतीच. मरणाची वेळ येताच त्याने आपल्या पुत्रास बोलावून म्हटले, 'पुत्रा, मला गंगातटावर घेऊन चल.' पुत्राने त्याला गंगेच्या तटावर नेले. तेथेच तो आपल्या पित्यावर श्रद्धा ठेवून राहू लागला.

एके दिवशी दैववश होऊन कान्यकुब्जदेशनिवासी सिद्धपुरुषाच्या घरी तो ब्राह्मणकुमार भोजनासाठी गेला. सिद्धपुरुषाने त्याचे यथोचित स्वागत केले. आपल्या कन्येचा विवाह त्याच्याशी केला. तेव्हापासून तो ब्राह्मणकुमार आपल्या श्वशुराच्या घरीच भोजन करू लागला. आपल्या पित्याची चिंताजनक स्थिती पाहून त्या ब्राह्मणपुत्राने सिद्धपुरुषास विचारले, 'स्वामिन्, पिताजींचं हे कष्टमय जीवन कधी शांत होणार ?' तेव्हा सिद्धपुरुष हसून म्हणाला, 'द्विजवर, तुझ्या पित्यानं अपवित्र अन्न खाल्लं होतं. या आहारदोषानं त्याची अशी दुर्गती झाली आहे. ते अजून त्याच्या पायांत पडलं आहे.'

ब्राह्मणकुमाराने आपल्या पित्यास ही बाब सांगितली. शरीराच्या जर्जरतेने कष्टी झालेल्या त्या श्रेष्ठ ब्राह्मणाने गंगातटावरील एका फत्तराने अन्नदोषयुक्त असे आपले दोनही पाय मोडून टाकले. त्यामुळे त्याचा प्राण गेला. त्यावेळी ब्राह्मणपुत्र आपल्या सासऱ्याच्या घरी स्नान व भोजन यांसाठी गेला होता. परत येताच पित्याचे शव पाहून तो विलाप करू लागला. तो परत आपल्या श्वशुराच्या घरी गेला तेव्हा श्वशुर म्हणाला,

'अरे, तुला तर ब्रह्महत्या लागली आहे. तू इथून निघून जा.'

'महानुभाव, मी तर कोणत्याच ब्राह्मणाची हत्या केली नाही. मग मी ब्रह्महत्येचा दोषी कसा ?'

'तू आपल्या पित्याच्या मृत्यूस कारण झाला आहेस. म्हणून तुला हे पातक लागलं आहे. आता तू माझ्या घरी राहू नकोस. नाही तर मीही पापी होईन.'

'सुव्रता, आपण तर माझा त्याग केलात. मी कोणत्या प्रायश्चित्तानं शुद्ध होईन ?'

'आता तू या कल्पग्रामाचा त्याग कर. तू मथुरेस जा. त्याशिवाय तुझी शुद्धी होणार नाही.'

त्याच क्षणी तो ब्राह्मण कल्पग्राम सोडून मथुरेस गेला. त्यावेळी मथुरेस कान्यकुब्जाचे महाराज कुशिकांचे नित्य सत्र चालू होते. या सत्रात प्रतिदिन दोन हजार ब्राह्मणांचे भोजन होई. या ब्राह्मणांचे उष्टे, शिल्लक राहिलेले अन्न खाऊन त्या ब्राह्मणकुमाराचा उद्धार झाला. तो सदा 'चक्रतीर्था'त जाऊन स्नान करी. इतरत्र तो कोठेच जात नसे, की भिक्षा मागीत नसे.

काही दिवसांनी त्याच्या श्वशुराच्या मनात चिंता निर्माण झाली. त्याने आपल्या दिव्य ज्ञानाने आपल्या जामाताची स्थिती जाणून कन्येस म्हटले, 'तू आता भोजन घेऊन मथुरेस जा. तिथं तुझा पती आहे.' ही कन्याही योगसिद्धा व ज्ञानसंपन्न होती. ती आपल्या स्वामीस भोजन देण्यासाठी नित्य सायंकाळी जाऊ लागली. तो ब्राह्मणकुमार ते भोजन करून रात्री सत्रशालेत झोपायचा. अशा रीतीने त्या ब्राह्मणाचे सहा महिने गेले. काही दिवसांनी त्याला तेथील ब्राह्मणांनी विचारले, 'आपण तर निवास इथंच करता. मग प्रतिदिन भोजन कुठं घेता ?' ब्राह्मणकुमाराने सर्व वृत्तांत सांगितल्यावर ते सर्व ब्राह्मण त्याला म्हणाले,

'द्विजवर, आपण आता शुद्ध झाला आहात. या चक्रतीर्थाच्या प्रभावानं आपलं सर्व पाप नष्ट झालं आहे. आमच्या संगतीनंतर पापाचा लेशही उरलेला नाही.'

हे ऐकून त्या ब्राह्मणाचे चित्त प्रसन्न झाले. तो स्नानासाठी 'चक्रतीर्था'वर गेला. तेथे त्याची भार्या भोजन घेऊन उपस्थित होती. तिने

हर्षित होऊन आपल्या पतीस म्हटले, 'स्वामी, आपण ब्रह्महत्येच्या पापापासून मुक्त झालात, असंच मला दिसतंय.' तेव्हा ब्राह्मण म्हणाला, 'प्रिये, तू काय म्हणालीस ते थोडं स्पष्ट कर ना.' तेव्हा पत्नीने म्हटले, 'यापूर्वी आपणांशी भाषण करावं, असंही वाटत नव्हतं. परंतु आता 'चक्रतीर्था'च्या प्रभावानं आपण पापमुक्त झाला आहात. आपण आता उठावं. आणि परम पवित्र कल्पग्रामास चलावं.'

तो श्रेष्ठ ब्राह्मण आपल्या पत्नीसह कल्पग्रामास पोचला. ही सर्व कथा सांगून भगवान वराह म्हणाले, 'वसुंधरे, त्या चक्रतीर्थात भगवान भद्रेश्वर विराजमान असतात. या तीर्थाच्या सेवनानं कल्पग्रामापेक्षा शंभर पटींनी अधिक फल प्राप्त होतं. एक दिवस जरी तिथं राहून उपवास केला तरी मनुष्याचा ब्रह्महत्येपासूनही उद्धार होतो.'

## कपिलवराहाचे माहात्म्य

मिथिला प्रांतात जनकाची जनकपुरी नावाची एक प्राचीन व रमणीय नगरी आहे. येथे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशा चारही वर्णांचे लोक निवास करीत. तीर्थयात्रेच्या निमित्ताने बाहेरूनही लोक येत असत. तेथील 'सौकरवतीर्था'त स्नान करून मथुरातीर्थाचीही ते यात्रा करीत. या समाजातच एक ब्राह्मण असा होता की, ज्याच्या शरीरावर ब्रह्महत्येची चिन्हे होती. त्याच्या हातातून सदा रुधिराची धारा गळत असे. सर्व लोकांना ती दिसत राही. हा दोष दूर व्हावा म्हणून या ब्राह्मणाने सर्व तीर्थांच्या यात्रा केल्या. पण त्याचा दोष दूर झाला नाही. पण त्याने जेव्हा 'वैकुंठतीर्था'त स्नान केले, तेव्हा त्याची रुधिरधारा बंद झाली. त्याच्या सर्व सहवासींना याचे आश्चर्य वाटून ते म्हणाले,

'हे कसं झालं ?

याचवेळी ब्राह्मणाचे रूप धारण करून एक दिव्य पुरुष तेथे आला व त्याने सर्वांना सांगितले, 'या ब्राह्मणाची ब्रह्महत्या कशी संपली ?' तेव्हा त्यांनी वैकुंठतीर्थात ब्राह्मणाने स्नान केल्याची हकीगत सांगितली. या तीर्थाच्या महिम्यात थोडाही संदेह नाही.

यानंतर भगवान वराहांनी पृथ्वीस 'असिकुंड', 'गंधर्वकुंड'

इत्यादींची माहिती देऊन त्यांनी मथुरामंडलाचे आणखी वर्णन केले. सर्वांना मुक्त देणाऱ्या या मंडलाची आकृती कमलासारखी आहे. याच्या कर्णिकाच्या मध्यभागी क्लेशनाशक केशव विराजतात. या स्थानी प्राण देणाऱ्यांना मुक्त प्राप्त होते. या तीर्थांच्या पश्चिमभागी ' गोवर्धनपर्वत ' असून येथे भगवान श्रीकृष्ण निवास करतात.

पूर्वीच्या काळी मांधाता नावाचा एक राजा होता. त्याच्या भक्तीने प्रसन्न होऊन भगवान वराहांनी एक मूर्ती त्याला दिली. मुक्तीच्या इच्छेने तो त्या मूर्तीची नित्य आराधना करी. ज्या समयी मथुरेत लवणासुराचा वध झाला, त्याच वेळी या तीर्थात मूर्तीची स्थापना झाली. कपिल नावाच्या मुनीने अपार श्रद्धेने व मनोयोगाने वराहांची मूर्ती निर्माण केली होती. तो विप्रवर मुनी कपिल प्रतिदिन या मूर्तीचे ध्यान व पूजन करी. नंतर इंद्राने प्रार्थना केल्यावरून कपिलाने प्रसन्न होऊन ही दिव्य मूर्ती त्याला दिली. त्यालाही अपार हर्ष झाला व तो नित्य भक्तीने तिचे पूजन करू लागला. फलरूपाने शक्रास सर्वोत्कृष्ट दिव्य ज्ञान प्राप्त झाले. इंद्राने या ' कपिलवराहा 'ची पूजा अनेक वर्षे केली.

यानंतर रावण नावाचा एक दुष्ट राक्षस झाला. तो महान निशाचर एकदा इंद्रलोकात गेला व त्याने स्वर्ग जिंकण्याचा प्रयत्न केला. देवराजाशी तो युद्ध करू लागला. त्याने देवांना पराभूत केले. इंद्रही पराजित झाला. रावणाने त्याला बंदिवान करून त्याच्या भवनात प्रवेश केला. तेव्हा त्याला ' कपिलवराहां 'चे दर्शन झाले. वराहांना पाहाताच त्याने जमिनीवर मस्तक टेकून भगवंतांची स्तुती केली. भगवंत सूक्ष्म रूप धारण करून तेथे आले. आणि त्यांनी त्या मूर्तीत प्रवेश केला. रावणास ती प्रतिमा उचलता आली नाही. तेव्हा तो आश्चर्याने म्हणाला,

' भगवन्, पूर्वी मी शंकरांसह कैलासपर्वतही हातांनी उचलून धारण केला होता. आपली आकृती तर किती लहान. पण उचलताना माझी मती कुंठित झाली. देवेश्वरा, आपणांस नमस्कार असो. आपण माझ्यावर प्रसन्न व्हावं. प्रभो, माझी इच्छा आहे की, मी आपणांस माझ्या सर्वोत्तम लंकापुरीस न्यावं.'

' राक्षसा, तू अवैष्णव आहेस. तुला अशी भक्ती कुठून प्राप्त

झाली ?'

'महात्मन्, आपल्या पवित्र दर्शनानं मला अनन्यभक्ती सुलभ झाली आहे. देवेश्वरा, आपणांस प्रणाम असो. आपण माझ्या पुरीस कृपा करून यावं.'

त्यानंतर भगवंतांची मूर्ती हलकी झाली. रावणाने त्या 'कपिल-वराह' मूर्तीची स्थापना आपल्या लंकेत केली. जेव्हा भगवान रामांनी रावणास मारून लंकेच्या राज्यावर विभीषणास वसविले तेव्हा विभीषणाने श्रीरामांना प्रार्थना केली,

'प्रभो, हे सर्व राज्य आपलंच आहे. आपण याचा स्वीकार करावा.'

'राक्षसराज विभीषणा, हे सर्व काही तुझंच आहे. पण राक्षसेश्वरा, इंद्रलोकाहून रावणानं जी 'कपिलवरांहा'ची मूर्ती आणली आहे, ती तेवढी मला दे. त्या भगवान वराहांची मी प्रतिदिन पूजा करू इच्छितो. मी तिला घेऊन अयोध्येस जाईन.'

तेव्हा विभीषणाने ही मूर्ती श्रीरामांना दिली. रामांनी तिची स्थापना अयोध्येत केली. ते प्रतिदिन तिची पूजा करीत. दहा वर्षांनंतर श्रीरामांनी लवणासुराचा वध करण्याची अनुज्ञा शत्रुघ्नास दिली. त्या वेळी तो राक्षस मथुरेत राहात होता. रामांना प्रणाम करून शत्रुघ्न सेनेसह मथुरेस आला. लवणासुराचे रूप महाभयंकर होते. सर्व राक्षसांचा तो नायक होता. तरी शत्रुघ्नाने त्याचा वध केला. शत्रुघ्नाने या मथुरा-नगरीत अत्यंत तेजस्वी अशा सव्वीस हजार ब्राह्मणांची वस्ती वसविली.

परत अयोध्येस येऊन शत्रुघ्नाने सारा वृत्तांत श्रीरामांना सांगितला. असुराच्या मृत्यूचे वृत्त ऐकून श्रीरामचंद्र म्हणाले, 'शत्रुघ्ना, तुझ्या मनात जी वस्तू हवी असेल ती तू माग.' त्यावर शत्रुघ्न म्हणाला, 'भगवन्, आपण माझ्यावर प्रसन्न असाल तर ही कपिलवराहांची मूर्ती आपण मला द्यावी.' तेव्हा श्रीराम म्हणाले, 'शत्रुघ्ना, तू या वराहमूर्तीस घेऊन जा. मथुरेचे लोक या वराहमूर्तीचं दर्शन घेतील. त्यांची सर्व पापं दूर होतील.' यानंतर शत्रुघ्नाने ही वराहमूर्ती मथुरेस नेली. आणि मथुरेत तिची स्थापना केली.

## अन्नकूट (गोवर्धन) पर्वताची प्रदक्षिणा, 'चतु:सामुद्रिक' कूपाचे माहात्म्य

मथुरेच्या जवळच पश्चिमेस दोन योजनांच्या अंतरावर गोवर्धन नावाचे एक विख्यात क्षेत्र आहे. वृक्ष व लता यांनी मंडित असे एक सरोवर तेथे आहे. मथुरेच्या पूर्व भागी इंद्रतीर्थ, दक्षिणेस यमतीर्थ, पश्चिमेस वरुणतीर्थ व उत्तरेस कुबेरतीर्थ आहे. येथेच अन्नकूट नावाचेही एक क्षेत्र आहे. यास प्रदक्षिणा करणारा मनुष्य पुन: जन्मास येत नाही. मानसी गंगेत स्नान करून गोवर्धनगिरीवरील भगवान कृष्णांचे दर्शन घ्यावे. सोमवती अमावास्येस जो येथे पितरांना पिंडदान करील, त्याला राजसूययज्ञाचे फल प्राप्त होते.

या पर्वतावर पुंडरीकतीर्थ, अप्सराकुंड, संकर्षणतीर्थ, शक्रतीर्थ; अशी काही स्थाने आहेत. शक्रतीर्थातच इंद्रपूजा बंद झाली. या यज्ञाच्या समयास भोज्य पदार्थांचे ढीगच्या ढीग उभारले होते. या वेळी इंद्राशी कृष्णांचा विवाद झाला. इंद्राने घोर वृष्टी केली. गोपाळांच्या रक्षणासाठी कृष्णांनी या पर्वतास हाताने उचलून धरले. तेव्हापासून हा पर्वत अन्नकूट या नावाने प्रसिद्ध झाला. येथून पुढे 'कदंबखंड' नावाचे स्वच्छ जलाचे एक कुंड आहे. येथे स्नान केल्याने, पितरांना तर्पण केल्याने ब्रह्मलोकाची प्राप्ती होते.

मानसी गंगेच्या उत्तरतटावर चक्रधारी श्रीहरी व अरिष्टासुर यांच्यांत घोर युद्ध झाले होते. असुराने बैलाचा वेष धारण केला होता. त्याची जीवनलीला कृष्णांनी समाप्त केली. या वृषभासुरास मारून भगवान श्रीकृष्णांनी तीर्थात स्नान केले, त्यांच्या मनात चिंता उत्पन्न झाली की, आपल्या हातून गोहत्या झाली. एवढ्यात भगवती राधा श्रीकृष्णांजवळ आली. तिने आपल्या नावाने त्या तीर्थास कुंडाचे स्वरूप दिले. तेव्हापासून हे 'राधाकुंड' या नावाने प्रसिद्ध झाले याचेच नाव 'अरिष्टकुंड' असेही होते. येथे स्नान केल्याने राजसूय व अश्वमेधयज्ञ केल्याचे फल प्राप्त होते. असेच एक तीर्थ 'इंद्रध्वज' नावाने विख्यात आहे. चक्रतीर्थ, पंचतीर्थकुंड, या तीर्थांचा महिमाही पृथ्वीस भगवान वराहांनी

सांगितला.

त्यांनी पृथ्वीला एक कथाप्रसंगही सांगितला. मथुरेच्या दक्षिणेस एका नगरीत सुशील नावाचा एक धनवान वैश्य राहात होता. त्याचा व्यवसाय क्रयविक्रयाचा होता. त्याला कधीच सत्संग प्राप्त झाला नाही, की कधी त्याने दानधर्म केला नाही. तो नेहमी कुटुंबात आसक्त असायचा. काही काळाने तो वैश्य कालवश होऊन त्याला प्रेतयोनी मिळाली. जंगलात तो तहानेने, भुकेने व्याकुळ होऊन भटकत राहिला. असे करताना तो मरुभूमीत येऊन पोचला. तेथील एका वृक्षावर त्याने अनेक दिवस निवास केला.

अशा अवस्थेत तो असताना एके दिवशी दैवयोगाने खरेदी-विक्री करणारा एक वैश्य तेथे आला. त्याला पाहून प्रेताला प्रसन्नता वाटली. तो नाचतच म्हणाला,

'अरे, तू या वेळी माझा आहार बनून ये.' वैश्य भयभीत झाला. प्रेत त्याला म्हणाले, 'आता मी तुला खाणार.' तेव्हा तो वैश्य म्हणाला,

'राक्षसा, मी आपल्या परिवाराच्या भरणपोषणार्थ या वनात आलो आहे. माझ्या घरी वृद्ध पिता व माता आहेत, एक पतिव्रता पत्नी आहे. जर तू मला खाशील तर या सर्वांचाच मृत्यू होईल.'

'महामते, तू कोणत्या स्थानाहून इथं आलास ?'

'प्रेता, मी गिरिराज गोवर्धन व यमुनानदी यांच्या मधील मथुरापुरीत राहात होतो. मी जमविलेली संपत्ती चोरांनी लुटून नेल्यावर मी निर्धन झालो. थोडं उरलेलं धन घेऊन मी व्यापारासाठी या मरुस्थलात येऊन पोचलो. आता तुला काय हवं ते तू कर.'

'वैश्या, तुझी मला दया येते. मी आता तुला खाणार नाही. तू मला एक वचन मात्र दे. तू माझं काम करण्यासाठी मथुरेस जा. तू तिथं जाऊन 'चतुःसामुद्रिक' नावाच्या कूपावर जाऊन स्नान कर. माझ्या नावाचा उच्चार करून पिंडदान कर. या कर्माचं फल मला दे. एवढं काम तू करच. आता तू सुखानं जा.'

'प्रेता, माझ्या घरी आता कोणतंच धन उरलेलं नाही.'

'वैश्या, तुझ्या घरी एका खड्ड्यात खूप सुवर्णाचा साठा आहे.

मी तुला मथुरेचा मार्ग दाखवितो.'

'प्रेता, या योनीत तुला असं दिव्य ज्ञान कसं प्राप्त झालं ?'

'वैश्या, मी प्रथम मथुरेचाच निवासी होतो. तिथं साक्षात भगवान श्रीकृष्ण विराजतात. एकदा भगवानांच्या मंदिरापाशी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांचा समाज जमला होता. तिथं एक कथावाचक पुराणांतील कथा सांगत होता. माझा एक मित्र प्रतिदिन तिथं जायचा. या मित्राच्या प्रेरणेनं मी एके दिवशी तिथं गेलो. तिथं मी ऐकलं की, पवित्र कूपातील जल सर्व पापं धुऊन काढतं. या कूपात चारही समुद्रांची तीर्थं एकत्रित झाली आहेत. या कूपाचं माहात्म्य ऐकून महान फल प्राप्त होतं. या वेळी सर्व लोकांनी कथावाचकास धन दिलं. पण मी स्तब्ध राहिलो. माझ्या मित्रानं शक्तीनुसार धन देण्यास मला सांगितलं. तेव्हा मी त्या कथावाचकास एक सुवर्ण (आठ रत्तींची एक मुद्रा) दिलं. त्यानंतर माझा अंत झाल्यावर माझी ही अवस्था प्रेतयोनीची झाली. मी कधी पूर्वजन्मी तीर्थात स्नान केलं नाही. कधी दान केलं नाही, कधी पितरांना तर्पण केलं नाही. यामुळं मला प्रेतयोनी मिळाली.'

'तू या वृक्षाच्या मुळाशी राहून प्राण कसा धारण करतोस ?'

'मी तुला सांगितलं होतं की, मी त्या कथावाचकास एक सुवर्णमुद्रा दिली होती. या प्रभावानं मी या वृक्षावर तृप्त आहे. पण हे दान मी दुसऱ्याच्या प्रेरणेनं केलं होतं. तरी याचा परिणाम असा की, या प्रेतयोनीतही मला दिव्य ज्ञान आहे.'

प्रेताची सर्व हकीगत ऐकून तो वैश्य मथुरेस आला. त्याने प्रेताच्या सांगण्यानुसार सर्व काही केले. तो प्रेतभावातून मुक्त होऊन स्वर्गलोकी गेला. असे हे मथुरेचे व तेथील 'चतुःसामुद्रिक'कूपाचे माहात्म्य आहे. या मथुरापुरीची विशेषतः ही आहे की, येथे चुकून केलेले पाप येथेच नष्ट होते. ही पुरी पुण्यमयी आहे. येथे पापाला स्थान नाही.

## 'असिकुंड'तीर्थ आणि 'विश्रांति'माहात्म्य

भगवान वराहांनी पृथ्वीस असिकुंडाचे माहात्म्य ऐकविले. एका सुमती नावाच्या धार्मिक राजाचा मृत्यू एका तीर्थयात्रेच्या प्रसंगी झाला.

त्याचा पुत्र विमती राज्य सांभाळू लागला. एकदा त्याच्याकडे नारदमुनी आले. त्यांचे राजाने स्वागत केल्यावर ते म्हणाले, ' राजन्, पित्याचं ऋण फेडूनच पुत्र धर्माचा वाटेकरी होतो.' एवढे म्हणून नारदमुनी अंतर्धान पावले. राजाने आपल्या मंत्र्यांचा सल्ला घेतला. मंत्र्यांनी सांगितले, ' आपण तीर्थयात्रा करून तिचं फल महाराजांना द्यावं. म्हणजे पित्याचं ऋण चुकतं होईल. कारण त्यांची यात्रा अपुरी राहिली होती.'

मंत्र्यांचे बोल ऐकून विमतीने सर्व तीर्थे असलेल्या मथुरेत निवास करण्याचा विचार केला. तो मथुरेस आला तेव्हा तेथील तीर्थांनी आपापसांत म्हटले, ' याच्याशी सामना करणं कठीण आहे. आपण भगवान वराहांच्या कल्पग्रामास जाऊ.' सर्व तीर्थे कल्पग्रामास गेली आणि त्यांनी भगवंतांना म्हटले,

' भगवन्, आपण स्वतः श्रीहरी आहात. आपण अचिंत्य, अच्युत, जगताचे शास्ते आणि स्रष्टे आहात. प्रभो, आपला जय असो. जय असो.'

' तीर्थांनो, तुमचं कल्याण असो. तुम्ही एखादा वर मागावा.'

' वराहरूपी देवेश्वरा, आपण आम्हांस विपत्तीपासून मुक्त करावं.'

असे ऐकताच भगवान मथुरेस आले व त्यांनी ' असि ' म्हणजे तलवारीने विमतीचा शिरच्छेद केला. तलवारीच्या टोकाने त्याला पृथ्वीत गाडून टाकले. तेथे एक दिव्य कुंड तयार झाले. हेच ते ' असिकुंड '. याच्या प्रभावाने सुमती व विमती यांना मुक्ती मिळाली. जो मनुष्य द्वादशीस या असिकुंडात स्नान करील, त्याला येथे वराह, नारायण, वामन, राघव यांच्या सुवर्णप्रतिमांचे दर्शन होईल. त्याला पुन्हा जन्म येणार नाही.

यानंतर भगवान वराहांनी पृथ्वीस ' विश्रांतितीर्था 'चा महिमा समजावून दिला. पूर्वी उज्जयिनीत एक दुराचारी ब्राह्मण राहात होता. तो कधी देवाची पूजा करीत नसे. कधी साधुसंतांना प्रणाम करायचा नाही. त्याने कधी तीर्थांत स्नान केले नव्हते. हा मूर्ख प्रातःकाळी, संध्याकाळी झोपून राहायचा. सर्व आश्रमांत गृहस्थाश्रम श्रेष्ठ होय. पण

हा अधम ब्राह्मण या आश्रमात राहून चोरी करायचा. एकदा रात्री चोरी करताना त्याला राजाच्या सैनिकांनी पकडले. पण तो त्यांच्या हातून चटकन निसटला व एका विहिरीत पडला व त्याचे जीवन समाप्त झाले.

पुढल्या जन्मी तो ब्रह्मराक्षस झाला. त्याचे रूप मोठे भयंकर होते. एकदा एक जनसमाज तेथे आला. त्यांतील एक ब्राह्मण रक्षोघ्न-मंत्र म्हणून सर्वांचे रक्षण करीत असे. या ब्राह्मणास तो ब्रह्मराक्षस म्हणाला,

'विप्रा, तुझ्या मनात इच्छा असेल ती वस्तू मी तुला देईन. फार दिवसांनी आज मला मनासारखं भोजन मिळालं आहे. तू उठून दूर कुठं तरी जाऊन झोप जा. मी या सर्वांना खाऊन तृप्त होईन.'

'राक्षसा, मी यांच्याबरोबर इथं आलो आहे. हा सर्व माझाच परिवार आहे. मी यांना सोडू शकणार नाही. तूच इथून निघून जा. माझ्या मंत्रशक्तीच्या प्रभावानं तू यांना काहीच करू शकणार नाहीस.'

'विप्रा, केवळ अनाचारानं माझी अशी दुर्दशा झाली आहे.' राक्षसाने आपली सारी कथा सांगितली.

'राक्षसा', ब्राह्मण म्हणाला, 'आता तू माझा मित्र झालास. सांग मी काय करू तुझ्यासाठी ?'

'विप्र, तू मथुरापुरीत विश्रांतितीर्थात स्नान करून जे पुण्य मिळवलंस, त्याचं फल मला देण्याची कृपा कर. त्यामुळं मी मुक्त होईन.'

'राक्षसा, विश्रांतितीर्थाची माहिती तुला कशी मिळाली ? त्याला हे नाव तरी कसं मिळालं ?'

'ब्राह्मणा, मी प्रथम उज्जयिनीत निवास करीत होतो. संयोगवश होऊन मी एका विष्णुमंदिरात गेलो. त्या मंदिराच्या दारापाशी एक कथा सांगणारा विद्वान ब्राह्मण बसत असे. विश्रांतितीर्थाचा महिमा प्रतिदिन सांगण्याचा त्याचा परिपाठ होता. त्या माहात्म्यास ऐकून माझ्या मनात भक्ती निर्माण झाली. या स्थानावर जगताचे शासक श्रीहरी विश्राम करतात. या प्रभूंना वासुदेवही म्हणतात. म्हणून या

स्थानास ‘ विश्रांतितीर्थ ’ हे नाव प्राप्त झालं.’

‘ब्राह्मणा, त्या तीर्थात स्नान करण्याचं फल मी तुला दिलं आहे.’

ब्राह्मणाने असे म्हणताच राक्षसास त्या योनीतून मुक्तता मिळाली.

## मथुरा आणि इतर तीर्थे

एकशेअडुसष्ट, एकशेएकोणसत्तर अशा दोन अध्यायांत भगवान वराहांनी मथुरा व तेथील अवांतर तीर्थे यांची माहिती दिली. शिव भगवान निरंतर या मथुरापुरीतच निवास करतात. फार पूर्वी रुद्रांनी भगवान वराहांसाठी एक हजार वर्षांची अत्यंत उग्र तपस्या केली. भगवान संतुष्ट झाले व म्हणाले, ‘हरे, आपल्या मनात जे असेल ते आपण मागावं.’ तेव्हा महादेव म्हणाले, ‘ देवेश, आपण सर्वत्र विराजमान आहात. आपण मला मथुरेत राहाण्यासाठी छोटीशी जागा द्यावी.’ तेव्हा वराह म्हणाले, ‘ देव, आपण मथुरेत क्षेत्रपालाचं स्थान ग्रहण करावं. जी व्यक्ती इथं येऊन आपलं दर्शन घेणार नाही तिचं कोणतंच कार्य सिद्ध होणार नाही. ज्याप्रमाणं स्वर्गात अमरावती, त्याप्रमाणं या जंबूद्वीपात मथुरापुरी आहे.’

या क्षेत्रात साठ कोटी, सहा हजार तीर्थे आहेत. गोवर्धन, अक्रूर, प्रस्कंदन, भांडीर, सोमतीर्थ, चक्रतीर्थ, अविमुक्त, यमन, तिंदुक; अशा अनेक तीर्थांनी ही भूमी समृद्ध आहे. येथील सर्व स्थानांवर भगवान श्रीकृष्णांची चरणचिन्हे उमटली आहेत. दक्षिणकोटीपासून उत्तरकोटीपर्यंत यात्रा पूर्ण करावी.

येथे यज्ञोपवीताच्या प्रमाणभूमीवर जे चालतात त्यांच्या द्वारे अनेक कुलांचे रक्षण होते. हे यज्ञोपवीत काय माप आहे ? या भूमीचे जे दक्षिणेकडील टोक आहे, तेथून उत्तरसीमेपर्यंतच्या भूमीस ‘यज्ञोपवीत’-प्रमाण म्हणतात. स्नान करून भगवान कृष्णांची पूजा करावी. पयस्विनी गायीचे दान करावे. यज्ञ करावा. सुवर्ण व धन यांचे ब्राह्मणांना दान करावे. ‘ अर्धचंद्र’तीर्थात ज्यास मृत्यू येतो, तो स्वर्गात जातो. इतकेच नव्हे

येथे एखाद्या गाढवाचे शरीर जळाले तरी त्याला विष्णुरूप प्राप्त होते.

मथुरानिवासी तृप्त झाले की भगवान वराह तृप्त होतात, एकदा गरुड श्रीकृष्णांच्या दर्शनाच्या इच्छेने मथुरेस आले होते. त्यांनी तेथील सर्व प्राणी कृष्णरूपात पाहिले. शेवटी त्यांनी भगवंतांची स्तुती केली. तेव्हा भगवान म्हणाले, 'गरुडा, तुम्ही कोणत्या उद्देशानं मथुरेस आला होता? ही माझी स्तुती कशासाठी करता?' त्यावर गरुड म्हणाले, 'भगवान, मी आपल्या दर्शनासाठी मथुरेस आलो होतो. पण इथले सर्व निवासी मला आपल्याच रूपात दिसले. मी मोहात पडलो.' गरुडाचे हे बोल ऐकून श्रीकृष्ण हसले व म्हणाले,

'गरुडा, मथुरेच्या निवासींचं जे रूप तेच माझं असतं. पक्षिराजा, ज्यांच्या हृदयांत पाप असतं त्यांनाच मथुरानिवासी माझ्यापेक्षा निराळे दिसतात.'

या मथुरेत मरण पावल्यास मनुष्य, पशू, पक्षी, किडे, पतंग; सर्वांना चार भुजांच्या विष्णूंचे रूप प्राप्त होते. येथे येऊन श्रीकृष्णांची भगिनी भगवती एकानंशा, माता देवकी व यशोदा, महाविद्येश्वरीदेवी यांचे दर्शन अगत्याने घ्यावे.

## गोकर्णतीर्थ व सरस्वती यांचा महिमा

भगवान वराहांनी पृथ्वीस आणखी एक इतिहासप्रसंग निवेदन केला. फार पूर्वी मथुरेत वसुकर्ण नावाचा एक वैश्य राहात होता. त्याची पत्नी सुशीला मोठी गुणवती होती. पण तिला संतती नव्हती. एकदा वैश्यस्त्री सरस्वतीनदीच्या तटावर पुत्रवती स्त्रियांना पाहून एकांतात खिन्न होऊन वसली. तिला पाहून एका मुनीच्या हृदयात दया उत्पन्न झाली व त्याने विचारले,

'सुभगे, तू कोण आहेस? इथं काय करतेस?'

'मी एक पुत्रहीन स्त्री आहे. पण माझ्या सर्व सख्या पुत्रवती आहेत. माझ्या खेदाचं हेच एक कारण आहे.'

'देवी, भगवान गोकर्णांच्या कृपेनं तुला पुत्र होईल. यशस्विनी, तू आपल्या पतीसह त्यांची आराधना कर. स्नान, दीपदान, जप, स्तोत्रं

यांनी त्यांना प्रसन्न कर.'

मुनीस प्रणाम करून ही स्त्री आपल्या घरी आली. आपल्या पतीस तिने सर्व सांगितले. तेव्हा वसुकर्ण म्हणाला, 'देवी, मुनीनं जे सांगितलं ते मला पटलं.' त्यानंतर त्या वैश्यदंपतीने प्रतिदिन सरस्वतीनदीत स्नान करून पुष्प, धूप, दीपद्वारे गोकर्णमहादेवांची आराधना सुरू केली. अशी दहा वर्षे गेल्यावर भगवान शंकर प्रसन्न झाले. त्यांनी तिला रूपवान व गुणी पुत्रप्राप्तीचा वर दिला. सुशीलेस दहाव्या महिन्यात एक सुंदर पुत्र झाला. वसुकर्णाने पुत्रजन्माच्या उत्सवात हजार गायी, खूपसे सुवर्ण आणि वस्त्रे यांची दाने केली. या बालकाचे नावही 'गोकर्ण' असेच ठेवण्यात आले. यथासमय त्याचे अन्नप्राशन, चूडाकरण, यज्ञोपवीत; इत्यादी संस्कार झाले. वैवाहिक गोदानही झाले.

आता वसुकर्णाचा वेळ भगवानांची पूजा, उपासना यांत जाऊ लागला. गोकर्ण युवावस्थेत आला. पण त्याला पुत्र झाला नाही. पित्याने त्याचे आणखी तीन विवाह करून दिले. अशा त्याला एकूण चार भार्या होत्या. त्या परम सुंदर व गुणवान होत्या. पण कोणालाच संतान झाले नाही. गोकर्णाने पुत्रप्राप्तीसाठी धर्मकृत्ये केली. वापी, कूप, तलाव, मंदिरे यांची निर्मिती केली. पाणपोया, सदावर्ते त्याने निर्माण करून गोकर्णशिवापाशी पश्चिमेस भगवान चक्रपाणींचे एक मोठे मंदिर बांधले. विशाल उद्यान निर्माण केले. त्यात अनेक प्रकारची फुलझाडे लावली. त्याच्या चारही स्त्रिया मंदिरात जाऊन भगवानांची पूजा करू लागल्या. धर्मनिष्ठ गोकर्णाची सारी धनसंपत्ती अशा रीतीने कमी झाली, तेव्हा त्याला चिंता वाटू लागली. आता माता-पित्यांना कसे सांभाळावे? धनाची तर आवश्यकता आहे. त्याने पुन्हा व्यापार करण्याचा निश्चय केला.

एके दिवशी थोडी विश्रांती घेण्यासाठी तो एका पर्वताच्या शिखरावर गेला. तेथे फार सुंदर गुहा होत्या. इकडेतिकडे धूर निघत होता. त्याची दृष्टी एका स्वच्छ जलस्थानाकडे गेली. तेथे फळांनी लगडलेले वृक्ष व सुगंधित फुलांच्या लतावेली होत्या. दोन पहाडांच्या मध्ये माळेप्रमाणे गोलाकार असे एक रिक्त स्थान त्याने पाहिले. तेथून एखादा

आवाज असा येई की, तो जणू अतिथीस बोलावीत होता. एवढ्यात त्याची दृष्टी एका पोपटावर पडली. तो एका पिंजऱ्यात बसला होता. गोकर्ण त्याच्याजवळ जाताच तो पोपट त्याला म्हणाला,

' पांथस्था, तू आपल्या साथीदारांसह यावंस. या उत्तम आसनावर बसावंस. पाद्य, अर्घ्यं, फलंमूलं यांचा स्वीकार करावा. थोड्याच वेळात माझे माता-पिता येतील व तुमचं स्वागत यथार्थ रीतीनं करतील. जो गृहस्थ अतिथीचं स्वागत करीत नाही, त्याचे पितर निश्चयानं नरकात पडतात. जो अतिथीचा सन्मान करतो, त्यास अनंत कालाचा आनंद भोगण्यास मिळतो. ज्या घरून अतिथी निराश होऊन परत जातो, तो आपलं पाप त्या गृहस्थास देऊन निघून जातो. म्हणून गृहस्थानं अतिथीचं स्वागत करावं.'

**अतिथिर्यस्य भग्नाशो गृहात्प्रव्रजते यदि ।**
**आत्मनो दुष्कृतं तस्मै दत्त्वा तत्सुकृतं हरेत् ।।**
**तस्मात् सर्वप्रयत्नेन पूज्यो वै गृहमेधिना ।**
**काले प्राप्तस्त्वकाले वा यथा विष्णुस्तथैव सः ।।**

(१७०. ५३-५४)

यावर गोकर्णाने त्या पोपटास विचारले, ' पुराणांचं रहस्य जाणणारा तू कोण आहेस ? तो मनुष्य धन्य आहे की, जो तुझ्यापाशी निवास करतो.' तेव्हा त्या पोपटाने आपला सर्व इतिहास त्याला सांगितला, ' पांथा, पूर्वी सुमेरू पर्वतावरील उत्तरभागात मुनिवर शुकदेव तपस्या करीत होते. ते प्रतिदिन इतिहास व पुराणं यांवर प्रवचन करीत. ते ऐकण्यासाठी असित, देवल, मार्कंडेय, भरद्वाज, यवक्रीत, भृगू, अंगिरा, तैत्तिरी, रैभ्य, कण्व, मेधातिथी, क्रत, तंतू, सुमंतू, वसुमान, एकत, द्वित, वामदेव, अश्वशिरा, त्रिशीर्ष, गोतमोदर इत्यादी ऋषी महर्षी, सिद्ध, देव, पन्नग, गुह्यक इत्यादी येत असत. शुकदेव त्यांच्या शंका दूर करीत.

'या समयी मी वामदेवांचा एक दुराचारी शिष्य ' शुकोदर ' नावाचा होतो. मी बालपणापासून जिथं धर्मकथा चालली असेल तिथं उपस्थित असायचा. पण एकदा मी गुरुदेवांची अवहेलना केली. तेव्हा

शुकदेवांनी क्रोधात येऊन शाप दिला. 'हा नावाप्रमाणेच शुकपक्षी होईल.' तेव्हापासून मी असा पोपट बनलो. पण मला पुराणांचं ज्ञान असल्यामुळं मी मथुरेस जाऊन शेवटी ब्रह्मलोक प्राप्त करून घेईन. पांथा, नंतर मी तिथून उडत उडत या हिमालयाच्या गुहेत राहू लागलो. सावधानीनं मी सदा मथुरेचं नाव घेऊ लागलो. एकदा मी एका पारध्याच्या डावात फसलो व अशा पिंजऱ्यात पडलो.'

'भद्र, मी पापनाशिनी मथुरापुरीतच राहातो. व्यापार करून थकल्यानं इथं विश्रांतीसाठी आलो आहे.'

या दोघांतील हे संभाषण एका शबराच्या स्त्रीने ऐकले. ती झोपलेली होती. पण ती जागी झाली तेव्हा तिला पोपट म्हणाला, 'माते, हे अतिथिरूपानं इथं आले आहेत. म्हणून पूज्य आहेत.' तेव्हा ती स्वागताची तयारी करू लागली. इतक्यात शबर तेथे आला. पोपटाने त्यालाही अतिथीचा सत्कार करण्यासाठी सांगितले. त्याने गोकर्णास प्रणाम केला. त्याला स्वादिष्ट फळे दिली. सुगंधी पेय समर्पण केले. आणि म्हटले, 'अतिथिदेव, सांगा. मी आपली सेवा काय करू?' तेव्हा गोकर्ण म्हणाला, 'मित्रा, तू मला हा पोपट दे. मी याला मथुरेला घेऊन जाईन. आपल्या पुत्राप्रमाणं याचा सांभाळ करीन.' तेव्हा शबर म्हणाला, 'तू याच्या बदलात मला यमुनेच्या स्नानाचं पुण्य देशील? या पोपटानंच मला सांगितलं आहे की, मथुरेत संगमस्नान, द्वादशीव्रत केलं की नीच जातीतील लोकांनाही अभीष्टाची प्राप्ती होते.' गोकर्णाने शबरास संमती दिली.

अशा रीतीने गोकर्ण पोपटाच्याबरोबर मथुरेस गेला. मातापित्यांना त्याचा परिचय करून दिला. त्यानंतर व्यापार करण्याच्या हेतूने तो आपले सहकारी व पोपट यांना घेऊन समुद्रमार्गाने निघाला. एके दिवशी प्रतिकूल वारा सुटून एक भयंकर तुफान आले. सर्व प्रवासी घाबरून गोकर्णास म्हणू लागले, 'एखादा निकृष्ट वा पापी या जहाजावर चढला आहे का? त्यामुळेची आमची अशी दुर्दशा झाली असावी. आपण सारे आता मरणार.' गोकर्णाने पोपटास सर्व परिस्थिती समजावून सांगितली, आणि म्हटले, 'पुत्रहीन व्यक्तीची अशीच दुर्गती होते. या

जहाजावरील व्यक्तींत मीच एक पापी आहे. आता काय करावं ?'

'आपण खेद करू नये' पोपट म्हणाला, 'मी एक उपाय करून पाहातो.' असे म्हणून तो पोपट उडून उत्तरध्रुवाकडे निघून गेला. पर्वत-शिखरे ओलांडून तो भगवान विष्णूंच्या सुंदर मंदिरापर्यंत गेला. आत प्रवेश करून त्याने विचारले, 'इथं कोणते देव आहेत ? मी त्यांना माझे पिताजी या घोर समुद्रास कसे पार करतील ? हे विचारणार आहे.' एवढ्यात एक देवी तेथे आली. तिच्या हातात एक सुवर्णपात्र होते. तिने विष्णूंची पूजा केली. 'नमो नारायणाय' म्हणून ती एकाआसनावर वसली. एका पळात अशा असंख्य रूपवती देवी तेथे आल्या व त्यांनी देवांचे नृत्य, गायन, वादन यांनी अर्चन सुरू केले. त्यानंतर त्या निघून गेल्या. तेथेच जटायूच्या वंशातील काही पक्षीही होते. त्यांनी पोपटास विचारले,

'तू इथं कसा आलास ? अगाध जलास पार करणं साधं काम नाही.'

'माझे पिताजी समुद्रावर तुफानात सापडले आहेत. त्यांच्या रक्षणासाठी मी इथं आलो आहे. आपण काही मदत करावी.'

'तू आमच्या मार्गाचं अनुसरण कर. आम्ही चोचींनी समुद्रातील मकरांचा, नक्रांचा संहार करू. तुझे पिताजी समुद्र तरून जातील.'

पोपट त्या पक्ष्यांसह गोकर्णापाशी आला. पोपटाने व पक्ष्यांनी गोकर्णास समुद्रातून पार केले. तेथून तो कमलांनी सुशोभित अशा सरोवरापाशी आला. त्याच्या पायऱ्या मण्यांनी व रत्नांनी बनविल्या होत्या. गोकर्णाने त्या सरोवरात स्नान केले. देवांना व पितरांना तर्पण केले. मंदिरात जाऊन भगवान केशवांची पूजा केली. व तो पोपटासह त्या मंदिरात लपून बसला. एवढ्यात त्या सुंदर देवी पुन्हा त्या मंदिरात आल्या. देव पूजन करू लागल्या. त्यांतील प्रधान देवी म्हणाली, 'सख्यांनो, ब्रह्मात निष्ठा राखणाऱ्या गोकर्णास खाण्यासाठी दिव्य फलं व उत्तम जल द्यावं. त्याची तृप्ती व्हावी.'

याप्रमाणे त्या देवींनी करून गोकर्णास म्हटले, 'तुम्ही निश्चित होऊन या ठिकाणी तुमचं काम सिद्ध होईपर्यंत राहावं.' असे म्हणून त्या

निघून गेल्या. गोकर्णाचे जहाज काही दिवसांनी किनाऱ्यास लागले. जहाजावरील त्याचे सहकारी म्हणू लागले, 'हो गोकर्ण गेला तरी कुठं? काही पत्ता नाही त्याचा. का लाजेनं त्यानं समुद्रात जीव दिला? या रत्नांतील जो भाग गोकर्णाचा असेल तो त्याच्या पित्यास द्यावा.'

इकडे गोकर्णही शोकाकुल होता. त्याने पोपटाला माता-पित्यां-संबंधी विचारले. पोपट म्हणाला, 'मी एक तुच्छ पक्षी आहे. आपणांस नेणं माझ्या शक्तीच्या बाहेर आहे. फार तर मी मथुरेस जाऊन तुमचा संदेश पोचवीन. त्यांचा आणू शकेन.' तेव्हा गोकर्ण म्हणाला, 'ठीक आहे. तू मथुरेस जा व माझ्या पित्यांना निरोप दे. त्यांचाही घेऊन ये.'

याप्रमाणे पोपट मथुरेस पोचला. गोकर्णाचा वृत्तांत त्याने पित्यास सांगितला. तो ऐकून माता-पित्यांना अत्यंत दुःख झाले. त्यांच्या डोळ्यां-तून अश्रू गळू लागले. ते पोपटाला म्हणाले, 'विहंगम, तू धर्मानुकूल वृत्त सांगून आमचं जीवन राखलं आहेस.' या पक्ष्याने पुत्रशोकाने कष्टी झालेल्या वृद्ध माता-पित्यांना शांती प्राप्त करून दिली. गोकर्णाचे साथी-दार वसुकर्णापाशी रत्ने घेऊन आले. पुत्रासारखा व्यवहार करून त्यांनी ती रत्नराशी मातापित्यांना दिली.

इकडे गोकर्णाने दिव्य देवींच्या आदेशाने त्या मंदिरात तेरा दिवसांची आराधना केली. देवी यथासमय येऊन नृत्य करीत असत. एकदा गोकर्णाने त्या देवींना अत्यंत म्लान, निस्तेज, दुःखी अवस्थेत पाहिले. त्याने मनात म्हटले, पुत्रहीन पुरुषास सद्गती नाही. या देवीं-नाही वृद्धत्व आलं की काय? त्याने त्यांना उदास होण्याचे कारण विचारले. तेव्हा प्रमुख देवी म्हणाली, 'दुःख दूर करील त्याच्यापाशीच दुःख सांगावं. तरी सांगते, मथुरा नावाची एक दिव्य पुरी आहे. तिच्या प्रभावानं मनुष्यास मुक्ती मिळते. या वेळी अयोध्यानरेश चातुर्मास्य-व्रत करण्यासाठी आपली चतुरंगिणी सेना घेऊन तिकडंच गेला आहे. तिथं विष्णूंची पांच मंदिरं आणि अनेक फुलबागा आहेत. पण त्याच्या सेवकांनी त्या नष्टभ्रष्ट केल्या आहेत.'

एवढे म्हणून त्या सर्व देवी रडू लागल्या. त्यामुळे गोकर्ण अत्यंत दुःखी झाला. तो त्यांना प्रणाम करून, हात जोडून म्हणाला, 'देवींनो,

मी अयोध्येच्या राजाचा हा दुर्व्यवहार अगत्यानं दूर करीन. पण या वेळी प्रतिकूल प्रारब्धानं मला वंचित केलं आहे.' तेव्हा त्या देवींनी त्याला विचारले,

'तुम्ही कोण आहात ? कुठून आलात ?'

'माझं नाव गोकर्ण. मी मथुरेहून आलो. आपण कोण आहात ?'

'आम्ही उद्यानाधिष्ठात्री देवी आहोत.'

'देवींनो, या जगात उद्यानं लावून कोणतं फळ मिळतं ? विहीर, देवमंदिर निर्माण केल्यानं काय फळ प्राप्त होतं ?'

"आर्य, ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांनी इष्टापूर्ताचं* पालन करावं. इष्टाच्या प्रभावानं स्वर्ग मिळतो. आणि पूर्तानं मोक्ष. जो मनुष्य मोडकळीस आलेली विहीर दुरुस्त करतो, तलाव, देवमंदिर निर्माण करतो, त्याला पूर्तकर्माचं फल मिळतं. भूमिदान, गोदान, फळांची, फुलांची झाडं लावणं यांची फलं सारखीच आहेत. एक पिंपळ, एक लिंब, एक वड, दहा फुलझाडं, दोन डाळिंबं, दोन नारिंगं, पांच आम्रवृक्ष लावणारा नरकात जात नाही. ज्याप्रकारे पुत्र कुलाचा उद्धार करतो, त्याचप्रमाणं फुलं व फलं यांचे वृक्ष आपल्या स्वामीचा उद्धार करतात.'

'अहो, मी आपल्या मातापित्यांना विसरलोच होतो. ही मोठी दु:खाची बाब आहे.' असे म्हणत असताना गोकर्णास मूर्च्छा आली. देवींनी त्याच्या मुखावर जल शिंपडले. तो सावध होताच त्या देवींनी त्याला पुन्हा विचारले,

'आर्य, तुम्ही कुठं जाणार ?

'देवींनो, माझा निवास मथुरेत असतो. तिथं माझे वृद्ध मातापिता आहेत. माझ्या चार पतिव्रता स्त्रिया आहेत. तिथं माझं एक उद्यान आहे. देवाचं मंदिर आहे.'

'अनघा', ज्येष्ठ देवी म्हणाली, 'तुम्हांस मथुरेस जाण्याची उत्कट इच्छा असेल तर मी आजच तुम्हांस तिथं पोचवीन. तुम्ही या सुंदर विमानावर बसावं. ही दिव्य रत्नं, आभूषणं आणि फलं यांनाही

---

* अग्निहोत्र, तप, वेदपाठ, अतिथिसत्कार, बलिवैश्वदेव, हे इष्टकर्म; आणि कूप, विहीर. मंदिर, तलाव यांची निर्मिती, अन्नदान इत्यादी पूर्तकर्म होय.

बरोबर घ्या.'

गोकर्ण यानंतर विमानावर बसला. त्याने भगवान श्रीहरींना नमस्कार केला. देवींना अभिवादन केले. त्याने मथुरेस पोचून अयोध्येच्या राजास रत्ने व फुले अर्पण केली. गोकर्णास पाहून राजास आश्चर्य वाटले. त्याला आनंद झाला. गोकर्ण राजास म्हणाला, 'काही वेळासाठी आपण या स्थानापासून बाहेर यावं. मी एक आश्चर्यमय दृश्य दाखवीन.'

एवढ्यात त्या सर्व देवी विमानातून तेथे आल्या. राजाने आपली सेना मथुरेहून दूर नेली. राजाने गोकर्णाची प्रशंसा केली. देवी गोकर्णास म्हणाल्या, 'तुझं कल्याण असो.' असे म्हणून त्या दिव्य लोकास निघून गेल्या. अयोध्यानरेशाने गोकर्णास अनेक गायी, अमूल्य वस्त्रे, हत्ती, घोडे आणि अपार धन समर्पण केले.

आता गोकर्ण न्यायपूर्वक मथुरेत राहू लागला. त्याने माता-पित्यांच्या चरणकमलांना शिर वाकवून नमस्कार केला. त्या पोपटानेही त्यांची पूजा केली. गोकर्णाने एक यज्ञ केला. ब्राह्मणांना उत्तम दाने दिली. तो पोपटाकडे पाहून म्हणाला, 'या जीवामुळं मला जीवन, सद्-धर्म, उत्तम गती यांची प्राप्ती झाली.'

गोकर्णाने मथुरेत एक मंदिर बनविले. त्याचे नाव शुकेश्वर झाले. त्यात शुकेश्वरांची मूर्ती त्याने स्थापन केली. एक अन्नसत्र सुरू केले. याचे नाव 'शुकसत्र' झाले. या स्थानावर ज्यास मृत्यू येईल तो मुक्त होतो. शेवटी तो पोपटही विमानावर चढून स्वर्गलोकास गेला. ज्या शबराच्या कृपेने गोकर्णास हा पोपट मिळाला होता, त्याचाही उद्धार होण्यासाठी गोकर्णाने त्रिवेणीच्या स्नानाचे फल अर्पण केले. म्हणून शबर आपल्या पत्नीसह स्वर्गवासी झाला. शुकोदराबरोबर ते सर्व स्वर्गास गेले. मथुरेतील सरस्वतीसंगमात स्नान, गोकर्णेश्वर शिव, इत्यादींचे माहात्म्य हे असे आहे.

## गोकर्णेश्वर, श्लेष्मातकक्षेत्र, जलेश्वर, बागमतीनदी, पशुपति-नाथ, शृंगेश्वर

अध्याय दोनशेतेरा ते सोळापर्यंत आणखी एकदा गोकर्णेश्वराचे माहात्म्य आले आहे. प्राचीन काळी तारकामय नावाचा एक घोर संग्राम

देवासुरांत झाला. त्या वेळी देवांनी दानवांच्या सेनेस पराजित केले. इंद्र पुन्हा स्वर्गाचा अधिपती झाला. तीनही लोकांत सुखशांती नांदत होती. पर्वतराज रत्नांनी शोभत होते. काही पर्वतांवर विद्रुममण्यांच्या खाणी होत्या. विशाल कमलावर ब्रह्मदेव सुखपूर्वक वसले होते. एकदा सनत्-कुमार तेथे आले आणि पितामहांना प्रणाम करून म्हणाले,

'भगवन्, तत्त्व जाणणाऱ्या पुरुषांत आपण शिरोमणी आहात. महाभाग, मी आपल्या मुखातून ऋषींनी सांगितलेलं पुराण ऐकू इच्छितो. उत्तरगोकर्ण, दक्षिणगोकर्ण, शृंगेश्वर, ही तीन शिवलिंगं परम उत्तम आहेत. यांची प्रतिष्ठा कशी झाली? भगवान शंकर तिथं मृगरूप धारण करून का विराजतात? प्रमुख देव तिथं का निवास करतात? शंकर मृगरूप का झाले?' या प्रश्नांची सविस्तर उत्तरे ब्रह्मदेवांनी दिली.

गिरिराज मंदराचलाच्या परम पवित्र उत्तरभागी 'मुंजवान्' नावाचे एक प्रसिद्ध शिखर आहे. त्याची शोभा नंदन नावाचे उपवन वाढविते. तेथील सर्वसाधारण फत्तरही हिऱ्यासारखे, स्फटिकासारखे असतात. येथील श्रेष्ठ गुंफा आणि पाण्याचे निर्झर प्रसिद्ध आहेत. पर्वत-राजीची शिखरे विचित्र फुलांनी समृद्ध असतात. येथे देवगण आपल्या स्त्रियांसह विहार करण्यासाठी येतात. वृक्षांच्या फांद्यांवर पक्षी मधुर कूजन करतात. हंस-सारस, विकसित कमले, निर्मल जलाचे तलाव, यांनी या प्रदेशाची शोभा वाढते. पशुपक्ष्यांनी समृद्ध असे हे स्थान तपस्ये-साठी अत्यंत उपयुक्त आहे. यालाच 'धर्मारण्य' असे नाव आहे. येथे भगवान विष्णूंचे 'स्थाणुमहेश्वरां'चे स्थान आहे. हे प्रभू सर्व देवांचे गुरू आहेत. या शक्तिशाली प्रभूंची साथ गिरिराज कन्या गौरी निरंतर करीत असते. हे देवेश्वर, अजन्मा, अविनाशी व परम पूज्य आहेत. त्यांची सेवा करण्यासाठी अनेक देव विमानातून येतात.

त्रेतायुगातील हकीगत आहे. नंदी नावाचे एक महान मुनी भगवान शंकरांची आराधना करण्यासाठी येथे आले. उन्हात ते पंचाग्निसाधन करीत. थंडीत थंड पाण्यात उभे राहून ते तप करीत. कोठल्याही आधाराशिवाय उभे राहून, हात वर उंचावून ते उग्र तपस्या करू लागले. त्यांनी अनेक प्रकारची व्रते व तपे पूर्ण केली होती. ब्राह्मणांत

नंदींची प्रतिष्ठा मोठीच होती. भगवान शंकरांनी प्रसन्न होऊन नंदींना दर्शन दिले आणि म्हटले,

'मुने, मी तुला दिव्य नेत्र देतो. वत्सा, आतापर्यंत तुझ्यासाठी माझं रूप अदृश्य होतं. पण आता मी प्रसन्न आहे. आता माझं हे रूप पाहा. जगतात विद्वान पुरुषच माझं हे अप्रतिम व तेजस्वी रूप पाहू शकतात.'

यावेळी शंकरांच्या अंगातून हजारो किरणांचा सूर्यासमान प्रकाश बाहेर पडत होता. त्यांच्या जटा त्यांची शोभा वाढवींत होत्या. चंद्रमा ललाटास सुशोभित करीत होता. त्यांचे दोन डोळे प्रकाशमान होते. तिसरा नेत्र अग्नीसारखा चमकत होता. त्यांच्या गळ्यात कमळांची माळ शोभत होती. हातात कमंडलू होता. शरीरावर व्याघ्रांबर असून यज्ञोपवीत सर्पाचे होते. अशा भगवानांचे रूप पाहून नंदींचे शरीर रोमांचित झाले.

अशा सनातन, परब्रह्म परमात्म्यास पाहून मुनिवर नंदींनी हात जोडून प्रभूंची स्तुती करिताना म्हटले, 'जगताचं धारण, पोषण करणाऱ्या, वर देणाऱ्या देवा, आपणांस नमस्कार असो. आपणच त्रिनेत्र, शिवशंकर, भव या नावांनी विख्यात आहात. आपण नीलकंठ, भीम, भूत, भव्य, भव, प्रलंबभुज, कराल, हरिनेत्र, कपर्दी, विशाल, मंजुकेश, धीमान्, शूल, पशुपती, विभू, स्थाणू, गणांचे पती, स्रष्टा, संक्षेप्ता, भीषण, सौम्य, सौम्यतर, त्र्यंबक, स्मशाननिवास, वरद, कपालमाली व हरितश्मश्रुधर, या अभिधानांनी शोभता. आपणांस नमस्कार असो. भक्तांना सदा प्रिय असणाऱ्या परमात्म्यास, शंकरांना वारंवार नमस्कार असो.'

अशा प्रकारे नंदींनी भगवान रुद्रांची स्तुती करून त्यांना पुष्पांजली अर्पण केली. भगवान शंकरांनी संतुष्ट होऊन म्हटले, 'विप्रवर, वर मागा. तुमच्या मनातील अभीष्ट सांगा.' तेव्हा नंदी म्हणाले, 'प्रभो, मला प्रभुत्व, देवत्व, इंद्रत्व, ब्रह्मत्व, लोकपालत्व, अपवर्ग, अणिमादी आठ सिद्धी, ऐश्वर्य, गाणपत्य यांतील एकही पदार्थ नको. देवेश्वरा, आपण प्रसन्न असाल तर मला आपली भक्ती प्रदान करावी. महेश्वरा,

आपणांशिवाय कुणाचीच भक्ती करावीशी वाटू नये. मी आपल्याच भक्तींत सदा स्थिर राहावं. हीच माझी अभिलाषा आहे. दिनरात्री मी आपलं नामच जपत राहावं.'

नंदींचे हे बोलणे ऐकून भगवान शंकरांना हसू आले. ते प्रसन्न होऊन मधुरवाणीने म्हणाले, 'विप्रर्षे, उठावं. सुव्रता, मी तुमच्या तपस्येनं प्रसन्न झालो आहे. महाभाग, तुम्ही चित्तशुद्धीनं भक्तिपूर्वक माझी आराधना केली आहे. तपोधना, तुमच्या तपश्चर्येनं मला संतोष झाला आहे. तुम्ही माझ्या आराधनेत निरंतर मग्न राहावं. तुम्ही तीन कोटींचा जप केला आहे. एक हजार वर्षं तपस्या केली आहे. तिच्या प्रभावानं चर व अचर प्राणी अत्यंत क्षुब्ध झाले आहेत. तुम्हांस पाहाण्यासाठी इंद्रासह सर्व देव इथं येणार आहेत. तुमच्या शरीरातून दिव्य तेज प्रकटत आहे. माझ्यासारखीच शक्ती तुमच्यांत निर्माण झाली आहे. देव व दानव सर्वच तुम्हांस अद्वितीय पुरुष मानतात. आता तुम्ही माझ्यासमान रूप धारण करावं. तुम्हांस माझ्या सारखं तेज प्राप्त होईल. तीन नेत्र मिळतील. देव व दानव तुमची आराधना करतील. तुम्ही याच शरीरानं अमर व्हाल. वृद्धत्व वा मृत्यू तुमच्यापाशी येणार नाहीत. हिलाच गाणेश्वरीगती म्हणतात. देवांनाही हे पद अलभ्य आहे. द्विजोत्तम, माझ्या पार्षदांत तुमचं स्थान प्रधान होईल. तुम्हांस जनता नंदीश्वर म्हणेल.

'तपोधना, तुमचं ऐश्वर्य वाढेल. तुम्हांस आठ सिद्धी प्राप्त होतील. देव तुम्हांस नमस्कार करतील. माझ्या कृपेनं तुम्हांस स्वामीचं पद प्राप्त होईल. आतापासून देवकार्यात तुमची पूजा सर्व प्रथम होईल. तुम्ही माझे गण व्हाल आणि माझ्या द्वारपालपदावर प्रतिष्ठित व्हाल. तीनही लोकांत वज्र, दंड, चक्र अथवा अग्नी यांपैकी कशानंच तुम्हांला बाधा होणार नाही. देव, दानव, यक्ष, गंधर्व, पन्नग, राक्षस, माझे भक्त; हे सर्व तुमचाच आश्रय घेतील. तुमच्यापेक्षा अधिक प्रिय असा विश्वात मला कुणीच नाही.'

नंदींना असा वर देऊन उमापती भगवान शंकर मधुर वाणीने

म्हणाले, ‘ विप्रवर, तुमचं कल्याण असो. तुम्ही आता कृतकृत्य झालात. मरुद्गणांसह सर्व देवदेवता तुमच्या दर्शनासाठी येत आहेत.’ इतके म्हणून भगवान शंकर अंतर्धान पावले. आणि त्याच क्षणी गणाध्यक्ष नंदींचे शरीर दिव्य झाले. चार भुजा, तीन नेत्र यांनी संपन्न होऊन ते दिव्य आसनावर बसले. त्रिशूळ, परिघ, दंड, पिनाक ही आयुधे त्यांच्या हातांत शोभून दिसली. मुंजाची मेखला त्यांच्या कमरेस दिसली. ते जणू दुसरे शंकरच वाटू लागले.

या नंदिकेश्वरास पाहून आकाशातील देवांचा समूह आशंकित झाला. त्यांच्या आश्चर्यास सीमा उरली नाही. उमाकांत शंकरांपासून वर प्राप्त करणाऱ्या या नंदिकेश्वरास पाहून हा आपले स्थान घेईल अशी शंका काही देवांना आली. सर्वश्रेष्ठ देव मुंजवानपर्वताच्या शिखरावर आले. येथे भगवान श्रीहरींचे स्थान होते. त्यांना सर्व देवांचा हेतू माहीत होता. स्वतः श्रीहरी नंदीपाशी आले. त्यांना पाहून नंदी म्हणाला,

‘ अहा, आज माझं जीवन सफल झालं. कारण देवांचा अधिपती इंद्र आणि स्वतः भगवान श्रीहरी यांच्या दर्शनाचं सौभाग्य मला प्राप्त झालं आहे. आज माझे मनोरथ पूर्ण झाले. भगवान शंकर मोठेच महात्मा पुरुष आहेत. त्यांनी म्हटल्याप्रमाणं झालं. सारे देव प्रसन्न होऊन इथं आले आहेत.’

‘ विप्रवर’, देवांनी म्हटले, ‘ नंदिन्, आम्हांस त्या भगवान शंकरांचं दर्शन हवं आहे. त्या महाभाग महेश्वरांचं दर्शन आम्हांस कोणत्या स्थानावर होईल ?’

‘ ते प्रभू माझ्यावर कृपा करून अदृश्य झाले. आता ते कुठं आहेत, हे मला माहीत नाही. जिथं असतील तिथंच तुम्ही त्यांचा शोध घ्यावा.’ नंदीने म्हटले.

या नंदीस भगवान शंकरांनी सांगितले होते, ‘विप्रवर, हिमालयाच्या पलीकडं संकटगिरी नावाचं एक विख्यात सिद्धस्थान आहे. तिथं अनेक वनं व उपवनं आहेत. तिथं ‘ श्लेष्मातक ’ नावाचा एक श्रेष्ठ सर्प निवास करतो. त्यानं तीव्र तपश्चर्या करून सारी पापं भस्म केली होती. आता त्याच्यावर अनुग्रह करायला हवा. एका अत्यंत सुंदर आश्रमात तो राहातो.

त्या वनासही ‘ श्लेष्मातकवन ’ असंच नाव पडलं आहे. एकदा मी मृग-रूप धारण करून तिथं हिंडत होतो. देव मला पकडण्यासाठी प्रयत्न करीत होते. मी त्वरित लपून बसलो. देव मला शोधीत राहिले.’

ज्या वेळी नंदीस वर देऊन भगवान शंकर अंतर्धान पावले तेव्हा त्याच्या तेजाने साऱ्या दिशा प्रकाशित झाल्या. त्याच्या जवळ अनेक देव आले. वरुण, कुबेर, अकरा रुद्र, बारा आदित्य, दोन अश्विनीकुमार, त्या मंजुवानपर्वतावर आले. विश्वदेव, साध्यगण, तपस्वी व बृहस्पती इत्यादीही आले. नारद, तुंबरू, विश्वावसू, परावसू, हाहा-हूहू, गंधर्व, महान ऋषी इत्यादी उपस्थित झाले. गंधकाली, घृताची, बुद्धा, गौरी, तिलोत्तमा, उर्वशी, मेनका, रंभा, पुंजिकस्थला, अशा दिव्य अप्सराही आल्या. पुलस्त्य, अत्री, मरीची, वसिष्ठ, भृगू, कश्यप, पुलह, विश्वामित्र, गौतम, भारद्वाज, अग्निवेश्य, वृद्ध पराशर, मार्कंडेय, अंगिरा, गर्ग, संवर्त, ऋतू, जमदग्नी, भार्गव, च्यवन, असे ऋषीही तेथे आले.

स्त्री-पुरुषांची रूपे धारण करून सिंधू, महानदी शरयू, ताम्रारुणा, चारुभागा, वितस्ता, कौशिकी, पुण्या, सरस्वती, कोका, नर्मदा, बाहुदा, शतद्रू, विपाशा, गंडकी, सरिद्वरा, गोदावरी, वेणी, तापी, करतोया, सीता, चीरवती, नंदा, चंदना, चर्मण्वती, पर्णाशा, देविका, प्रभास, सोम, लौहित्य, गंगासागर आणि इतर अनेक तीर्थे उपस्थित झाली. पर्वतात उत्तम महामेरू, कैलास, गंधमादन, हिमवान, हेमकूट, निषध, विंध्याचल, महेंद्र, सह्य, मलयागिरी, दुर्दर, माल्यवान, चित्रकूट, द्रोणाचल, श्रीपर्वत, पारियात्र या सर्वांचे व अरण्यांचे तेथे आगमन झाले. सर्व यज्ञ, सर्व विद्या, चार वेद, धर्म, सत्य, दम, स्वर्ग, ऋषी कपिल, वासुकी, सर्पराज, अमृताशी, अनंत, शेषनाग, धृतराष्ट्र, सर्पांचा राजा किर्मीर, अंभोधर, नागराज, इत्यादी प्रमुख सर्पही आले. विद्युज्जिव्ह, द्विजिव्हेंद्र, शंखवर्चा, महाद्युती, अनिमिषेश्वर, विरोचनकुमार सत्य, स्फोटमणी, सतैचीत, नागराज विनत, भूरी, कंबल अश्वतर, एकापत्र, कर्कोटक, धनंजय, इत्यादी पराक्रमी भुजंगही तेथे आले.

दिन-रात्र, पक्ष-मास, संवत्सर, आकाश, पृथ्वी, दिशा, विदिशा यांनी मुंजवानपर्वताचे शिखर भरून गेले. या समाजावर वृक्षांनी फुलांची वृष्टी

केली. दिव्य गंधर्वांनी गायन केले. अप्सरांनी नृत्य केले. पक्ष्यांनी मधुर शब्द केले. पवन गंध घेऊन वाहू लागला. अशा रीतीने सर्व देवांनी दिव्य तेजाच्या नंदीस पाहिले. नंदीने हात जोडून सर्वांना प्रणाम केला. त्यांचे चांगले आगतस्वागत त्याने केले. सर्व देवांनी नंदीची प्रशंसा केली. काहींनी नंदीची पूजा केली. त्यांनी नंदीला आशीर्वाद देताना म्हटले,

'मुने, भगवान शंकर तुमच्यावर प्रसन्न असोत. तुमच्यापाशी रोग व व्याधी न येवोत. तुम्ही अमर व्हावं.'

'आपणां सर्वांचा स्नेह माझ्यावर अगाध आहे. मी आपला ऋणी आहे. मी आता आपणांसाठी काय करू ? मला आपण आज्ञा द्यावी.'

'भद्र', शक्र म्हणाला, 'आपण हे सांगावं की, भगवान शंकर आहेत कुठं ? आम्ही त्या देवेश्वरांना पाहू इच्छितो. त्या भगवानांना तुम्ही जाणता. त्यांचं स्थान त्वरित आम्हांस सांगावं.'

'देवेंद्र', भगवान शिवांचे ध्यान करून नंदिकेश्वर म्हणाला, 'याच मुंजवानपर्वतावर मी शंकरांची पूजा केली होती. ते परम शक्तिशाली पुरुष आहेत. त्यांनी प्रसन्न होऊन मला अनेक वर दिले आहेत. पण ते प्रभू कुठं गेले आहेत, हे सांगण्यास मी असमर्थ आहे. आपण सर्वच त्यांचा शोध करू.'

यानंतर सर्व देवांनी भगवान शंकरांकडे जाण्याचा विचार केला. नदीस बरोबर घेऊन देवांनी महेश्वरांचा सर्वत्र शोध घेतला. पण त्यांना भगवानांचा पत्ता लागला नाही. तेव्हा ते सर्व ब्रह्मदेवांना शरण गेले, ब्रह्मदेवांनी मनानें शंकरांचे ध्यान केले. सर्व देवांना घेऊन ते श्लेष्मातक* नावाच्या स्थानाकडे निघाले. हे पुण्यमय स्थान सिद्ध व चरणांनी सेवित होते. तेथे पर्वताच्या अनेक गुहा होत्या. अत्यंत रमणीय स्थाने होती. सिंह, रेडे, नीलगाय, हत्ती, मृग यांच्या झुंडीच्या झुंडी तेथे होत्या.

सर्व देवांनी येथे भगवान शंकरांचा शोध घेतला. ते एका सुंदर

---

* हे स्थान म्हणजे उत्तरगोकर्ण होय. नेपाळमधील पशुपतिनाथापासून हे केवळ दोन मैल अंतरावर आहे.

वनात गेले. अनेक नद्या, वृक्ष यांनी ते समृद्ध होते. सुगंधी फुले होती. तेथे मोत्यांच्या चूर्णाप्रमाणे वाळू पसरलेली होती. तीवर मन मुग्ध करणारी कन्या खेळताना त्यांनी पाहिली. ब्रह्मदेवांनी जाणले की, ही कन्या म्हणजे भगवती उमादेवी होती. पर्वताच्या शिखरावर चढून सर्वांनी भगवान शंकरांचे दर्शन घेतले. त्या वेळी प्रभू मृगसमूहात रक्षण करण्यासाठी विराजमान होते. त्यांच्या शिरावर एक शिंग होते. तापलेल्या सोन्याप्रमाणे ते चमकत होते.

मृगरूपधारी भगवान रुद्रांना पाहून सर्व देव शिखरावरून उतरले. त्यांच्या मनात त्या मृगेंद्राला पकडण्याची अभिलाषा निर्माण झाली. इंद्राने त्यांच्या शिंगास पकडले. ब्रह्मदेवांनी मोठ्या श्रद्धेने शिंगाच्या मध्यभागी हात लावला. शिंगाच्या मूलभागास श्रीहरींनी पकडले. यामुळे या शिंगाचे तीन भाग झाले. शंकर शृंगरहित बनून पुन्हा अंतर्धान पावले. भगवान आकाशातून म्हणाले, 'देवांनो, मी स्वतः तुम्हांस प्राप्त होणार नाही. तुम्ही माझ्या शिंगावरच संतोष मानावा. हे श्लेष्मातकवन आहे. इथंच माझ्या शिंगांची विधिपूर्वक स्थापना करावी. हे वन अत्यंत पुण्यक्षेत्र होईल. याच्या एका शुभ प्रदेशाचं नाव 'नेपाळ' आहे. मी इथं स्वयंभू रूपात प्रकट होईन. मला चार मुखं असतील. माझं शिर प्रकाशानं चमकत राहील. साऱ्या लोकांत माझं नाव शरीरेश वा पशुपतिनाथ होईल. इथंच नागहृद नावाचं विशाल सरोवर होईल. मी या जलात तीस हजार वर्षांपर्यंत निवास करीन.

'ज्या वेळी वृष्णिकुलात भगवान श्रीकृष्णांचा अवतार होईल, तेव्हा दानवांचा संहार होईल. सूर्यवंशी क्षत्रिय उत्पन्न होतील. त्यांच्या प्रयासानं म्लेच्छांची सत्ता संपेल. ब्राह्मणांच्या साह्यानं धर्माची स्थापना होईल. राजे माझी प्रतिष्ठापना करतील. त्यानंतर हे स्थान एक महान जनपद बनेल. हे स्थान गंगेच्या उत्तरेस व अश्विनीमुखाच्या दक्षिणेस चौदा योजनांचं असेल. वागमती नावाची नदी हिमालयाच्या उंच शिखरावरून निघून याची शोभा वाढवील. तपस्वी लोकांसाठी हे सिद्धक्षेत्र निर्माण होईल. याचा महिमा प्रभास, प्रयाग, नैमिषारण्य, पुष्कर, कुरुक्षेत्र यांच्यापेक्षाही मोठा असेल. इथंच माझे श्वसुर पर्वतराज हिमालय

विराजमान आहेत. हे क्षेत्र परम पुण्यमय होईल. सर्व श्रेष्ठ नद्या व तीर्थं इथूनच प्रकट होतील. इथं मी शैलेश्वर या नावानं विख्यात होईन. इथल्या नदीतून मृगशृंगोदक नावानं माझी एक प्रतिमा प्रकट होईल. ती मुनिजनांना अत्यंत प्रिय होईल. इथंच 'पंचनद' नावाचं एक पवित्र तीर्थ आहे. त्या ठिकाणी ब्रह्मर्षिगण निवास करतात. इथं स्नान करणाऱ्या जीवास 'अग्निष्टोम' नावाच्या यज्ञाचं फल प्राप्त होईल. बागमतीनदी इथं साठ हजार दिव्य गायींचं रक्षण करते. या नदीत स्नान केल्यानं उत्तम गती प्राप्त होते.

'हीत स्नान करून जे पशुपतिनाथाचं दर्शन घेतात, त्यांना शाश्वत शांती मिळते, सर्व उग्र उपद्रव शांत होतात. ईति* इत्यादी उपद्रव उरत नाहीत. बागमती नदी सर्व नद्यांत मुख्य आहे. या नदीत स्नान करणाऱ्या मनुष्यास राजसूय व अश्वमेधयज्ञाचं फल प्राप्त होतं. ज्या स्थानावर मी नागेश्वर रुद्ररूपात विराजमान आहे, ते क्षेत्र मूळ मानावं. त्याच्या पूर्व व दक्षिणभागी नागराज वासुकीचं स्थान आहे. तो हजार नागांसह माझ्या दारावर सदा असतो. वासुकीचं नाव घेऊनच या क्षेत्रात प्रवेश करावा.

'इथलंच एक स्थान शैलेश्वर या नावानं प्रसिद्ध आहे. हे परम गुह्यस्थान आहे. कोशोदक, भृगुप्रपतन, ब्रह्मोद्भेद, गोरक्ष, गौरीशिखर, प्रान्तकपानीय अशी काही स्थानं याच प्रदेशात आहेत. बागमतीसारखीच पुण्यमयी नदी मणिवती आहे. या दोनही पाप नाश करणाऱ्या आहेत. याच क्षेत्रात विद्याधर, सिद्ध, गंधर्व मुनी, देव, यक्ष यांचे समुदाय स्नानं करतात. उपासना करतात. असं हे श्लेष्मातक एक परम पुण्यक्षेत्र आहे. देवांनो, मी मृगाचा वेष धारण करून जिथं हिंडतो ते सारं पुण्यक्षेत्र बनलं आहे. हे माझं क्षेत्र 'गोकर्णेश्वर' या नावानंही प्रसिद्ध होईल.'

इतके सांगून सनातन भगवान रुद्रांनी आपले रूप आवरून घेतले व ते अंतर्धान पावले. देव नंतर आपापसांत विचार करू लागले. त्यांच्या जवळ शिंगाचे तीन भाग होते. देवांनी विधिवत शृंगेश्वरांची स्थापना

* अतिवृष्टी, अनावृष्टी, टोळ, उंदीर, पक्षी, बगळ्यांचा राजा, या सहांना 'ईति' म्हणतात.

केली. याही मूर्तीस गोकर्ण या नावाने प्रसिद्धी मिळाली. यासच श्लेष्मातकतीर्थ असेही नाव आहे. एकदा पुलस्त्य ऋषींचा पौत्र रावण येथे आला होता. त्याने उग्र तपस्या करून भगवान शंकरांची आराधना केली. गोकर्णेश्वरांची उपासना केली. प्रसन्न झालेल्या शिवांना रावणाने तीनही लोकांवर विजयाचा वर मागितला. त्याच्या सर्व कामना शिवांनी पूर्ण केल्या. रावणाने आपल्या नगरास जाताना शंभूंच्या शिंगाचा अग्रभाग उखडला व बरोबर नेला. त्याने प्रवासात समुद्राच्या तीरावर तो ठेविला. रावण संध्या करू लागला. संध्या संपल्यावर तो भाग रावणास उचलता आला नाही. तो तेथेच वज्रासारखा कठोर बनून राहिला. त्याला तेथेच सोडून रावणाने लंकेची यात्रा पूर्ण केली. हेच ते दक्षिणेकडील गोकर्णेश्वर क्षेत्र होय.

# ४ सृष्टिरचना

## प्रकृती व पुरुष

इतर अनेक पुराणांप्रमाणे वराहपुराणातही सृष्टिरचनेसंबंधी वर्णन आले आहे. सृष्टीच्या आरंभी प्रकृती व पुरुष यांच्या तत्त्वांचे विवेचन बहात्तराव्या अध्यायात आले आहे. भगवान वराहांनी हा विषय पृथ्वीस समजावून सांगितला. एकदा रुद्रांना अगस्त यांनी विचारले, ' महाभाग रुद्र, ब्रह्मा, विष्णू व महेश या तीन देवांच्या समूहास शास्त्रात त्रयी म्हटलं आहे. आपण सर्वजण सर्वव्यापी आहात. भगवान, कोणत्यावेळीं कुणाची प्रधानता असते ? कृपा करून आपण हे सांगावं.'

या प्रश्नाचे सविस्तर उत्तर रुद्रांनी दिले. परब्रह्म परमात्मा विष्णूच ब्रह्मा, विष्णू व शिव या तीन भेदांनी निर्देशित होतात. ' विश्-

प्रवेशने ' या धातूस ' स्नु ' प्रत्यय लागून ' विष्णू ' शब्द तयार झाला आहे. हे विष्णू सर्व देवसमाजात सनातन परमात्मा आहेत. हे विष्णूच आदित्य आहेत. सृष्टीच्या समयी ब्रह्मदेवांचे स्तवन होते. रुद्र कालरूपाने शोभतात. ब्रह्मदेव रुद्रांच्या लिंगमूर्तीचे यजन करतात. मुक्तीची इच्छा करणारे मानव विश्वात्मा भगवान नारायणांचे यजन करतात. तेच विश्वाचे आत्मा आहेत. ब्रह्मदेवांना प्रसन्न करण्यासाठी लोक ब्रह्मयज्ञ करतात. वेदासही ' ब्रह्म ' म्हणतात. नारायण, शिव, विष्णू, शंकर, आणि पुरुषोत्तम, यांत केवळ नामांचाच भेद आहे. वस्तुतः यांना सनातन परब्रह्मी परमात्मा म्हणतात.

वैदिक कर्मे करणाऱ्या पुरुषांकडून ब्रह्मा, विष्णू, महेश्वर या नामांचा उच्चार पृथकपणे होतो. वस्तुतः हे तीनही देव एकच आहेत. विद्वान पुरुषांनी भेदभावना करू नये.

## वैराजवृत्तांत

भगवान रुद्रांनी अगस्त्यांना आणखी एक प्रसंग सांगितला. ज्यावेळी रुद्र जलात होते, त्या वेळची ही घटना आहे. सर्वप्रथम ब्रह्मदेवांनी रुद्रांची निर्मिती करून त्यांना म्हटले, तुम्ही प्रजांची निर्मिती करावी. पण या कार्याची माहिती रुद्रांना नव्हती. म्हणून ते जलात गेले. त्यांनी तेथे तपस्या केली. याच वेळी त्यांना परम प्रभू परमात्म्याचे दर्शन झाले. त्या पुरुषाची आकृती केवळ अंगठ्याएवढी होती. रुद्रांनी त्यांचे ध्यान केले एवढ्यात जलातून अकरा पुरुष बाहेर पडले. त्यांची प्रतिभा प्रलयकाली अग्नीसारखी होती. ते आपल्या किरणांनी जलास संतप्त करीत होते. 'आपण कोण आहात ?' असा प्रश्न त्यांना रुद्रांनी विचारिला. त्या आदरणीय पुरुषांनी काहीच म्हटले नाही. ते सर्व प्रशंसनीय ब्राह्मण होते. काही न बोलताच ते निघून गेले. त्यानंतर अत्यंत सुंदर आकृतीचा एक महान पुरुष आला. त्याच्या शरीराचा वर्ण मेघाप्रमाणे श्यामल होता. डोळे कमलांप्रमाणे होते. रुद्रांनी त्यालाही विचारिले '.पुरुषप्रवर, आपण कोण आहात ? आता निघून गेले ते कोण होत ? आपण इथं कशासाठी आलात ?' त्यावर तो पुरुष म्हणाला,

'जे प्रथम प्रकट होऊन गेले त्यांना आदित्य म्हणतात. ते मोठे तेजस्वी आहेत. ब्रह्मदेवांनी त्यांचं ध्यान केलं, म्हणून ते इथून निघून गेले. कारण या वेळी ब्रह्मदेव जगताची निर्मिती करीत आहेत.'

'भगवन्, आपण महापुरुषांचे शिरोमणी आहात. आपण आपलं नाव सांगावं. परिचय करून द्यावा.'

'मी भगवान नारायण आहे. माझी सर्वत्र सत्ता चालते. मी जलात शयन करतो. मी तुम्हांस दिव्य नेत्र देतो. त्यांनी तुम्ही मला पाहू शकाल.'

एवढ्यात अंगठ्याएवढी आकृती विराट रूपाची झाली. त्यांचे तेज विलक्षण होते. त्यांच्या नाभीत कमळ उगवले होते. त्यावर सूर्यासारखे तेजस्वी ब्रह्मदेव होते. त्यांच्या जवळच रुद्रही होते. त्या परमात्म्यास पाहून रुद्रांना आनंद झाला. त्यांनी नारायणांची स्तुती करताना म्हटले,

'ज्यांना अंत नाही, जे विशुद्ध चित्ताचे आहेत, जे सुंदर रूपधारी, सहस्र भुजांनी सुशोभित आहेत, जे अनंत किरणांचे आकार आहेत, ज्यांचं कर्म अत्यंत शुद्ध व ज्यांचा देह परम विशाल आहे, अशा परब्रह्म परमात्म्यास माझा नमस्कार असो. अखिल विश्वाचं दुःख करण्याचा ज्यांचा स्वभाव आहे, जे सहस्र सूर्यप्रमाणे तेजस्वी आहेत, सर्व विद्या ज्यांच्या आश्रयास आहेत, सर्व देव ज्यांना निरंतर नमस्कार करितात, त्या चक्र धारण करणाऱ्या कल्याण स्रोतरूपी प्रभूंना माझा नमस्कार असो.

'प्रभो, अनादिदेवा, अच्युता, शेषशायी, विभू, भूतपती, महेश्वरा, मरुत्पती, सर्वपती, जगत्पती, भुवःपती आणि भुवनपती आदी नामांनी भक्त आपणांस संबोधितात. अशा आपणांस, भगवानांना माझा नमस्कार असो. नारायणा, आपण जलाचे स्वामी आहात. विश्वाचे कल्याणदाते आहात. आपण पृथ्वीचे स्वामी, जगाचे संचालक, जगताचे लोचनस्वरूप, चंद्र व सूर्यरूप धारण करणारे, विश्वास व्यापणारे अच्युत व पराक्रमी पुरुष आहात. आपली मूर्ती तर्कांचा विषय नाही. आपण

अमृतस्वरूप व अविनाशी आहात. नारायणा, प्रचंड अग्नीच्या ज्वाला आपल्या मूर्तीची समता करण्यास असमर्थ आहेत. आपणांस चारही दिशांना मुखं आहेत. आपल्या कृपेने देवांचं महान दुःख दूर होतं. सनातन प्रभो, आपणांस नमस्कार असो. आपणांस मी शरण आलो आहे.

'सनातन प्रभो, आपणांस नमस्कार असो. मी शरण आलो आहे. आपण माझं रक्षण करावं. विभो, आपल्या अनेक रूपांचं दर्शन होत आहे. आपणांत जगत निर्माण करणाऱ्या सनातन ब्रह्मदेवांचं व ईशांचं दर्शन होत आहे. त्या परम पितामहास नमस्कार असो. देवेश्वरा, मी आपणांस केवळ प्रणाम करतो. आदिदेवा, आपण प्रकृतीच्या पलीकडचे एकमात्र पुरुष आहात. ज्यानं आपलं हे सनातन रूप जाणलं, त्यानं सर्व काही जाणलं असं समजावं. आपली मूर्ती सर्वांत मोठी व सर्वांत छोटी आहे. भगवन्, आपण वागिन्द्रियाचं मूलकारण, अखिल कर्मांच्या पलीकडचे आणि विश्वात्मा आहात. आपलं हे शरीर विशुद्ध भावांनी ओतप्रोत आहे. आपली उपासना संसारबंधन संपविणारी आहे. तिच्यामुळंच आपलं सम्यक् ज्ञान होते.

'साधारण पुरुष सोडूनच देऊ. पण आपणांस देवही जाणू शकत नाहीत. तरी तपस्या पूर्ण झाल्यामुळं अंतःकरण शुद्ध झाल्यानं मी आपणांस कवी, पुराण, आदिपुरुष यांच्या रूपांत जाणू शकतो. माझ्या पित्यानं, ब्रह्मदेवांनी सृष्टीची निर्मिती करिताना वारंवार वेदांचं साह्य घेतलं आहे. म्हणून त्यांचंही चित्त शुद्ध बनलं आहे प्रभो, माझ्यासारखी व्यक्ती आपलं रूप जाणण्यास योग्य नाही. कारण आपण ब्रह्मदेवप्रभृतींनाही अगम्य आहात. म्हणून ते देवाचं रूप धारण करून आपणांस वारंवार नमस्कार करितात. त्यामुळं त्यांना ज्ञान होतं, भक्तीचा अभाव असेल तर आपणांस जाणण्याची इच्छा मनात होत नाही. अभक्त वेदवादियांना कित्येक जन्मी विवेक उत्पन्न होत नाही. मला अशी बुद्धी न व्हावी, म्हणून मी आपणांस प्रार्थना करतो. हे सर्व जगत आपलंच रूप आहे. आपण महान आहात, सूक्ष्म व स्थूलरूप आहात, आदिप्रभो, हे जगत आपणांपासूनच बनलं आहे.

'भगवन्, आपण कधी महान रूप, तर कधी स्थूलरूप धारण करता,

कधी आपलं रूप अत्यंत सूक्ष्म असतं. वसू, सूर्य, पवन, पृथ्वी ही सर्व आपणांत स्थित असतात. आपलं रूप सदा समान असतं. आपण आत्मरूपानं सदा विरजता. व्यापकता आपला स्वभाव आहे. सत्त्वगुण आपली शोभा वाढवितो. आपण अनंत व सर्व ऐश्वर्यांनी संपन्न आहात. आपण मजवर प्रसन्न व्हावं.'

रुद्रांवर अमित तेजस्वी भगवान श्रीहरी प्रसन्न झाले. मेघासारख्या गंभीर वाणीने ते म्हणाले, 'देवेश्वरा, तुमचं कल्याण असो. उमापते, वर मागा. भगवन्, तत्त्वतः आपण दोघे एकच आहोत.'

'प्रभो, पितामह ब्रह्मदेवांनी सृष्टी निर्माण करण्यासाठी माझी नियुक्ती केली. प्राण्यांची उत्पत्ती करणाऱ्या प्रभो, याविषयी आपणांकडून तीन प्रकारचं ज्ञान प्राप्त करून घेणं परम आवश्यक आहे.'

'रुद्रा, तुम्ही सनातन व सर्वज्ञ आहात. तुमच्यांत ज्ञान पूर्णपणानं आहे. तुम्ही देवांसाठी पूज्य व्हाल.'

इतके म्हणून भगवान श्रीहरींनी स्वतःचे रूप मेघाचे बनविले. जलातून बाहेर येऊन महाभाग रुद्रांना म्हणाले, 'शंभो, ते जे अकरा पुरुष होते, त्यांचं नाव वैराज आहे. त्यांनाच आदित्य म्हणतात. ते पृथ्वीवर गेले आहेत. धरातलावर विष्णू या नावानं मी बारा रूपांनी अवतीर्ण होईन. शंकरा, या प्रकारे अवतार धारण करून सर्व आपली आराधना करतील.' असे म्हणून स्वतः भगवान नारायण एखाद्या मेघासारखे अंतर्धान पावले.

सर्व प्राण्यांची निर्मिती करण्यात कुशल असलेल्या श्रीहरींनी रुद्रांना अशा प्रकारचा वर दिला. म्हणून ते सर्व देशांत श्रेष्ठ बनले. वस्तुतः भगवान नारायणांशिवाय श्रेष्ठ देव नाही. होणार नाही. पुराणे आणि वेद यांचे रहस्य हेच आहे.

## भुवनकोशाचे वर्णन

चौऱ्याहत्तराव्या अध्यायात भगवान वराहांनी पृथ्वीसाठी भुवनकोशांचे वर्णन केले. भगवान रुद्र पुराणपुरुष, शाश्वत देव, यज्ञस्वरूप, अविनाशी, विश्वमय, अज, शंभू, त्रिनेत्र व शूलपाणी आहेत. त्यांना

ऋषींनी विचारले, ‘ देवेश्वरा, आपण सर्व देवांत श्रेष्ठ आहात, उमापते, आम्ही काही प्रश्न विचारतो, आपण उत्तरं द्यावीत. पृथ्वीचं प्रमाण, पर्वतांची स्थिती आणि त्यांचा विस्तार कसा आहे ?’ रुद्रांनी या प्रश्नांची सविस्तर उत्तरे दिली.

सर्व पुराणांतून भूगोलाची चर्चा केलेली आहे. हा लोक पृथ्वीतलावर आहे, परमात्म्याच्या नामात पाप लेशमात्र नसते. ते परमाणूप्रमाणे सूक्ष्म व अचिंत्यरूपही धारण करू शकतात. सर्व लोकांत व्यापून राहाणाऱ्या पीतांबरधारीचे नाव नारायण आहे. पृथ्वी त्यांच्या वक्षःस्थलावर टिकून आहे. ते दीर्घ, ऱ्हस्व, कृश, लोहित आदी गुणांनी रहित व सर्व प्रपंचाच्यापलीकडचे आहेत. त्यांचे स्वरूप ज्ञानाचा विषय आहे. सृष्टीच्या आदिकाळात त्या प्रभूंत सत्त्व, रज व तम निर्माण करण्याची इच्छा झाली. म्हणून त्यांनी जलाची निर्मिती करून त्यावर योगनिद्रा करण्यासाठी शयन केले. नंतर त्यांच्या नाभीत एक कमळ निर्माण झाले. त्या कमळावर सर्व वेद जाणणारे, ज्ञानाचे भांडार, अचिंत्यरूप, शक्तिशाली व प्रजेचे रक्षक ब्रह्मदेव प्रकट झाले. त्यांनी सनक, सनंदन, सतातन, सनत्कुमार प्रभृती धर्मज्ञानी पुत्रांना सर्वप्रथम उत्पन्न केले. नंतर स्वायंभुव मनू, मरीची आदी मुनी, दक्षादी प्रजापती यांची निर्मिती केली.

दक्षाने निर्माण केलेल्या स्वायंभुव मनूने या भूमंडलाचा विशेष विस्तार केला. या मनूस दोन पुत्र झाले. एकाचे नाव प्रियव्रत, दुसऱ्याचे नाव उत्तानपाद. प्रियव्रतास दहा पुत्र झाले. त्यांची नावे अशी— आग्नीध्र, अग्निबाहू, मेध, मेधातिथी, ध्रुव, ज्योतिष्मान, द्युतिमान, हव्य, वपुष्मान् आणि सवन. या प्रियव्रताने आपल्या सात पुत्रांना ही पृथ्वी सात द्वीपांत वाटून दिली. आग्नीध्र जंबूद्वीपाचा, मेधातिथी शाकद्वीपाचा, ज्योतिष्मान् क्रौंचद्वीपाचा, द्युतिमान् शाल्मलिद्वीपाचा, हव्य गोमेदद्वीपाचा, वपुमान् प्लक्षद्वीपाचा, सवन पुष्करद्वीपाचा स्वामी झाला.

पुष्करद्वीपाच्या सवनास दोन पुत्र झाले. ते महावीति (कुमुद) व धातक नावांनी प्रसिद्ध झाले. सवनाने स्वतःच्या नावाने दोन देशांना निर्माण केले. धातकाचे ‘ राज्यखंड ’ ‘ धातकीखंड ’ व कुमुदाचे ‘ कौमुद-

खंड ' या नावाने प्रसिद्ध झाले. शाल्मलिद्वीपाच्या स्वामीस, द्युतिमानास तीन पुत्र झाले. कुश, वैद्युत आणि जीमूतवाहन अशी त्यांची नावे होती. ज्योतिष्मानास सात पुत्र झाले. कुशल, मनुगव्य, पीवर, अंध्र, अंधकारक, मुनी, दुंदुभी; अशी त्यांची नावे होती. त्यांच्या नावांनी क्रौंचद्वीपात सात महादेश झाले. कुशद्वीपाचा स्वामी मोठा प्रतापी होता. त्यालाही सात पुत्र झाले. उद्भिद, वेणुमान, रथपाल, मनू, धृती, प्रभाकर व कपिल; ही त्यांची नावे होत. या द्वीपाचेही त्यांच्या नावावर सात देश झाले. शाकद्वीपाच्या स्वामीस, मेधातिथीस सात पुत्र झाले. नाभी, शांतभय, शिशिर, मुखोदम, नंदशिव, क्षेमक आणि ध्रुव; अशी त्यांची नावे होती.

याच द्वीपात हेमवान, हेमकूट, किंपुरुष, नैषध, हरिवर्ष, मेरूमध्य, इलावृत, नीळ, रम्यक्, श्वेत, हिरण्मय व शृंगवान असे वर्ष झाले. पर्वताच्या उत्तर भागात उत्तर कुरु व माल्यवान् आहेत. भद्राश्व व गंधमादनावर महाराज नाभीचे शासन सुरू झाले. केतुमालवर्षावरही त्याचेच शासन होते. नाभीच्या धर्मपत्नीचे नाव मेरुदेवी होते. त्यांच्या पुत्राचे नाव ऋषभ. यास भरत नावाचा पुत्र झाला. तो हिमाद्रीच्या दक्षिणेचा राजा झाला. त्याच्या देशास भारत हे नाव प्राप्त झाले. भरताचा पुत्र सुमती. सुमतीस राज्य देऊन भरत वनात गेला. सुमतीस तेज, यास सत्सुत, यास इंद्रद्युम्न, यास परमेष्ठी, यास प्रतिहर्ता, यास निखात यास उन्नेता, यास अभाव, यास उद्गाता, यास प्रस्तोता, यास विभू, यास पृथू, यास अनंत, यास गय, यास नय, यास विराट्, यास महावीर्य आणि महावीर्यास सुधीमान् पुत्र झाला. सुधीमानास शंभर पुत्र झाले. अशी प्रजेची निरंतर वृद्धी होत गेली.

## जंबूद्वीप व सुमेरुपर्वत

चारही बाजूंनी विस्तारलेले जंबूद्वीप लाख योजनांचे आहे. अनेक योजने असलेली अनेक जनपदे याची शोभा वाढवितात. सिद्ध व चरण यांनी हे द्वीप व्यापलेले आहे. पर्वत याची मनोहारिता वाढवितात. शिलाजिताच्या उत्पन्नाने याचा महिमा सीमेपार पसरला आहे. पर्वतीय

नद्यांनी हे द्वीप चमकत असते. हे जंबूद्वीप नऊ वर्षांनी व्यापलेले आहे. या सुंदर द्वीपात भगवान श्रीनारायण विराजमान होतात. याच्या चारही दिशांना समुद्र आहे. पूर्वेस सहा वर्षपर्वत आहेत. याच्या पूर्वेस व पश्चिमेस लवणसमुद्र आहेत. येथे वर्फाने व्यापलेला हिमालय, सुवर्णयुक्त हेमकूट व अत्यंत सुखदायी असा निषधपर्वत आहे. चार वर्णांचा सुवर्णयुक्त सुमेरुपर्वत कमलासमान वर्तुळाकार आहे. तो खूप उंच असून त्याचे बरोबर चार भाग होतात. याच्या पार्श्वभागी परमात्म्याच्या नाभीतून प्रकट झालेले प्रजापती ब्रह्मदेव आहेत. पूर्वभागी श्वेतवर्णाचे ब्राह्मण आहेत, दक्षिणेस पीतवर्णाचे वैश्य आहेत. पश्चिमेस भृंगराजपत्राच्या वर्णाचे शूद्र आहेत.

याचे शिखर नील व वैडूर्य मण्यासमान आहे. ते कधी श्वेत, कधी शुक्ल, कधी पिवळे दिसते. कधी हिरवे असते. तर कधी मोरपंखासारखे चित्रविचित्र असते. या सर्व पर्वतांवर सिद्ध व चारणगण निवास करतात. या पर्वतांच्या मध्ये लांबरुंद असा ‘ विष्कंभ ’ नावाचा पर्वत आहे. या महान सुमेरुपर्वताच्या मध्यभागी इलावृत वर्ष आहे. याचा विस्तार चारही दिशांना हजार योजनांचा आहे. त्याच्यामध्ये धूम्ररहित अग्नीप्रमाणे प्रकाशणारा महामेरू आहे, सुमेरूच्या वेदीच्या दक्षिणेचा अर्धाभाग व उत्तरेचा अर्धा भाग महामेरूचे स्थान आहे. येथील सहा वर्षांना वर्षपर्वताच्या संज्ञा आहेत. या सर्व वर्षांचे पुरे एक योजनाचा अवकाश आहे. वर्षाची लांबीरुंदी दोन दोन हजार योजनांची आहे. त्यांच्या परिमाणावरून जंबूद्वीपाचा विस्तार सांगितला जातो. एक एक लाख योजने विस्ताराचे नील व निषध नावांचे दोन पर्वत आहेत. त्यांशिवाय श्वेत, हेमकूट, हिमवान, शृंगवान् नावांचे पर्वत आहेत.

जंबूद्वीपाच्या प्रमाणाने निषधपर्वताचे वर्णन करता येते. हेमकूट निषधाच्या बाराव्या भागाबरोबर आहे. हिमवानपर्वत पूर्वेकडून पश्चिमेस पसरला आहे. उत्तर व दक्षिण यांच्यांत मनुष्यांच्या वस्ती आहेत. त्यांना अनुवर्ष म्हणतात. हिमालयासंबंधी वर्ष भरताच्या संतानांनी व्यापलेले आहे. हेमकूटावर जे उत्तम वर्ष आहे, त्याला किंपुरुष म्हणतात. हेमकूटाच्या पुढील वर्षांचे नाव निषध व हरिवर्ष आहे. हरिवर्षाच्या पुढे व

हेमकूटापाशी इलावृत वर्ष आहे. याच्या पुढील वर्षांना नील व रम्यक अशी नावे आहेत. रम्यकाच्या पुढे श्वेतवर्ष व हिरण्मयवर्ष आहे. त्याच्याही पुढे शृंगवंत व कुरुवर्ष आहे.

इलावृत्ताचे चारही कोन बरोबर आहेत. हे द्वीपाच्या चतुर्थांश भागात आहे. निषधाच्या वेदीच्या अर्ध्या भागास उत्तर म्हटले जाते. उत्तर दिशेस व दक्षिण दिशेस तीन तीन वर्षे आहेत. त्या दोन भागांच्या मध्यभागी मेरुपर्वत आहे. हेच इलावृतवर्ष होय. याचे प्रमाण चौतीस हजार योजनांचे आहे. त्याच्या पश्चिमेस गंधमादनपर्वत आहे. सुमेरुच्या चारही बाजूंनी समुद्र आहे. सुमेरुपर्वताच्या पार्श्वभागी पूर्वेस श्वेतपर्वत, दक्षिणेस पीत, पश्चिमेस कृष्णवर्ण व उत्तरेस रक्तवर्णाचा पर्वत आहे. पर्वतांचा राजा सुमेरू शुक्लवर्णाचा असून त्याची कांती प्रचंड सूर्यासारखी आहे. तो धूमरहित अग्नीसारखा प्रदीप्त होतो. तो चौऱ्याऐंशी हजार योजने उंच असून सोळा हजार योजने जमिनीत आहे. त्याच्या शिखरावरील भाग बत्तीस योजनांचा आहे. हा पर्वत महान दिव्य औषधींनी संपन्न आहे. यावर सर्व देव, गंधर्व, नाग, राक्षस, अप्सरा यांचे समुदाय आनंद करतात. प्राण्यांची निर्मिती करणाऱ्या ब्रह्मदेवांचे भवनही याच पर्वतावर आहे. याच्या पश्चिमेस भद्राश्व, भारत व केतुमाल आहेत. उत्तरेस पुण्यवान कुरुवर्ष आहे. पद्मरूप सुमेरूच्या कर्णिका चारही दिशांना मंडलाकार पसरल्या आहेत.

या मेरुपर्वताच्या कर्णिका शेकडो मणिमय पत्रांनी सुशोभित असतात. यांवर एक हजार कंदरे आहेत. या पर्वतावर वृत्ताकार व कमलकर्णिकांसारखी विस्तृत अशी एक लाख पाने आहेत. या पर्वतावर मनोवती नावाची ब्रह्मदेवांची एक सभा आहे. अनेक महर्षी तिचे सदस्य आहेत. महात्मे, ब्रह्मचारी, विनयी, सुंदर व्रतधारी, सदाचारी, अतिथि-सेवी गृहस्थ, विरक्त, पुण्यवान योगी या सभेचे सभासद आहेत. याच पर्वतावर रुद्रांचाही निवास असतो. या सभामंडलाचा विस्तार चौदा हजार योजने आहे. तो रत्न व धातू यांनी संपन्न असल्यामुळे मोठा सुंदर व अद्‌भुत आहे. त्यावर अगणित रत्नमणिमय तोरणयुक्त मंदिरे आहेत. येथेच तीस हजार योजन विस्तृत चक्रपाद नावाचा विख्यात

श्रेष्ठ पर्वत आहे. येथूनच दहा हजार योजनांची एक नदी ऊर्ध्ववाहिनी नावाची प्रवाहित होते. या नदीच्या प्रतिमेपुढे सूर्य व चंद्रही फिके पडतात.

## आठ दिक्पालांच्या नगरी

शहाहत्तराव्या अध्यायात आठ दिक्पालांच्या पुरींचे वर्णन आले आहे. चक्रपादपर्वतास सर्व देवांची पुरी समजतात. येथे देव, दानव व राक्षस राहातात. या पुरीची सोन्याचे तट व मनोहर तोरण यांनी शोभा वाढविलेली असते. या पुरीच्या ईशानकोणात एका तेज:पूर्ण स्थानावर इंद्राची अमरावतीपुरी आहे. या परम रमणीय पुरीत सर्व दिव्य पुरुष निवास करितात. शेकडो विमानांच्या पंक्ती येथे दिसतात. येथे अनेक विहिरी असून हर्षाचा ऱ्हास कधीच होत नाही. अनेक रंगीबेरंगी फुले या पुरीची शोभा वाढवितात. पताका, ध्वजा यांनी पुरी मनमोहक दिसते. ऋद्धिसिद्धींनी परिपूर्ण अशा या पुरीत देव, यक्षगण, अप्सरा, ऋषिसमुदाय निवास करतात. या पुरीच्या मध्यभागी वैदूर्यमण्यांच्या वेदीने मंडित अशी 'सुधर्मा' नावाची सभा आहे. येथे सर्व सुरगण व सिद्धसमुदाय यांनी घेरलेला शचीपती सहस्राक्ष इंद्र विराजतो.

या अमरावतीपासून दक्षिणेस अग्निदेवाची पुरी आहे. हिचे नाव 'तेजोवती' आहे. या पुरीच्या दक्षिणेस यमराजाची 'संयमनी पुरी' आहे. नैर्ऋत्यकोणात विरूपाक्षाची 'कृष्णपतीपुरी' आहे. हिच्या पश्चिमेस जलस्वामी वरुणाची 'शुद्धवतीपुरी' आहे. वायव्य कोणात वायुदेवाची 'गंधवतीपुरी' आहे. हिच्या उत्तरेस गुह्यकांचा स्वामी कुबेराची मनोहर 'महोदयापुरी' आहे. या पुरीत वैदूर्यमण्यांनी बनलेल्या वेदी आहेत. ईशानकोणात भगवान रुद्रांची 'मनोहरा' नावाची पुरी आहे. हीत अनेक प्रकारचे भूतसमुदाय, विविध प्रकारची पुष्पे, उंच भवनें, वन व आश्रम आहेत.

## मेरुपर्वताचे वर्णन

सत्याहत्तराव्या अध्यायात मेरुपर्वताचे आणखी वर्णन आले आहे.

मेरुपर्वताच्या मध्यभागी कर्णिकेचे मूळ आहे. त्याचे परिमाण एक सहस्र योजने आहे. त्याचे रक्षण आठ दिशांना आठ पर्वत करितात. पूर्वेस जठर व देवकूट या नावांचे दोन पर्वत आहेत. मेरूच्या अग्रभागी रक्षण करणाऱ्या चार पर्वतांच्या पुढे चौदा दुसरे पर्वत आहेत. ते या सात द्वीपांच्या पृथ्वीस अचल राखतात. जागजागी हरिताल, मैनशिला आदी धातू व मणिमंडित गुंफा आहेत. सिद्धांची अनेक भवने आहेत.

मेरुगिरीच्या पूर्वेस मंदराचल, दक्षिणेस गंधमादन, पश्चिमेस विपुल व पार्श्वभागी सुपार्श्वपर्वत आहे. या पर्वतांवर चार महान वृक्ष आहेत. समृद्ध देव, दैत्य, अप्सरा येथे सुरक्षितपणे राहातात. मंदर-गिरीच्या शिखरावर कदंवाचा वृक्ष आहे. त्याचा गंध मोठा हृदयहारी आहे. त्याचे नाव 'भद्राश्व' असून याचा प्रादुर्भाव केतुमालवर्षात झाला होता. हा विशाल वृक्ष कीर्ती, रूप व शोभा यांनी संपन्न आहे.

या मेरुपर्वताच्या दक्षिणेस दोन मोठी शिखरे आहेत. तेथे फुले, फळे व महान शाखा यांनी शोभणाऱ्या जंवूवृक्षांचे एक वन आहे. या वृक्षांपासून पुराणप्रसिद्ध, स्वादिष्ट, गंधयुक्त, अमृतासारखी फळे पर्वताच्या शिखरावर गळतात. या फळांच्या रसातून एक मोठी नदी वाहते. या नदीपासून अग्नीप्रमाणे चमकणारे जांवूनद नावाचे सुवर्ण वनते. हे अत्यंत सुंदर व देवांना भूषणांच्या कामी उपयोगी येणारे असते. देव, दानव, गंधर्व, यक्ष, राक्षस, गुह्यक या अमृतासारख्या जंवूफलांच्या आसवाचा आस्वाद घेतात, म्हणून या लोकास 'जंवूलोक' अशी संज्ञा मिळाली आहे. जंवूद्वीप म्हणूनही यास ओळखतात.

मेरुपर्वताच्या दक्षिणेस दूरवर एक विशाल पिंपळाचा वृक्ष आहे. त्याच्या शाखा खूप उंचीवर पसरलेल्या आहेत. येथेच अनेक प्राणी असून याचे नाव 'केतुमाल' आहे. आता या वृक्षाचा विशेष असा आहे. क्षीर-समुद्राच्या मंथनाच्या वेळी इंद्राने या वृक्षास चैत्य मानून यांच्या शाखांना माळेप्रमाणे आपल्या गळ्यात धारण केले होते. तेव्हापासून हा वृक्ष 'केतुमाल' या नावाने प्रसिद्ध झाला. या वर्षासही 'केतुमाल' असेच नाव पडले.

सुपार्श्व नावाच्या पर्वताच्या उत्तरशृंगावर एक महान वटवृक्ष आहे. या वृक्षाच्या शाखा मोठ्या विशाल असून त्यांचा विस्तार तीन योजनांचा आहे. हा वृक्ष केतुमाल व इलावृत वर्षांच्या सीमेवर आहे. याच्या आश्रयाने सिद्धगण राहातात. ब्रह्मदेवांचे मानसपुत्रही कधी कधी येथे येतात. येथे सात कुरुमहात्मे निवास करीत असल्याने याला 'कुरुवर्ष' असे म्हणतात.

## मंदरादी पर्वतांचे वर्णन

पुढल्या अठ्ठ्याहत्तराव्या अध्यायात भगवान रुद्रांनी मंदरादी पर्वतांचे वर्णन केले आहे. वरील पर्वतांच्या पृष्ठभागी अत्यंत रम्य असे चार पर्वत आहेत. त्यांच्या शिखरांची शोभा पक्षी कलरवाने वाढवितात. देव व देवांगना येथे क्रीडा करण्यासाठी येतात. येथील शीतल व सुगंधित पवनाचे सेवन किन्नरगण करतात. या चारही पर्वतांच्या पूर्वेस चैत्ररथ-वन व दक्षिणेस गंधमादनपर्वत आहे. या पर्वतांवर स्वादिष्ट जलाने परिपूर्ण अशी अनेक सरोवरे आहेत. हे स्थान अतिशय रमणीय आहे. परम पवित्र जल व रत्ने यांनी समृद्ध अशी सरोवरे या स्थानाची शोभा वाढवितात. उमललेल्या निळ्या, स्वच्छ, लाल कमलांनी हे जलाशय सुंदर दिसतात.

या पर्वतांच्या पूर्वेस अरुणोद, दक्षिणेस मानसोद, पश्चिमेस असितोद आणि उत्तरेस महाभद्र या नावांची सरोवरे आहेत. श्वेत, कृष्ण, पीत रंगांच्या कमलांनी या सरोवरांची शोभा वाढते. अरुणोद-सरोवराच्या पूर्वेस विकंक, मणिशृंग, सुपात्र, महोपल, महानील, कुंभ, सुबिंदू, मदन, वेणुनद्ध, सुमेदा, निषध व देव या नावांचे प्रसिद्ध पर्वत आहेत.

मानससरोवराच्या दक्षिणेस त्रिशिखर, गिरिश्रेष्ठ, शिशिर, कपी, शताक्ष, तुरग, सानुमान, ताम्राह, विष, श्वेतोदन, समूल, सरल, रत्नकेतू, एकमूल, महाशृंग, गजमूल, शावक, पंचशैल आणि कैलास; असे पर्वत आहेत. महाभद्रसरोवराच्या उत्तरेस हंसकूट, वृषहंस, कपिंजल, गिरि-राज इंद्रशैल, सानुमान, नील, कनकशृंग, शतशृंग, पुष्कर, विराज आणि

भारुची; या नावांचे पर्वत आहेत. यांच्या उत्तरेस काही ग्रामे, नगरे आहेत.

## मेरुपर्वतावरील जलाशय

एकोणऐंशिव्या अध्यायात भगवान रुद्रांनी मेरुपर्वतावरील जलाशयांचे वर्णन केले आहे. सीमांत व कुमुदपर्वत यांच्यामध्ये अनेक पक्षी निवास करितात. येथे विविध प्रकारचे प्राणी आहेत. येथेच एक स्वादिष्ट व स्वच्छ जलाशय असून विशाल सुगंधित कमलपुष्पे त्याची शोभा निरंतर वाढवितात. हा जलाशय देव, दानव, गंधर्व, महान सर्प यांनी कधीच रिक्त असत नाही. या दिव्य आणि पवित्र जलाशयाचे नाव 'श्रीसरोवर' आहे. या सरोवरातील जल नेहमी स्वच्छ असते. येथेच कमलवनात एक मोठे कमल आहे. याची पाने एक कोटीपर्यंत आहेत. हे कमल मध्यान्हकालीन सूर्याप्रमाणे सदा प्रफुल्लित व प्रकाशमान असते. या कमलावर मत्त भ्रमर सदा गुंजारव करीत असतात. याच्या मध्यभागी साक्षात लक्ष्मीचा निवास असतो. या सरोवराच्या तटावर सिद्धपुरुषांचे आश्रमही आहेत.

या सरोवराच्या तटावर एक मोठा बिल्ववृक्ष आहे. त्यावर सदा फुले व फळे असतात. त्याच्या चारही बाजूंनी अनेक वृक्ष आहेत. हजारो शाखांनी व फळांनी हे वृक्ष सदा समृद्ध असतात. त्याच्या फळांचा स्वाद अमृतासारखा असतो. त्यांचा गंध उत्कट असतो. त्याची पिकलेली फळे जमिनीवर गळून पडतात. या वनाचे नाव 'श्रीवन' वा 'लक्ष्मीवन' आहे. त्याच्या आठ दिशांना देवांचा निवास असतो. या कल्याणप्रद बिल्ववृक्षापाशी सदैव फळे खाणारे एक मुनी निवास करितात. याखाली नित्य लक्ष्मीचा निवास असतो. सिद्धसमुदाय तिची सेवा करितात.

येथेच मणिशैल नावाचा एक महान पर्वत आहे. त्यावर एक स्वच्छ कमलांचे वन आहे. येथे सिद्ध व चारण यांचा निवास असतो. या फुलांची माला भगवती लक्ष्मी धारण करते. याच्या चारही दिशांना पर्वत आहेत. या कमलवनात अनेक पक्षी असतात. नाना रंगांची, गंधांची ही कमले देवांना मुग्ध करितात. देव, दानव, गंधर्व, यक्ष, राक्षस किन्नर, अप्सरा यांनी सेवित असा प्रजापती भगवान कश्यपांचा आश्रमही

येथेच आहे.

महानील व ककुभ नावांच्या पर्वतांच्या मध्यभागी एक मोठे वन आहे. यात सिद्ध व साधू यांचा सदा निवास असतो. या पर्वतांच्या मध्ये 'सुखा' नावाची एक नदी वाहाते. या वनाचे नाव 'तालवन' आहे. येथेच ऐरावताच्या आकृतीची एक पर्वतीय भूमी आहे. ईरावान, रुद्र व देवशील या पर्वतांच्या मध्यभागी ही आहे. येथे फक्त एकच विशाल शिला आहे. हीवर एकही वृक्ष वा लता नाही. या शिलेचा एक चतुर्थांश भाग जलात बुडलेला आहे.

## काही पर्वतीय स्थाने

ऐंशीव्या अध्यायात मेरुपर्वतावरील काही स्थानांचे वर्णन आले आहे. या पर्वताच्या दक्षिणेस अनेक पहाड व नद्या आहेत. ही सिद्धांची निवासभूमी आहे. शिशिर व पतंग या पर्वतांच्या मध्यभागी एक स्वच्छ भूमी आहे. येथे दिव्य व मुक्त स्त्रिया राहातात. येथील वृक्ष गलितपत्र असतात. येथेच इक्षुक्षेप नावाचे शिखर आहे. या शिखरावर सुंदर उंबरांच्या वृक्षांचे एक वन आहे. या वृक्षांवर अनेक पक्षी असतात. सिद्धादी आठ प्रकारचे देव या वनात नित्य निवास करितात. येथून स्वच्छ व स्वादिष्ट जलाच्या अनेक नद्या प्रवाहित होतात. येथेच कर्दम-प्रजापतींचा आश्रम आहे. येथेच ताम्राभ व पतंग या पर्वतांच्या मध्य-भागी एक महान सरोवर आहे. त्यात हजारो पानांची कमळे शोभतात. येथे सिद्ध व गंधर्व यांचा निवास असतो. याच भागात एक महान शिखर अनेक धातू व रत्ने यांनी शोभत असते. येथेच पुलोमविद्याधराचे पुर आहे. विशाख व श्वेत नावांच्या पर्वतांच्या मध्यभागी एक नदी आहे. हिच्या पूर्वतटावर एक विशाल आम्रवृक्ष आहे. या वृक्षास सुवर्णासारखी चमकणारी अनेक फळे लगडतात. येथे देव व गंधर्व यांचा निवास असतो.

येथेच सुमूल व सुधार हे दोन प्रसिद्ध पर्वत आहेत. यांच्यामध्ये एक लांबरुंद रिक्त भूमी आहे. येथे बिल्वाचा एक वृक्ष आहे. यापासून मोठी फळे जमिनीवर पडतात. या फळांतील रसाने या भूमीची माती ओली झाली आहे. बिल्वफले खाण्यासाठी गुह्यक लोक या स्थलाचे रक्षण

करितात. याचप्रमाणे वसुधार व रत्नधार पर्वतांच्या मध्यभागी किंशुक अर्थात पलाशवृक्षांचे एक वन आहे. येथील पुष्पांच्या सुगंधाने लांब-वरची भूमी सुगंधित होते. येथे जलाची कमतरता कधीच नसते. सिद्ध लोक येथे सदा निवास करतात. येथे भगवान सूर्याचे एक विशाल मंदिर आहे.

पंचकूट व कैलासपर्वत यांच्या मध्ये 'हंसपांडुर' नावाचा एक प्रसिद्ध भूमिखंड आहे. हा भूभाग म्हणजे स्वर्गाची शिडीच आहे. सुपार्श्व व शिखिशैल पर्वतांच्या मध्यभागी 'भौमशिलातल' नावाची भूमी आहे. येथील भूमी सदा तप्त असते. येथेच अग्निदेवांचे स्थान आहे. येथे भगवान नारायण लोकांचा संहार करणाऱ्या 'संवर्तक' नावाच्या अग्नीचे रूप घेऊन राहतात व लाकडाशिवाय सदा प्रज्वलित असतात. कुमुद व अंजन शैलश्रेष्ठांच्या मध्ये 'मातुलुंगस्थली' नावाची भूमी आहे. येथे जाण्यास सर्व प्राणी असमर्थ आहेत. पिवळ्या रंगाची फळे येथे विपुल असतात. सिद्ध पुरुषांनी संपन्न असा एक पवित्र तलाव येथे आहे. येथेच बृहस्पतीचे एक वन आहे. पिंजर व गौर नावांच्या पर्वतांमध्ये लहान लहान अनेक नद्या आहेत. भगवान नारायणांचे मंदिर येथेच आहे. शुक्ल व पांडुर या पर्वतांच्यामधील एक पर्वतीय भागात एकच शिला आहे. एकही वृक्ष नाही. तेथे एक विहीर अशी आहे की, जिचे जल कधीच कमी होत नाही. येथे एक वृक्ष व एक 'स्थलपद्मिनी' आहे. येथे भगवान शंकर निळे वस्त्र धारण करून पार्वतीसह निवास करितात त्यांची आराधना यक्ष, भूत इत्यादी सदा करितात.

सहस्रशिखर व कुमुद या दोन पर्वतांच्यामध्ये 'इक्षुक्षेप' नावाचे एक शिखर आहे. यावर अनेक पक्षी निवास करितात. अनेक वृक्षांवर मधुर फळे असतात. येथे चंद्राचा महान आश्रम आहे. शंखकूट व ऋषभ यांच्या मध्ये 'पुरुषस्थली' आहे. कपिंजल व नागशैल यांच्यामधील भूमीवर अनेक यक्षांचा निवास असतो. ही भूमी द्राक्ष व खजूर यांच्या वृक्षांनी व्यापलेली आहे. पुष्कर व महादेव नावांच्या पर्वतांच्या मध्ये एक मोठे उपवन आहे. त्याचे नाव 'पाणितल' असून येथे वृक्ष, वेली यांचा सर्वथा अभाव आहे.

## देवपर्वतावरील देवस्थाने

सींता नावाच्या पर्वतावर इंद्राचे एक सुंदर क्रीडास्थान आहे. तेथेच त्याचा पारिजात नावाचा वृक्ष आहे. त्याच्या शेजारीच 'कुन्जर' नावाचा एक पर्वत आहे. त्यावर दानवांची आठ नगरे आहेत. वज्र-पर्वतावर राक्षसांच्या नगरी आहेत. त्यांमधील असुरांची प्रसिद्धी 'नालका' नावाची आहे. महानीलपर्वतावर पंधरा सहस्र किन्नर आहेत. तेथे देवदत्त, चंद्रदत्त इत्यादी पंधरा गर्विष्ठ राजे राज्य करतात. त्यांची नगरे सुवर्णाची आहेत. चंद्रोदयपर्वतावरील बिळांतून व नगरांतून सर्पांची निवासस्थाने आहेत. गरुडांच्या भीतीने ते सर्प बिळांत लपून राहातात. अनुरागपर्वतावर दानवेश्वर राहातात. वेणुमानपर्वतावर विद्याधरांची तीन नगरे आहेत. त्यात विद्याधरांचे शासक उलूक, गरूड, रोमश व महावेत्र राहातात. कुन्जर व वसुधार या पर्वतांवर भगवान पशुपतींचा निवास असतो.

वसुधार व रत्नधार या पर्वतांवर वसू आणि सप्तर्षी यांच्या पंधरा पुऱ्या आहेत. एकशृंग या पर्वतावर ब्रह्मदेवांचे निवासस्थान आहे. गज-पर्वतावर भूतसमुदायाने घेरलेली पार्वती शोभत असते. वसुधारपर्वतावर मुनी, सिद्ध व विद्याधर यांचे एक नगर आहे. युद्धनिपुण पर्वत नावाचे अनेक गंधर्व तेथे राहातात. त्यांच्या राजाचे नाव पिंगल आहे. पंचकूट-पर्वतावर देव व राक्षस राहातात. तर दानव शतशृंगपर्वतावर असतात. प्रभेदक पर्वतावर पश्चिमभागी देव, दानव व सिद्ध यांच्या पुऱ्या आहेत. याच्या शिखरावर चंद्र येत असतो. त्रिकूटपर्वतावर कधी कधी ब्रह्मदेव राहातात. कधी अग्निदेव असतात. शृंगपर्वतावर देवांचे निवासस्थान आहे. पूर्वेस भगवान नारायण, मध्ये ब्रह्मदेव व पश्चिमेस भगवान शंकर राहातात.

येथेच यक्षादींची अनेक नगरे आहेत. येथेच नंदजल या नावाची एक नदी आहे. तिच्या उत्तरतटावर जातुच्छ नावाचा एक उंच पर्वत आहे. येथे सर्पाचा राजा नंद निवास करतो. त्याला शंभर फण्या आहेत. असेच आठ दिव्य पर्वत सोने, चांदी, रत्ने, वैडूर्य इत्यादी रत्ने धारण

करतात. ही पृथ्वी अगणित पर्वतांनी समृद्ध आहे. ही कमळाच्या आकृतीत स्थित आहे.

## नद्यांचे अवतरण

पुढल्या ब्याऐंशिव्या अध्यायात भगवान रुद्रांनी नद्यांच्या अवतरणाबद्दल माहिती दिली आहे. आकाशसमुद्रापासून आकाशगंगेची निर्मिती होते. आकाशसमुद्र नेहमी इंद्राच्या ऐरावताकडून क्षुभित असतो. चौऱ्याऐंशी हजार योजनांवरून आकाशगंगा मेरुपर्वतावर येते. तेथून ती चार भागांत विभक्त होते. हीच नदी भूभागावर आल्यावर सीता, अलकनंदा, चक्षू, भद्र आदी नामांनी विख्यात होते. एक्याऐंशी हजार पर्वतांना ओलांडून 'गो' अर्थात गमन करणारी 'गां गता– गंगा' ओळखली जाते.

गंधमादनपर्वतावरून अमरगंडिका नदी वाहाते. हिच्या तटावर केतुमालादी जानपदे आहेत. येथील निवासी पुरुष काळ्या वर्णाचे आहेत. येथील स्त्रिया कमलांसारख्या सुंदर नेत्रांच्या आहेत. येथे फणस वृक्ष भरपूर असतात. हिच्या जलाचे पान केल्यास वृद्धत्व वा रोग येत नाही. हजार वर्षांचे आयुष्य मनुष्यास मिळते. माल्यवानपर्वताच्या पूर्वशिखरावरून पूर्वगंडिका उगम पावते. तिच्या काठी भद्राश्व नावाची अनेक जनपदे आहेत. येथेच भद्रसाल नावाचे एक वन आहे. त्यात कालाम्र नावाच्या वृक्षांची संख्या अगणित आहे. येथील पुरुष श्वेतवर्णाचे व स्त्रिया कमल आणि कुंद यांच्या वर्णांच्या असतात. सर्वांचे आयुष्य दहा हजार वर्षांचे असते.

येथेच कुलपर्वत आहेत. शैलवर्ण, मालाख्य, कोरजस्क, त्रिपर्ण व नील या नावांनी ते विख्यात आहेत. येथे सीता, सुवाहिनी, हंसावती, कासा, महावक्रा, चंद्रवती, कावेरी, सुरसा, अख्यावती, इंद्रवती, अंगारवाहिनी, हरित्तोया, समावर्ता, शतऱ्हदा, वनमाला, वसुमती, हंसा, सुपर्णा, पंचगंगा, धनुष्मती, मणिवप्रा, सुब्रह्मभोगा, विलासिनी, कृष्णतोया, पुण्योदा, नागवती, शिवा, शैवालिनी, मणितटा, क्षीरोदा, वरुणताली व विष्णुपदी; या नावांच्या नद्या असून, यांचे पाणी प्याल्याने

तेथील लोकांना दहा हजार वर्षांचे आयुष्य लाभते. येथील सर्व स्त्री-पुरुष भगवान रुद्र व उमा यांचे भक्त आहेत.

## नैषध व रम्यकवर्षांतील कुलपर्वत, जनपदे व नद्या

त्र्याऐंशी व चौऱ्याऐंशी अध्यायांत निषधवर्ष, रम्यकवर्ष यांची माहिती आली आहे. निषधवर्षात पर्वतराज नैषध आहे. त्याच्या पश्चिमेस विशाख, कंवल, जयंत, कृष्ण, हरित, अशोक व वर्धमान हे सात कुलपर्वत आहेत. येथील जनपदे याच पर्वतांच्या शिखरांच्या वा छोटचा छोटचा पर्वतांच्या नावांनी ओळखली जातात. सौर, ग्रामांत-सातप, कृतसुराश्रवण, कंवल, माहेय, कूटवास, मूलतप, क्रौंच, कृष्णांग, मणिपंकज, चूडमल, सोमीय, समुद्रांतक, कुरकुंज, सुवर्णतट, कुह, श्वेतांग, कृष्णपाद, विद, कपिल कर्णिक, महिष, कुब्ज, करनाट, महोत्कट, शुक-नाक, सगज, भूम ककुरंजन, महानाद, किकिसपर्ण, भौमक, चोरक, धूम-जन्मा, अंगारज, जीवलौकित, वाचांसहांग, मधुरेय, शुकेय, चकेय, श्रवण, मत्तकाशिक, गोदावाय, कुलपंजाव, वर्जह आणि मोहशालक; अशी या पर्वतांची नावे आहेत.

या पर्वतीय जनपदांतील जन पुढील नद्यांचे जल पितात. र.नाक्षा, महाकदंबा, मानसी, श्यामा, सुमेधा, बहुला, विपर्णा, पुंखा, माला, दर्भवती, भद्रनदी, शुकनदी, पल्लवा, भीमा, प्रभंजना, कांबा, कुशावती, दक्षा, काशवती, तुंगा, पुण्योदा, चंद्रावती, सुमूलावती, ककुपद्मिनी, विशाला, करंटका, पीवरी, महामाया, महिषी, मानषी, व चंडा; या त्या नद्या आहेत. आणखीही हजारो छोटचा नद्या आहेत.

आता उत्तर व दक्षिण या दोन दिशांना असणाऱ्या पर्वतवासीयांची माहिती पाहा. मेरूच्या दक्षिणेस व श्वेतगिरीच्या उत्तरेस सोमरसाच्या लतांनी परिपूर्ण असे रम्यकवर्ष आहे. या रसाच्या प्रभावाने येथील माणसे बुद्धिमान, निर्मळ व वार्धक्य–रोगविरहित असतात. येथे एक मोठा वटवृक्ष आहे. त्याचा रंग प्रायः लाल असतो. त्याच्या फळांचा रस पिणारा मनुष्य दहा हजार वर्षांपर्यंत जगणारा व देवाप्रमाणे सुंदर होतो. श्वेतगिरीच्या दक्षिणेस हिरण्मय नावाचे वर्ष आहे. येथील नदीचे

नाव हैरण्यवती आहे. येथे इच्छेनुरूप रूप धारण करणाऱ्या कामरूपी पराक्रमी यक्षांचा निवास असतो. येथील लोकांचे आयुष्य सुमारे अकरा हजार वर्षांचे असते. येथे वड व फणस या वृक्षांची निर्मिती खूप असते. त्यांच्या फलांचा रस खाऊन लोक अनेक वर्षे जिवंत राहतात.

विश्रृंगपर्वतावर मणी, सुवर्ण व रत्ने यांनी युक्त अशा शिखरांची रांग उत्तरेपासून दक्षिणेस समुद्रापर्यंत पसरली आहे. येथील निवासींना उत्तरकौरव म्हणतात. येथील वहुतेक वृक्षांतून दूध वा रस वाहेर पडतो. या वृक्षांपासून आभूषणे व वस्त्रे तयार करतात. येथील भूमी मण्यांची वनलेली असून रेतीत सुवर्णकण मिळतात. येथील लोकांचे आयुष्य तेरा हजार वर्षांचे असते. याच द्वीपाच्या पश्चिमेस चंद्रद्वीप आहे. येथे चंद्रकांत व सूर्यकांत नावांचे दोन प्रस्रवणपर्वत आहेत. त्यांच्यामध्ये चंद्रवर्त्ता नावाची नदी वाहाते. तिच्या किनाऱ्यावर असंख्य वृक्ष आहेत. समुद्राच्या लहरी येथे येतात.

येथून पुढे पांच हजार योजने सूर्यद्वीप येते. याच्या मध्यभागी शंभर योजने विस्तारलेला व तितकाच उंच असा श्रेष्ठ पर्वत आहे. या पर्वतापासून सूर्यावर्त नावाची नदी उगम पावते. हे भगवान सूर्याचे निवासस्थान आहे. येथील प्रजा सूर्योपासक असून सूर्याच्या वर्णाची असते. सूर्यद्वीपापासून चार हजार योजने दूर पश्चिमेस भद्राकार नावाचे द्वीप आहे. हे समुद्राच्या देशात आहे. येथे पवनाचे रत्नजडित मंदिर आहे. यास भद्रासन म्हणतात. पवनदेव अनेक रूपे धारण करून येथे निवास करतो. येथील प्रजा तापलेल्या सुवर्णाच्या रंगाची असते. आयुष्य पांच हजार वर्षांचे राहाते.

## भारतवर्षाची नऊ खंडे

पंचाऐंशिव्या अध्यायात भगवान रुद्रांनी भारतवर्षाच्या नऊ खंडांचे वर्णन केले आहे. हे भूखंड कमलाच्या प्रमाणे गोलाकार आहे. त्यात नऊ उपवर्षे वा खंडे आहेत. इंद्रद्वीप, कसेरू, ताम्रवर्ण, गभस्तिमान्, नागद्वीप, सौम्य, गंधर्व, वारुण व भारत अशी त्यांची नावे असून ती सर्व समुद्रांनी घेरलेली आहेत. भारतवर्षात सात कुलपर्वत असून त्यांची नावे महेंद्र,

मलय, सह्य, शुक्तिमान, ऋक्षगिरी, विंध्याचल, पारियात्र, अशी आहेत. यांखेरीज अनेक छोटे छोटे पर्वत असून त्यांची नावे मंदर, शारद, दर्दुर, कैलास, मैनाक, वैद्युत, वारंधम, पांडुर, तंगप्रस्थ, कृष्णगिरी, जयंत, ऐरावत, ऋष्यमूक, गोमंत, चित्रकूट, श्रीपर्वत, चकोरकुट, श्रीशैल व कृतस्थल; अशी आहेत. यांहीपेक्षा लहान पर्वतीय प्रदेशात आर्य व म्लेच्छ लोकांची जनपदे आहेत.

भारतवर्षी लोक गंगा, सिंधू, सरस्वती, शतद्रू, वितस्ता, विपाशा, चंद्रभागा, शरयू, यमुना, इरावती, देविका, कुहू, गोमती, धूतपापा, वाहुदा, दृषद्वती, कौशिकी, निश्चीरा, गंडकी, इक्षुमती, लोहिता; या नद्यांचे पाणी पितात. या सर्व नद्या हिमालयापासून उगम पावतात. पारियात्रपर्वतापासून वेदस्मृती, वेदवती, सिंधू, पर्णाशा, चंद्रनाभा, नर्मदा, सदानीरा रोहिणीपारा, चर्मण्वती, विदिशा, वेत्रवती, शिप्रा, अवंती व कुंती या नद्या उगम पावतात. ऋक्षमानपर्वतापासून शोण, ज्योतिरथा, नर्मदा, सुरसा, मंदाकिनी, दशार्णा, चित्रकूटा, तमसा, पिप्पला, करतोया, पिशाचिका, चित्रोत्पला, विमला, विशाला, वंजका, वालुवाहिनी, शुक्तिमती, विरजा, पंकिनी व रात्री; या नद्या उगम पावतात.

विंध्यपर्वतापासून मणिजाला, शुभा, तापी, पयोष्णी, निर्विंध्या, वेणा, पाशा, वैतरणी, वैदिपाला, कुमुद्वती, तोया, दुर्गा व अंतःशिला या नद्या निघतात. सह्यपर्वतापासून गोदावरी, भीमरथी, कृष्णावेणी, वंजुला, तुंगभद्रा, सुप्रयोगा आणि बाह्यकावेरी या नद्या उगम पावतात. मलयगिरीपासून कृतमाला, ताम्रपर्णी, पुष्पावती व उत्पलावती; या नद्या निघतात. महेंद्रपर्वतापासून त्रिसामा, ऋषिकुल्या, इक्षुला, त्रिदिवा, लांगूलिनी आणि वंशधरा; या नद्या निघतात. शुक्तिमानपर्वतापासून ऋषिका, सुकुमारी, मंदगामिनी, कृपा व पलाशिनी या नद्या उगम पावतात. असे हे भारताचे कुलपर्वत व या प्रमुख नद्या होत.

## शाक आणि कुशद्वीप, क्रौंच आणि शाल्मलिद्वीप

पुढे शहाऐंशी ते एकोणनव्वद अध्यायांपर्यंत भगवान रुद्रांनी शाक,

कुश, क्रौंच, शाल्मली या द्वीपांचे वर्णन केले आहे. शाकद्वीपाचे वर्णन असे. जंबूद्वीप आपल्यापेक्षा दुप्पट लवणसमुद्राने आवृत आहे. येथील निवासी मोठे पवित्र व दीर्घजीवी आहेत. दारिद्र्य, वृद्धत्व, व्याधी यांची बाधा त्यांना नसते. या शाकद्वीपातही सात कुलपर्वत आहेत. या द्वीपाच्या दोनही बाजूंनी समुद्र; एकीकडे लवणसमुद्र व दुसरीकडे क्षीर-समुद्र आहेत. पूर्वेकडे पसरलेला महान पर्वत उदयाचल नावाने प्रसिद्ध आहे. त्याच्यावर पश्चिमभागी जलधारपर्वत आहे. यासच लोक चंद्रगिरी म्हणतात. येथूनच जल घेऊन इंद्र वृष्टी करतो. यानंतर श्वेतक नावाचा पर्वत आहे. आणखीही काही लहान पर्वत आहेत. यानंतर रजतगिरी असून यासच जनता शाकगिरीही म्हणते.

यानंतर आंबिकेयपर्वत आहे. लोक यासच विभ्राजक अथवा केसरीही म्हणतात. येथूनच वायूचा प्रवाह सुरू होतो. उदय, सुकुमार, जलधार, क्षेमक व महाद्रुम या पर्वतांमुळे खंडांचीही प्रसिद्धी झाली आहे. यांच्यामध्ये शाक नावाचा एक वृक्ष आहे. येथे सुकुमारी, कुमारी, नंदा, वेणिका, धेनू, इक्षुमती व गभस्ती अशा नद्या वाहतात.

शाकद्वीपाच्या दुप्पट विस्ताराचे कुशद्वीप आहे. क्षीरसमुद्राच्या चारही दिशांना कुशद्वीप आहे. येथेही सात कुलपर्वत आहेत. कुमुद (विद्रुम), उन्नत (हेम), द्रोण (पुष्पवान), कंक (कुश), ईश (अग्निमान), महिष (हरी) आणि ककुद्म (मंदर); अशी या पर्वतांची नावे आहेत. या पर्वतांनी विभाजित भूभागासही विभिन्न वर्षे वा खंडे झाली आहेत. कुमुदपर्वतापासून श्वेत वा उद्भिद्वर्ष, उन्नतगिरी-पासून लोहित वा वेणुमंडल, वलाहकपर्वतापासून जीमूत वा रथाकर, द्रोणगिरीपासून हरिवर्ष वा बलाधन; अशी वर्षे निर्माण झाली. येथेही सात नद्या असून त्यांना दोन दोन नावे आहेत. प्रतोया (प्रवेशा), शिवा (यशोदा), चित्रा (कृष्णा), ल्हादिनी (चंद्रा,) विद्युल्लता (शुक्ला), वर्णा (विभावरी), महती (धृती); अशा या नद्या आहेत. कुशद्वीपाच्या मध्यभागी कुशांची मोठीच दाटी आहे. म्हणूनच याचे नाव कुशद्वीप पडले.

आता क्रौंचद्वीपाचे वर्णन पाहू. याचे परिमाण कुशद्वीपाच्या दुप्पट

आहे. या द्वीपातही सात प्रधान पर्वत आहेत. क्रौंच (विद्युल्लता), रैवत (मानस), पावन (अंधकार), अच्छोदक (देवावृत), सुराप (देविष्ठ), कांचनशृंग (देवनंद), गोविंद (द्विविद), पुंडरीक (तोयासह), अशा सात रत्नमय पर्वतांनी कौंचद्वीप शोभते. येथेही दोन दोन नामांची वर्षे आहेत. कुशल (माधव), वामक (संवर्तक), उष्णवान् (सप्रकाश), पावनक (सुदर्शन), अंधकार (संमोह), मुनिदेश (प्रकाश), दुंदुभी (अनर्थ); अशी ही नावे होत. गौरी, कुमुद्वती, संध्या, रात्री, मनोजवा, ख्याती आणि पुंडरीका; या येथील नद्या होत. यांनाच कोणी कोणी पुष्पवहा, आर्द्रवती, संध्या, भोगजवा, क्षिप्रोदा, वहुला इत्यादी नावांनी ओळखतात. क्रौंचद्वीपाच्या चारही दिशांनी घृतसमुद्र पसरला आहे.

शाल्मलिद्वीप कौंचद्वीपापेक्षा दुप्पट मोठे आहे. हे द्वीप घृतसमुद्राच्या भोवती चारही दिशांना पसरले आहे. येथेही सात प्रधान पर्वत व तितक्याच नद्या आहेत. सर्वगुण, सौवर्णरोहित, सुमनस, कुशल, जांबूनद, वैद्युत इत्यादी नावे असून याच नावांनी वर्षे वा खंडे प्रसिद्ध झाली आहेत. अशीच माहिती गोमेदद्वीपाचीही आलेली आहे.

# ५ सदाचारदर्शन

## मत्स्यद्वादशीव्रत

इतर पुराणांप्रमाणेच वराहपुराणातही नाना प्रकारांनी सदाचारांचे वर्णन आले आहे. श्राद्धस्वरूप, श्राद्धकल्प, तिथिमहिमा, विविध माहात्म्ये, तीर्थयात्राविधी, विविध प्रकारच्या प्रतिमा, दानधर्म, इत्यादींचे सविस्तर निरूपण आले आहे. प्रथम आपण द्वादशीव्रतांचा परिचय करून घेऊ.

अध्याय सोळापासून अध्याय बत्तीसपर्यंत प्रत्येक तिथीच्या व्रतांसंबंधी ज्या कथा होत्या त्या पूर्वी आपण पाहिल्या आहेत. आता छत्तिसाव्यापासून एकोणसाठाव्या अध्यायापर्यंत नऊ अवतारांची द्वादशीव्रते आणि आणखी विविध व्रते यांची वर्णने आली आहेत. प्रथम एकोणचाळिसाव्या अध्यायात मत्स्यद्वादशीव्रताचा महिमा व त्याचे फलकथन आले आहे. सत्यतपास दुर्वासांनी ही व्रते सांगितली आहेत. पूर्वी पृथ्वी पाताळात अडकली होती तेव्हा तिने उपवास करून हे द्वादशीव्रत केले. मार्गशीर्षाच्या दशमीतिथीपासूनच या व्रतास सुरुवात होते. पवित्र वस्त्र धारण करून विधिपूर्वक हवन करावे. शरीरशुद्धी करून आचमन करावे. भगवान जनार्दनांचे ध्यान करावे आणि प्रार्थना करावी.

**एकादश्यां निराहारः स्थित्वा चैवापरेऽहनि ।**
**भोक्ष्यामि पुण्डरीकाक्ष शरणं मे भवाच्युत ।।**

(३९.३२)

'कमलाप्रमाणे नेत्र शोभत आहेत अशा भगवाना, अच्युता, आज एकादशीतिथी आहे. मी निराधार राहून दुसऱ्या दिवशी भोजन करीन. आपणांस मी शरण आलो आहे.' अशी प्रार्थना करून उपवास करावा. 'ॐ नमो नारायणाय' या मंत्राचा जप करावा. नदीतील पवित्र माती हातात धरून मंत्र म्हणावा,

**धारणं पोषणं त्वत्त्वो भूतानां देवि सर्वदा ।**
**तेन सत्येन मे पापं यावन्मोचय सुव्रते ।।**
**ब्रह्माण्डोदरतीर्थानि त्वया स्पृष्टानि काश्यपि ।**
**तेनेमां मृत्तिकां त्वत्तो गृह्य स्थास्येऽद्य मेदिनी ।।**

(३९.३५, ३७)

'देवी, सर्व प्राण्याचं धारण व पोषण सर्वस्वी तुझ्यावर अवलंबून आहे. सुव्रते, हे जर सत्य असेल तर माझ्या सर्व पापांना तू दूर कर. कश्यपतनये, या ब्रह्मांडात जितकी तीर्थं असतील ती सर्व तुझ्यामुळं आहेत. त्या सर्वांना तूच आपल्या पाठीवर घेतलं आहेस. भगवती पृथ्वी, या भावानं मी ही मृत्तिका धारण करीत आहे.'

अशीच प्रार्थना वरुणास करावी. माती व जल यांना शिरावर धारण करावे. उरलेली मृत्तिका सर्व अंगास लावावी. फिरून वरुणाचा खालील मंत्र म्हणून विधिपूर्वक स्नान करावे.

**त्वयि सर्वे रसा नित्याः स्थिता वरुणा सर्वदा ।**
**तैरियं मृत्तिका प्लाव्य पूतां कुरु च मां चिरम् ।।**
(३९.३५, ३८)

'महाभाग वरुणा, आपणांत सर्व रस विद्यमान असतात. त्यांनी या मृत्तिकेस ओलसर करून मला पवित्र करण्याची कृपा करावी.'

स्नान केल्यानंतर संध्यातर्पण करून देवालयात जावे. तेथे लक्ष्मी-सहित भगवान नारायणांची षोडशोपचारे विधिपूर्वक पूजा करावी. केशव, दामोदर, नृसिंह, श्रीवत्सचिन्हधारी, कौस्तुभमणिधारी, लक्ष्मी-पती, सर्वात्मा श्रीहरी, रथचक्रधारी, कल्याणकारी, गंभीरस्वरूप, शांतिस्वरूप भगवानांना प्रणाम करावा. त्यानंतर जलपूर्ण असे चार कलश स्थापन करावेत. त्यांवर तिळांनी भरलेली पात्र ठेवावे. त्यात भगवान जनार्दनांची मत्स्याकार सुवर्णप्रतिमा स्थापन करावी. गंध, पुष्प, धूप, दीप, वस्त्र, नैवेद्य इत्यादींनी पूजा करावी. नंतर स्वतःच्या उद्धारासाठी प्रार्थना करावी. रात्री जागरण करावे. सकाळी कलशांचे दान ब्राह्मणांना करावे. भगवान विष्णूंचे पूजन करावे. शक्तीस अनु-सरून ब्राह्मणांना भोजन द्यावे. दक्षिणा द्यावी. जो पुरुष असे द्वादशीव्रत करील तो ब्रह्मलोकास जाईल.

## कूर्मद्वादशीव्रत

पौषमासात कूर्मद्वादशीचे व्रत करावे. याच मासात देवांनी अमृत-समुद्रमंथन करून प्राप्त केले होते. पौषातील दशमीस प्रभूंनी कूर्मरूप धारण केले. दशमीस स्नान करून जनार्दनांची आराधना करावी. 'ॐ कूर्माय नमः', 'ॐ नारायणाय नमः', 'ॐ संकर्षणाय नमः', 'ॐ विशोकाय नमः', 'ॐ भवाय नमः', 'ॐ सुबाहवे नमः'' आणि 'ॐ विशालाय नमः', अशा मंत्रांनी भगवंतांच्या चरणांची, कटिभागाची, उदराची, वक्षःस्थळाची, कंठाची, भुजांची, शिराची, मनापासून पूजा

करावी. भगवान कूर्मांची सुवर्णमय प्रतिमा स्थापन करून त्यांची यथाविधि पूजा करावी.

## वराहद्वादशीव्रत

माघमासात शुक्लपक्षाच्या द्वादशीस भगवान पृथ्वीचा उद्धार करण्यासाठी वराहाच्या रूपात अवतरले. अविनाशी प्रभूची पूजा चंदन, धूप, इत्यादींनी करावी. त्यांच्या समोर जलपूर्ण कलश ठेवावा. 'ॐ वराहाय नमः' म्हणून दोन चरणांची 'ॐ माधवाय नमः' म्हणून कटीची, 'ॐ क्षेत्राय नमः' म्हणून उदराची, 'ॐ विश्वरूपाय नमः' म्हणून हृदयाची, 'ॐ सर्वज्ञाय नमः' म्हणून कंठाची, 'ॐ प्रजानां पतये नमः' म्हणून शिराची, 'ॐ प्रद्युम्नाय नमः' म्हणून दोन भुजांची, 'ॐ दिव्यास्त्राय नमः' म्हणून चक्राची आणि 'ॐ अमृतोद्भवाय नमः' म्हणून शंखाची पूजा करावी. भगवान वराहांना कलशावर स्थापित करावे. कलश शुभ्र वस्त्राने आच्छादित करावा. त्यावर तांब्याचे पात्र असावे. मूर्तीची चंदन, फूल, नैवेद्य इत्यादी अर्पण करून अर्चना करावी. रात्री स्वतः इतरांबरोबर जागरण करावे. दुसऱ्या दिवशी प्रतिमा ब्राह्मणास अर्पण करावी. या व्रताच्या आचरणामुळे सुंदर भाग्य, लक्ष्मी, कांती व संतोष यांची प्राप्ती होईल. संतानहीनास पुत्र मिळेल. दारिद्र्य नाहीसे होईल.

या व्रताची एक प्राचीन कथाही दुर्वासांनी सांगितली. पूर्वी प्रतिष्ठानपुरात वीरधन्वा नावाचा एक राजा होऊन गेला. एकदा तो शिकार खेळण्यासाठी वनात गेला. त्याच वनात संवर्तऋषींचा आश्रम होता. मृगांना मारण्याच्या नादात राजाने अजाणता मृगरूपधारी पन्नास ब्राह्मणपुत्रांचाही वध केला. या ब्राह्मणांनी मृगांचा वेष का धारण केला होता? काही काळापूर्वी हे ब्राह्मण वनात आले. तेथे त्यांनी पांच हरिणांचे बच्चे पाहिले. त्यांचा जन्म नुकताच झाला असून त्यांना आई नव्हती. त्या ब्राह्मणांनी एक एक बच्च्यास उचलून आपल्या गुंफेत नेले. तेथे त्या शावकांचे प्राण समाप्त झाले. त्या सर्व ब्राह्मणांना अपार दुःख झाले. ते संवर्तमुनींपाशी आले. ते म्हणाले,

'मुने, पांच मृगशावकं आमच्या हातून मरण पावली आहेत. आता आम्हांस प्रायश्चित्त द्यावं.'

'पुत्रांनो, तुम्ही संयमशील बनून मृगचर्म अंगावर धारण करून वनात हिंडावं. तुम्ही शुद्ध व्हाल.'

मुनींच्या या उपदेशानुसार ते ब्राह्मण मृगचर्म धारण करून वनात हिंडत होते. पांच वर्षांनंतर वीरधन्व्याने यांचा वध केला. आपल्या हातून ब्राह्मण मरण पावलेले पाहून राजा त्वरित देवरातमुनींच्या आश्रमात गेला. सर्व वृत्तांत सांगून वीरधन्वा जोराने रडू लागला. तेव्हा त्याला ऋषींनी म्हटले, 'राजन्, रडू नकोस. मी तुझं पाप दूर करीन. पृथ्वीचा उद्धार करण्यासाठी भगवानांनी वराहरूपानं अवतार धारण केला, त्याचप्रमाणं ते प्रभू तुझाही उद्धार करतील.' राजाने विचारले, 'भगवान माझा कसा उद्धार करतील ?' तेव्हा मुनींनी राजास हे वराहद्वादशीचे व्रत सांगितले. या व्रताने वीरधन्वा पापमुक्त झाला.

## नृसिंहद्वादशीव्रत

फाल्गुनमासाच्या शुक्लपक्षाच्या द्वादशीस नृसिंहद्वादशी म्हणतात. या दिवशी उपवास करून भगवान श्रीहरींची आराधना करावी. 'ॐ नरसिंहाय नमः' म्हणून नृसिंहांच्या चरणांची, 'ॐ गोविंदाय नमः' म्हणून ऊरूंची, 'ॐ विश्वभुजे नमः' म्हणून कटिप्रदेशाची, 'ॐ अनिरुद्धाय नमः' म्हणून वक्षःस्थलाची, 'ॐ शितिकंठाय नमः' म्हणून कंठाची, 'ॐ पिंगकेशाय नमः' म्हणून शिरोभागाची, 'ॐ असुरध्वंसनाय नमः' म्हणून चक्राची व 'ॐ तोयात्मने नमः' म्हणून शंखाची चंदन, फूल, धूप इत्यादींनी पूजा करावी. त्यानंतर भगवानांना कलशावरील तांब्याच्या पात्रात ठेवावे. त्यात नृसिंहाची सुवर्णमयी मूर्ती ठेवावी. द्वादशीस पूजा झाल्यावर प्रतिमा वेदज्ञ ब्राह्मणास द्यावी.

या व्रताचे फल एका राजास मिळाले, ती कथा अशी. किंपुरुषवर्षात भारत नावाचा एक विख्यात धार्मिक राजा होता. त्याला वत्स नावाचा एक पुत्र होता. शत्रूंकडून पराजित होऊन तो आपल्या पत्नीसह पायीच वसिष्ठांच्या आश्रमात आला. एके दिवशी त्याला मुनींनी

विचारले,

'राजन्, तू कोणत्या प्रयोजनानं या आश्रमात आलास ?'

'भगवन्, शत्रूंनी माझा पराभव करून माझं राज्य घेतलं. मी असहाय बनून शरण आलो आहे. आपण आपल्या उपदेशानं माझं चित्त शांत करावं.'

हे ऐकून मुनींनी राजास नृसिंहद्वादशीचे व्रत विधिपूर्वक सांगितले. राजाने हे व्रत केल्यावर तो शत्रूंना पराभूत करू शकला. त्याने आपले राज्य परत मिळवले.

## वामनद्वादशीव्रत

चैत्रमासाच्या शुक्लपक्षातील द्वादशीस वामनद्वादशीव्रत असते. उपवास करून भगवान श्रीहरींची पूजा करावी. 'ॐ वामनाय नमः' म्हणून चरणांची, 'ॐ विष्णवे नमः' म्हणून कटिभागाची, 'ॐ वासुदेवाय नमः' म्हणून उदराची, 'ॐ संकर्षणाय नमः' म्हणून हृदयाची, 'ॐ विश्वभृते नमः' म्हणून कंठाची, 'ॐ व्योमरूपिणे नमः' म्हणून शिरोभागाची, 'ॐ विश्वजिते नमः' 'ॐ वामनाय नमः' म्हणून दोन भुजांची, 'पांचजन्याय नमः' म्हणून शंखाची व 'सुदर्शनाय नमः' म्हणून चक्राची पूजा करावी.

भगवानांच्या प्रतिमेस रत्नगर्भित कलशावर स्थापित करावे. वामनांची मूर्ती सुवर्णाची असावी. वामनांना यज्ञोपवीत अर्पण करावे. कमंडलू, छत्री, खडावा, कमलांची माला, आसन या वस्तू अर्पण कराव्यात. द्वादशीस या प्रतिमेचे दान ब्राह्मणास द्यावे. भगवान वामनांची प्रार्थना करावी, 'आपण चैत्रमासाच्या शुक्लपक्षातील द्वादशीस प्रकट झालात. आपण माझ्यावर प्रसन्न व्हावं.'

यासंबंधी एक लहानशी कथा आहे. पूर्वी हर्यश्व नावाचा एक राजा होता. त्याला पुत्र नव्हता. संतानप्राप्तीसाठी त्याने तपश्चर्या केली. भगवान ब्राह्मणाचा वेष धारण करून प्रकट झाले. त्यांनी राजाला वामनद्वादशीचे व्रत करण्यास सांगितले. राजाने या व्रताचे अनुष्ठान

केले. यामुळे राजास उग्राश्व नावाचा पुत्र झाला. तो मोठा चक्रवर्ती सम्राट झाला.

## जामदग्न्यद्वादशीव्रत

वैशाखमासाच्या शुक्लपक्षाच्या द्वादशीस परशुरामद्वादशीचे व्रत करावे. संकल्प करून मृत्तिका लावून स्नान करावे. मंदिरात जाऊन श्रीहरी परशुरामांची पूजा 'ॐ जामदग्न्याय नमः' म्हणून चरणांची, 'ॐ सर्वधारिणे नमः' म्हणून उदराची, 'ॐ मधुसूदनाय नमः' म्हणून कटिप्रदेशाची, 'ॐ श्रीवत्सधारिणे नमः' म्हणून मांड्यांची, 'ॐ क्षत्रान्तकाय नमः' म्हणून भुजांची, 'ॐ शितिकंठाय नमः' म्हणून कंठाची, 'ॐ पांचजन्याय नमः' म्हणून शंखाची, 'ॐ सुदर्शनाय नमः' म्हणून चक्राची आणि 'ॐ ब्रह्मांडधारिणे नमः' म्हणून शिराची पूजा करावी. कलशावर भगवान परशुरामांची मूर्ती स्थापन करावी. पुष्प, चंदन, अर्घ्य इत्यादी उपचारांनी तिची पूजा करावी. रात्री भक्तिपूर्वक जागरण करावे. प्रातःकाली सूर्योदय झाल्यावर प्रतिमेचे दान ब्राह्मणास करावे.

या व्रताचीही एक कथा आहे. वीरसेन नावाचा एक पराक्रमी व भाग्यशाली राजा होता. तो पुत्रप्राप्तीसाठी तपस्या करू लागला. त्याच्या जवळच महर्षी याज्ञवल्क्य यांचा आश्रम होता, एकदा ते त्याला पाहाण्यासाठी आले. तेजस्वी ऋषी येत आहेत असे पाहून वीरसेन हात जोडून उभा राहिला. याज्ञवल्क्य त्याला म्हणाले,

'धर्मज्ञ राजन्, तुझ्या तपाचा काय उद्देश आहे ?'

'महर्षे, मी पुत्रहीन आहे. संतानप्राप्तीसाठी मी शरीरास सुकवीत आहे.'

'राजन्, तपस्येत मोठे क्लेश असतात. म्हणून तू ही सोडून दे. मी तुला पुत्रप्राप्तीसाठी एक साधा व सरळ उपाय सांगतो.'

त्यांनी त्याला वैशाखातील परशुरामद्वादशीचे व्रत सांगितले. वीरसेनाने विधिपूर्वक हे व्रत केले. फलस्वरूप त्याला नळ नावाचा एक धार्मिक पुत्र झाला. त्याची कीर्ती पुण्यश्लोक म्हणून सर्व जगतात झाली. या व्रतामुळे पुत्र, विद्या, श्री, परलोकातील सुख यांची प्राप्ती होते.

## श्रीराम व श्रीकृष्णद्वादशीव्रत

ज्येष्ठमासाच्या शुक्लपक्षातील द्वादशीस श्रीरामद्वादशी म्हणतात. संकल्प करून श्रीरामांची पूजा करावी. 'ॐ रामाभिरामाय नमः' म्हणून भगवानांच्या दोनही चरणांची, 'ॐ त्रिविक्रमाय नमः' म्हणून कटीची, 'ॐ घृतविश्वाय नमः' म्हणून उदराची, 'ॐ संवत्सराय नमः' म्हणून हृदयाची, 'ॐ संवर्तकाय नमः' म्हणून कंठाची, 'ॐ सर्वास्त्रधारिणे नमः' म्हणून भुजांची, 'ॐ पांचजन्याय नमः' ने शंखाची, 'ॐ सुदर्शनचक्राय-नमः' ने चक्राची आणि 'ॐ सहस्रशिरसे नमः' म्हणून शिराची पूजा करावी. कलशात राम व लक्ष्मण यांच्या सुवर्णप्रतिमा स्थापन कराव्यात. विधिपूर्वक त्यांचे पूजन करावे.

पुत्र नसल्याने महाराज दशरथाने वसिष्ठांच्या सांगण्यावरून या व्रताचे अनुष्ठान केले होते. फलरूपाने त्यांना शक्तिशाली राम पुत्ररूपाने प्राप्त झाले. हे व्रत करणारा चिरंतन स्वर्गात राहातो. त्याची सर्व पापे नष्ट होतात.

अशाच रीतीने आषाढमासाच्या शुक्लपक्षाच्या द्वादशीस श्रीकृष्ण-द्वादशीव्रत म्हणतात. व्रत करणाऱ्या पुरुषाने 'ॐ चक्रपाणये नमः', 'ॐ भूपतये नमः', 'ॐ पांचजन्याय नमः', 'ॐ सुदर्शनाय नमः', 'ॐ पुरुषाय नमः' म्हणून श्रीकृष्णांच्या क्रमशः भुजा, कंठ, शंख, चक्र आणि शिर यांचे पूजन करावे. कलश स्थापन करून श्रीकृष्णांची चतुर्व्यूहरूपात सुवर्णमूर्तीची स्थापना करावी. चंदन, पुष्पे यांनी पूजा करावी. नंतर ती प्रतिमा वेदपाठी ब्राह्मणास दान करावी.

यदुवंशात वसुदेव नावाचा एक कुशल पुरुष होता. त्याच्या पत्नीचे नाव देवकी. त्यांना पुत्र नव्हता. त्यांना एकदा नारद भेटले. नारदांची त्यांनी मनोभावे पूजा केली. त्यांच्या सांगण्यावरून त्या पति-पत्नींनी द्वादशीव्रत केले. तेव्हा त्या यदुश्रेष्ठास विशाल वैभव प्राप्त झाले. जीवनात सुखभोग प्राप्त झाले.

## बुद्धद्वादशीव्रत

श्रावणमासाच्या शुक्लपक्षाच्या द्वादशीस बुद्धव्रत करावे. चंदन व

फुले यांनी श्रीहरींची पूजा करावी. 'ॐ दामोदराय नमः', 'ॐ हृषीकेशाय नमः', 'ॐ सनातनाय नमः', 'ॐ श्रीवत्सधारिणे नमः', 'ॐ चक्रपाणये नमः', 'ॐ हरये नमः', 'ॐ मंजुकेशाय नमः' आणि 'ॐ भद्राय नमः' या मंत्रांनी क्रमशः भगवान बुद्धरूपी श्रीहरींच्या चरणांची, कटीची, उदराची, छातीची, भुजांची, कंठाची, शिराची व शिखेची अर्चना करावी. कलश स्थापन करून तो वस्त्राने आच्छादित करावा. भगवान श्रीहरींची सुवर्णमयी प्रतिमा स्थापन करून विधिवत तिचे पूजन करावे. नंतर वेदगामी ब्राह्मणास ती प्रतिमा देऊन टाकावी.

प्राचीन काळातील प्रसंग आहे. सत्ययुगात नृग नावाचा एक तापी नरेश होता. त्याला शिकारीची मोठी हौस होती. तो नेहमी गहन अरण्यातून भटकायचा. असाच एकदा तो घोड्यावर स्वार होऊन वनात खूप दूरपर्यंत गेला. तेथे वाघ, सिंह, हत्ती, सर्प, डाकू यांचा निवास होता. राजा नृगाच्या साह्यासही कोणी नव्हते. तो घोडा दूर ठेवून एका वृक्षाखाली विश्रांती घेत असता झोपी गेला. एवढ्यात रात्र झाली. चौदा हजार व्याध मृगांच्या शिकारीसाठी त्या वनात आले. राजा झोपलेला व्याधांनी पाहिला. त्याचे शरीर सुवर्णाने व रत्नांनी शोभत होते. त्या व्याधांनी ही वार्ता आपल्या सरदारास दिली. सुवर्णाच्या लोभाने सरदार नृगाला मारण्यासाठी उत्सुक बनला. झोपलेल्या राजाकडे हात तलवार घेऊन ते राजापाशी आले.

एवढ्यात राजाच्या शरीरातून चंदनमाल्यादींनी विभूषित अशी एक स्त्री प्रकट झाली. तिने चक्र धारण करून सर्व व्याधांना ठार केले. नंतर ती स्त्री पुन्हा राजाच्या शरीरात विलीन झाली. एवढ्या वेळात राजाची झोप संपली. म्लेच्छ नष्ट झालेले, देवी आपल्या शरीरात प्रवेश करीत आहे, असे त्याने पाहिले. तो राजा तसाच वामदेवांच्या आश्रमात गेला. त्याने त्यांना भक्तिपूर्वक वंदन करून म्हटले,

'भगवन्, ही स्त्री कोण होती ? मरण पावलेले व्याध कोण होते ?'

'राजन्, यापूर्वी तुझा जन्म शूद्रजातीत झाला होता. त्या वेळी ब्राह्मणांच्या मुखातून तू श्रावणमासातील शुक्लद्वादशीचं अनुष्ठान ऐकलं होतंस. त्या दिवशी मोठ्या श्रद्धेनं तू उपवास केला होतास. अनघा,

त्याचा परिणाम असा झाला की, या जन्मी तुला राज्यपद प्राप्त झालं. ती द्वादशीदेवी तुला प्रसन्न आहे. तिनंच या व्याधांना नाहीसं केलं. श्रावणमासातील ही द्वादशी तुझी रक्षिका आहे. हिच्या कृपेनंच तुला राज्य सुलभ आहे.'

## कल्किद्वादशीव्रत

भाद्रपदमासाच्या शुक्लपक्षातील एकादशीस कल्किव्रत करावे. विधिपूर्वक संकल्प करून देवाधिदेव भगवान श्रीहरींची अर्चना करावी. 'ॐ कल्कये नमः', 'ॐ हृषीकेशाय नमः', 'ॐ म्लेच्छविध्वंसनाय नमः', 'ॐ शितिकंठाय नमः', 'ॐ खड्गपाणये नमः', 'ॐ चतुर्भुजाय नमः' आणि 'ॐ विश्वमूर्तये नमः' अशा मंत्रांनी भगवान कल्कींच्या चरणांची, कमरेची, उदराची, कंठाची, भुजांची, हातांची व शिराची पूजा करावी. कलशाची स्थापना करून त्यावर कल्कींची सुवर्णप्रतिमा स्थापन करावी. चंदन, पुष्पे यांनी तिची पूजा करावी. प्रातःकाली ती शास्त्रज्ञात्या ब्राह्मणास दान करावी.

या व्रताचीही एक कथा आहे. काशीपुरीस एक विशाल नावाचा पराक्रमी राजा होता. एकदा त्याच्या गोत्रातील व्यक्तींनी त्याचे राज्य हिरावून घेतले. नंतर तो गंधमादनपर्वतावरील पवित्र अशा बदरीवनात तप करू लागला. अशा वेळी श्रीनरनारायण नावाचे प्रसिद्ध ऋषी तेथे आले. या दोन देवांनी राजा विशालास पाहिले. त्यांनी प्रसन्न होऊन राजास म्हटले,

'राजेंद्रा, आम्ही तुला वर देण्यासाठी आलो आहोत. तुला काय हवंय ?'

'आपण दोघं कोण आहात, हे मी जाणत नाही. मग वर कुणास मागू ? मी ज्यांची आराधना करीत आहे, त्यांनीच मला वर देण्याची कृपा करावी.'

'राजन्, तू कुणाची आराधना करतोस ? तुला काय हवंय ?'

'मी भगवान विष्णूंची आराधना करतो.'

'त्याच देवेश्वरांच्या कृपेनं आम्ही वर देण्यासाठी आलो आहोत.

तुझी अभिलाषा काय आहे ?'

'मी यज्ञ करून यज्ञेश्वरांची उपासना करतो. आपण वर देऊन ती पूर्ण करावी.'

त्यानंतर नराने त्याला म्हटले, 'हे भगवान नारायण आहेत. माझ्यासह हे वदरीवनात आले आहेत. यांनीच अवतार धारण केले. म्हणून लोक यांची उपासना करतात.' असे म्हणून मुनिवर नराने राजा विशालास श्रीहरींच्या द्वादशीचे व्रत सांगितले. राजाने ते मनोभावे केले. फलरूपाने तो चक्रवर्ती राजा झाला. या वनास त्याच्या नावाने बदरी-विशाल हे नाव पडले.

## पद्मनाभद्वादशीव्रत

आश्विनमासाच्या शुक्लपक्षातील द्वादशीस हे व्रत करतात. पद्मनाभ भगवानांची अर्चना या व्रतात असते. 'ॐ पद्मनाभाय नमः', 'ॐ पद्मयोनये नमः', 'ॐ सर्वदेवाय नमः', 'ॐ पुष्कराक्षाय नमः', 'ॐ अव्ययाय नमः', 'ॐ प्रभवाय नमः' अशा मंत्रांनी भगवानांच्या चरणांची, कटिभागाची, उदराची, हृदयाची, हाताची, शिराची पूजा करावी. 'सुदर्शनाय नमः', आणि 'कौमदक्यै नमः' म्हणून आयुधांची पूजा करावी. कलशात पद्मनाभाची सुवर्णप्रतिमा ठेवून चंदन, पुष्पे यांनी तिचे पूजन करावे.

पूर्वी सत्ययुगात भद्राश्व नावाचा एक शक्तिशाली राजा होता. त्याच्याच नावाने भद्राश्ववर्ष प्रसिद्ध झाले. एकदा अगस्त्यमुनी त्याच्या घरी आले आणि म्हणाले, 'राजन्, मी सात रात्र तुझ्या घरी निवास करणार आहे.' तेव्हा राजाने नमस्कार करून म्हटले, 'आपण अगत्यानं माझ्या घरी राहावं.' राजा भद्राश्वाच्या सुंदरीचे नाव कांतिमती होते. बारा सूर्यांसारखे तिचे तेज होते. अशा राजास पांचशे सुंदर राण्या होत्या. पण कांतिमती त्याची पट्टराणी होती.

एकदा या राणीवर अगस्त्यांची दृष्टी पडली. तिच्या सवतींनाही त्यांनी पाहिले, राणीला पाहून अगस्त्य आनंदाने म्हणाले, 'राजन्, तू धन्य आहेस.' मुनींनी राजा भद्राश्वाची स्तुती केली. त्या नरेशाने मुनींना

विचारले,

'ब्रह्मन्, आपणांस एवढा हर्ष का झाला आहे? आपण असे नाचत का आहात?'

'राजन्, मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे. तू किती अज्ञानी आहेस? तुझे मंत्री, पुरोहित सर्वच अज्ञानी दिसतात.'

'ब्रह्मन्', राजाने हात जोडून म्हटले, 'आपण काय म्हणता ते समजत नाही. आपण कृपा करून सर्व समजावून सांगावं.'

अगस्त्यांनी या पट्टराणीची सर्व हकीगत सांगितली. ही राणी पूर्वजन्मी हरिदत्त नावाच्या एका वैश्याचे घरी दासीचे काम करीत होती. त्या वेळी राजाच तिचा पती होता. तोही तेथे सेवेकरी होता. एकदा आश्विनामधील द्वादशीचे व्रत हा वैश्य करीत होता. त्याने मंदिरात जाऊन भगवंताची पूजा केली. त्यावेळी हे दोघे वैश्याच्या सुरक्षेसाठी तेथे होते. पूजा होताच वैश्य घरी निघून गेला. दीपक विझले नव्हते, म्हणून ते दोघे राजाच्या तेथेच राहिले. ते पूर्ण एक रात्र जागले. त्यांनी दिव्यांची देखभाल केली. ते तेथून बाहेर पडलेच नाहीत. आयुष्य समाप्त होताच त्या स्त्री-पुरुषांचा मृत्यू तेथेच झाला. या पुण्याने पुरुषाचा जन्म राजा प्रियव्रताच्या घरी झाला. आणि त्याची पत्नी ही दासी झाली. मंदिरातील दीपक फक्त प्रज्वलित ठेवण्याचे हे असे फल मिळत राहिले. एवढे सांगून अगस्त्य म्हणाले,

'म्हणून राजा, मी तुला धन्य म्हटलं.'

कलियुगात 'नमो नारायणाय' म्हणूनच सर्व काही फळ प्राप्त होते. राजा भद्राश्वास अगस्त्यांनी म्हटले, 'राजन्, आता कार्तिकी पूर्णिमेचं पर्व आलं आहे. मी पुष्करक्षेत्री जात आहे' असे म्हणून, राजाला द्वादशीव्रताचा उपदेश करून ते निघून गेले. पद्मनाभद्वादशीचे व्रत करून राजा पुत्रपौत्र आणि उत्तम भोग यांनी समृद्ध झाला.

## धरणीव्रत

पन्नासाव्या अध्यायात राजा भद्राश्वास अगस्त्यांनी धरणीव्रताचा महिमा सांगितला. कार्तिकमासात हे व्रत द्वादशीस करावे.

संकल्पपूर्वक स्नान करून भगवानांची पूजा करावी. 'ॐ सहस्रशिरसे नमः', 'ॐ पुरुषाय नमः', 'ॐ विश्वरूपिणे नमः', 'ॐ ज्ञानास्त्राय नमः', 'ॐ श्रीवत्साय नमः', 'ॐ जगद्ग्रसिष्णवे नमः', 'ॐ दिव्यमूर्तये नमः', आणि 'ॐ सहस्रपादाय नमः'; या मंत्रांनी श्रीहरींच्या, शिराचे, भुजांचे, कंठाचे, अस्त्राचे, हृदयाचे, उदराचे, कटिभागाचे आणि चरणांचे पूजन करावे.

प्रतिमेच्या पुढे चार कलश ठेवून, त्यांत रत्ने टाकून, त्यांना चंदन व पुष्पमाला समर्पून श्वेत वस्त्राने आवेष्टित करावे, त्यांवर तिलपूर्ण ताम्रपात्र ठेवावे. त्यांत चारही समुद्रांची कल्पना करावी. मध्यभागी भगवान श्रीहरींची प्रतिमा स्थापावी. त्यांची विधिवत पूजा करून सर्व रात्र जागरण करावे. कलश ब्राह्मणांना दान द्यावेत. असे दान करून द्वादशीस भगवान विष्णूंची पूजा करावी. ब्राह्मणांना भोजन द्यावे, दक्षिणा द्यावी.

असे हे धरणीव्रत पूर्वी दक्षप्रजापतीने केले होते. त्यास प्रजापति-पद मिळालं. शेवटी तो मुक्त होऊन श्रीहरींत लीन झाला. हैहयवंशी कृतवीर्यानेही हे व्रत केले होते. त्याला कार्तवीर्य नावाचा प्रभावी पुत्र झाला. शकुंतलेनेही हे व्रत केले होते. त्यामुळे ती भरताची माता झाली. अगदी प्राचीन काळी पाताळात डुबलेल्या पृथ्वीनेही हे उत्तम व्रत केले होते. म्हणूनच यास धरणीव्रत असे नाव प्राप्त झाले. याच व्रताच्या प्रभावाने श्रीहरींनी वराहरूप धारण करून पृथ्वीचा उद्धार केला.

## उत्तम पतिप्राप्तीसाठी साधनस्वरूप व्रत

राजा भद्राश्वाने विचारल्यावरून अगस्त्यांनी या आणखी एका व्रताची महती सांगितली. महात्मा नारदांनी हे भगवान विष्णूंचे व्रत अप्सरांना सांगितले होते. या व्रताच्या साधनेमुळे भगवान श्रीहरी उत्तम वराची प्राप्ती करून देतात. चैत्र आणि वैशाख मासांतील द्वादशीतिथीस हे व्रत करावे. रात्री विधिवत भगवानांची पूजा करावी. नृत्य, गीत, जागरण करावे.

'ॐ भवाय नमः', 'ॐ अनंगाय नमः,' 'ॐ कामाय नमः';

'ॐ सुशास्त्राय नमः', 'ॐ मन्मथाय नमः', 'ॐ हरये नमः' या मंत्रांनी शिराचे, कटीचे, भुजांचे, उदराचे, चरणांचे पूजन करावे. प्रातःकाळी भगवानांची प्रतिमा वेदज्ञ ब्राह्मणास दान करावी. उसाचा पवित्र रस, मल्लिकेची फुले यांनी देवेश्वरांचे पूजन करावे. असे सांगून नारद अप्सरांना म्हणाले, 'अप्सरांनो, तुम्ही मला प्रणाम न करता प्रश्न केलात म्हणून अष्टावक्राकडून तुम्हांस शापही मिळेल. गोपलोक तुमचं हरण करतील.' यानुसार अप्सरांनी व्रताचा विधी केला. स्वतः भगवान श्रीहरी त्यांचे पती झाले.

## शुभव्रताचा महिमा

पंचावन्नाव्या अध्यायात अगस्त्यांनी सांगितलेला कुब्जाम्रश्वर-ऋषिकेशमाहात्म्याच्या संदर्भात शुभव्रताचा महिमा आला आहे. या व्रताने श्रीविष्णूंचे दर्शन सुलभ होते. मार्गशीर्ष मासाच्या प्रथमदिनी या व्रताचा प्रारंभ होतो. दशमीस एकदाच भोजन करावे. या दिवशी स्नान करून विष्णूंची पूजा करावी. एकादशीस उपवास करून ब्राह्मणांना यथाविधी यवदान करावे. दान, होम, अर्चना करून भगवान श्रीहरींचे नामसंकीर्तन करावे. मार्गशीर्ष, पौष, माघ व फाल्गुन या चार महिन्यांत अशाच नियमांचे पालन करावे. चैत्र, वैशाख, ज्येष्ठ व आषाढ या चार मासांत असेच संयमपूर्वक व्रत करावे. या चार मासांत ब्राह्मणांना सातूचे दान करावे. श्रावण, भाद्रपद व आश्विन या तीन महिन्यांत मार्गशीर्षात तयार होणाऱ्या धान्याच्या दानाचे विधान करावे.

एकादशीस पर्वत व पातालरूपाने अंकित अशा पृथ्वीची सुवर्ण-प्रतिमा पुजून तिचे दान करावे. भगवान श्रीहरींसमोर ही प्रतिमा स्थापन करावी. रात्री जागरण करावे. प्रातःकाली चोवीस ब्राह्मणांना बोलावून प्रत्येक ब्राह्मणास गाय, दोन वस्त्रे, सोन्याची अंगठी, कुंडले आदींचे दान करावे. व्रती राजा असेल तर त्याने ब्राह्मणास सुवर्णमयी पृथ्वीच्या प्रतिमेचे, दोन गायींचे, दोन वस्त्रांचे दान करावे. निमंत्रित ब्राह्मणांना भोजन, छत्री व खडावा यांचे दान द्यावे. त्यानंतर भगवानांची प्रार्थना करावी.

या व्रतासंबंधी एक कथाप्रसंग आहे. सत्ययुगात एक ब्रह्मवादी राजा होता. त्याने ब्रह्मदेवांना पुत्रप्राप्तीसाठी उपाय विचारला. तेव्हा ब्रह्मदेवांनी त्याला हे व्रत करण्यास सांगितले. व्रत समाप्त होताच राजास विश्वात्मा श्रीहरींनी म्हटले, 'राजन्, एक वर माग.' त्या वेळी राजा म्हणाला, 'देवेशा, सर्व वैदिक मंत्रांना जाणणारा, यज्ञ करणारा, कीर्ति-संपन्न, दीर्घायू, गुणयुक्त असा एक पुत्र देण्याची कृपा करावी.' यावर श्रीहरींनी 'तथास्तु' म्हटले. राजास एक पुत्र झाला. त्याचे नाव वत्सश्री होते. तो वेदवेदांगाचा ज्ञाता होता, पुत्रप्राप्ती झाल्यावर राजाने हिमालयात जाऊन भगवान विष्णूंची आराधना करताना म्हटले,

'क्षर व अक्षररूप आपणच आहात. आपण क्षीरसागरात शयन करता. देहधारीयांना आपण परमपद आहात. आपण भक्तांचा हेतू पूर्ण करता. आपण मत्स्य, कूर्म, वराह, नरसिंहादी नामांनी संबोधित होता. आपणच यज्ञपुरुष आहात. पशू, ऋत्विक, घृत; ही सर्व आपलीच रूपं आहेत. कमलनेत्रा, मी आपणांस शरण आलो आहे. माझा उद्धार करावा, अशी विनंती आहे.'

स्तुतीने भगवंत प्रसन्न झाले. एका कुबड्या ब्राह्मणाचा वेष धारण करून ते तेथे प्रकट झाले. ते येताच तो आम्रवृक्ष तसाच कुबडा झाला. राजाने ब्राह्मणवेषधारी प्रभूंना प्रणाम केला. त्याने म्हटले, 'भगवन्, आपण माझ्यावर कृपा करण्यासाठी इथं आला आहात. आपल्या वास्तविक स्वरूपाचं दर्शन मला घडवावं.' राजाने असे म्हणताच भगवंत शंख, चक्र, गदा धारण करून सौम्य रूपात विराजमान झाले व त्यांनी म्हटले,

'राजन्, तुझ्या मनात जे असेल ते माग.'

'देवा, आपण मला मोक्ष देण्याची कृपा करावी.'

'राजा, मी इथं आल्यानं हा विशाल आम्रवृक्ष कुबडा झाला आहे. म्हणून हे स्थान कुब्जाम्रक या नावानं प्रसिद्ध होईल. इथं शरीराचा त्याग केल्यास पांचशे दिव्य विमानं येतील आणि योग्यांना मुक्ती देतील.'

असे म्हणून जनार्दनांनी शंखाच्या अग्रभागाने राजास स्पर्श केला.

लागलीच त्या राजास निर्वाणपद प्राप्त झाले. जो मनुष्य या चरित्राचे पठण वा श्रवण करील त्याला भगवान श्रीहरी धर्म व मोक्ष देतील. जो या शुभव्रताचे आचरण करील, तो सुखसंपत्ती, भोग यांना प्राप्त करून शेवटी भगवंतात लीन होईल.

## धन्यव्रत

असेच आणखी एक धन्यव्रत नावाचे उत्तम व्रत अगस्त्यांनी राजाला सांगितले. हे एक नक्तव्रत आहे. मार्गशीर्षाच्या शुक्लपक्षात प्रतिपदेस हे व्रत करतात. या व्रतात अग्निस्वरूप विष्णुभगवानांच्या पूजेचे विधान आहे. 'ॐ वैश्वानराय नमः', 'ॐ अग्नये नमः', 'ॐ हविर्भुजाय नमः', 'ॐ द्रविणोदाय नमः', 'ॐ संवर्तताय नमः' आणि 'ॐ ज्वलनाय नमः' या मंत्रांचा उच्चार करून श्रीहरींचे चरण, उदर, वक्षःस्थल, भुजा, शिर व सर्वांग यांची क्रमाने पूजा करावी. हवन करावे. या व्रतात यवान्न व घृत यांनी युक्त भोजन करावे. हे व्रत कृष्णपक्षातही होते. चार महिने हे व्रत करावे. चैत्रापासून आषाढापर्यंत घृतयुक्त खीर व श्रावणापासून कार्तिकापर्यंत सातू यांचे भोजन करावे. व्रत पूर्ण झाले की, अग्निदेवांची सुवर्णमय प्रतिमा करून ती दोन लाल वस्त्रांनी आच्छादित करावी. लाल फुलांनी पूजा करावी. लाल चंदनाचे अनुलेपन करावे. नंतर ब्राह्मणाची पूजा करावी. वस्त्रांसह प्रतिमा त्याला दान करावी. या धन्यव्रताने केलेले कर्म धन्य होते. करणाऱ्यास सुखशांती मिळते. पूर्वी कुबेराचा जन्म शूद्र जातीत झाला होता. त्याने हे व्रत केल्यावर तो धनाचा स्वामी झाला.

## कांतिव्रत

हे व्रत पूर्वी चंद्राने केले होते. म्हणून त्याला कांती प्राप्त झाली. प्राचीन काळी दक्षप्रजापतीच्या शापाने चंद्रास राजयक्ष्मा नावाचा रोग झाला होता. त्याने हे व्रत केले व तो कांतिमान झाला. हेही एक नक्तव्रत आहे. कार्तिक महिन्याच्या शुक्लपक्षाच्या द्वितीयेस हे व्रत करतात. यात बलराम व कृष्ण यांची पूजा असते.' 'ॐ बलदेवाय नमः' म्हणून

चरणांची व 'ॐ केशवाय नमः' म्हणून शिराची पूजा करावी. अमृतस्वरूप अशा भगवानांची प्रार्थना करावी. चंद्राच्या रूपात येण्यासाठी त्यांना विनंती करावी. त्यांना नमस्कार करावा.

व्रती ब्राह्मणाने रात्री घृतयुक्त यवान्नाचे भोजन करावे. वर्ष पूर्ण झाले की, चंद्राची एक सुवर्णप्रतिमा तयार करावी. ती दोन शुभ्र वस्त्रांनी आच्छादित करावी. श्वेतचंदनाचे अनुलेपन करावे. ब्राह्मणाची पूजा करून ती प्रतिमा दान करावी. चंद्राची प्रार्थना करावी. पूर्वी स्वतः चंद्रानेच हे व्रत केले होते. भगवानांनी त्याचा रोग बरा करून त्याला अमृता* नावाची कला प्रदान केली. या दिवशी अश्विनीकुमारांसाठी कीर्तन करावे.

## सौभाग्यव्रत

या व्रताच्या आचरणाने मनुष्यास सौभाग्याची प्राप्ती होते. भाग्याचा उदय होतो. फाल्गुनमासाच्या शुक्लपक्षाच्या तृतीयेस नक्तव्रताने राहून उपवास करावा. या व्रतात लक्ष्मीसह श्रीहरींची, उमेसह भगवान शंकरांची पूजा करावी. जी लक्ष्मी तीच गिरिजा व जे श्रीहरी तेच शिव; अशी धारणा असावी. व्रतीने 'ॐ गम्भीराय नमः', 'ॐ सुभगाय नमः', 'ॐ देवदेवाय नमः', 'ॐ त्रिनेत्राय नमः', 'ॐ वाचस्पतये नमः', 'ॐ रुद्राय नमः' अशा मंत्रांनी क्रमशः दोन चरण, कटिभाग, उदर, मुख, शिर व सर्वांग यांची पूजा करावी. लक्ष्मीसहित विष्णूंची व गौरीसह शंकरांची पुष्पचंदनाने पूजा करावी. मध व घृत यांचे हवन करावे.

आपल्या शक्तीस अनुसरून पार्वतीशंकर व लक्ष्मीनारायण यांच्या सुवर्णप्रतिमा बनवाव्यात. त्या सत्पात्र ब्राह्मणास अर्पण कराव्यात. सहा पात्रांचेही दान करावे. ही पात्रे क्रमाने मध, घृत, तिळाचे तेल, गूळ, लवण, गायीचे दूध यांनी भरलेली असावीत. या पात्रांचे दान केल्याने

---

*'अमृता मानदा पूषा तृष्टिः पुष्टीरतिर्धृतिः। शशिनी चंद्रिका कांतिर्ज्योत्स्ना श्रीः प्रीतिरंगदा। पूर्णा पूर्णामृता कामदायिन्यः शशिनः कलाः' (शारदातिलक २.१२–१३) या वचनानुसार अमृता शुक्लपक्षातील द्वितीयेची चंद्रकला आहे.

स्त्री-पुरुष भाग्यशाली होतात.

### अविघ्नव्रत

या व्रताच्या आचरणाने मनुष्याची विघ्ने दूर होतात. फाल्गुन-मासाच्या चतुर्थीस उपवास करून रात्री भोजन करावे. प्रातःकाली तिळाचे हवन करावे. ब्राह्मणास तिळाचे दान करावे. पांचव्या महिन्यात, आषाढमासी चतुर्थीस गणेशाची सुवर्णमय प्रतिमा करून तिची पूजा करावी. नंतर ती खीर व तीळ यांनी भरलेल्या पात्रांसह ब्राह्मणास दान करावी. राजा सगराने हे व्रत केले होते. त्रिपुरासुराशी युद्ध करताना भगवान रुद्रांनी हे व्रत करून त्रिपुरासुराचा वध केला. अगस्त्यांनी समुद्रपानाच्या वेळी हे व्रत केले होते. 'ॐ शूराय नमः', 'ॐ धीराय नमः', 'ॐ गजाननाय नमः', 'ॐ लंबोदराय नमः', 'ॐ एकदंष्ट्राय नमः', इत्यादी मंत्रांनी पूजा करून हवन करावे. सर्व विघ्नांची बाधा दूर होते.

### शांतिव्रत

या व्रताच्या आचरणाने गृहस्थाच्या घरात सदा शांती निवास करते. कार्तिकमासाच्या शुक्लपक्षाच्या पंचमीपासून प्रारंभ करून एक वर्षपर्यंत उष्ण भोजनाचा त्याग करावा. प्रदोषकाली शेषशायी श्रीहरींची पूजा करावी. 'ॐ अनंताय नमः', 'ॐ वासुकये नमः', 'ॐ तक्षकाय नमः', 'ॐ कर्कोटकाय नमः', 'ॐ पद्माय नमः', 'ॐ महापद्माय नमः', 'ॐ शंखपालाय नमः', 'ॐ कुटिलाय नमः' या मंत्रांनी भगवान विष्णूंच्या शय्यारूप शेषनागाच्या दोन चरणांची, कटिभागाची, उदराची, छातीची, भुजांची, मुखाची व शिराची विधिपूर्वक पूजा करावी. नंतर भगवान विष्णूंना दुधाचे स्नान घालावे. भगवानांच्या समोर तिलमिश्रित दुधाचे हवन करावे. सुवर्णमय नागाची प्रतिमा ब्राह्मणास दान करावी. या व्रताने निश्चयाने शांती सुलभ होईल.

### कामव्रत

या व्रताच्या प्रभावाने मनात उत्पन्न झालेली कामना सिद्ध होईल.

हे व्रत पौषमासाच्या शुक्लपक्षात सुरू होऊन एक वर्षभर चालते. पंचमीस भोजन करून षष्ठीस फलाहार करावा. रात्री मौन धारण करून ब्राह्मणांसह शुद्ध भात खावा. सप्तमीस पारणे करावे. या व्रतात भगवान कार्तिकेयाची पूजा करून हवन करावे. षडानन, कार्तिकेय, सेनानी, कृतिकासुत, कुमार, स्कंद या नावांनी विष्णूच प्रतिष्ठित आहेत. व्रत समाप्त होताच ब्राह्मणास भोजन देऊन षण्मुखाची सुवर्णमय प्रतिमा द्यावी. प्रार्थना करावी, 'भगवान कार्तिकेय, आपल्या कृपेनं माझ्या सर्व कामना पूर्ण व्हाव्यात.' या व्रताने सर्व कामना पूर्ण होतील. संतानहीनास पुत्र, धनाची इच्छा करणाऱ्यास धन, राज्यहीनास राज्य यांची सुलभतेने प्राप्ती होईल. राजा नलाने या व्रताचे अधिष्ठान केले होते.

## आरोग्यव्रत

या व्रताने सर्व पापे नष्ट होतात. यात आदित्य, भास्कर, रवी, भानू, सूर्य, दिवाकर, प्रभाकर या सात नामांनी भगवान सूर्याची पूजा करावी. या व्रतात षष्ठीस भोजन करावे. सप्तमीस उपवास करून आदित्याचे पूजन करावे. अष्टमीस भोजन करावे. असे एक वर्षभर व्रत केल्यास आरोग्य, धन, धान्य यांची प्राप्ती होते.

प्राचीन काळातील हकीगत आहे. अनरण्य नावाचा एक महान प्रतापी राजा होता. त्याने हे व्रत करून भास्कराची पूजा केली होती. त्याच्यावर सूर्य प्रसन्न झाला व त्याने त्याला आरोग्य दिले. अगस्त्यांकडून ही हकीगत ऐकताना राजा भद्राश्वाने विचारले, 'राजास आरोग्य मिळालं हे खरं, पण तो रोगी कशानं झाला?' अगस्त्यांनी याही प्रश्नाचे उत्तर दिले. राजा अनरण्य अत्यंत रूपवान व यशस्वी होता. एकदा हा पराक्रमी राजा दिव्य मानससरोवराकडे गेला. येथे देवांचा निवास असतो. त्या सरोवरात एक श्वेतकमल होते. त्यावर एक अंगठ्याएवढा दिव्य तेजस्वी पुरुष बसला होता. त्याला दोन हात होते. तो लाल रंगाच्या वस्त्राने आच्छादित होता. या कमलास पाहून राजा सारथ्यास म्हणाला, 'प्रयत्न करून तू हे कमल घेऊन ये. मी जेव्हा या कमलास शिरोभागी धारण करीन तेव्हाच माझी प्रतिष्ठा राहील.'

राजाची आज्ञा होताच तो सारथी सरोवरात शिरला. तो कमलास स्पर्श करणार, एवढ्यात तेथे एक उच्च स्वरात हुंकार प्रकटला. त्याच्या प्रभावाने सारथी भयभीत झाला. तो जमिनीवर पडला. त्याचे प्राण निघून गेले. आणि राजा कुष्ठग्रस्त व बलहीन बनला. स्वत:ची अशी स्थिती पाहून राजा चिंताग्रस्त झाला. एवढ्यात ब्रह्मपुत्र वसिष्ठ तेथे आले. व त्यांनी राजा अनरण्यास विचारले,

'राजा, तू इथं कसा आलास ? तुझ्या शरीराची अशी दशा कशानं झाली ? मी तुला कोणती मदत करू ?'

वसिष्ठांची पृच्छा ऐकून राजाने कमलाचा वृत्तांत सांगितला. तो ऐकून वसिष्ठ म्हणाले,

'राजा, तू साधू होतास. पण तुझ्या मनात असाधुता आली. म्हणून तू कुष्ठरोगी झालास.' तेव्हा राजा म्हणाला, 'विप्रवर, मी असाधू कसा झालो ? मला हा रोग कसा झाला ?' त्यावर वसिष्ठ राजास म्हणाले, 'राजन्, या ब्रह्मोद्भव कमलाची तीन लोकांत प्रसिद्धी आहे. याच्या दर्शनाचा महिमाही मोठा आहे. याचं दर्शन घेऊन जलात पाय धुतले तर सर्व पापं नष्ट होतात. तो निर्वाणपदाचा अधिकारी होतो. जलात दिसणारी ब्रह्मदेवांची प्रारंभिक मूर्ती आहे. हिचं दर्शन होताच मुक्ती मिळते. तुझ्या सारथ्यानं या मूर्तीस घेण्याचा प्रयत्न केला. तुझ्याही मनात लोभ उत्पन्न झाला. तुझी बुद्धी नष्ट झाली. म्हणून तू असा कुष्ठरोगी बनलास. या कमलावर स्वत: भगवान श्रीहरी सूर्याचं रूप धारण करून विराजतात. हे सनातन परब्रह्म परमात्म्याचं रूप आहे. राजा, तू आरोग्यव्रत कर म्हणजे या रोगातून मुक्त होशील.

राजा या उपदेशानुसार प्रतिदिन त्या सरोवरापाशी जाऊन ब्रह्मदेवांचे दर्शन घेऊ लागला. तो थोड्याच अवधीत कुष्ठरोगापासून मुक्त झाला.

## पुत्रप्राप्तिव्रत

भाद्रपद* मासाच्या कृष्णपक्षाच्या अष्टमीस उपवासपूर्वक हे व्रत

* दक्षिण भारतात शालिवाहन शकानुसार हा महिना श्रावण असतो.

करावे. सप्तमीस संकल्प करून अष्टमीस श्रीहरींचे पूजन करावे. भगवान नारायण कृष्णरूप धारण करून मातेच्या मांडीवर वसले आहेत अशी धारणा धरावी. अष्टमीस प्रातःकाली भगवानांची अर्चना करावी. गोविंदांचे पूजन करून यव, तिल व घृत या हव्य पदार्थांचे हवन करावे. ब्राह्मणास दह्यासह भोजन देऊन दक्षिणा द्यावी. नंतर स्वतः भोजन करावे. पहिला घास उत्तम तिळांचा असावा. भोज्य पदार्थ स्निग्ध व सरस असावेत. साधकाने प्रतिमास हे व्रत करावे. यास कृष्णाष्टमीचे व्रतही म्हणतात.

प्राचीन काळी शूरसेन नावाचा एक प्रतापी राजा होता. त्याला पुत्र नव्हता. म्हणून त्याने हिमालयात जाऊन तपस्या केली. त्याला नंतर एक पुत्र झाला. त्याचे नाव वसुदेव होते. यानेही अनेक व्रते व यज्ञ केले. असे हे कृष्णाष्टमीचे व्रत. व्रत पूर्ण होताच ब्राह्मणास दोन वस्त्रे दान द्यावीत.

## शौर्य व सार्वभौमव्रत

शौर्यव्रताच्या आचरणाने अत्यंत भित्रा मनुष्यही पराक्रमी वनतो. आश्विनमासाच्या शुक्लपक्षाच्या नवमीस हे व्रत करावे. सप्तमीस संकल्प करावा. अष्टमीस भाताचा त्याग करावा. नवमीस पक्वान्न खावे. ब्राह्मणांना भक्तिपूर्वक भोजन द्यावे. या व्रतात महातेजस्वी, महाभागा, भगवती महामाया, दुर्गा हिचे पूजन करावे. एक वर्षभर हे व्रत करावे. व्रत समाप्त होताच शक्तीस अनुसरून कुमारिकांना भोजन द्यावे. सुवर्ण व वस्त्र यांनी त्यांना अलंकृत करावे. ती प्रसन्न व्हावी म्हणून तिची प्रार्थना करावी. या व्रताच्या प्रभावाने राज्यहीन राजास राज्याची प्राप्ती होते. मूर्खास विद्या, भित्र्या माणसास शौर्य प्राप्त होते.

सार्वभौम राजा होण्यासाठी एक सार्वभौम नावाचे व्रत आहे. कार्तिक मासाच्या शुक्लपक्षात दशमीस उपवास करावा. रात्री भोजन करावे. दहा दिशांना बळी द्यावा. फुलांनी श्रेष्ठ ब्राह्मणांची पूजा करावी. दिशांना सर्वार्थसिद्धीसाठी प्रार्थना करावी. रात्री दधिमिश्रित अन्नाचे भोजन करावे. प्रतिवर्ष हे व्रत केल्याने राजा दिग्विजयी होतो. मार्गशीर्ष

मासाच्या शुक्लपक्षाच्या एकादशीस निराहार राहून हे व्रत करणाऱ्यास धनाची प्राप्ती होते. हे एक महान असे व्रत आहे.

त्रयोदशीस व्रतस्थ राहून रात्री भोजन केल्यास धर्मव्रत होते. फाल्गुन शुद्ध त्रयोदशीस प्रारंभ करून फाल्गुन कृष्णपक्षाच्या चतुर्दशीस रौद्रव्रत करावे. माघमासात नक्तव्रत केले तर ते पितृव्रत होते.

## तिलधेनुदानाचे माहात्म्य

वराहपुराणात ज्याप्रमाणे विविध व्रतांचा परिचय आहे, त्याचप्रमाणे नाना प्रकारची माहात्म्येही आली आहेत. अध्याय क्र. ९९ ते ११० पर्यंत विविध धेनुमाहात्म्ये आहेत. पृथ्वीने एकदा वराहांना विचारले, 'भगवन्, ब्रह्मदेवांनी आठ भुजांची गायत्री निर्माण केली. तिनं चैत्रासुराचा वध केला. तिनंच नंदा नाम धारण करून महिषासुरास मारलं. हीच देवी वैष्णवी या नावानं विख्यात झाली.' यासंबंधीची सर्व हकीगत भगवान वराहांनी पृथ्वीस सांगितली. स्वायंभुवमन्वन्तरात याच देवीने महिषासुराचा व चैत्रासुराचा वध केला होता. देवी ज्ञानशक्ती आहे व महिषासुर मूर्तिमान अज्ञान आहे.

भगवान विष्णू देवांचेही देव आहेत. त्यांच्यासाठी केलेल्या यजनाने पुत्र व धन यांची प्राप्ती होते. दारिद्र्य व्याधी, कुष्ठादी रोग, पुत्राचा अभाव जाऊन मनुष्य धनवान, दीर्घायू, पुत्रवान होतो. याचे प्रधान कारण म्हणजे लक्ष्मीसहित भगवान नारायणांचे दर्शन होय. कार्तिकमासाच्या शुक्लपक्षाच्या द्वादशीस जो आचार्यदत्त मंत्राचा उच्चार करतो त्यावर श्रीहरी प्रसन्न होतात.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे तीन वर्ण भक्तीचे अधिकारी आहेत. जात, शौच (शुद्धता) व क्रिया आदींनी गुरूंची परीक्षा करावी. एक वर्षभर शिष्याने त्यांच्यावर भगवान विष्णूंची भावना करून अचल निष्ठा ठेवावी. त्यांना प्रार्थना करावी, 'आपल्या कृपेनं संसारसागर तरून जाण्याचं ज्ञान व्हावं.' गुरूंची पूजा विष्णूंप्रमाणे करावी. श्रद्धावान पुरुषाने कार्तिकाच्या शुक्ल दशमीस दुधाळ वृक्षाचे दंतकाष्ठ घेऊन तोंड

धुवावे. रात्री भोजन करून भगवान श्रीहरींच्या समोर झोपावे. रात्री जे स्वप्न पडेल ते गुरूंना निवेदन करावे. शुभाशुभ समजावून घ्यावे. एकादशीस उपवास करावा. स्नान करून व्रती पुरुषाने देवालयात जावे. तेथे निश्चित केलेल्या भूमीवर सोळा पाकळ्यांचे एक कमळ आणि आठ पानांचे एक कमळ तयार करून त्यावर देवांची स्थापना करावी. सर्वतोभद्र नावाचे चक्र तयार करावे. शिष्याने गुरूंच्या आज्ञेने मंडपात प्रवेश करावा. नऊ भागांच्या मंडलात क्रमशः पूर्व, अग्निकोण, दक्षिण, नैर्ऋत्य, पश्चिम, वायव्य, उत्तर व ईशान आदी दिशांना लोकपालसहित इंद्र, अग्निदेव, यमराज, निर्ऋती, वरुण, वायू, कुबेर, रुद्र यांची स्थापना करून पूजा करावी. मध्यभागी परम प्रभू श्रीविष्णूंची स्थापना करून त्यांची अर्चना करावी.

कमलाच्या पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर दिशांच्या पानांवर बलराम, प्रद्युम्न, अनिरुद्ध व वासुदेव यांची स्थापना करून पूजा करावी. ईशानकोणात शंखाची, अग्निकोणात चक्राची, दक्षिणेस गदेची व वायव्येस पद्माची स्थापना व पूजा करावी. ईशानकोणात मुसळाची, दक्षिणेस गरुडाची, वामभागात लक्ष्मीची स्थापना करून पूजा करावी. प्रधान देवासमोर धनुष्य व खड्ग यांची स्थापना करावी. नवदलात श्रीवत्स व कौस्तुभमणी यांची कल्पना करावी. आठ दिशांना आठ कलश स्थापन करून मध्यभागी विष्णुकलशाची स्थापना करावी. त्या कलशांवर आठ लोकपाल व भगवान विष्णू यांची स्थापना करून यांची विधिपूर्वक पूजा करावी. मुक्तीसाठी विष्णुकलशाने, लक्ष्मीसाठी इंद्रकलशाने, संतानासाठी अग्निकोणातील कलशाने, मृत्यूवर विजय मिळविण्यासाठी दक्षिणकलशाने, दुष्टांचे दमन करण्यासाठी निर्ऋतिकोणामधील कलशाने, शांतीसाठी वरुणकलशाने, पापनाशासाठी वायव्यकोणातील कलशाने, धनप्राप्तीसाठी उत्तरकलशाने, ज्ञानासाठी, लोकपाल पदासाठी रुद्रकलशाने स्नान करावे.

पूजेच्या शेवटी गुरूंच्या आज्ञेने सर्वांना प्रदक्षिणा करावी. गुरुदेवांनी शिष्याचे अंतःकरण शुद्ध करावे. त्याला दीक्षावचन ऐकवावे. अशा प्रकारे ब्राह्मण, वेद, विष्णू, ब्रह्मदेव, रुद्र, आदित्य, अग्नी, लोकपाल,

ग्रह, वैष्णवपुरुष व गुरू यांचा सन्मान केल्याने पुरुषास दीक्षाद्वारे शीघ्र सिद्धी प्राप्त होते. दीक्षेच्या शेवटी प्रज्वलित अग्नीत 'ॐ नमो भगवते सर्वरूपिणे हुं फट् स्वाहा' या सोळा अक्षरांच्या मंत्राने हवनविधी करावा. हवनानंतर दीक्षाप्राप्त शिष्याने गुरूसाठी हत्ती, घोडा, सुवर्ण, अन्न, गात्र इत्यादींना अर्पण करावे. शेवटी वराहपुराण ऐकावे, पुष्कर-तीर्थ, प्रयाग, गंगासागरसंगम, देवालय, कुरुक्षेत्र, वाराणसी, ग्रहण आणि विषुवयोग यांचे फल वराहपुराणश्रवणाने मिळते.

या संदर्भात अन्नदानाच्या विषयात वसिष्ठ व श्वेत यांच्या संवादाची एक कथाही भगवान वराहांनी पृथ्वीस सांगितली. इलावृत-वर्षात श्वेत नावाचा एक महान तपस्वी राजा होता. त्याने वृक्षांच्या वनांसहित पृथ्वीचे दान करण्यासाठी तपोनिधी वसिष्ठांना म्हटले, 'ब्रह्मन्, मी या पृथ्वीचं दान करू इच्छितो. आपण मला आज्ञा द्यावी.' त्यावर वसिष्ठ म्हणाले, 'राजन्, अन्न, सर्व काळी सुखदायक आहे. तू सदा अन्नदान करावंस. सर्व दानांत अन्नदानच श्रेष्ठ आहे.' पण राजा श्वेताने असे न करता अनेक हत्ती, घोडे, रत्ने, वस्त्रे, आभूषणे, धनधान्य, नगरे, धन यांचे दान ब्राह्मणांना दिले.

एकदा धर्माचा ज्ञाता राजा पुरोहित वसिष्ठांना म्हणाला, 'भगवन्, मी एक हजार अश्वमेध यज्ञ करू इच्छितो.' राजाने यज्ञ करून ब्राह्मणांना सोने, चांदी, रत्ने यांची दाने दिली. पण अन्न व जल यांचे दान दिले नाही. शेवटी राजा परलोकी गेला तेव्हा त्याला तहान व भूक लागली. म्हणून त्याने स्वर्ग सोडून श्वेतपर्वताकडे प्रयाण केले. त्याचे शरीर नष्ट झाले होते, तरी त्या भुकेलेल्या राजाने आपली हाडे एकत्रित करून चाटायला सुरुवात केली. तेव्हा वसिष्ठ त्याला म्हणाले,

'राजन्, तू स्वतःची हाडे का चाटतोस ?'

'भगवन्, मला क्षुधा त्रास देत आहे. पूर्वजन्मी मी अन्न व जल यांचं दान केलं नाही. म्हणून मला तहान व भूक लागली आहे.'

'राजेंद्रा, मी तुझ्यासाठी काय करू ? तुला जल व अन्न यांची तुच्छता वाटली. पण हेच दान सर्वोत्तम आहे.'

'मग आता माझी तृप्ती कशी होणार ? महामुने, आपणच

आता कृपा करावी.'

'अनघा, एक उपाय आहे. पूर्वकल्पात विनीताश्व नावाचा एक प्रसिद्ध राजा होता. त्यानं अनेक अश्वमेध यज्ञ केले. अनेक गायी, हत्ती, धन यांचं दान केलं. पण अन्नदान नाही केलं. त्यालाही स्वर्गात तुझ्या-सारखाच अनुभव आला. त्याला होता नावाच्या पुरोहितानं तिलधेनू, जलधेनू, घृतधेनू, रसधेनू, यांची दानं करायला सांगितली. तेव्हा त्यानं तिलधेनूचे माहात्म्य विचारलं. होतानं ते सांगितलं. चार कुडवांचं (पांव शेरांचं) एक प्रस्थ, अशा सोळा प्रस्थांच्या तिळांची धेनू करावी. चार प्रस्थांचा एक वत्स बनवावा. गायीचे नाक चंदनाचं असावं. जीभ गुळाची असावी. फुलं व आभूषणं यांनी तिला अलंकृत करावं. तिची शिंगं सोन्याची असावीत. कास व खुरंही सोन्याची असावीत. या तिलधेनूचं सर्वौषधीसहित दान करावं. दान करताना प्रार्थना करावी. 'तिलधेनू, तुझ्या कृपेनं मला जल व अन्न यांची समृद्धी व्हावी. माझी कामना पूर्ण करावी. माझा तुला नमस्कार असो.' अशा प्रार्थनेनं राजा, तिलधेनूचं दान करावं. सर्व कामना पूर्ण होतील. सर्व पातकांपासून मुक्तता होईल. गोमयानं मंडल बनवून गोचर्म* भूमीच्या आकाराच्या तिलधेनूचं दान करावं.'

## जलधेनू व रसधेनुदानविधी

पुरोहित होतांनी विनीताश्वास जलधेनूचे व रसधेनूचे माहात्म्य १००–१०१ व्या अध्यायांत सांगितले आहे. एखाद्या पवित्र दिवशी गोचर्माच्या एवढी भूमी गोमयाने सारवावी. मध्यभागी जल, कापूर, अगरू व चंदनयुक्त कलश स्थापन करावा. त्या कलशात जलधेनूची धारणा धरावी. दुसऱ्या एका कलशात वत्साची कल्पना करावी. मंत्र-पुष्पांनी युक्त असे एक वर्धनीपात्र घ्यावे. पूर्वोक्त कलशात दूर्वांकुर, जटामासी, उशीर (खशाची मुळे), कुष्ठ नावाची औषधी, शिलाजित,

* सप्तहस्तेन दण्डेन त्रिंशद्दण्डान्निवर्तनम् । दश तान्येव गोचर्म दत्वा स्वर्गे महीयते ।। सात हातांचा दंड, ३० दंडांचा निवर्तन व दहा निवर्तनांचे 'गोचर्म' मान असते.

नेत्रवाला, पवित्र पर्वताचे रेणू, आवळे, सरस, सप्त धान्य इत्यादी वस्तू टाकून त्याला पुष्पमालांनी सजवावे. नंतर चार दिशांना चार पात्रांची कल्पना करावी. एक पात्र घृताने, दुसरे दह्याने, तिसरे मधाने, चौथे साखरेने पूर्ण भरावे. या कल्पित कुंभमयी धेनूस सुवर्णमय मुख, तांब्याचे शृंग असावे. कुशांनी तिचे केस कल्पावेत. मूत्राने तिच्या शेपटाची कल्पना करावी. गुळाचे मुख, साखरेची जीभ समजावी. लोण्याचे स्तन कल्पावेत. उसाचे चरण असावेत. चंदन व फुले यांनी धेनूस सुशोभित करावे. काळ्या मृगचर्मावर तिला स्थापित करावे. चंदन व फुलांनी तिची पूजा करून ती वेदवेत्त्या ब्राह्मणास अर्पण करावी. या दानाने पुरुष सर्व पापांतून मुक्त होऊन विष्णुलोकात जातो. अश्वमेधयज्ञ व जलधेनुदान बरोबर मानले गेले आहेत.

आता 'रसधेनू'चे माहात्म्य पाहा. सारवलेल्या पवित्र भूमीवर मृगचर्म व कुश पसरून त्यांवर उसाच्या रसाने भरलेला घडा ठेवावा. शेजारी लहानसा कलश असावा. त्याच्या जवळ उसाची चार कांडे ठेवावीत. त्यांना धेनू समजून चांदीचे खूर, सोन्याची शिंगे लावावीत. आभूषणे चढवावीत. शेपटासाठी वस्त्र व स्तनांसाठी घृत समजावे. मुख व जीभ साखरेची असावीत. दातांच्या जागी फुले ठेवावीत. या रसधेनूची पाठ तांब्याची असावी. डोळ्यांच्या जागी मोती असावेत. या रसधेनूस सुगंधाने सुवासित करावे. तिच्या चारही दिशांना तिळांनी भरलेली चार पात्रे असावीत. अशी धेनू ब्राह्मणास अर्पण करावी. यामुळे स्वर्गाची प्राप्ती होईल. रसधेनूचे हे दान सर्वांत उत्तम मानले गेले आहे.

## गुडधेनुदानविधी

यानंतर एकशेदोनाव्या अध्यायात पुरोहित होतांनी राजास गुडधेनुदानविधी समजावून दिला आहे. हे दान केल्याने सर्व कामनांची पूर्ती होते. लिंपलेल्या भूमीवर काळे मृगचर्म व कुश पसरून त्यांवर वस्त्र अंथरावे. पुरेसा गूळ घेऊन त्याची धेनू बनवावी. शेजारी गुळाचे वत्स असावे. मुख सोन्याचे, शिंगे सोन्याची असावीत. दात मोत्यांचे असावेत. मानेच्या जागी मोती असावेत. या धेनूचे नाक चंदनाचे व अगरूच्या

काष्ठाची दोन शिंगे तयार करावीत. पाठ तांब्याची असावी. या धेनूची शेपटी रेशमी वस्त्राची असावी. पायांच्या जागी चार ऊस असून खूर चांदीचे, पानांचे कान, लोणाचे स्तन असावेत. नंतर चंदन व फुले यांनी तिची पूजा करून तिचे दान ब्राह्मणास करावे. घृताचा नैवेद्य दाखवावा. दीप लावावा. अग्निहोत्री श्रोत्रिय ब्राह्मणास गुडधेनूचे दान करावे. चंदन व फुले यांनी ब्राह्मणाची पूजा करून त्याला अंगठी द्यावी. कानांतील भूषणे द्यावीत. छत्री, पादत्राणे द्यावीत. दान करताना प्रार्थना करावी, ' गुडधेनू , तू अपार शक्तिमान आहेस. शुभे, तुझ्या कृपेनं संपत्ती सुलभ होते. देवी, माझ्या आजच्या दानानं तू प्रसन्न हो. मला भक्ष्य व भोज्य पदार्थ देण्याची कृपा कर. देवी, मन, वाणी व कर्म यांनी केलेली माझी पापं तुझ्या कृपेनं नष्ट होवोत.'

अशा प्रकारे गुडधेनूचे दान केल्याने दूध, घृत व दही यांची समृद्धी होते. मागील, पुढील एकवीस पिढ्यांचा उद्धार होतो. अयन, विषुवयोग, व्यतिपात, दिनक्षय; अशा अवसरांत गुडधेनुदानाचे महत्त्व विशेष आहे. गुडधेनूच्या कृपेने सौभाग्य, आयुष्य, आरोग्य, ऐश्वर्य यांची प्राप्ती सुलभ होते.

## शर्करा व मधुधेनुदानविधी

अध्याय एकशेतीन व एकशेचारमध्ये शर्कराधेनू व मधुधेनू यांचे माहात्म्य सांगितले आहे. सारवलेल्या भूमीवर काळे मृगचर्म व कुश अंथरावेत. चार भार साखरेची उत्तम धेनू बनवावी. चौथ्या हिश्श्याने वत्स बनवावे. दात्याने आपल्या शक्तीस अनुसरून शर्कराधेनू बनवावी. धेनूचे मुखाग्र, तिची शिंगे सोन्याची असावीत. डोळे मोत्यांचे असावेत. गुळाने मुखाच्या आतील भाग व पिठाने जीभ निर्माण करावी. रेशमी सूत्राचे गोकंबल करावे. धेनूच्या कंठात भूषणे असावीत. उसाचे पाय, चांदीचे खूर व लोण्याचे स्तन निर्माण करावेत. मोठ्या पानांचे कान करावेत. चंदन व फुले यांनी अलंकृत करून ही गाय ब्राह्मणास दान द्यावी.

पूर्व अथवा उत्तर दिशेकडे तोंड करून दात्याने बसावे. गायीचे

मुख पूर्वेस व वत्साचे मुख उत्तरेस असावे. दान करताना गोदानाचा मंत्र जपावा. दात्याने एक दिवस शर्करेचा आहार घ्यावा. शर्कराधेनू सर्व प्रकारची पापे दूर करणारी आहे. या धेनूचे दान करणारा पुरुष कामना व ऐश्वर्य यांनी संपन्न होतो. त्याला व या विद्येचे माहात्म्य ऐकणारास विष्णुलोकाची प्राप्ती होते.

मधुधेनूसाठी पवित्र जमीन सारवून, काळे मृगचर्म व कुश पसरून ठेवावी. सोळा कलशांच्या मधापासून एका धेनूची कल्पना करावी. चौथ्या भागाचे वत्स बनवावे. या धेनूचे मुख सोन्याचे, शिंगे अगरूची वा चंदनाची, पाठ तांब्याची, गळ्यातील पोळी रेशमी सुताची असावी, चरण उसाचे असून मुख गुळाचे व जीभ साखरेची असावी. ओठ पुष्पांचे व दात फळांचे असावेत. कुशांचे केस व चांदीचे खूर असावेत. श्रेष्ठ पानांचे कान असावेत. तिच्या चारही दिशांना सप्तधान्यांबरोबर तिळांनी भरलेले पात्र असावे. दोन वस्त्रांचे कंठावर आभूषण असावे. चंदन व फुले यांनी या धेनूची पूजा करावी. अयन, विषुव, व्यतीपात, दिनक्षय, संक्रांत, ग्रहण अशा अवसरी या धेनूचे दान विशेष महत्त्वाचे आहे. धेनूच्या पुच्छभागास स्पर्श करून, हातात जल व दक्षिणा घेऊन चंदन व धूप यांनी पूजा करावी. शक्तीस अनुसरून दान करावे. ब्राह्मणास दान देताना म्हणावे, ' मधुधेनू , तुला माझा नमस्कार आहे. तुझ्या कृपेनं देव प्रसन्न होवोत.' ' मधुवाता०' हा मंत्र म्हणून धेनूचे दान करावे. छत्री व पादत्राण यांचेही दान करावे. अशा रीतीने भक्तियुक्त मनाने मधुधेनूचे दान दिल्याने दात्याच्या मागच्या व पुढच्या दहा पिढ्यांना विष्णुलोकात स्थान मिळते.

## क्षीरधेनू , दधिधेनू यांचा दानविधी

पुढे एकशेपांचाव्या व एकशेसहाव्या अध्यायांत पुरोहित होतांनी क्षीरधेनू व दधिधेनू यांची माहात्म्ये सांगितली आहेत. गोमयाने पवित्र भूमी सारवावी, गोचर्मप्रमाणात सर्वत्र कुश पसरावेत. त्यांवर कृष्ण-मृगाचे चर्म अंथरावे. त्यावर गोमयाची कुंडिका निर्माण करावी. तेथेच दुधाने भरलेला एक घडा ठेवावा. त्याच्या चौथ्या भागाने वत्साची

कल्पना करावी. गायीचे मुख सोन्याचे, शिंगे चंदनाची व अगुरुकाष्ठाची असावीत. कानांच्या ठिकाणी वृक्षाची उत्तम पाने असावीत. या कुंभावर तिळाचे पात्र ठेवावे. गुळाने तिच्या मुखाची, शर्करेने जिभेची, उत्तम फलांनी दातांची, मोत्यांनी डोळ्यांची रचना करावी. उसाचे पाय, कुशांचे केस, तांब्याची पाठ असावी. रेशमाच्या सुतांचे शेपूट असावे. लोण्याचे स्तन बनवावे. शिंगे सोन्याची असावीत. खूर चांदीचे असावेत.

जवळच पंचरत्ने ठेवावीत. चारही दिशांनी तिळांनी भरलेली पात्रे व सर्व दिशांना सप्तधान्ये असावीत. अशा क्षीरधेनूची पूजा चंदन व पुष्पे यांनी करावी. तिला वस्त्राने अलंकृत करावे. मुद्रिका व कुंडले यांनी तिला सजवावे. नंतर धूपदीप दाखवून ती ब्राह्मणास समर्पण करताना 'आप्यायस्व०' या मंत्राचा उच्चार करावा. अशा दानामुळे परमगती प्राप्त होते. दाता साठ हजार वर्षेपर्यंत इंद्रलोकात स्थान मिळवितो. शेवटी आपल्या पिता-पितामहांसह ब्रह्मलोकात जातो. नंतर विष्णु-लोकाचा निवासी होतो.

असेच दधिधेनूचे विधान आहे. दधीच्या धेनूबरोबर अंगठी, कानातील भूषण, खडावा, पादत्राण, छत्री इत्यादी वस्तूंचेही दान करावे. 'दधिक्राव्णोरकारिषं०' हा मंत्र म्हणून धेनूचे दान करावे. हे दान दिल्याने परमगतीची प्राप्ती होते. दात्यास अश्वमेधयज्ञाचे फळ मिळून तो विष्णुलोकी जातो.

## नवनीतधेनू, लवणधेनू यांचा दानविधी

नवनीतधेनूच्या दानाने सर्व पापांपासून सुटका होते. गोचर्म-प्रमाणाची भूमी गोमयाने सारवून तीवर मृगचर्म पसरावे. नवनीताचा एक मोठा घडा तेथे ठेवावा. त्याचा एकचतुर्थांश भाग वत्सरूप समजावा. त्या नवनीताच्या घड्यास सोन्याच्या शिंगांची व सुंदर मुखाची रचना करावी. मोत्यांनी नेत्र घडवावेत. गुळाची जीभ करावी. फुलांचे ओठ, फळांचे दात करावेत. लोण्याचे स्तन करावेत. उसांचे चरण, तांब्याची पाठ, रौप्याचे खूर, दर्भमय केस; अशी या धेनूची रचना असावी. या कलशरूपी गायीस चंदन व फुले यांनी सुशोभित करावे. चारही

दिशांना दीपक प्रज्वलित करावेत. गाय ब्राह्मणास अर्पण करावी. धेनूस प्रार्थना करावी, 'देवी, पूर्वी देव व असुर यांनी समुद्रमंथन केलं तेव्हा दिव्य अमृतमय नवनीत निघालं.त्यानं सर्वांची तृप्ती झाली. अशा नवनीतास माझा नमस्कार असो.' असे म्हणून कुटुंबी ब्राह्मणास गाय दान करावी. दानी सर्व पापांपासून मुक्त होऊन भगवान शिवांच्या सायुज्याची त्याला प्राप्ती होते. आपले पितर व आपली संतती यांच्यासह तो प्रलय-कालपर्यंत विष्णुलोकात स्थान मिळवतो.

लवणधेनूचाही विधी असाच आहे. एक मण वजनाची लवणधेनू तयार करावी. चार शेर मिठाचा एक वत्स तयार करावा. बाकी सारा शृंगार वर सांगितल्यासारखा असावा. घंटा व आभूषणे यांनी त्या धेनूस भूषवावे. चंदन, फूल व धूप यांनी तिची विधिपूर्वक पूजा करावी. नक्षत्रे व ग्रह यांनी कष्ट दिल्यास या लवणधेनूचे दान करावे. लवणाच्या आहारावर एक दिवस असावे. दात्यास या दानामुळे भगवान शंकराच्या निवासाची प्राप्ती होते. त्याची व श्रवण करणाऱ्याची सर्व पापे दूर होतात व तो भगवान रुद्रांच्या लोकात प्रविष्ट होतो.

कार्पासधेनू, धान्यधेनू इत्यादींच्या दानविधींचेही असेच वर्णन अध्याय एकशेनऊ व एकशेदहात आले आहे.

## कपिलादानविधीचे माहात्म्य

अध्याय एकशेअकराव्यात कपिलादानाचा विधी पुरोहित होतांनी समजावून दिला आहे. या दानाने मनुष्यास विष्णुलोकाची प्राप्ती होते. पूर्वी सांगितल्याप्रमाणे वत्सासह गायीस अलंकारांनी नटवून तिचे दान करावे. कपिला गायीच्या शिरात व ग्रीवात सर्व तीर्थांचा निवास असतो. कपिलेच्या शिरावरून, गळ्यातून गळणाऱ्या पाण्यास जो मनुष्य आपल्या शिरावर प्रेमपूर्वक शिंपडतो, त्याची पापे नष्ट होतात. व्रतधारी पुरुषाने कपिलागायीच्या मूत्राने स्नान करावे. गंगानदीत स्नान केल्याचे पुण्य त्याला मिळेल. सर्व पापांतून त्याची सुटका होईल. कपिलेचे शरीर खाजविणे, तिची सेवा करणे, हाच मोठा धर्म आहे. जो मनुष्य प्रति-दिन कपिलेस एक तृणाची काडी देतो, त्याला गोमेधयज्ञाचे फल प्राप्त

होते. तो अग्नीसारखा देदीप्यमान होतो. दिव्यलोकात निवास करतो.

सोन्याच्या रंगाची कपिला गाय प्रथम श्रेणीची व पिंगलवर्णाची दुसऱ्या श्रेणीची समजावी. लाल डोळ्यांची कपिलागाय तिसऱ्या श्रेणीची समजावी. वैडूर्याच्या रंगाची चौथ्या श्रेणीची मानावी. अशा विविध प्रकारच्या कपिला सांगितल्या आहेत. कपिलेचे दान केल्याने मनुष्यास भुक्ती व मुक्ती प्राप्त होते. या गायीच्या दानामुळे भगवान विष्णूंच्या लोकाचा मार्ग मनुष्यास सुलभ होतो.

## कपिलामाहात्म्य, 'उभयमुखी' गोदान, हेमकुंभदान

एकशेबाराव्या अध्यायात भगवान वराहांनी कपिलेचे भेद, उभयमुखीगोदान इत्यादींचे वर्णन केले आहे. पूर्वी ब्रह्मदेवांनी सर्व तेजांचे सार एकत्र करून यज्ञात अग्निहोत्राच्या संपन्नतेसाठी कपिला-गायीस निर्माण केले. कपिल पवित्रांना पवित्र करणारी, मंगलांचे मंगल करणारी, पुण्यांत पुण्यमयी आहे. तप, उत्तम व्रत, दान, निधी अशी हिचीच रूपे आहेत. पृथ्वीवरील सर्व तीर्थे कपिलागायीच्या दुधाने, दह्याने, तुपाने पूर्ण असतात. हिच्यात सिद्धी व बुद्धी देण्याची योग्यता आहे. हिच्या कृपेने मानवाचा निश्चयाने उद्धार होतो. कपिलेचे पुच्छ, मुख, रोम, यांना अग्नीप्रमाणे महत्त्व असते. अशी अग्निमयी कपिलादेवी 'सुवर्णाख्या' मानली गेली आहे. या कपिलागायींचें दान साधारण हजार गायींच्या समान आहे.

गृहस्थाने दान देण्यासाठी लवकर प्रसूत होणाऱ्या धेनूचे पालन करावे. ती अर्धी प्रसूत होत असताना ब्राह्मणास दान द्यावी. अशा अवस्थेत धेनू पृथ्वीसमान असते. अशा गायीचे दान देणारा पुरुष ब्रह्म-लोकात कोटयवधी वर्षे निवास करतो. सोन्याची शिंगे, चांदीचे खूर यांनी संपन्न अशी कपिला ब्राह्मणास दान द्यावी. दान करताना त्या धेनूचे पुच्छ ब्राह्मणाच्या हातावर ठेवावे. हातात जल घेऊन संकल्प करावा. असे उभयमुखी दान करण्याने संपूर्ण पृथ्वीचे पान केल्याचे फल मिळते. तो आपल्या पितरांना आनंदित करतो. विष्णुधामास तो जातो. ब्राह्मणाचा धन हिरावणारा, गोघातकी, दुसऱ्यास फसविणारा, वेदनिंदक,

नास्तिक, ब्राह्मण्याचा निंदक, असा घोर पापीही सुवर्णयुक्त उभयमुखी गायीचे दान केल्याने सर्व पापांपासून मुक्त होतो. चंद्रासारखी, सूक्ष्म, मध्यभागाची, तापलेल्या सुवर्णासारखी गाय प्रसवाच्या अवस्थेत असताना सर्व देव तिची स्तुती करतात. जो मनुष्य 'गोदानविधान' वाचतो त्याची पापे नष्ट होतात.

यानंतर सुवर्णकुंभात ब्रह्मांडाची कल्पना करून त्याच्या दानाची महती वर्णन केली आहे. अशा दानाने सर्व कामना पूर्ण होतात. यानंतर भगवान वराहांनी पृथ्वीस वराहपुराणमहिमा ऐकविला.

## विविध धर्मांची उत्पत्ती

एकशेपंधराव्या अध्यायात विविध धर्मांची उत्पत्ती निवेदन केली आहे. परमात्मा धनाने, दानाने संतुष्ट होत नाही. केवळ एकाग्रचित्ताने केलेल्या भक्तीने तो तृप्त होतो. द्वादशीस भगवानांची पूजा श्वेत पुष्पे आणि सुगंधित धूप यांनी करावी. मंदिरात त्यांची स्थापना करावी. उज्ज्वल वस्त्र धारण करून मंत्रोच्चारपूर्वक भगवंतांना पुष्प अर्पण करावे. शास्त्रांचे श्रवण करावे. मंत्रद्वारे पूजा करणारा भगवंतांना प्रिय होतो. सावा, सातू, गहू, मूग, धने, यव अशी पवित्र धान्ये खाण्याने चतुर्भुज-रूपाचे दर्शन होते.

भगवंतांनी मोक्षकामी ब्राह्मणाचा धर्म सांगितला आहे. ब्राह्मणाने अध्यापनादी सहा कर्मांत निरंतर रत राहून निरहंकारी असावे. लाभ व हानी यांचा विचार न करता इंद्रियांना वश करावे. भिक्षेच्या आहारा-वर जगावे. परमेश्वरास प्रिय असणारे कर्म करावे. चहाडी कधीच करू नये. शास्त्रांना अनुसरावे. एकाग्रचित्त व्हावे. इष्टापूर्त* कर्म करावे. यज्ञांचे अनुष्ठान करावे. उद्यान निर्माण करावे. कूप-तलाव निर्माण करणारा ब्राह्मण परमात्म्यास आवडतो. क्षत्रियाने दान देण्यात शूर असावे. कर्माची माहिती त्याला असावी. तो यज्ञांत परम कुशल, पवित्र असावा. त्याने थोडे बोलावे. दुसऱ्यांचे गुण समजावून घ्यावेत. भगवंतां-

* अग्निहोत्र, तप, वेदपाठ, अतिथिसत्कार, बलिवैश्वदेव; हे इष्टकर्म. आणि कूप, विहीर, मंदिर, तलाव, अन्नदान इत्यादी पूतकर्म होय.

वर सदा प्रीती ठेवावी. विद्यागुरूचा द्वेष करू नये. कोणतेंही निंदित कर्म करू नये. स्वागतसत्कारात कुशल राहून त्याने कृपणता सोडावी.

वैश्याने निरंतर परमेश्वराची भक्ती करावी. त्याच्या मनात धनाचा विशेष लोभ, लाभ व हानी यांचे भाव असता कामा नयेत. अंतःकरणात त्याने सदा शांति-संतोष ठेवावा. मोहात पडू नये. पवित्र व निपुण राहून व्रतपूर्वक उपवास करावेत. सदा भगवंतांची त्याने उपासना करावी. त्याने नित्य गुरूची पूजा करावी. सेवकांवर दया राखावी. शूद्राच्या दंपतीने परमेश्वराची सदा भक्तिभावाने उपासना करावी. त्याने रजोगुण व तमोगुण यांच्या प्रभावापासून मुक्त असावे. अहंकार-रहित, शुद्ध हृदय, अतिथिसेवी, विनम्र, श्रद्धाशील, अतिपवित्र, सर्वांना सदा नमस्कार करणारा तो असावा. परमात्म्याचे तो ध्यान करील तर हजारो ऋषींना सोडून त्याचे चित्त शूद्राकडेच वळते.

याच अध्यायात आणखीही काही धर्म चारही वर्णांचे सांगितले आहेत. क्षत्रियाने असे आचरण करावे की, ज्याने योग सुलभ होईल. त्याने लाभ-हानीचा त्याग करावा. मोह व काम यांपासून मुक्त असावे. शीत व उष्ण यांत निर्विकार असावे. उत्तम सिद्धी प्राप्त झाली तरी तिची अभिलाषा त्याच्या चित्तात नसावी. भार्या, पुत्र, मातापिता यांची प्राप्ती त्यांच्या सेवेसाठी त्याने मानावी. आसक्ती न ठेवता सदा भक्तीत रमावे. तो धैर्यवान, कार्यकुशल, श्रद्धावान व व्रतांचे पालन करणारा असावा. कर्तव्यतत्पर असावा. निंदित कार्यांपासून त्याने दूर असावे. भोजन थोडे करावे. कुलीनता राखावी. सर्व प्राण्यांवर दया करावी. प्रातःकाळी त्याने उठावे. तो क्षमाशील व पर्वकाळी मौन धारण करणारा असावा. असा क्षत्रियच ‘ योगा ’चा अधिकारी होतो.

धर्माच्या पथावर राहून त्याने अखाद्य वस्तूचा त्याग करावा. धर्माच्या अनुष्ठानात त्याने असावे. आपले मन सदा परमात्म्यात लावावे. यथासमय मलमूत्राचा त्याग करून त्याने स्नान करावे. पुष्प-चंदनाने भगवंतांची पूजा करावी. कधी कंदमूळे व फळे खाऊन शरीराचा निर्वाह करावा. कधी दूध, कधी सातू, तर कधी केवळ जल पिऊन राहावे. निर्दोष फलांचा आहार घ्यावा.

## भगवंतांच्या सेवेतील परिहार्य बत्तीस अपराध

एकशेसतराव्या अध्यायात भगवान वराहांनी प्रथम काय खावे, काय खाऊ नये, याचे विवेचन केले आहे. परमेश्वरास अर्पण केलेले पदार्थ खावेत. धर्मज्ञ पुरुषाने प्रतिदिन धने, यव आदी अन्नाचा आहार घ्यावा. साधनेत बाधक अशा वस्तू टाळाव्यात. अपवित्र वस्तू ईश्वरास अर्पण करून खाणे हा **पहिला** अपराध आहे. अपराध्याचे अन्न भगवंतांना रुचत नाही. दुसऱ्याचे अन्न खाऊन परमात्म्याची उपासना करणे हा **दुसरा** अपराध आहे. स्त्रीसंग करून परमेश्वरास स्पर्श करणे हा **तिसरा** अपराध आहे. रजःस्वला नारीस पाहून जो भगवंतांची पूजा करतो, तो **चौथ्या** अपराधाचा धनी होतो. मृतास स्पर्श करून जो स्वतःचे शरीर शुद्ध न करता परमेश्वराची सेवा करतो तो **पांचवा** अपराध करतो. मृतास पाहून आचमन न करता परमेश्वरास स्पर्श करणे हा **सहावा** अपराध आहे. पूजा करतानाच शौचास जाणे हा **सातवा** अपराध आहे. निळे वस्त्र पांघरून परमात्म्याची सेवा करणे हा **आठवा** अपराध होय. पूजेच्या वेळी अनुचित बोलणे करतो तो **नववा** अपराध करतो. शास्त्र-विरुद्ध वस्तूस स्पर्श करून परमात्म्यास प्राप्त करणे हा **दहावा** अपराध होय. असेच आणखीही काही महत्त्वाचे अपराध सांगितले आहेत.

**अकरावा**– क्रोधात असताना परमात्म्याची पूजा करणे.

**बारावा**– निषिद्ध कर्मांना पवित्र मानून ती भगवंतांना अर्पण करणे.

**तेरावा**– लाल वा कुसुंबी रंगाचे वस्त्र पांघरून ईश्वराची सेवा करणे.

**चौदावा**– अंधारात परमेश्वरास स्पर्श करणे.

**पंधरावा**– काळे वस्त्र धारण करून परमात्म्याचे कार्य करणे.

**सोळावा**– धोतर नेसल्याशिवाय परमेश्वराची अर्चना करणे.

**सतरावा**– अज्ञानवश होऊन परमेश्वरास अर्पण न करता भोजन करणे.

**अठरावा**– अभक्ष्य (मांसादी) भक्षण करून शरण जाणे.

**एकोणिसावा**– जालपादाचे मांस खाऊन भगवंतास शरण जाणे.

**विसावा**– दीपकास स्पर्श केल्यावर हात न धुता भगवंतांची उपासना करणे.

**एकविसावा**– स्मशानभूमीत जाऊन शुद्ध न होता उपासना करणे.

**बाविसावा**– हिंग भक्षण करून परमेश्वराची उपासना करणे.

**तेविसावा**– सूकरादींचे मांस प्राप्त करण्याचा प्रयत्न करणे.

**चोविसावा**– मदिरा पिऊन परमेश्वराची सेवा करणे

**पंचविसावा**– कुसुंभाची भाजी खाऊन परमेश्वराकडे जाणे

**सव्विसावा**– दुसऱ्याचे वस्त्र नेसून परमेश्वराची सेवा करणे

**सत्ताविसावा**– नवीन अन्न उत्पन्न झाल्यावर ते प्रथम देवांना व पितरांना न देणे.

**अठ्ठाविसावा**– जोडे घालून जलाशयावर वा विहिरीवर जाणे

**एकोणतिसावा**– शरीरास उटणे लावून स्नान न करता परमेश्वराकडे जाणे.

**तिसावा**– अजीर्णाने ग्रस्त होऊन परमेश्वराकडे जाणे

**एकतिसावा**– चंदन, पुष्प अर्पण न करताच धूप देण्यात तत्पर होणे

**बत्तिसावा**– भेटवस्तू न देता मंदिराचे दार उघडणे.

## पूजेचे प्रकार

यानंतर एकशेअठराव्या अध्यायात पूजेचे प्रकार वर्णन केले आहेत. प्रायश्चित्तांचे तत्त्वपूर्वक वर्णन येथेच आले आहे. मंत्रविद्येने भगवंतांना सर्व वस्तू अर्पण कराव्यात. दीपकाष्ठ भूमीस टेकवून मग दीप प्रज्वलित करावा. त्यानंतर हात धुवावा. त्यानंतर इष्टदेवाकडे जाऊन त्याच्या चरणांना वंदन करावे. मंत्रभावाने नंतर दंतधावन करावे. इष्टदेवाच्या शिरावरील निर्माल्य उतरून ते स्वतःच्या शिरावर धारण करावे. जलाने हात धुवावा. मुखप्रक्षालन करावे. याचाही एक मंत्र सांगितला आहे. पंचरात्रमंत्राने चंदन, धूप, दीप व नैवेद्य अर्पण

करावा. हातांत नंतर पुष्पांजली घेऊन प्रार्थना करावी. शास्त्रविधीस अनुसरून देवाला प्रदक्षिणा घालावी.

कोणतीही क्रिया घाईने करू नये. घृत तथा तेलाने भगवंतांना अभ्यंजन करावे. मंत्र म्हणून देवाच्या मस्तकावर स्नेहपदार्थ लावावा. प्रथम उजव्या अंगास व नंतर डाव्या अंगास लावावा. त्यानंतर पाठीस व कटिभागास लावावा. त्यानंतर व्रती पुरुषाने गोमय घेऊन भूमी सारवावी. त्यानंतर सुगंधित अनुलेपन लावून देवास प्रसन्न ठेवावे. अनुलेपन परमेश्वरास मोठे सुख देते. त्यानंतर देवास स्नान घालावे. आवळा व सुगंधी पदार्थ यांनी परमेश्वराचे अंग माखावे. सोन्याच्या वा चांदीच्या घड्याने देवास पुनः जलस्नान घालावे. त्यानंतर चंदन अर्पण करावे. देवास प्रार्थना करावी, 'अच्युता, आपण माझा उद्धार करावा. आपण या पुष्पांचा स्वीकार करावा.'

त्यानंतर पुन्हा देवाला सुगंधी द्रव्ये अर्पण करावीत. धूप दाखवावा धूप परमेश्वरास खूप आवडतो. याच्या प्रदानाने दात्याच्या मातृपितृ-कुलांचे आत्मे पवित्र होतात. अशा रीतीने माला, चंदन, अनुलेपन आदी सामग्रीने पूजा करून पीतरंगाचे रेशमी वस्त्र देवास अर्पण करावे. शिराशी अंजली नेऊन प्रार्थना करावी, 'सर्व प्राण्यांचं रक्षण करणाऱ्या देवा, आपण पुरुषांत श्रेष्ठ आहात. आपणांपाशी लक्ष्मी शोभा पावते. आपलं रूप आनंदमय आहे. आपण सर्वांचे रक्षक आहात. रचयिते आहात. अधिष्ठाते आहात. प्रभो, आपण आदिपुरुष आहात. आपलं रूप सर्वथा दुर्ज्ञेय आहे. आपलं दिव्य अंग झाकण्यासाठी या मनोहर व सुशोभित वस्त्राचा स्वीकार करावा.'

त्यानंतर एक पुष्प हातात घेऊन भगवंतांसाठी आसनाची कल्पना करून ते त्यांना अर्पण करावे. पूजा करताना प्रणव, धर्म, पुण्यमय विचार यांनी पूजा संपन्न असावी. अशाच प्रकारे मंत्र म्हणून नैवेद्य समर्पण करून प्रसाद बाजूला काढावा. भगवंतांना तांबूल द्यावा. तो स्वीकारण्यासाठी देवाची प्रार्थना करावी.

## श्रीहरींचे भोज्यपदार्थ, भजन-ध्यानाचे नियम

एकशेएकोणिसाव्या व एकशेविसाव्या अध्यायांत भगवानांनी पृथ्वीस पूजाविधी व पूजाद्रव्ये यांवद्दल सांगितले आहे. सात प्रकारची अन्ने घेऊन ती दुधात मिसळावीत. मधूक व औदुंबर यांच्या फांद्याही देवाला प्रिय आहेत. उत्तम गंधाने युक्त अशी 'धर्मचिल्लिक' नावाची शाक व लाल धने, स्वादिष्ट तांदूळ हे देवास प्रिय आहेत. उत्तम कुंकुम व मधही त्याला प्रिय आहेत. आमोदा, शिवसुंदरी, शिरीष, आकुल संज्ञेचे धने वा तांदूळ देवास उपयुक्त होतात. मूग, उडीद, तीळ, कुलथ, गहू हे सर्व त्यास प्रिय आहेत. यज्ञात बकरी, म्हैस आदी पशूंचे दूध, दही, घृत सर्वथा निषिद्ध आहे.

भगवंतांच्या उपासकाने इंद्रियांना वश करून जे अन्न उपलब्ध होईल ते खावे. भगवान सर्वत्र विराजमान आहेत. प्रातःकाली एक अंजली जलाची घेऊन पूर्वाभिमुख व्हावे आणि 'ॐ नमो नारायणाय' हा मंत्र म्हणावा. नंतर पश्चिमाभिमुख होऊन अंजलीत जल भरून घ्यावे. द्वादशाक्षरांचा वासुदेवमंत्र म्हणावा. अनंतस्वरूप प्रभूस नमस्कार करावा. एक अंजलीभर जल घेऊन उत्तराभिमुख होऊन 'ॐ नमो नारायणाय' म्हणून प्रभूचे यजन करावे. नंतर दक्षिणाभिमुख होऊन 'ॐ नमः पुरुषोत्तमाय' मंत्र म्हणून भगवानांना प्रार्थना करावी.

उत्तम गती प्राप्त करण्यासाठी साधकाने तीनही संध्यासमयी बुद्धी, युक्ती, मतीची साह्यता घेऊन परमात्म्याची उपासना करावी. हा प्रसंग गोपनीयांत गोपनीय, योगांचा निधी, सांख्यांचे परमतत्त्व, कर्मांत उत्तम कर्म आहे. मूर्ख, कृपण, दुष्ट व्यक्तीस याचा उपदेश करू नये. दीक्षित, उत्तम शिष्य, दृढव्रती असेल तर त्यालाच सांगावा. प्रातःकाली उठून याचा पाठ करावा. त्याला परमात्म्याच्या लोकात स्थान प्राप्त होईल. त्याला कधीच पुनर्जन्म येत नाही.

## श्राद्धकल्पाचे स्वरूप

विविध व्रतांप्रमाणेच आणखी काही आचारप्रकार वराहपुराणात

आले आहेत. तिसऱ्या अध्यायात ब्रह्मपारस्तोत्र, सहाव्या अध्यायात पुंडरीकाक्षपारस्तोत्र कथांच्या संदर्भात आले आहे. सातव्या अध्यायात गयेस पिंडदान केल्याचा महिमा आला आहे. तेराव्या अध्यायात पितरांच्या परिचयानंतर श्राद्धाच्या समयाचे निरूपण आले आहे. यातच प्रसिद्ध असे 'पितृगीत' असल्याचे आपण पाहिलेच आहे. पुढे चौदाव्या अध्यायात श्राद्धकल्पाचे वर्णन आले आहे. त्रिणाचिकेत, त्रिमधु, त्रिसुपर्ण, सहा वेदांगे, यज्ञानुष्ठान यांत तत्पर; अशा ब्राह्मणांना श्राद्धासाठी नियुक्त करावे. मित्राचा घात करणारे, विकृत नखांचे, काळ्या दातांचे, कन्यागामी, आग लावणारे, सोमरस विकणारे, चोर, चहाडखोर, पुनर्विवाहिता स्त्रीचा पती, मातापित्यांचा त्याग करणारे, शूद्र स्त्रीचा पती, अशा ब्राह्मणांना श्राद्धास बोलावू नये.

ब्राह्मणास कशा रीतीने बोलवावे, हेही सांगितले आहे. एक दिवस आधी संयमी व श्रेष्ठ ब्राह्मणांना आमंत्रण द्यावे. श्राद्धाच्या दिवशी एखादा अभिमंत्रित ब्राह्मण उपस्थित झाला तरी त्याला भोजन द्यावे. श्राद्धकर्त्याने घरी आलेल्या ब्राह्मणाचे पाय धुवावेत. आपले हात धुऊन आचमन करावे. पितरांसाठी एक, तीन आणि देवांसाठी दोन, चार अशा विषम व सम संख्येचे ब्राह्मण असावेत. पितृपक्ष व मातामहपक्ष, या दोहोंसाठी एकच वैश्वदेवश्राद्ध करावे. देवांसाठी ब्राह्मणांना पूर्वाभिमुख बसवावे. पितृपक्ष, मातामहपक्ष यांसाठी ब्राह्मणांना उत्तराभिमुख बसवावे.

श्राद्ध करणाऱ्या पुरुषाने प्रथम आसनासाठी कुश द्यावेत. नंतर देवांना आवाहन करावे. अर्घ्यादींनी ब्राह्मणांची विधिपूर्वक पूजा करावी. जल व यव यांनी देवांना अर्घ्य द्यावा. श्राद्धकर्त्याने विधिपूर्वक चंदन, धूप, दीप इत्यादी विश्वेदेवादींना अर्पण करावे. पितरांना हे उपचार अपसव्य भावाने अर्पण करावेत. विवेकी पुरुषाने मंत्र म्हणून पितरांना आवाहन करावे. अपसव्य होऊन तिल व जल यांचा अर्घ्य द्यावा. श्राद्धाच्या वेळी कोणी भुकेलेला ब्राह्मण येईल, तर त्याला भोजन द्यावे. अतिथीचा सत्कार करावा. नाहीतर श्राद्धाचे फल प्राप्त होणार नाही

श्राद्धाच्या वेळी ब्राह्मणांना भोजन देण्याच्या आधी शाक व लवण यांनी रहित अशा अन्नाचे तीनदा हवन करावे. पहिली आहुती 'अग्नये कव्यवाहनाय स्वाहा', दुसरी आहुती 'सोमाय पितृमते स्वाहा', तिसरी आहुती 'वैवस्वताय स्वाहा' या मंत्राने द्यावी. हवन झाल्यानंतर उरलेले अन्न ब्राह्मणांच्या पात्रांत वाढावे. भोजनासाठी अत्यंत मधुर स्वादिष्ट अन्न असावे. श्राद्धकर्त्याने गोड वाणीने म्हणावे, 'आपण आपल्या इच्छेस अनुसरून भोजन करावं.' ब्राह्मणांनीही मौन राहून प्रसन्न वृत्तीने भोजन करावे. श्राद्धात ब्राह्मणांचे भोजन चालू असताना 'यज्ञेश्वरो यज्ञसमस्त-नेता भोक्ताऽव्ययात्मा हरिरीश्वरोऽत्र । तत्संनिधानादपयान्तु सद्यो रक्षांस्य-शेषाण्यसुराश्च सर्वे ।।'(१४.३२)हा रक्षोघ्नमंत्र म्हणून भूमीवर तिळाचे दाणे पसरावेत. आपल्या पितृरूपात द्विजांना पाहावे. 'या ब्राह्मणांच्या शरीरांत माझे पिता, माझे पितामह, प्रपितामह इत्यादी आज भोजन करून तृप्त होत आहेत' अशी भावना मनात धारण करावी. भूमीवर पिंडदान करताना 'माझे पिता, पितामह, प्रपितामह या पिंडदानानं तृप्त व्हावेत.' अशी प्रार्थना करावी. निमंत्रित ब्राह्मण भोजनाने तृप्त झाले की, थोडेसे अन्न भूमीवर ठेवावे. आचमन करून शुद्ध जल प्रदान करावे. तृप्त ब्राह्मणाची आज्ञा घेऊन भूमीवर पिंडदान करावे.

श्राद्धात तिळांनी युक्त असा पिंड समर्पण करावा. पितृतीर्थाने तिलयुक्त जलांजली द्यावी. मातामहादींसाठीही पितृतीर्थाने पिंडदान करावे. ब्राह्मणांच्या उच्छिष्टाजवळच दक्षिणदिशेस अग्रभाग असलेले कुश पसरून प्रथम आपल्या पित्यासाठी पुष्प, धूप आदींनी पूजिलेला पिंड द्यावा. त्यानंतर पितामह व प्रपितामह यांना एक एक पिंड अर्पण करावा. 'लेपभागभुजस्तृप्यन्ताम्' असा उच्चार करून लेपभोजी (पिंडातून उरलेले अन्न ग्रहण करणारे) पितरांच्या निमित्ताने कुशाच्या मूलभागापासून आपल्या हातास लागलेले अन्न सांडावे. गंध व मालादी यांनी युक्त पिंडांनी मातामहादींचे पूजन करावे. पितरांचे चिंतन करून प्रथम पिताप्रभृतींना पिंड द्यावा. त्यानंतर ब्राह्मणांना शक्तीस अनुसरून दक्षिणा द्यावी. विश्वेदेवास प्रसन्न करण्यासाठी प्रार्थना करावी. ब्राह्मणांचा आशीर्वाद घ्यावा. नंतर प्रथम पितृपक्षाच्या ब्राह्मणांचे विसर्जन करावे.

त्यानंतर देवपक्षाच्या ब्राह्मणांना निरोप द्यावा. विश्वेदेवगणांसह माता महादींतही ब्राह्मणभोजन, दान, विसर्जन इत्यादी विधी आहेत. पितृ व मातामह या दोनही श्राद्धांत पादशौचादी सर्व कर्मे देवपक्षाच्या ब्राह्मणांसाठी करावीत. परंतु निरोप मात्र प्रथम पितृपक्षीय अथवा मातृपक्षीय ब्राह्मणांना द्यावा. मातामहादी तीन पितरांच्या श्राद्धात ज्ञानी ब्राह्मण प्रथम स्थान प्राप्त करतो. ब्राह्मणांस प्रीतिपूर्वक वचने बोलून निरोप द्यावा. त्यांना दारापर्यंत पोचवावे.

श्राद्धानंतर वैश्वदेव नावाची नित्यक्रिया करावी. सर्वांचा सत्कार करावा. नंतर बंधुबांधवांसह सेवकांना घेऊन भोजन करावे. श्राद्धाने संतुष्ट झालेले पितर तृप्त होऊन आपले मनोरथ पूर्ण करतात. काळे तीळ, कुतप मुहूर्त (दिवसाचा आठवा मुहूर्त) आणि दौहित्र या तिघांना श्राद्धात महत्त्व असते. चांदीचे दान श्रेष्ठ आहे. श्राद्धकर्त्याने क्रोध, उतावळेपणा, यांचा त्याग करावा. विधिपूर्वक श्राद्ध केल्याने विश्वेदेवगण, पितृगण, मातामह, कुटुंबीय संतुष्ट राहातात. पितृगणांचा आधार चंद्र व चंद्राचा आधार योग आहे. म्हणून श्राद्धात योगिजनांना नियुक्त करावे. श्राद्धभोजी एक सहस्र ब्राह्मणांच्या बरोबर एक योगी असतो. अशा रीतीने पितृक्रियेचे कर्मकांड असावे.

## गोदावरीनदी व कलियुगधर्म

वराहपुराणाच्या सत्तराव्या अध्यायात सत्य, त्रेता, द्वापर या युगांचे गुणधर्म वर्णन केले आहेत. पुढल्याच अध्यायात कलियुगाचा धर्म विस्ताराने आला आहे. कलियुगाचे धर्म वर्णन करताना भगवान रुद्रांनी एक आख्यान सांगितले आहे. भारतवर्षात दंडकारण्य नावाचे एक वन आहे. येथे गौतमऋषी मोठी तपस्या करीत होते. त्यांच्यावर ब्रह्मदेव प्रसन्न झाले. त्यांनी देवांना धान्यांची व फुलांची सदा भरलेली पंक्ती मागितली. गौतमांनी शतशृंगपर्वतावर एक श्रेष्ठ आश्रम तयार केला. मोठे परिश्रम घेऊन त्यांनी शेती केली. अतिथिसत्कार केला.

एकदा देशात दुष्काळ पडला. बारा वर्षांपर्यंत पाऊस पडला नाही. या दुष्काळात त्या वनातील सर्व मुनी भुकेने पीडित होऊन गौतमां-

पाशी आले. त्यांना आश्रय मिळाला. दुष्काळ संपल्यावर सर्व मुनी तीर्थयात्रेस निघाले. त्यांच्यांत शांडिल्य नावाचा एक तपस्वी होता. त्याने मायेच्या द्वारे एक गाय तयार केली. ती गाय गौतमांच्या उद्यानात चरू लागली. गौतमांनी तिच्यावर पाण्याचे थेंब टाकताच ती मरण पावली. गोहत्या जेथे झाली तेथे राहाण्याचा विचार मुनींना पसंत पडला नाही. त्यांनी गौतमांना सांगितले. 'गाय मरण पावली नाही. बेशुद्ध पडली आहे. गंगाजलानं ती सावध होईल.' गौतमांनी हिमालयावर तपस्या केली. रुद्रांनी त्यांच्यासाठी गोदावरीनदी दंडकारण्यात प्रवाहित केली.

मुनींनी मायेची गाय केली हे समजताच गौतमांनी त्यांना शाप दिला. 'तुम्ही तीन वेदांपासून बहिष्कृत व्हाल.' म्हणून कलियुगात ब्राह्मण क्रियाहीन झाले. गोदावरीनदीत स्नान केल्यास, दान केल्यास स्वर्गाचा आनंद मिळेल. कलियुगात ब्राह्मण जटामय मुकुटांनी संपन्न होतील. मिथ्या चिन्ह धारण करतील. ते महान लोभी होतील. शिवसंहिता, शांडिल्यशास्त्र, पाशुपतदर्शन अशी शास्त्रं निर्माण होतील. त्यांचे उपास्य दैवत रुद्र उग्ररूपधारी होईल. त्यांच्या उपासकांना मांस व मदिरा यांची रुची होईल. नीच लोक नरकास जातील.

## पुष्पादींचे माहात्म्य

यानंतर एकशेपंधराव्या अध्यायात विविध धर्मांची उत्पत्ती सांगितली आहे. पुढे भगवानांच्या सेवेतील बत्तीस अपराध सांगितले आहेत ते आपण पाहिले आहेतच. एकशेअठराव्या अध्यायात भोज्यपदार्थ, भजन, ध्यान इत्यादींचे नियम आले आहेत. एकशेतेविसाव्या अध्यायात पुष्पादिकांचे माहात्म्य सांगितले आहे. पावसाळ्यानंतर जलाशयातील जल स्वच्छ होते. आकाश व चंद्र निर्मळ दिसतात. अधिक शीत नसते. अधिक गरमी नसते. हंसांचा कलरव सुरू होतो. कुमुद, रक्तकमल, नीलकमल यांचा सुवास पसरतो. या प्रसंगी भगवान वराहांचे पूजन करावे. पूजा करणारा भक्त कल्पपर्यंत धनवान व लक्ष्मीचा भक्त बनतो. साधकाने स्तोत्राचा पाठ करताना म्हणावे, 'जगत्प्रभो, ब्रह्मा, रुद्र, ऋषी ज्यांची पूजा करतात, त्या आपली

आराधना करण्यासाठी कार्तिक शुक्ल द्वादशी तिथी आहे. आपण उठावं. जागृत व्हावं. निद्रेचा त्याग करावा. मेघ संपले. चंद्राच्या कला पूर्ण झाल्या आहेत. शरदऋतूमधील पुष्पं मी आपणांस समर्पण करतो. आपण जागे होण्याची कृपा करावी.' अशी प्रार्थना पुष्पांजलीसह केल्यास भक्तांना परमगती प्राप्त होते.

शिशिरऋतूत वनस्पती नव्याने तयार होतात. त्यावेळी फुलणाऱ्या फुलांना हातांत घेऊन, पृथ्वीवर गुडघे टेकून प्रार्थना करावी, 'तीनही लोकांचं रक्षण करणाऱ्या प्रभो, आपण जगताचे स्त्रष्टे आहात. हा शिशिरऋतूतही आपलंच रूप आहे. हा शीत समय सर्वांना दुस्तर आहे. या वेळी मी आपली आराधना करीत आहे. आपण माझ्यावर कृपा करून माझा उद्धार करावा.' अशी भक्तीसह उपासना केल्यास परासिद्धी प्राप्त होईल.

मार्गशीर्ष व वैशाखमास वराहांना अत्यंत प्रिय असतात. यावेळी गंध व पुष्पे समर्पण केल्यास मनुष्य नऊ हजार नऊशे वर्षांपर्यंत विष्णुलोकात सुखाने निवास करतो. गंधयुक्त पुष्पपत्र वा तुलसीपत्र देण्याचे हे फल आहे. म्हणून चंदन व पुष्पे यांनी भगवंतांची पूजा करावी. कार्तिक, मार्गशीर्ष व वैशाख यांतील एकादशींना जो मनुष्य पुष्पांची माला व चंदन भगवंतांना अर्पण करतो, त्याला बारा वर्षपर्यन्त पूजा केल्याचे फल मिळते. कार्तिकाच्या द्वादशीतिथीस साखूवृक्षाच्या फुलांनी व चंदनाने भगवंतांची पूजा करावी.

सर्व तिथींत द्वादशीतिथी का श्रेष्ठ हेही भगवान वराहांनी पृथ्वीस समजावून सांगितले. या तिथीच्या उपासकांना संपूर्ण यज्ञांच्या अनुष्ठानापेक्षाही जास्त फल प्राप्त होते. कार्तिकमासाच्या द्वादशीतिथीस भगवान जागे होतात. वैशाखी द्वादशीस ते सर्वशक्तिसंपन्न असतात. या दोन तिथींना भगवंतांना चंदन व सुगंधी पुष्पे अर्पण करून प्रार्थना करावी, 'भगवन्, वैशाख व कार्तिक या मासांना सर्व मासांत श्रेष्ठत्व प्राप्त झालं आहे. तुलसीपत्र व चंद[illegible] या प्रसंगी अर्पण करण्याची अनुज्ञा म[illegible]. द्य[illegible]वी. म[illegible]झ्या[illegible] धर्माची वृद्धी [illegible]ह[illegible]री. [illegible] न[illegible]तर ॐ नमो न[illegible]राय[illegible]ण[illegible]य' म्हणून च[illegible]दन व [illegible]ुलसीपत्र अ[illegible]ण क[illegible]र[illegible]वे. हातात च[illegible]दन, तुलसीपत्र

व फूल घेऊन 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' म्हणून भगवंतांना अर्पण करावे. त्यांची प्रार्थना करावी. अशाने उपासकाचे जन्ममरण चुकेल. त्याला कधी ग्लानी येणार नाही. कधी क्षुधा लागणार नाही.

## वसंतादी ऋतूंत भगवानांचा पूजाविधी

फाल्गुनमासाच्या शुक्ल द्वादशीस पवित्र अंतःकरणाने श्रीहरींची पूजा करावी. शुभ्रवर्णाची सुवासिक फुले घेऊन 'ॐ नमो नारायणाय' म्हणून पूजा करावी. मंत्र म्हणावा,

**ॐ नमोऽस्तु देवदेवेश शंखचक्रगदाधर ।**
**नमोऽस्तु ते लोकनाथ प्रवीराय नमोऽस्तुते ॥**
(१२४.५)

या श्लोकाचा भावार्थ असा की, 'देवेश्वरा, आपण ॐकाररूप आहात. शंख, चक्र, गदा यांनी आपल्या भुजा शोभत आहेत. जगत्प्रभो, आपण पराक्रमी आहात. आपणांस वारंवार नमस्कार असो. प्रभो, वसंत ऋतूत वृक्ष फुलांनी वहरलेले असतात. वन व पर्वत यांवर आपली कृपादृष्टी असावी.' अशी पूजा करणाऱ्यास पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. वैशाखमासात शालवृक्षाची फुले हातात घेऊन आराधना करावी. या वेळी प्रल्हाद, नारद इत्यादी भागवतांचीही पूजा करावी. वेदमंत्र, अप्सरांची गीते, वाद्ये, नृत्य यांनीही आराधना करावी. भगवंतांची अशी स्तुती केली की, सिद्ध, विद्याधर, किन्नर, यक्ष, पिशाच, उरग, राक्षस, आदित्य, वसू, रुद्रगण, मरुद्‌गण, विश्वेदेव, अश्विनीकुमार, ब्रह्मा, सोम, इंद्र, अग्नी, नारदपर्वत, असित-देवल, पुलह-पुलस्त्य, भृगू, अंगिरा, मित्रावसू व परावसू हेही संतुष्ट होऊन स्तुती करतात.

याच एकशे चोविसाव्या अध्यायात पृथ्वीने वराहांना विचारले आहे, 'भगवन्, कोणत्या पुष्पांनी कशी पूजा करावी ? आपण प्रसन्न कसे व्हाल' तेव्हा भगवानांनी तिला हाही विषय समजावून दिला. भगवंतांच्या जपाचा निरंतर पाठ केला की ते संतुष्ट होतात. या मंत्राचा भावार्थ असा आहे की, 'भगवन्, आपण सर्व मासांत मुख्य माधव म्हणजे वैशाखमास आहात. म्हणून माधव या नावानं आपली प्रसिद्धी आहे.

वसंतऋतूत चंदन, रस व पुष्पादींनी अलंकृत अशा प्रतिमेचे दर्शन घ्यावं आणि पुण्य प्राप्त करावं. सात लोकांत आपण नारायण या नावानं प्रसिद्ध आहात. यज्ञात आपलंच निरंतर यजन केलं जातं.'

ग्रीष्मऋतूत विधिपूर्वक आचरण करून, भगवानांवर श्रद्धा ठेवून मंत्राचा भावार्थ जाणावा. 'भगवन्, सर्व मासांत प्रधान अशा ज्येष्ठ मासाचं रूप आपण धारण केलं आहे. आपल्या कृपेनं सारं दुःख दूर व्हावं' अशी वृत्ती धारण करून ग्रीष्मऋतूत पूजा करणाऱ्याच्या जन्म-मृत्यूचे फेरे चुकतात. शालादी वृक्षांच्या गंधपूर्ण फुलांनी श्रीहरींची अर्चना करावी. वर्षाऋतून श्रावणादी मासांतही भगवंताची आराधना करावी.

कदंब, मुकुल, साल व अर्जुन हे देववृक्ष आहेत. भगवंतांची प्रतिमा स्थापन करून या फुलांनी 'ॐ नमो नारायणाय' म्हणून त्यांची अर्चना करावी. नंतर प्रार्थना करावी. 'लोकनाथ, मेघासारखी आपली कांती आहे. आपण आपल्या महिम्यात स्थित आहात. या वर्षाऋतूत निद्रेत अभिरुची घेणारे आपण सर्वांना बंधनापासून मुक्त करता.' अशा प्रार्थनेने मनुष्य संसारसागर तरून जातो.

## आणखी काही स्फुट विषय

एकशेसत्ताविसाव्या अध्यायात दीक्षासूत्राचे सविस्तर वर्णन आले आहे. यापूर्वी ते शिवपुराणात, अग्निपुराणात आपण पाहिले आहेच. पुढल्या एकशेअठ्ठाविसाव्या अध्यायात क्षत्रियादी दीक्षा, गणांतिका दीक्षा इत्यादींचे वर्णन आले आहे. पुढे एकशेएकोणतिसाव्या अध्यायात पूजाविधी व ताम्रधातुमहिमा, एकशेतिसाव्या अध्यायात राजाच्या अन्न-भक्षणाचा प्रायश्चित्तविधी, पुढे एकशेएकतीस व एकशेबत्तीस अध्यायांत दंतधावन न करण्याने, मृतक व रजःस्वला यांच्या स्पर्शाने होणाऱ्या दोषाच्या प्रायश्चित्ताचे विधिविधान आले आहे. एकशेतेहतीस व एकशेचौतीस या अध्यायांत भगवंतांच्या पूजेच्या वेळी होणाऱ्या अपरा-धांचे प्रायश्चित्तवर्णन केले आहे. पुढे सेवापराध, प्रायश्चित्त-कर्मसूत्र, इत्यादींचा विचार आहे. नंतर एकशेएकोणचाळिसाव्या अध्यायात

भगवानांच्या मंदिरास लिंपणे, संकीर्तन करणे, इत्यादींचे माहात्म्य सांगितले आहे. एकशेबेचाळिसाव्या अध्यायात उपासनाकर्मांचे विवरण नारीधर्मासह आले आहे. नंतर एकशेअठ्ठावन्न ते एकशे साठपर्यंतच्या अध्यायांत मथुरातीर्थाच्या प्रदक्षिणेचे माहात्म्य समजावून सांगितले आहे. एकशेचौऱ्याहत्तराव्या अध्यायात सत्संगमहिमा व वामनपूजाविधी यांचे वर्णन आहे. एकशेएक्यांऐंशीव्या व एकशेव्याऐंशीव्या अध्यायांत काष्ठ, पाषाण-प्रतिमेची निर्मिती, तिची प्रतिष्ठा व तिच्या पूजेचा विधी समजावून दिला आहे. पुढल्या एकशेत्र्याऐंशीव्या व एकशेचौऱ्यांशीव्या अध्यायांत मृण्मयी व ताम्रप्रतिमेच्या प्रतिष्ठाविधीचे वर्णन आले आहे. पुढल्या एकशेपंच्याऐंशिव्या अध्यायात कास्यप्रतिमेच्या स्थापनाविधीसंबंधी निवेदन आहे. एकशेशहाऐंशिव्या अध्यायात भगवान वराहांनी रजत-सुवर्ण-प्रतिमेची स्थापना, शालग्राम व शिवलिंग यांच्या पूजनाचा विधी इत्यादी विषय पृथ्वीस समजावून दिले आहेत. पुढील दोन-तीन अध्यायांत श्राद्धाची उत्पत्ती, पितृयज्ञ, अशौच, पिंडकल्प, श्राद्धाचे दोष, दानाचे महत्त्व; इत्यादी विषय विस्ताराने आले आहेत. एकशेएक्याण्णव व एकशेव्याण्णव या दोन अध्यायांत मधुपर्कविधी, शांतिपाठ, इत्यादींचे विवेचन आहे, एकशेअठ्ठ्याण्णव व दोनशे या अध्यायांत यमयातनेचे वर्णन सविस्तर आले आहे. पुढे नरकाचे क्लेश आणि कर्मविपाकनिरूपण, दानधर्माचे महत्त्व आले आहे. पुन्हा दोनशेदहाव्या व दोनशे अकराव्या अध्यायांत कर्मविपाक व पापनाशनाचे उपाय या विषयांचे विवेचन आहे.

# ६ तत्त्वज्ञानदर्शन

## प्रकृती आणि पुरुष

कथाप्रसंग, आचारधर्म, क्षेत्रमाहात्म्य इत्यादींचे वर्णन करताना पुराणांतून आपोआपच तत्त्वज्ञानाचे धागे उलगडत जातात. सृष्टिरचनेचे निरूपण करतानाही पुराणकारांची तत्त्वनिष्ठ बैठक सुटलेली नसते.

एकावन्नाव्या अध्यायात अगस्त्यगीता आली असून नासदीयसूक्तांचे विवेचन आले आहे. सहासष्ट व सदुसष्ट या दोन अध्यायांत राजा भद्राश्वास नारदांनी श्रीविष्णूंच्या आश्चर्यमय स्वरूपाचे वर्णन केले आहे. पुढल्या एकोणसत्तराव्या अध्यायात भगवान नारायणांचे आश्चर्यकारक वर्णन आहे. वहात्तराव्या अध्यायात प्रकृती व पुरुष यांचा निर्णय आहे.

अगस्त्यांस भगवान रुद्रांनी हा विषय समजावून दिला आहे. वैदिक सिद्धांतास अनुसरून परब्रह्म परमात्मा विष्णूच ब्रह्मा, शिव या रूपांनी व्यक्त होतो. विष्णू सर्व देवांत सनातन परमात्मा आहेत. हेच आदित्य आहेत. शतद्वीपात रुद्र ब्रह्मा व विष्णू यांची निरंतर स्तुती करतात. सृष्टीच्या निर्मितीच्या वेळी ते ब्रह्मदेवांची स्तुती करतात. रुद्र कालरूपाने शोभतात. ब्रह्मदेवांसहित सर्व देव व दानव सत्ययुगात रुद्रांचे स्तवन करतात. भोगाची इच्छा करणारे देवसमुदाय त्यांची लिंगमूर्ती स्थापन करून आराधना करतात. मुक्तीची इच्छा करणारे मानव सहस्र मस्तके असलेल्या प्रभूंचे यजन करतात.

या विश्वाचा आत्मा स्वतः नारायणच आहेत. ब्रह्मयज्ञ करून पुरुष ब्रह्मास प्रसन्न करून घेतात. वेदासही 'ब्रह्म' म्हणतात. नारायण, शिव, विष्णू, शंकर, पुरुषोत्तम; हे केवळ नावांचेच भेद आहेत. वस्तुतः या सर्वांना सनातन परब्रह्म परमात्माच म्हणतात. वैदिक कर्म करणारे ब्रह्मा, विष्णू व महेश्वर या नामांचा वेगवेगळा उच्चार करतात. रुद्र या तीनही मंत्रांचे आदिदेव आहेत. वैदिक कर्मानुसार रुद्र, विष्णू व ब्रह्मा यांचे पार्थक्य आहे. वस्तुतः हे तिघे एकच आहेत. विद्वान पुरुषाने यांच्यांत भेदभावना धरू नये. जो अशी भेदभावना धारण करील तो पापी नरकात जाईल. त्याच्याच बुद्धीत रुद्र, ब्रह्मा, विष्णू अथवा ऋग्, यजुः, साम्; यांत भेदभावना राहते.

## सुख व दुःख यांचे निरूपण

एकशेसोळाव्या अध्यायात भगवान वराहांनी पृथ्वीस सुख व दुःख यांसंबंधी निरूपण केले आहे. भगवंतांचा भक्त एकाग्रचित्त, सुस्थित होऊन अहंकाराचा त्याग करतो. आपले चित्त सदा भगवंतात

लावतो. तो क्षमाशील, जितेंद्रिय असतो. द्वादशीतिथीस तो फलमूल अथवा शाकाहार घेतो. षष्ठी, अष्टमी, द्वादशी, अमावास्या, चतुर्दशी या तिथींना संयमपूर्वक ब्रह्मचर्याचे पालन करतो. अशा प्रकारे योग-विधानपूर्वक भगवंतांची उपासना करणारा दृढव्रती पवित्रात्मा धर्माने संपन्न होऊन विष्णुलोकास जातो. तेथे त्याला अठरा भुजा असतात. धनुष्य, तलवार, बाण, गदा इत्यादी धारण करून तो सारूप्यमोक्षाची प्राप्ती करून घेतो. त्याला ग्लानी, वृद्धत्व, मोह, रोग यांची बाधा होत नाही असे हे सुखाचे रूप.

आता दुःखाचे स्वरूप पाहावे. जो मनुष्य सदा अहंकार व मोह यांनी प्रेरित होऊन परमेश्वरास शरण जात नाही, अन्न सिद्ध झाल्या-वर जो बलिवैश्वदेवकर्म न करता भोजन करतो, जो परमेश्वरास नमस्कारही करीत नाही, त्याला प्राप्त करण्याचा प्रयत्नही करीत नाही, त्याच्यापेक्षा दुःखी दुसरा कोण आहे ? तो अतिथीस काहीही न देता स्वतः भोजन करतो. तो सदा असंतुष्ट राहून दुसऱ्याच्या स्त्रीवर दृष्टी ठेवतो. दुसऱ्यांना कष्ट देतो. घरातच आळसात राहातो. जो काळाच्या फेऱ्यात सापडतो तो दुःखीच होय.

काही पुरुष आपल्या कर्मांच्या प्रभावाने सुंदर रूप प्राप्त करून घेतात. आणि काही दुसरे पुरुष कुरूप होतात. काही विद्वान पुण्यात्मे, गुणांचे ज्ञाते, सर्व शास्त्रांचे पारगामी होतात. तर काही बोलण्यासही असमर्थ असतात. काहींच्यापाशी धन असते. ते कोणास देत नाहीत. स्वतःही उपयोग करीत नाहीत. तसे ते मग दरिद्रीच असतात. मग त्यांच्या दारिद्र्यासारखे दुसरे दुःख कोणते ? काही पुरुषांना दोन स्त्रिया असतात. पती एकीची प्रशंसा करतो, दुसरीस हीन मानतो. त्या भाग्य-हीन स्त्रीच्या वाटयास केवढे दुःख येते ! हे सर्व पूर्वकर्मांचे फल आहे.

ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य द्विजाती असूनही पापकर्मांत रमतात. पंचतत्त्वांनी निर्माण झालेले शरीर त्यांना प्राप्त झाले असूनही ते परमात्म्यास प्राप्त करू शकत नाहीत. याहून मोठे दुःख कोणते ? जो शुभकर्मांचे अनुष्ठान करतो व श्रेय भक्तांना देतो, त्याच्यापाशी दुःख उरत नाही. जो परमेश्वराची पूजा करून त्याला नैवेद्य दाखवतो, प्रसाद

भक्षण करतो, त्याच्याएवढा सुखी कोण आहे? तो तीनही काळी संध्यादी कर्मे करतो. देव, अतिथी व दुःखी मानवांना तो अन्न देतो. तो प्रत्येक मासात एकादशी करतो. अमावास्येस श्राद्धकर्म करतो. त्याचे पितृगण तृप्त असतात. त्याच्याशिवाय या जगतात सुखी कोण आहे ?

ज्याला दोन भार्या आहेत, दोहींत ज्याची विकाररहित बुद्धी आहे, जो दोहींकडे समान दृष्टीने पाहातो, जो सदा हिंसारहित कर्मे करतो, तो या जगतात परम सुख भोगण्यासाठीच आलेला असतो. दुसऱ्याची सुंदर स्त्री पाहाताच त्याचे चित्त चलित होत नाही. तो मोती, रत्ने, सुवर्ण यांना मातीसमान मानतो. त्याच्याएवढा सुखी कोण आहे? हत्ती, घोडे यांनी परिपूर्ण तयारी करून जो युद्धभूमीवर आपल्या प्राणांचा त्याग करतो, संयोगवियोगात जो सदा अनासक्त राहातो, जो कुत्सित कर्मांचा त्याग करतो, जो स्वतः भगवद्भजन करतो, जो संतुष्ट असतो, त्याच्याएवढा या जगात सुखी कोण आहे ?

स्त्रियांना पतीची सेवा हेच एक व्रत आहे. असे समजून स्त्रीने आपल्या स्वामीस सदा संतुष्ट राखावे. धनवान असूनही जो पंडित पुरुष जितेंद्रिय असतो, जो अपमान सहन करतो, जो दुःखात उद्विग्न होत नाही, जो परमात्म्याच्या उत्तम क्षेत्रात प्राण सोडतो, जो सदा माता व पिता यांची सेवा करतो, देवाप्रमाणे जो त्यांचे नित्य दर्शन घेतो, त्याच्यापेक्षा या जगतात सुखी दुसरा कोण आहे? सर्व देवांत परमात्म्याची, वराहांची भावना ठेवून जो पूजा करतो, तो त्रैलोक्याचे हित पाहतो.

## मुक्तीची साधने

एकशेएकविसाव्या अध्यायात भगवान वराहांनी वसुंधरेस मुक्तीची साधने समजावून दिली आहेत. जो सर्वांत मोठे कार्य करूनही आपली प्रशंसा करीत नाही, जो सदा शुद्ध अंतःकरणाने शास्त्रीय सत्कर्मांचे अनुष्ठान करतो, तो त्या सत्कर्मांच्या प्रभावाने पुन्हा जन्मास येत नाही. जो सामर्थ्यशाली भक्त असून सर्वांवर कृपा करतो, कार्य व अकार्य यां-संबंधी ज्याला ज्ञान आहे, ज्याची धर्मावर श्रद्धा आहे, तो पुन्हा गर्भ-

वासी होत नाही. जो गर्मी-सर्दी, वात-वर्षा, तहान-भूक सहन करू शकतो, जो गरीब झाला तरी लोभ, मोह, आळस यांपासून दूर राहतो, जो कधी खोटे बोलत नाही, कोणाची निंदा करीत नाही, जो आपल्याच स्त्रीवर संतुष्ट असतो, दुसऱ्यांच्या स्त्रियांपासून जो दूर राहतो, जो सत्यवादी, पवित्र आत्मा, भगवानांचा भक्त असतो, तो सदा त्यांच्याच लोकात राहातो. जो वाटून खातो, जो ब्राह्मणांचा भक्त आहे, जो सर्वांशी मधुर वाणीने बोलतो, तो कुत्सित योनीत न जाता भगवंतांच्या लोकांचा अधिकारी बनतो.

जो कधी जीवांची हिंसा करीत नाही, जो सर्व प्राण्यांच्या हितात तत्पर असतो, जो मन, कर्म, वचन यांनी पवित्र असतो, तो विकृत योनीत जात नाही. ज्याच्या मनात सदा समता असते, जो बालपणा-पासून शांत स्वभावाचा असतो, इंद्रियविजयी असतो, सदा शुभ कार्यांत जो तत्पर राहातो, त्याला नीच योनी मिळत नाही. दुसऱ्याने केलेल्या अपकारावर जो कधीच लक्ष देत नाही, जो सदा कर्तव्यदक्ष असतो, जो नेहमी यथार्थ बोलतो, तो कधीच नीच योनीत जात नाही. जो व्यर्थ गप्पांपासून दूर राहतो, ज्याची तत्त्वज्ञानावर अचल निष्ठा असते, जो सदा आपल्या वृत्तीत राहून दुसऱ्याची कधी निंदा करीत नाही, तो कधीच हीन योनीत जात नाही.

जो सदा संयत राहातो, ज्याचे मनू, अंगिरा, शुक्राचार्य, गौतम-मुनी, चंद्र, रुद्र, शंखलिखित, कश्यप, धर्मदेव, अग्निदेव, पवनदेव, यम-राज, इंद्र, वरुण, कुबेर, शांडिल्य, पुलस्त्य, आदित्य, पितृगण, स्वयंभू ब्रह्मदेव इत्यादींच्या धर्माचे पालन करतो, तो कधीच विकृत योनीत जन्म पावत नाही. जो आपल्या धर्माचे पालन करतो, आपल्या बुद्धीस अनुसरून ठीक वागतो, दुसऱ्याच्या निंदेपासून जो दूर राहातो, संपूर्ण धर्मात ज्याची बुद्धी स्थिर असते. जो दुसऱ्यांच्या धर्मांची निंदा करीत नाही, जो स्वतःच्या धार्मिक मार्गावर अटळ असतो, तो कधीच विकृत योनीत जात नाही.

ज्याची इंद्रिये स्वाधीन आहेत, ज्याने क्रोधावर पूर्ण नियंत्रण ठेवले आहे. जो लोभ व मोह यांच्यापासून दूर आहे, जो विश्वाच्या

उपकारात तत्पर आहे, जो देव, अतिथी, गुरू यांच्यावर श्रद्धा ठेवतो, जो कधीच कोणाची हिंसा करीत नाही, जो कधी मद्य-मांसाचे सेवन करीत नाही, जो अनुचित भावबंधन ठेवीत नाही, जो ब्राह्मणास कपिला-गाय दान देतो, असा धर्मयुक्त पुरुष भगवंतांच्या लोकी निवास करतो. जो आपल्या पुत्रांवर समान भावना ठेवतो, क्रोधाने भरलेल्या ब्राह्मणास पाहून जो त्याला प्रसन्न राखण्याचे काम करतो, जो भक्तिपूर्वक कपिला-गायीस स्पर्श करतो, जो कुमारी कन्येशी विपरीत भावना ठेवीत नाही, जो अग्नीस उल्लंघीत नाही, जो जलात शौचविधी करीत नाही, जो गुरूं-वर श्रद्धा ठेवतो, जो त्यांची व ईश्वराची कधीच निंदा करीत नाही, जो अशा प्रकारे धर्मात तत्पर असतो, तो मनुष्य निश्चयाने परमेश्वरास प्राप्त करून घेतो. तो मातेच्या गर्भात न जाता परमात्म्याच्या लोकी जातो.

## वराहपुराणात भक्तितत्त्व

नारदपुराणाप्रमाणे वराहपुराण हे प्रायः विष्णूंचेमाहात्म्य वर्णन करणारे आहे. या पुराणात सर्वत्र भगवान नारायणांची स्तुती आहे. यात म्हटले आहे,

**नारायणात्परो देवो न भूतो न भविष्यति ।**
**एतद्रहस्यं वेदानां पुराणानां च सत्तम ।।**

(५२)

'नरश्रेष्ठा, भगवान नारायणांपेक्षा उत्तम व श्रेष्ठ देव कोणी नाही. होणारही नाही. वेद व पुराणं यांचं सारभूत रहस्य हेच आहे.' या भगवान नारायणांनी सगुणसाकाररूपात नाना अवतार धारण केले असे हे पुराण सांगते.

**मत्स्यः कूर्मो वराहश्च नरसिंहोऽथ वामनः ।**
**रामो रामश्च कृष्णश्च बुद्धः कल्किश्च ते दश ।।**
**इत्येताः कथितास्तस्य मूर्तयो भूतधारिणि ।**
**दर्शनं प्राप्तुमिच्छूनां सोपानानि च शोभने ।।**
**यत्तस्य परमं रूपं तन्न पश्यन्ति देवताः**
**अस्मदादिरूपेण पूरयन्ति ततो धृतिम् ।।**

(४.२-४)

'भूतधात्री, मत्स्य, कूर्म, वराह, नरसिंह, वामन, श्रीराम, परशुराम, कृष्ण, बुद्ध आणि कल्की; या भगवान नारायणांच्या दहा मूर्ती आहेत. शोभने, जे यांचे दर्शन प्राप्त करण्याची इच्छा करतात, त्यांना हे सोपानासारखे वाटतात. कारण त्यांच्या निर्गुणनिराकार रूपास देवही जाणत नाहीत. म्हणून त्यांच्या या अवतारांच्या दर्शनानेच ते आपली उत्कंठा शमवतात.'

अशा या भगवान विष्णूंचे रूपवर्णन वराहपुराणात अनेकदा आले आहे. भगवान नारायण त्या वेळी शंख, गदा आदी आयुधांनी सुशोभित होते. त्यांनी पीतांबर नेसला होता. ते गरुडाच्या पाठीवर विराजमान झाले होते. त्यांचे तेज बारा आदित्यांपेक्षाही अधिक प्रकाशमान होते. जणू आकाशात हजारो सूर्य चमकत होते. (१९.२४-२५) हे पुराण विष्णूपर असूनही यात शिव, लक्ष्मी, गौरी यांच्या अभेदाचे वर्णन आले आहे. विष्णू व शिव यांच्या अभेदाचेही वर्णन मधून मधून आले आहे.

**या श्रीः सा गिरिजा प्रोक्ता यो हरिः स त्रिलोचनः ।**
**एवं सर्वेषु शास्त्रेषु पुराणेषु च गद्यते ॥**

(५७.३-४)

अशा रीतीने सर्व देवदेवतांचे ऐक्य पाहणाऱ्या या पुराणात श्रवण, संकीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन इत्यादी नवविधा भक्तीचेही दर्शन होते. सख्य व दासभक्तीही येथे आढळते. काही उदाहरणे पाहू.

**श्रवणभक्ती–**

**गायन् मम यशो नित्यं भक्त्या परमया युतः ।**
**मत्प्रसादात् स शुद्धात्मा मम लोकाय गच्छति ॥**

(१३९.२८)

**गीतमानस्य गीतस्य यावदक्षरपङ्क्तयः ।**
**तावद् वर्षसहस्राणि इन्द्रलोके महीयते ॥**

(१३९.२४)

उत्तम भक्तीने युक्त होऊन नित्य-निरंतर माझ्या यशाचे गायन करणारा माझा भक्त शुद्ध अंतःकरणाचा होऊन माझ्या कृपाप्रसादाने

माझ्या लोकास प्राप्त होतो. त्याने केलेल्या गीताचे जितके अक्षरसमूह असतात, तितकी हजार वर्षे तो इंद्रलोकात सन्मानित होतो.

**स्मरणभक्ती–**

**दद्याज्जलाञ्जलिं मह्यं तेन मे प्रीतिरुत्तमा ।**
**तस्य किं सुमनोभिश्च जात्येन नियमेन किम् ।।**
**मह्यं चिन्तयतो नित्यं निभृतेनान्तरात्मना ।**
**तस्य कामान् प्रयच्छामि दिव्यान् भोगान्मनोरमान् ।।**

(१८३.१२-१३)

जो भक्त अनन्यचित्त होऊन आपल्या संपूर्ण अंतःकरणाने सदासर्वदा माझे चिंतन करतो, तो मला जलांजली देतो, तरी मला मोठा संतोष होतो. माझ्या अशा भक्तास पुष्पांनी, जपाने, व्रतनियमांनी काय लाभ होणार ? ह्या भक्तावर प्रसन्न होऊन मी स्वतःच त्याला मनोरम दिव्य भोग व यथाभिलाषित द्रव्यसामग्री प्रदान करतो.

**सख्यभक्ती**

**कृष्णक्रीडासेतुबन्धं महापातकनाशनम् ।**
**बालानां क्रीडनार्थं च कृत्वा देवो गदाधरः ।।**
**गोपेकैः सहितस्तत्र क्षणमेकं दिने दिने ।**
**तत्रैव रमणार्थं हि नित्यकाले च गच्छति ।।**
**बलिहृदं च तत्रैव जलक्रीडाकृतं शुभम् ।**
**यस्य सन्दर्शनादेव सर्वपापैः प्रमुच्यते ।।**

(१६०.३२-३४)

भगवान गदाधरांनी आपल्या मित्र ग्वालबालकांसाठी जी कृष्णक्रीडा सेतुबंधाची रचना केली होती, जेथे ते गोपांसह प्रतिदिन खेळत होते, आणि जे तेथे रमण्यासाठी आजही जातात, ते स्थान महापातकांचा नाश करणारे आहे. तेथेच 'बलिहृद' नावाचे एक सुंदर सरोवर आहे. येथे भगवान कृष्णांनी क्रीडा केली होती. तिच्या दर्शनानेच मनुष्याची सर्व पातके नष्ट होतात.

# ७ उपसंहार व महिमा

## वराहसंहितेची प्रशंसा

मध्येच एकशेबाराव्या अध्यायात भगवान वराहांनी देवी पृथ्वीस वराहसंहितेची प्रशंसा वर्णन करून सांगितली आहे. या वराहसंहितेत सर्व पातकांचा नाश करण्याची शक्ती आहे. सर्वज्ञ परमप्रभूंपासून हिचा उद्‌भव झाला आहे. त्यानंतर ब्रह्मदेव विशेषज्ञ झाले. त्यांनी आपल्या पुत्रास, पुलस्त्यांना हिचे ज्ञान दिले. पुलस्त्यांनी परशुरामास, परशुरामाने आपल्या शिष्यास, उग्रास व उग्रानेही इतर मनुष्यांना दिली. ही पूर्वकल्पातील हकीगत आहे.

आता भविष्यातील हकीगत पाहा. पृथ्वीच्या कृपेने कपिलादी सिद्ध पुरुष तपस्या करून हिला जाणण्यास समर्थ होतील. हिचे ज्ञान वेदव्यासांना होईल. ते शौनकास ही कथा सांगतील. कृष्णद्वैपायन व्यास सर्वांचे गुरू होतील. ते अठरा पुराणांचे ज्ञाते होतील. ब्रह्मपुराण, पद्मपुराण, वायुपुराण, शिवपुराण, भागवतपुराण, नारदपुराण, मार्कंडेयपुराण, अग्निपुराण, भविष्यपुराण, ब्रह्मवैवर्तपुराण, लिंगपुराण, वराहपुराण, स्कंदपुराण, वामनपुराण, कूर्मपुराण, मत्स्यपुराण, गरुडपुराण, आणि अठरावे ब्रह्मांडपुराण; अशी ही अठरा महापुराणे.

जो पुरुष कार्तिकमासाच्या द्वादशीस भक्तिपूर्वक या पुराणाचा पाठ करील तो संतानहीन असल्यास त्याला पुत्र होईल. ज्या घरात या पुराणाच्या लेखनाचे पूजन होईल, तेथे स्वतः नारायणांचा निवास राहील. जो भक्तीने याचे श्रवण करील, वराहपुराणाची जो पूजा करील, त्याने विष्णूंचीच पूजा केली असे समजावे. हे पुराण ऐकून ग्रंथ आणि भगवान वराह यांची गंध, पुष्पमाला, वस्त्रे यांनी पूजा करावी भोजनाद्वारे ब्राह्मणाचा सन्मान करून त्याला वस्त्र द्यावे. ग्राम द्यावे. वराहपुराणाची पूजा करावी. असे केल्यास मानव सर्व पापांतून मुक्त होऊन भगवान विष्णूंच्या सायुज्यास प्राप्त करील.

## वराहपुराणाची फलश्रुती

शेवटच्या दोनशेसतराव्या अध्यायात या पुराणाची फलश्रुती सांगितली आहे. ब्रह्मदेवांना सनत्कुमारांनी विचारले, 'विश्वरूप स्थाणु-जगदीश्वर भगवान शंकर अत्यंत तेजस्वी आहेत. ते वनात आनंदानं विहार करतात. त्यांच्या शृंगाचं क्षेत्र कसं बनलं ?' यावर ब्रह्मदेव म्हणाले, 'महामुने, हा सर्व भाग तुला मी सांगितला आहे. पुढचा भाग पुलस्त्य सांगतील. तू या मुनींचा प्रमुख बनून याच वनात राहा. जो पुरुष हा प्रसंग ऐकतील त्याची सर्व पापं नष्ट होतील. तो यशस्वी, कीर्तिमान होऊन या लोकात व परलोकात पूज्य होईल. चारही वर्णांच्या लोकांनी मन व इंद्रियं स्वाधीन ठेवून या प्रसंगाचं श्रवण करावं. हे कथानक परममंगल, कल्याणमय, धर्म, अर्थ व काम यांचं साधक, सर्व मनोरथ पूर्ण करणारं, परमपवित्र, आयुर्वर्धक, विजय देणारं आहे. हे धन व यश देणारं, पापांचं नाशक, कल्याणकारी व शांतिकारक आहे. हे पुराण ऐकल्यानं मनुष्याची या लोकी, परलोकी दुर्गती होत नाही. जो मनुष्य प्रातःकाली उठून याचं श्रवणकीर्तन करील, तो स्वर्गात प्रतिष्ठित होईल.

भगवान वराह व पृथ्वीदेवी यांच्या संवादाचा हा सारभाग जो भक्तिपूर्वक पठण, श्रवण, मनन करील त्याची सर्व पापे नष्ट होतील. त्याला परमगती प्राप्त होईल. प्रभासक्षेत्र, नैमिषारण्य, हरिद्वार, पुष्कर, प्रयाग, ब्रह्मतीर्थ, अमरकंटक येथे जाण्याने जे पुण्य मिळते त्यापेक्षा कोटिगुणांनी अधिक पुण्य हे पुराण ऐकण्याने प्राप्त होईल. श्रेष्ठ ब्राह्मणास कपिला दान दिल्याने जे फल मिळते ते या पुराणाचा एक अध्याय श्रवण केल्याने प्राप्त होईल. पवित्र होऊन सावधानतेने या पुराणाचे दहा अध्याय श्रवण केल्यास 'अग्निष्टोम' व 'अतिरात्र' यज्ञ केल्याचे फल मिळते. जो भक्तीने याचे श्रवण करील त्यास भगवान वराहांकडून यज्ञ, दान, सर्व तीर्थांतील अभिषेक यांचे फल प्राप्त होईल. पुत्रहीन व्यक्तीस याच्या श्रवणाने पुत्र होईल. पुत्रवान सुंदर पौत्रास प्राप्त करून घेईल.

ज्या घरात हे पुराण लिखित स्वरूपात राहील, याची पूजा होईल. त्याच्या मालकावर भगवान वराह संतुष्ट होतील.

हे पुराण ऐकल्यावर सनातन भगवान विष्णूंप्रमाणे चंदन, पुष्पे, वस्त्र यांनी याची पूजा करावी. ब्राह्मणांना भोजन द्यावे. राजाने त्यांना ग्रामादींचे दान द्यावे. जो मानव पवित्र होऊन, संयतचित्ताने या पुराणाचे श्रवण करून त्याची पूजा करतो, तो सर्व पापांतून मुक्त होऊन श्रीहरींच्या सायुज्यास प्राप्त करून घेतो.

# ८ स्तोत्रमंजूषा

## १. पुण्डरीकाक्षपार-स्तोत्र

नमस्ते पुण्डरीकाक्ष नमस्ते मधुसूदन ।
नमस्ते सर्वलोकेश नमस्ते तिग्मचक्रिणे ।।
विश्वमूर्ति महाबाहुं वरदं सर्वतेजसम् ।
नमामि पुण्डरीकाक्षं विद्याविद्यात्मकं विभुम् ।।
आदिदेवं महादेवं वेदवेदाङ्गपारगम् ।
गम्भीरं सर्वदेवानां नमस्ये वारिजेक्षणम् ।।
सहस्रशीर्षणं देवं सहस्राक्षं महाभुजम् ।
जगत्संव्याप्य तिष्ठन्तं नमस्ये परमेश्वरम् ।।
शरण्यं शरणं देवं विष्णुं जिष्णुं सनातनम् ।
नीलमेघप्रतीकाशं नमस्ये चक्रपाणिनम् ।।
शुद्धं सर्वगतं नित्यं व्योमरूपं सनातनम् ।
भावाभावविनिर्मुक्तं नमस्ये सर्वगं हरिम् ।।

**नान्यत् किंचित् प्रपश्यामि व्यतिरिक्तं त्वयाच्युत ।**
**त्वन्मयं च प्रपश्यामि सर्वमेतच्चराचरम् ।।**

(६.१०–१६)

पुंडरीकाक्ष, आपणांस नमस्कार असो. मधुसूदना, आपणांस नमस्कार असो. सर्वलोकमहेश्वरा, आपणांस नमस्कार असो. तीक्ष्ण सुदर्शनचक्र धारण करणाऱ्या श्रीहरींना माझा वारंवार नमस्कार असो. महाबाहो, आपण विश्वरूप आहात. आपण भक्तांना वर देणारे व सर्वव्यापक आहात. आपण असीम तेजोराशीचे निधान आहात. विद्या व अविद्या, या दोनही आपल्याच सत्तेत विलसतात. आपणांसारख्या कमल-नयन भगवान श्रीहरींना मी प्रणाम करतो.

प्रभो, आपण आदिदेव व देवांचेही देव आहात. आपण वेदवेदांगांत पारंगत, सर्व देवांत गहन व गंभीर आहात. कमलासमान नेत्र असणाऱ्या श्रीहरींना मी नमस्कार करतो. भगवान, आपणांस हजारो मस्तके आहेत. हजारो नेत्र आहेत. अनंत भुजा आहेत. आपण सर्व जगताला व्यापून आहात. अशा आपणांस, परम प्रभूंस मी वंदन करतो. आपण सर्वांना आश्रय आहात, एकमात्र शरण जाण्यास योग्य आहात. आपण व्यापक असल्याने विष्णू व सर्वत्र जयशील असल्याने जिष्णू आहात. आपली कांती नीलमेघासारखी आहे. आपण चक्रपाणी सनातन देवेश्वर श्रीहरी आहात. मी आपणांस अभिवादन करतो.

आपण शुद्धस्वरूप, सर्वव्यापी, अविनाशी, आकाशासारखे सूक्ष्म, सनातन, जन्ममरणरहित, सर्वगत श्रीहरी आहात. आपणांस नमस्कार असो. अच्युता, आपणांखेरीज मला कोणतीच वस्तू प्रतीत होत नाही. हे सर्व चराचर जगत मला आपल्याच स्वरूपात प्रतीत होते.

## २. रैभ्यकृत गदाधरस्तुती

**गदाधरं विबुधजनैरभिष्टुतं धृतक्षमं क्षुधितजनार्तिनाशनम् ।**
**शिवं विशालासुरसैन्यमर्दनं नमाम्यहं हृतसकलाशुभं स्मृतौ ।।**

पुराणपूर्वं पुरुषं पुरुष्टुतं पुरातनं विमलमलं नृणां गतिम् ।
त्रिविक्रमं हृतधर्रणिं बलोर्जितं गदाधरं रहसि नमामि केशवम् ।।
विशुद्धभावं विभवैरुपावृतं श्रिया वृतं विगतमलं विचक्षणम् ।
क्षितीश्वरैरपगतकिल्बिषैः स्तुतं गदाधरं प्रणमति यः सुखं वसेत् ।।
सुरासुरैरर्चितपादपङ्कजं केयूरहाङ्गदमौलिधारिणम् ।
अब्धौ शयानं च रथाङ्गपाणिनं गदाधरं प्रणमति यः सुखं वसेत् ।।
सितं कृते त्रैतयुगेऽरुणं विभुं तथा तृतीये नीलसुवर्णमच्युतम् ।।
कलौ युगेऽलिप्रतिमं महेश्वरं गदाधरं प्रणमति यः सुखं वसेत् ।
बीजोद्भवो यः सृजते चतुर्मुखं तथैव नारायणरूपतो जगत् ।
प्रपालयेद् रुद्रवपुस्तथान्तकृद्गदाधरो जयतु षडर्द्धमूर्तिमान् ।।
सत्त्वं रजश्चैव तमो गुणास्त्रयस्त्वेतेषु विश्वस्य समुद्भवः किल ।
स चैक एव त्रिविधो गदाधरो दधातु धैर्यं मम धर्ममोक्षयोः ।।
संसारतोयार्णवदुःखतन्तुभिर्वियोगनक्रक्रमाणैः सुभीषणैः ।
मज्जन्तमुच्चै सुतरां महाप्लवो गदाधरो मामुदधौ तु योऽतरत् ।।
स्वयं त्रिमूर्तिः स्वमिवात्मनात्मनि स्वशक्तिमश्चाण्डमिदं ससर्ज ह ।
तस्मिञ्जलोत्थासनमाप तैजसं ससर्ज यस्तं प्रणतोऽस्मि भूधरम् ।।
मत्स्यादिनामानि जगत्सु चाश्नुते सुरादिसंरक्षणतो वृषाकपिः ।
मखस्वरूपेण स संततो विभुर्गदाधरो मे विदधातु सद्गतिम् ।।
(७.३१–४०)

ज्यांचे स्तवन देव करतात, जे क्षमेचे धाम आहेत, जे क्षुधाग्रस्त आर्तजनांच्या दुःखांना दूर करणारे आहेत, जे विशाल नावाच्या दैत्याच्या सेनेचे मर्दन करणारे आहेत, जे स्मरण करताच समस्त अशुभांचा विनाश करतात, अशा मंगलमय भगवान गदाधरांना मी प्रणाम करतो. जे पूर्वजांचे पूर्वज, पुराण पुरुष, स्वर्गलोकात पूजित, मनुष्यांचे एकमात्र आधार आहेत, ज्यांनी वामनावतार धारण करून दैत्यराज बलीच्या प्रभावापासून पृथ्वीचा उद्धार केला, अशा महाबलशाली, शुद्धस्वरूप,

भगवान गदाधरांना मी एकांतात नमस्कार करतो.

जे परम शुद्ध स्वरूपाचे आहेत, अनंत वैभवसंपन्न आहेत, लक्ष्मीने ज्यांना वरले आहे, अत्यंत निर्मल, विचारशील, पवित्र अंतःकरणाचे भूपाल ज्यांचे स्तवन करतात, अशा भगवान गदाधरांना जो प्रणाम करतो, तो या जगात सुखाने राहाण्याचा अधिकारी बनतो. देव, दानव ज्यांच्या चरणकमलांची अर्चना करतात. जे हार, केयूर, बाजूबंद व किरीट धारण करतात, जे समुद्रावर शयन करतात, अशा चक्रधारी भगवान गदाधरांची जे स्तुती करतात, त्यांना या जगात सुखपूर्वक राहाण्याचा अधिकार असतो.

जे भगवान अच्युत सत्ययुगात श्वेत, त्रेतात अरुण, द्वापरात पीत-वर्णाने अनुरंजित श्याम व कलियुगात भ्रमरासारख्या कृष्णवर्णाचा अवतार धारण करतात, त्या भगवान गदाधरांना जो प्रणाम करतो, तो जगात सुखपूर्वक निवास करतो. ज्यांच्यापासून सृष्टीचे बीजरूप चतुर्मुख ब्रह्मदेवांचे प्राकट्य झाले, जे विष्णुरूप धारण करून जगताचे पालन व त्याचा संहार करतात, अशा रीतीने ब्रह्मा, विष्णू आणि महेश, या तीन मूर्तींत विलसित होतात, त्या भगवान गदाधरांचा जय असो.

सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांचा संयोगच सृष्टीचे कारण आहे. पण या प्रकारे जे एक असूनही तीन रूपांत अभिव्यक्त होतात, ते भगवान गदाधर धर्म व मोक्ष यांच्या कामनेने अधीर झालेल्या मला धैर्य प्रदान करण्याची कृपा करोत. ज्या दयामय प्रभूंनी दुःखरूपी जलजंतू व मृत्युरूपी मगर यांच्या भयंकर आक्रमणांनी संसारसागरात थपडा खाऊन बुडू पाहाणाऱ्या माझ्यासारख्या दीनहीन प्राण्याचा विशाल जलस्रोत बनून उद्धार केला, अशा भगवान गदाधरांना मी प्रणाम करतो.

जे स्वतः महाकाशात घटाकाशाच्या व्याप्तीप्रमाणे आपणांकडूनच या तीन मूर्तींत अभिव्यक्त होतात, आपल्या मायाशक्तीचा आश्रय घेऊन जे या ब्रह्मांडाची रचना करतात, जे कमलासन ब्रह्मदेवांच्या रूपात प्रकट होतात, जे तेजस् आदी तत्त्वांची निर्मिती करतात, त्या गदाधर भगवा-नांना मी प्रणाम करतो. जे मत्स्यकूर्मादी अवतार धारण करून देवांचे

रक्षण करतात, या जगात ज्यांची ‘ वृषाकपि ’ या नावाने प्रसिद्धी आहे, ते यज्ञवराहरूपी भगवान गदाधर मला सद्‌गती प्रदान करोत.

## ३. गौरमुखकृत विष्णुस्तुती

नमोऽस्तु विष्णवे नित्यं नमस्ते पीतवाससे ।
नमस्ते चाद्यरूपाय नमस्ते जलरूपिणे ।।
नमस्ते सर्वसंस्थाय नमस्ते जलशायिने ।
नमस्ते क्षितिरूपाय नमस्ते तैजसात्मने ।।
नमस्ते वायुरूपाय नमस्ते व्योमरूपिणे ।
त्वं देवः सर्वभूतानां प्रभुस्त्वमसि हृच्छयः ।।
त्वमोंकारो वषट्कारः सर्वत्रैव च संस्थितः ।
त्वमदिः सर्वदेवानां तव चादिर्न विद्यते ।।
त्वं भूस्त्वं च भुवः स्वस्त्वं जनस्त्वं च महः स्मृतः ।
त्वं तपस्त्वं च सत्यं च त्वयि देव चराचरम् ।।
त्वत्तो भूतमिदं सर्वं विश्वं त्वत्तो ऋगादयः ।
त्वत्तः शास्त्राणि जातानि त्वत्तो यज्ञाः प्रतिष्ठिताः ।।
त्वत्तो वृक्षा वीरुधश्च त्वत्तः सर्वा वनौषधिः ।
पशवः पक्षिणः सर्पास्त्वत्त एव जनार्दन ।।
ममापि देवदेवेश राजा दुर्जयसंज्ञितः ।
आगतोऽभ्यागतस्तस्य चातिथ्यं कर्तुमुत्सहे ।।
तस्य मे निर्धनस्याय देवदेव जगत्पते ।
भक्तिनम्रस्य देवेश कुरुष्वान्नादिसंचयम् ।।
यं यं स्पृशामि हस्तेन यं च पश्यामि चक्षुषा ।
काष्ठं वा तृणकन्दं वा तत्तदन्नं चतुर्विधम् ।।
तथा त्वन्यतमं वापि यद्ध्यातं मनसा मया ।
तत्सर्वं सिद्ध्यतां मह्यं नमस्ते परमेश्वर ।।

(११.११–२१)

जे पीतांबर धारण करतात, जे आदिरूप आहेत, जे जलाच्या रूपात अभिव्यक्त होतात, अशा सनातन भगवान विष्णूंना माझा वारंवार नमस्कार असो. जे घटघटवासी आहेत, जे जलात शयन करतात, पृथ्वी, तेज, वायू व आकाश आदी महाभूते ज्यांचे स्वरूप आहे, त्या भगवान नारायणांना माझा वारंवार नमस्कार असो.

भगवन्, आपण सर्व प्राण्यांचे आराध्य आहात. आपण सर्वांच्या हृदयात स्थित आहात. अंतर्यामी परमात्म्याच्या रूपात आपण विराजमान आहात. आपणच ॐकार व वषट्कार आहात. प्रभो, आपली सत्ता सर्वत्र विद्यमान आहे. आपण समस्त देवांचे आदिकारण आहात. पण आपला आदी मात्र कोणताच नाही. भगवन्, भूः, भुवः, स्वर, जन, मह, तप, सत्य हे सर्व लोक आपणांतच स्थित आहेत. म्हणून चराचर जगत आपणांतच आश्रय घेते. आपणांपासून सर्व प्राणिसमुदाय, चारही वेद व सर्व शास्त्रे यांची उत्पत्ती झाली आहे. यज्ञही आपणांतच प्रतिष्ठित आहे.

जनार्दना, झाडे-झुडपे, वनौषधी, पशुपक्षी, सर्प; या सर्वांची उत्पत्ती आपणांपासूनच झाली आहे. देवेश्वरा, हा दुर्जय नावाचा राजा माझ्या येथे अतिथिरूपाने आला आहे. मी त्याचा आदरसत्कार करण्याची इच्छा करीत आहे. भगवन्, आपण देवांचेही आराध्य आहात. जगताचे स्वामी आहात. मी नितांत निर्धन आहे. तरीही मी भक्ती व विनय यांनी पूर्ण अशी आपली प्रार्थना करतो की, आपण माझ्या येथे अन्नादी भोज्य पदार्थांचा संचय करावा. मी आपल्या हाताने ज्या ज्या वस्तूस स्पर्श करीन, डोळ्याने जी जी वस्तू पाहीन, ती काष्ठाची, तृणाची का असेना, पण तीपासून तत्काल चार प्रकारचे सुपक्व अन्नाच्या रूपात परिणत व्हावी. परमेश्वरा, आपणांस माझा नमस्कार असो. भगवन्, याखेरीज मी जरी दुसऱ्या कोणत्या तरी पदार्थाचे मनात चिंतन करीन, तरी तो पदार्थ आपण प्रस्तुत उपलब्ध करून द्यावा, अशी प्रार्थना आहे.

# ४. गौरमुखकृत दशावतारस्तोत्र

स्तोष्ये महेन्द्रं रिपुदर्पहं शिवं नारायणं ब्रह्मविदां वरिष्ठम् ।
आदित्यचन्द्राश्वियुगस्थमाद्यं पुरातनं दैत्यहरं सदा हरिम् ॥
चकार मात्स्यं वपुरात्मनो यः पुरातनं वेदविनाशकाले ।
महामहीभृद्वपुरग्रपुच्छच्छटाहवार्चिचः सुरशत्रुहाद्यः ।
तथाब्धिमन्थानकृते गिरीन्द्रं दधार यः कौर्मवपुः पुराणम् ।
हितेच्छयाप्तः पुरुषः पुराणः प्रपातु मां दैत्यहरः सुरेशः ॥
महावराहः सततं पृथिव्यास्तलात्तलं प्राविशद् यो महात्मा ।
यज्ञाङ्गसंज्ञः सुरसिद्धसङ्गैः स पातु मां दैत्यहरः पुराणः ॥
नृसिंहरूपी च बभूव योऽसौ युगे युगे योगिवरोऽथ भीमः ।
करालवक्त्रः कनकाग्रवर्चा वराशयोऽस्मानसुरान्तकोऽव्यात् ॥
बलेर्मखध्वंसकृदप्रमेयो योगात्मको योगवपुःस्वरूपः ।
स दण्डकाष्ठाजिनलक्षणः क्षितिं योऽसौ महान् क्रान्तवान् नः
पुनातु ॥
त्रिःसप्तकृत्वो जगतीं जिगाय कृत्वा ददौ कश्यपाय प्रचण्डः ।
स जामदग्न्योऽभिजनस्य गोप्ता हिरण्यगर्भोऽसुरहा प्रपातु ॥
चतुष्प्रकारं च वपुर्य आद्यं हैरण्यगर्भप्रतिमानलक्ष्यम् ।
रामादिरूपैर्बहुरूपभेदं चकार सोऽस्मानसुरान्तकोऽव्यात् ॥
चाणूरकंसासुरदर्पभीतेर्भीतामराणामभयाय वेदः ।
युगे युगे वासुदेवो बभूव कल्पे भवत्यद्भुतरूपकारी ॥
युगे युगे कल्किनाम्ना महात्मा वर्णस्थितिः कर्तुमनेकरूपः ।
सनातनो ब्रह्ममयः पुरातनो गूढाशयोऽस्मानसुरान्तकोऽव्यात् ॥
न यस्य रूपं सुरसिद्धदैत्याः पश्यन्ति विज्ञानगतिं विहाय ।
अतो यमेनापि समर्चयन्ति मत्स्यादिरूपाणि चराणि सोऽव्यात् ॥

**नमो नमस्ते पुरुषोत्तमाय पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ।**
**नमो नमः कारणकारणाय नयस्व मां मुक्तिपदं नमस्ते ।।**

(१५.९–२०)

जे शत्रूंचा दर्प दूर करणारे आहेत, ब्रह्मवेत्त्यांत श्रेष्ठ आहेत, जे सूर्य, चंद्र, अश्विनीकुमाररूपांत प्रतिष्ठित आहेत, युगात स्थित, परम-पुराण, आदिपुरुष, सदा विराजमान आणि जे देवाधिदेव भगवान नारायण या नावाने विख्यात आहेत, त्या मंगलमय श्रीहरींची आता मी स्तुती करतो. प्राचीन काळी जेव्हा वेद नष्ट झाले होते, त्यावेळी या विशाल वसुंधरेचे भरणपोषण करणाऱ्या ज्या आदिपुरुषाने पर्वतासारख्या विशाल मत्स्याचे शरीर धारण केले होते, ज्याच्या पुच्छाच्या अग्रभागा-पासून चमकणारी तेजच्छटा विकीर्ण होत होती, त्या शत्रुसूदन भगवान श्रीहरींची मी स्तुस्ती करतो.

समुद्रमंथनाच्या निमित्ताने सर्वांचे हित करण्याच्या विचाराने कच्छपाचे रूप धारण करून ज्यांनी महान पर्वत मंदराचलास आश्रय दिला होता, ते दैत्यांचा संहार करणारे पुराणपुरुष भगवान श्रीहरी सर्व प्रकारांनी माझे रक्षण करोत. ज्या महापुरुषाने वराहरूप धारण करून रसातळात प्रवेश केला व तेथून ज्यांनी पृथ्वीचा उद्धार केला व ज्यांना देव व सिद्ध यांनी यज्ञपुरुष अशी संज्ञा दिली, ते असुरसंहर्ते, सनातन श्रीहरी माझे रक्षण करोत.

जे प्रत्येक युगात भयंकर नृसिंहरूपाने विराजमान होतात, ज्यांचे मुख अत्यंत भयावह आहे, कांती सुवर्णासारखी आहे, दैत्यांचे दलन करणे हाच ज्यांचा स्वाभाविक गुण आहे, ते योगिराज जगताचे परम आश्रयस्थान असून भगवान श्रीहरी माझे रक्षण करोत. ज्यांचे कोणतेच माप होत नाही. तरीसुद्धा वलीचा यज्ञ नष्ट करण्यासाठी ज्यांनी योग-बलाने दंड व मृगचर्म यांनी सुशोभित अशा वामनरूपात वाढून त्रैलोक्यात सामावून घेतले, असे परम प्रभू आमचे रक्षण करोत.

ज्यांनी परमपराक्रमी परशुरामांचे रूप धारण करून एकवीस वेळा सर्व भूमंडलावर विजय प्राप्त केला आणि तिला कश्यपांकडे सोपविले, जे सज्जनांचे रक्षक व असुरांचे संहारक आहेत, असे हिरण्य-

गर्भ भगवान श्रीहरी आमचे रक्षण करोत. हिरण्यगर्भ ही ज्यांची संज्ञा आहे, सर्वसाधारण जन ज्यांना पाहू शकत नाहीत, जे राम आदी रूपांनी चार प्रकारची शरीरे धारण करून राक्षसांचा नाश करतात, असे आदि-पुरुष भगवान श्रीहरी आमचे रक्षण करोत.

चाणूर व कंस हे नाम धारण केलेले दानव दर्पाने भरलेले होते. त्यांच्या भीतीने देवांच्या हृदयांत थरकाप झाला होता. त्यांना निर्भय करण्यासाठी जे प्रत्येक युगात व कल्पात वसुदेवपुत्र श्रीकृष्णांच्या रूपाने विराजतात, ते प्रभू आमचे रक्षण करोत. जे सनातन, ब्रह्ममय व महान पुरुष असूनही वर्णव्यवस्था करण्यासाठी प्रत्येक युगात कल्की या नावाने विख्यात होतात, देव, सिद्ध व दैत्य ज्यांचे रूप डोळ्यांनी पाहू शकत नाहीत, जे विज्ञानमार्गाचा त्याग करून यमनियम आदींचे प्रवर्तक बुद्ध-रूपाने पूजित होतात, जे मत्स्यादी अनेक रूपांनी विचारतात, ते भगवान श्रीहरी आमचे रक्षण करोत. भगवन्, आपण पुरुषोत्तम आहात. समस्त कारणांचे कारणही आपणच आहात. आपणांस माझे वारंवार नमस्कार असोत. प्रभो, आपण मला भुक्तिमुक्ती प्रदान करण्याची कृपा करावी.

## ५. देवगणकृत शिवस्तुती

नमो विषमनेत्राय नमस्ते त्र्यम्बकाय च ॥
नमः सहस्रनेत्राय नमस्ते शूलपाणये ।
नमः खट्वाङ्गहस्ताय नमस्ते दण्डधारिणे ॥

त्वं देव हुतभुग्ज्वालाकोटिभानुसमप्रभः ।
अदर्शने वयं देव मूढविज्ञानतोऽधुना ॥

नमस्त्रिनेत्रार्तिहराय शम्भो त्रिशूलपाणे विकृतास्यरूप ।
समस्तदेवेश्वर शुद्धभाव प्रसीद रुद्राच्युत सर्वभाव ॥

पूष्णोऽस्य दन्तान्तक भीमरूप प्रलम्बभोगीन्द्र मनोज्ञकण्ठ ।
विशालदेहाच्युत नीलकण्ठ प्रसीद विश्वेश्वर विश्वमूर्ते ॥

भगाक्ष्चिसंस्फोटनदक्षकर्मन् गृहाण भागं मखतः प्रधानम् ।
प्रसीद देवेश्वर नीलकण्ठ प्रपाहि नः सर्वगुणोपपन्न ।।
सिताङ्गरागाप्रतिपन्नमूर्ते कपालधारिंस्त्रिपुरघ्न देव ।
प्रसीद नः सर्वभयेषु चैवमुमापते पुष्करनालजन्म ।।
पश्यामि ते देहगतान् सुरेश सर्गाद्यनेकान् वेदवराननन्त ।
साङ्गान् सविद्यान् सपदक्रमांश्च सर्वानलांश्च त्वयि देवदेव ।।
भव शर्व महादेव पिनाकिन् रुद्र ते हर ।
नताः स्म सर्वे विश्वेश त्राहि नः परमेश्वर ।।

(२१.६९-७७)

भगवन्, आपण विषम नेत्रांचे त्र्यंवक आहात. आपणांस माझा वारंवार नमस्कार असो. आपणांस अनंत नेत्र आहेत. आपण हातात त्रिशूळ धारण करता. आपणांस वारंवार नमस्कार असो. खट्वांग व दंड धारण करणाऱ्या प्रभूंना माझा वारंवार नमस्कार असो. भगवन्, आपले रूप अग्नीच्या प्रचंड ज्वाला व कोटयवधी सूर्य यांच्या प्रमाणे कांतिमान आहे. प्रभो, आपले दर्शन न झाल्याने आम्ही जड विज्ञानाचा आश्रय घेतो व पशुत्वास जाऊन मिळतो.

त्रिशूलपाणे, तीन नेत्र आपली शोभा वाढवितात. आर्तजनांचे दुःख दूर करणे, हा आपला स्वभाव आहे. आपण विकृत मुख व आकृती बनविता. सर्व देव आपले शासनवर्ती आहेत. आपण परम शुद्धस्वरूप, सर्वांचे रुद्र व अच्युत या नावांनी प्रसिद्ध आहात. आपण प्रसन्न व्हावे. या पूषाचे दात आपल्या हातून भग्न झाले आहेत. आपले रूप भयावह आहे. बृहत्काय वासुकिनागास धारण केल्याने आपला कंठदेश अत्यंत मनोरम प्रतीत होतो आहे. अच्युता, आपण विशाल शरीराचे आहात. आम्हां देवांवर अनुग्रह करण्यासाठी आपण कालकूट नावाच्या विषाचे पान केले आहे. म्हणून आपला कंठभाग नीलवर्णाचा झाला आहे.

सर्वलोकमहेश्वर, विश्वमूर्ते, आपण आमच्यावर प्रसन्न होण्याची

कृपा करावी. भगाचे नेत्र नष्ट करण्यात पटू असणाऱ्या देवेश्वरा, आपण या यज्ञाचा प्रधान भाग स्वीकारून कृपा करावी. नीलकंठा, आपण सर्व गुणांनी संपन्न आहात. प्रभो, आपण प्रसन्न व्हावे. आमचे रक्षण करावे. भगवन्, आपले स्वत:सिद्ध स्वरूप गौरवर्णाने शोभा पावत आहे. कपाली, त्रिपुरारी, उमापती; अशी आपली तीन नावे आहेत. पद्मयोनी ब्रह्मदेवांपासून प्रकट होणाऱ्या भगवाना, आपण सर्व भयांपासून आमचे रक्षण करावे. देवेश्वरा, आपल्या मूर्तीच्या अंतर्गत आम्ही अनेक सर्ग व अंगांसहित संपूर्ण वेद, विद्या, उपनिषदे आणि सर्व अग्नी पाहात आहोत. परम प्रभो, भव, शर्व, महादेव, पिनाकी, हर व रुद्र; ही सर्व आपलीच नावे आहेत. विश्वेश्वरा, आम्ही आपणांस वारंवार प्रणाम करतो. आपण आमचे रक्षण करावे.

## ८. पापनाशनस्तोत्र

गावः पवित्रा मङ्गल्या देवानामपि देवताः ।
यस्ताः शुश्रूषते भक्त्या स पापेभ्यः प्रमुच्यते ॥
सौम्ये मुहूर्ते संयुक्ते पञ्चगव्यं तु यः पिबेत् ।
यावज्जीवं कृतात् पापात् तत्क्षणादेव मुच्यते ॥
लाङ्गूलेनोद्धृतं तोयं मूर्ध्ना गृह्णाति यो नरः ।
सर्वतीर्थफलं प्राप्य स पापेभ्यः प्रमुच्यते ॥
ब्राह्मणस्तु सदा स्नातो भक्त्या परमया युतः ।
नमस्येत् प्रयतो भूत्वा स पापेभ्यः प्रमुच्यते ॥
उदयान्निःसृतं सूर्यं भक्त्या परमया युतः ।
नमस्येत् प्रयतो भूत्वा स पापेभ्यः प्रमुच्यते ॥
दध्यक्षताञ्जलीभिस्तु त्रिभिः पूजयते शुचिः ।
तस्य भानुः संदह्य दूरीकुर्यात् सदा द्विज ॥
यावकं दधिमिश्रं तु पात्रे औदुम्बरे स्थितम् ।
सोमाय पौर्णमास्यां हि दत्त्वा पापैः प्रमुच्यते ॥

अरुंधतीं बुधं चैव तथा सर्वान् महामुनीन् ।
अभ्यचर्य वेदविधिना तेभ्यो दत्त्वा च यावकम् ।।
द्विजं शुश्रूषते यस्तु तर्पयित्वातिभक्तितः ।
नमस्येत् प्रयतो भूत्वा स पापेभ्यः प्रमुच्यते ।।
विषुवेषु च योगेषु शुचिर्दत्त्वा पयो नरः ।
तस्य जन्मकृतं पापं तत्क्षणादेव नश्यति ।।
दक्षिणावर्तसव्येन कृत्वा प्राक्स्रोतसं नदीम् ।
कृत्वाभिषेकं विधिवत् ततः पापात् प्रमुच्यते ।।
दक्षिणावर्तशङ्खेन कृत्वा चैव करे जलम् ।
शिरसा तद् गृहीत्वा तु विप्रो हृष्टमनाः शुचिः ।।
तस्य जन्मकृतं पापं तत्क्षणादेव नश्यति ।
प्राक्स्रोतसं नदीं गत्वा नाभिमात्रजले स्थितः
स्नात्वा कृष्णतिलैर्मिश्रा दद्यात् सप्ताञ्जलीर्नरः ।
प्राणायामत्रयं कृत्वा ब्रह्मचारी जितेन्द्रियः ।।
यावज्जीवकृतं पापं तत्क्षणादेव नश्यति ।
अच्छिद्रपद्मपत्रेण सर्वरत्नोदकेन तु ।।
त्रिधा यस्तु नरः स्नायात् सर्वपापैः प्रमुच्यते ।

(२११.८–११, १३, १८)

गायींचा महिमा फार मोठा आहे. त्या परम पवित्र, मंगलमयी व देवतांच्याही देवता आहेत. त्यांची सेवा करणारा मनुष्य पापांपासून मुक्त होतो. शुभ मुहूर्तावर त्यांचे पंचगव्य प्राशन केल्याने मनुष्य तत्काळ पापांतून मुक्त होतो. त्यांच्या शेपटातून गळणारे जलबिंदू जो डोक्यावर घेतो, तो धन्य होय. त्यांना प्रणाम करणाराही सर्व तीर्थांचे फल प्राप्त करून सर्व पापांपासून मुक्त होतो. म्हणून सर्वसाधारणपणे गायींची सेवा अवश्य करावी.

उदयकालीन सूर्य, अरुंधती, वुध आणि सप्तर्षी यांची वैदिक विधीस अनुसरून पूजा करावी. दह्यात मिसळलेली अक्षता त्यांना

समर्पित करावी. एकाग्रचित्ताने हात जोडून जो मनुष्य त्यांना प्रणाम करतो, त्याची सर्व पापे त्याच क्षणी अवश्य नष्ट होतात. जी शूद्र व्यक्ती ब्राह्मणाची सेवा करते, त्याला तृप्त करते, भक्तीने त्याला प्रणाम करते, ती शीघ्र पापांतून मुक्त होते. विषुवयोगात म्हणजे ज्या दिवशी दिवस व रात्र यांचे मान सारखेच असते, अशा पवित्र दिवशी जो दुधाचे दान करतो, त्याचे जन्मभर केलेले पातक नष्ट होते.

जो मनुष्य पूर्वाग्र कुशा अंथरून त्यांवर वृषभास उभे करून दान देतो आणि ब्राह्मणांना बरोबर घेऊन त्याला प्रणाम करतो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो. पूर्वेस वाहाणाऱ्या नदीस सव्य होऊन प्रदक्षिणा-क्रमाने विधिवत अभिषेक करण्याने मनुष्य पापमुक्त होतो. जो ब्राह्मण पवित्र होऊन प्रसन्नतापूर्वक दक्षिणावर्त शंखांचे जल हातात घेऊन ते शिरावर धारण करतो, त्याचे जन्मभरची पापे त्याच क्षणी नष्ट होतात.

ब्रह्मचारी मनुष्याचे कर्तव्य आहे की, त्याने पूर्वेकडे वाहाणाऱ्या नदीत नाभिमात्र जलात उभे राहून स्नान करावे. नंतर काळ्या तिळांनी मिश्रित सात अंजली जलाने तर्पण करावे. तीनदा प्राणायाम करावा. फलस्वरूप असे की, त्याची जन्मभरची पापे त्याच क्षणी नष्ट होतात. जो मनुष्य कमलाच्या छिद्ररहित पानांत जल ठेवून सर्व रत्नांसह तीनदा स्नान करतो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो.

## ७. मंगलकामना व शांतिपाठ

शरणं त्वां गतो नाथ संसारार्णवतारक।
दिशः पश्य अधः पश्य व्याधिभ्यो रक्ष नित्यशः ।
प्रसीद स्वस्य राष्ट्रस्य राज्ञः सर्वबलस्य च ॥
गर्भिणीनां च वृद्धानां व्रीहीणां च गवां तथा ।
ब्राह्मणानां च सततं शान्तिं कुरु शुभं कुरु ॥
अन्नं कुरु सुवृष्टिं च सुभिक्षमभयं तथा ।
राष्ट्रं प्रवर्द्धतु विभो शान्तिर्भवतु नित्यशः ॥

**देवानां ब्राह्मणानां च भक्तानां कन्यकासु च।**
**पशूनां सर्वभूतानां शान्तिर्भवतु नित्यशः ।।**

(१९२.८, ९, १२)

संसारसागरातून उद्धार करणाऱ्या प्रभो, आम्ही आपणांस शरण आलो आहोत. आपण प्रसन्न व्हावे. आपली दिव्य रक्षादृष्टी चतुर्दिक् बनली आहे. आधिव्याधींपासून आपण आमचे रक्षण सदैव करता. आमचे राष्ट्र, शासन, त्रिविध प्रकारचे सैन्यबल यांवर आपली विजयिनी वरददृष्टी सतत असावी. गायी, गर्भिणी स्त्रिया, वृद्धजन, अशक्त, दीनहीन, विद्वान ब्राह्मण, यांवर आपली शुभ, अनुग्रहदृष्टी सतत असावी. आपण यांच्यावर प्रसन्न असावे. आमच्या देशातील धन-धान्य समृद्ध करावे. आपण सर्वत्र सुवृष्टी करावी. पर्याप्त अन्न व सुभिक्ष यांना प्रदान करावे. आमची अन्नभंडारे भरावीत. सर्वतः अभय-दान असावे, विभो, आपण आमच्या राष्ट्राचे संवर्धन करावे. सर्वत्र विश्वात शुभशांती पसरावी. देव, ब्राह्मण, भक्त, संतमहात्मे, कन्या, पशुपक्षी आणि समस्त जीव सदैव शांती प्राप्त करून घेवोत. सर्वत्र सर्वजण सुखाने, समाधानाने नांदावेत.

